# हरि नारायण आपटे

( चरित्र व वाङ्मयविवेचन )

कु. वेणूबाई पानसे, एम्. ए., बी. टी.

सन १९३१ ]  पुणें  [ किं. ६ रुपये

# प्रस्तावना

कै. हरिभाऊ आपटे यांनीं पूर्वी ठरल्याप्रमाणें आपलें आत्मचरित्र लिहिलें असतें तर हें अशा प्रकारचें चरित्र लिहिण्याची आवश्यकताच नव्हती. या आत्मचरित्रास त्यांनीं सुरुवातही केली होती व त्याचा कांहीं भाग त्यांच्या स्नेह्यांनीं पाहिलाही होता. तें चरित्र शेवटीं अपूर्णच राहिलें, एवढेंच नव्हे, तर त्या चारित्राचीं लिहिलेलीं प्रकरणेंही गहाळ झालीं अथवा रद्दींत गेलीं, असें म्हणतात.

'माझें चरित्र मी लिहून ठेवणार आहें; त्यांत तुम्ही सारेजण याल.' असे उद्गार हरिभाऊ त्यांच्या पत्नी रमाबाई व इतर नातेवाईक यांच्यापाशीं वारंवार काढीत. यावरून हरिभाऊंची चरित्रविषयक कल्पना वाचकांच्या ध्यानीं येईल. त्यांच्या आयुष्याशीं ज्यांचा ज्यांचा अत्यंत निकट संबंध आला होता त्यांची त्यांची माहिती त्यांत यावयाची होती; आणि याच दृष्टीनें या चरित्रांत हरिभाऊंच्या खाजगी व सार्वजनिक आयुष्यांतील गोष्टी लिहिल्या आहेत.

हरिभाऊंचा व माझे वडील ती. नानासाहेब यांचा निकट स्नेहसंबंध होता; आणि हरिभाऊंना मुलींच्या शिक्षणाची अत्यंत हौस होती. त्यामुळें ते वारंवार लहानपणीं मला पुस्तकें वाचावयास देत. 'माझ्या घरीं चल म्हणजे मी तुझी सारी वाचनाची हौस पुरवितों.' असें ते मला नेहमी म्हणत. हरिभाऊंच्या 'करमणूक' पत्रामुळें व कादंबऱ्यांमुळें मला वाचनाची गोडी लागली. त्यांनीं आपल्या आयुष्यभर स्त्रियांच्या उन्नतीप्रीत्यर्थ फार परिश्रम केले, म्हणून कृतज्ञताबुद्धीनें तरी हरिभाऊंचें चारित्र स्त्रीनेंच लिहिण्यांत औचित्य आहे असें वाटून मी हें कार्य हातीं घेतलें. त्यांची कन्या कै. शान्ताबाई हयात असती तर तिनें हें चरित्र लिहून वडिलांचें ऋण फेडलें असतें. ताई नाहीं तर नाहीं, परंतु एखाद्या मित्रकन्येनें तरी हरिभाऊंचें चरित्र लिहावें, अशी हरिभाऊंच्या पत्नी रमाबाई यांनीं आपली इच्छा प्रगट केली. धर्मकन्या या नात्यानें हरिभाऊंचें चारित्र लिहिणें हें आपलें कर्तव्यच आहे, असा विचार मनांत येऊन ती. रमाबाई यांची इच्छा अमान्य करणें मला बरें वाटेना. त्यांची आज्ञा म्हणूनच या कार्याचा मीं अंगिकार केला.

खरें पाहिलें असतां श्री. काशीताई कानिटकर यांनींच हरिभाऊंचें विस्तृत चरित्र लिहावयास पाहिजे होतें. जो कोणी अगोदर जाईल त्याचें चरित्र दुसऱ्यानें

लिहावें असा त्यांचा व हरिभाऊंचा करार ठरला होता. परंतु वार्धक्यामुळें व इतर कौटुंबिक संकटांमुळें त्या हरिभाऊंचें विस्तृत चरित्र लिहूं शकल्या नाहींत. विविधज्ञानविस्तारांत लहानसें, परंतु चटकदार चरित्र लिहून त्यांनीं हरिभाऊंना दिलेलें वचन अंशतः पार पाडलें आहे.

हरिभाऊंचे स्नेही श्री. बापूराव आंबेकर यांनीं हरिभाऊंचें एक चरित्र लिहिलें आहे. परंतु तें संक्षिप्त असल्यानें हरिभाऊंच्या चरित्राविषयींची वाचकांची जिज्ञासा त्यानें तृप्त होत नाहीं. श्री. वाग्भट नारायण देशपांडे व श्री. नि. म. केळकर, आर्टिस्ट, हे दोघेही हरिभाऊंचें चरित्र लिहिणार आहेत असें ऐकतें. श्री. नि. म. केळकर यांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक हरिभाऊंच्या चरित्राचें साहित्य जमा केलें आहे असें समजतें; परंतु त्यांचें चरित्र अद्यापि प्रसिद्ध न झाल्यामुळें विस्तृत चरित्राची आवश्यकता कायमच आहे.

ग्रंथकाराचें खाजगी चरित्र फार महत्त्वाचें असतें. त्याचे ग्रंथ व त्याचें जविन यांचा आत्यंतिक संबंध असतो. या कारणास्तव हरिभाऊंच्या कौटुंबिक जीवनास मीं या चरित्रांत प्राधान्य दिलें आहे.

कालानुक्रमानेंच केवळ चरित्र लिहीत गेल्यास महत्त्वाच्या प्रसंगांचें एकत्रित चित्र पहावयास न मिळाल्यामुळें मनावर नीट ठसा उमटत नाहीं. कालानुक्रमानुसार आयुष्यांतील प्रसंग कसे व केव्हां घडले तें मात्र कळतें. म्हणून कालानुक्रमानुसारच परंतु महत्त्वाचे कालखंड करून त्यांतील माहिती संकलित रीतीनें तेवढ्यापुरती एकत्र देण्याचा मीं प्रयत्न केला आहे, यामुळें क्वचित् द्विरुक्ति झाली असली तरी चरित्रांतील विविध प्रसंगांचे ठसे मनावर स्पष्ट उमटतील असा भरंवसा वाटतो.

चरित्रकार सर्वस्वीं परावलंबी असतो. दुसऱ्यांकडून मिळेल तेवढी माहिती मिळवून चरित्राचें साहित्य त्यास जमा करावें लागतें. तशांत माहिती देणारांनीं परिश्रमपूर्वक दिलेली सर्वच माहिती उपयोगांत आणतां येते असें नाहीं. त्यामुळें आपण दिलेली माहिती चरित्रांत आली नाहीं, असें समजल्यावर त्यांचा चरित्रकारांवर रोष होण्याचा संभव असतो. परंतु त्यास नाइलाज आहे. कारण उपलब्ध झालेल्या साहित्यांतील सत्यासत्य, औचित्य-अनौचित्य इत्यादिकांचा निर्णय चरित्रकारास करावाच लागतो. म्हणून ज्यांची माहिती या चरित्रांत आली नसेल त्यांनीं ती सकारण आली नसेल असें समजून रागावूं नये. माझें राहणें पुण्यापासून फार दूर झाल्यानें माहिती

मिळविण्याचें काम अत्यंत कष्टाचें झालें. या कामीं अनेकांचें साहाय्य मला झालें आहे. त्या सर्वांचा येथें निर्देश करणें शक्य नसलें तरी कांहीं व्यक्तींचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें जरूर आहे.

या चरित्रांतील बरीचशी माहिती ती. रमाबाई यांनींच मला दिली. त्यांनीं परिश्रमपूर्वक पुरविलेल्या माहितीमुळें व बारंवार दिलेल्या उत्तेजनामुळेंच हें चरित्र लिहून झालें. तेव्हां या चरित्राचें सारें श्रेय त्यांनाच आहे. माझ्यासाठीं त्यांनीं अतिशय प्रेमानें जो त्रास सोसला त्याबद्दल मी त्यांची अत्यंत ऋणी आहें.

तसेंच श्री. रा. ग. हर्षे यांनीं हरिभाऊंच्या कादंबऱ्यांवर समीक्षणात्मक प्रबंध लिहिण्यासाठीं जमा केलेली चारित्रविषयक माहिती मीं मागतांक्षणींच माझ्या उपयोगासाठीं मला दिली व वेळोवेळीं अत्यंत उपयुक्त सूचना करून, माझें राहणें परगांवीं असल्यामुळें या चरित्राचीं मुद्रितें तपासण्याचें वगैरे किचकट व कंटाळवाणें काम पत्करलें याबद्दल त्यांचीही मी फार आभारी आहें.

हरिभाऊंचें जन्मस्थान आजपर्यंत कोणासच माहीत नव्हतें, परंतु त्यांची मामेभावजय श्री. अन्नपूर्णाबाई परांजपे यांच्याकडून अगदीं अकल्पित रीतीनें हरिभाऊंच्या जन्माचें स्थान मला कळलें. ही अत्यंत महत्त्वाची माहिती दिल्याबद्दल श्री. अन्नपूर्णाबाई यांचे आभार अवश्य मानले पाहिजेत.

श्री. काशीताई कानिटकर यांनीं परगांवाहून येथें येऊन चरित्राचा बराचसा भाग वाचून पाहिला व महत्त्वाच्या सूचना करून मला उत्तेजन दिलें याबद्दल त्यांचे जितके आभार मानावेत तितके थोडेच होतील. हरिभाऊंच्या पूर्ववयांतील खाजगी माहिती त्यांना जितकी आहे तितकी दुसरी कोणासच नसल्यामुळें त्यांच्या डोळ्यांखालून हें चरित्र जाणें अवश्य होतें.

त्याचप्रमाणें इतर अनेक ऋणानुबंधी सद्‌गृहस्थांनी मला नानाप्रकारची माहिती पुरविली, याबद्दल मी त्यांचेही आभार मानतें. माझे वडील ती. नानासाहेब यांनीं प्रकृति बरी नसतांही महत्त्वाची माहिती देऊन चरित्राचीं बहुतेक प्रकरणें वाचून पाहिलीं, त्याचप्रमाणें माझ्या भगिनींनीं सूची वगैरे करण्याच्या व माहिती लिहून घेण्याच्या कामीं मला फार मदत केली. परंतु घरच्याच मंडळींचे औपचारिक आभार कशाला मानावयास पाहिजेत !

हरिभाऊंचें चरित्र यथातथ्य व निर्दोष लिहिलें जावें याबद्दल मी यथामति प्रयत्न केला असून निरनिराळ्या व्यक्तींकडून मिळालेल्या माहितीचा अन्यत्र

पडताळा पाहूनच स्वीकार केला आहे. तथापि आपल्या इकडे चरित्राचीं साधनेंच अत्यंत तुटपुंजीं असतात; बहुतेक भिस्त वृद्ध समकालीनांच्या स्मरणशक्तीवरच ठेवावी लागते; अशी वस्तुस्थिति असल्यामुळें अत्यंत दक्षता घेऊनही गैरसमजुतीनें कांहीं चुका झाल्या व त्या तशाच राहून गेल्याचें चरित्र पूर्णपणें छापून तयार झाल्यावर निदर्शनास आलें. तथापि कळलेल्या चुकांची दुरुस्ती करण्याकरितां दुसऱ्या आवृत्तीपर्यंत न थांबतां प्रस्तावनेंत कां होईना पण त्यांचा उल्लेख करणें जरूर आहे असें मला वाटतें. कारण चरित्राची योग्यता ही त्याच्या विश्वसनीयतेवरच अधिक अवलंबून असल्यानें कांहीं झालें तरी चुक्यांची तावडतोब दुरुस्ती करणेंच अधिक श्रेयस्कर होय.

( १ ) पृष्ठ २ वर २२ व्या ओळींत ‘ गणपतराव परांजपे मामलेदार ’ असा उल्लेख आलेला आहे. गणपतराव परांजपे हे मामलेदार म्हणूनच फार प्रसिद्ध असल्यामुळें त्यांच्यासंबंधीं माहिती असणारांनीं त्याच उपाधीसह त्यांच्या नांवाची माहिती सांगतांना वारंवार उल्लेख केला. त्यामुळें पूर्वापर संबंध ध्यानांत आला नाहीं. वस्तुतः गणपतराव परांजपे हे नानासाहेबांचें लग्न झालें त्या वेळीं चिमणाजी-पंतांप्रमाणेंच महालकरी होते व हरिभाऊंच्या जन्माच्या वेळेपर्यंतही ते महालकरीच राहिले ही गोष्ट त्या वेळीं त्यांचें बिऱ्हाड पारोळ्यास होतें यावरून उघड दिसतें. कारण पारोळें हा अगदीं प्रारंभापासून पेट्याचा गांव आहे असें बॉंबे गॅझेटिअर-वरून समजतें व पेट्याच्या प्रमुख जमाबंदी अधिकाऱ्यासच महालकरी म्हणतात. या दुरुस्तीनें चरित्रविवेचनांत कांहीं विशेष फरक पडत नाहीं. पूर्वीपासूनच परांजपे मंडळी श्रीमंत होती. अर्थात् त्यांच्या येथलि लग्नाच्या थाटाचें पृष्ठ ३ वर जें वर्णन आलें आहे तें खरेंच आहे. ‘ फक्त मामलेदाराची बरोबरी कारकून कशी करणार ? ’ हें वाक्य अस्थानीं पडल्यासारखें झालें इतकेंच काय तें !

( २ ) पृष्ठें २८-२९ मध्यें हरिभाऊंच्या हायस्कुलांतील शिक्षकांची माहिती दिली आहे. तिच्यावरून प्रो. जिन्सीवाले व चिपळूणकर हे समकालीन शिक्षक असल्याबद्दलचा समज होण्याचा कदाचित् संभव आहे. वस्तुस्थिति तशी नव्हती. शास्त्रीबोवा रत्नागिरीस बदलून गेल्यावर जिनसीवाले हे कांहीं दिवसांकरितां शिक्षक म्हणून आले.

( ३ ) पृष्ठ ३० वर हरिभाऊंच्या खोड्यांचें वर्णन आलें आहे. कृष्णशास्त्री व हरिभाऊ यांच्याबद्दलचा तेथें वर्णिलेला प्रसंग हरिभाऊ १४ वर्षांचे असतांना झालेला

नसून तो लहानपणचा म्हणजे ते मुंबईस असतानाचा आहे असें कांहीं म्हणतात. त्याचप्रमाणें पोत्यांत भरलेल्या जुन्या पुस्तकांचीही गोष्ट मुंबईचीच आहे असें सांगतात. अर्थात् अशा गोष्टींत जुन्या वृद्ध गृहस्थांची परस्परविरोधी माहिती मिळाल्यास त्याबद्दल निश्चयात्मक निर्णय करणें त्रयस्थास कठिण आहे, म्हणून दोन्ही गोष्टी वाचकांच्या समोर मांडल्या आहेत.

( ४ ) पृष्ठ १०५ वरील आरसे महालांतील सभा फक्त स्त्रियां करितांच होती. परंतु या ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें हरिभाऊ व त्यांचे मित्र सपत्नीक सभांस जात ही गोष्ट खरीच आहे.

( ५ ) ग्रामण्य प्रकरणांत श्रीशंकराचार्य समक्ष उपस्थित नव्हते. त्यांच्या तर्फे एक प्रातिनिधि आले होते. ( पृष्ठ ११५ पहा ).

( ६ ) पृष्ठ ११६ वर ओळ २४ मध्यें ‘ दुसऱ्या ’ च्या ऐवजीं ‘ तिसऱ्या ’ व ओळ २५ मधील ‘ तिसऱ्या ’ च्या ऐवजीं ‘ दुसऱ्या ’ असा फरक पाहिजे.

( ७ ) पृष्ठ २७९, ओळी १३–१४. ‘ लेडी नॉर्थकोट या गरीब अनाथ बायाबापड्यांना पैसे वांटीत असत. अशा कुटुंबांकडे हरिभाऊ त्यांना घेऊन जात,’ ‘ फंड जमा करण्यास हिंडत ’ हें बरोबर नाहीं.

येणेंप्रमाणें निदर्शनास आल्या त्या चुक्या दुरुस्त केल्या आहेत. यांखेरीज आणखी जे कांहीं दोष या पुस्तकांत आढळतील ते वाचकांनीं व अभिप्राय-लेखकांनीं जरूर दाखवावेत म्हणजे या पुस्तकाची द्वितीयावृत्ति काढण्याचा सुयोग आल्यास त्यांत ते अवश्य दुरुस्त करण्यांत येतील.

ही माझी प्रथम कृति वाचकांना पसंत पडेल अशी उमेद आहे.

पुणें शहर,
ता. १ ऑगस्ट १९३१ }

वेणूबाई पानसे

# अनुक्रमणिका

## प्रकरण पहिलें

# आपटे कुटुंब

मनुष्याचें खरें कर्तृत्व जगाच्या दृष्टोत्पत्तीस येण्यास अनेक गोष्टींची अपेक्षा असते. आनुवंशिक संस्कार, बाह्य परिस्थिति, नैसर्गिक गुणांची योग्य जोपासना, शिक्षण, द्रव्यसाहाय्य, गुणप्रकटीकरणास अनुकूल संधि इत्यादि नाना प्रकारच्या गोष्टींच्या मदतीवांचून मनुष्याची खरी योग्यता लोकांच्या निदर्शनास येऊं शकत नाहीं. पैकी आनुवंशिक संस्कारांस मानवी जीवितांत महत्त्वाचें स्थान आहे हें कोणाही अर्वाचीन पंडितास नाकबूल करतां येणार नाहीं. सनातन हिंदु धर्माचे अनुयायी तर आनुवंशिक संस्कारांस अत्यंत महत्त्व देतात; पण विसाव्या शतकांतील शास्त्रज्ञांचे नवीन शोधही याच गोष्टीचा पुरस्कार करणारे ठरले आहेत. बीजरूपानें कां होईना परंतु बापाचे, आजाचे, पणजाचे सुद्धां गुणावगुण मुलाच्या अंगीं उतरतात हा सिद्धांत वैद्यकशास्त्राच्या किंवा सुप्रजाजननशास्त्राच्या दृष्टीनेंही अगदीं खरा आहे. म्हणूनच चरित्रनायकाच्या पूर्वजांचा इतिहास कथन करणें हें चरित्रकाराचें आद्य कर्तव्य समजलें जातें.

या दृष्टीनें विचार करितां हरिभाऊंच्या अंगच्या गुणावगुणांचें योग्य महत्त्व लक्षांत येण्यासाठीं हरिभाऊंच्या पूर्वजांचा इतिहास कथन करणें अवश्य आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, हरिभाऊंच्या पूर्वजांची फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. आपटे घराण्याचा इतिहास प्रसिद्ध झाला असला तरी, त्यांत हरिभाऊंची कुळकथा अत्यंत संक्षिप्त स्वरूपांत आली आहे. ती इतकी त्रुटित आहे कीं, केवळ वंशावळीपलीकडे तिच्यापासून कसलाच अर्थबोध होत नाहीं. अशा स्थितींत जेवढी माहिती मिळाली तेवढ्यांतच समाधान मानून घेणें भाग आहे.

# हरि नारायण आपटे

हरिभाऊंचे आजोबा चिमणाजीपंत खानदेशांत नौकरीवर असले तरी त्यांचें वडिलार्जित घर पुण्यासच होतें. त्यांचे चुलते पुण्यास रहात. ते सरदार ढमढेरे यांचेकडे सरबागे म्हणून होते. सरदार ढमढेरे यांच्या बागांवर देखरेख करण्याचें काम त्यांजकडे असे. त्यामुळें आपट्यांना त्या वेळीं 'आपटे' न म्हणतां 'सरबागे'च म्हणत असत.

चिमणाजीपंत खानदेशीं महालकऱ्याच्या हुद्यावर होते. त्यांस नारायणराव ऊर्फ नानासाहेब, महादेवराव ऊर्फ अण्णासाहेब, गोविंदराव, विष्णुपंत ऊर्फ भाऊसाहेब असे चौघे पुत्र व मनूताई आणि बयाताई अशा दोघी कन्या मिळून एकंदर सहा अपत्यें होतीं. खानदेशांतील पाष्टें गांवच्या मराठे नामक कुलकर्ण्यांची कन्या बगूताई ही त्यांची पत्नी. बगूताईचें सासरचें नांव रखमाबाई होतें, तरी त्यांस सगळे बगूताईच म्हणत. बगूताई या स्वभावानें सरळ, सहनशील व घरप्रपंचांत अत्यंत दक्ष असत. चिमणाजीपंतांची सांपत्तिक स्थिति साधारण बऱ्यापैकीं होती. सामान्यतः एवढें म्हणतां येईल कीं, त्यांस कोणत्याही गोष्टीची ददात नसे.

सर्व भावंडांत मनूताई वडील होत्या. त्यांना सहावें वर्ष लागतांच चिमणाजीपंतांनीं त्यांचें मोठ्या हौसेनें लग्न केलें. पुण्याचे बाजीपंत ऊर्फ आबासाहेब पटवर्धन, वकील, यांचे चिरंजीव भास्करराव यांच्याशीं मनूताईचा विवाह झाला. शिक्षण बेताचेंच असल्यामुळें भास्करराव कोर्टात कारकुनी करीत.

नाना व अण्णा तेथेंच शाळेंत जात. दोघेही भाऊ बुद्धिमान् होते. पंधरा वर्षांचा नाना इंग्रजी पांचवींत व तेरा वर्षांचा अण्णा इंग्रजी चौथीच्या वर्गात होता. त्या काळच्या चालीप्रमाणें दोघेही मुलगे आतां लग्नाचे झाले होते. बाप हुद्देदार असल्यामुळें त्यांस मोठमोठ्या श्रीमंतांच्या मुली सांगून येऊं लागल्या. खानदेशांतील गणपतराव परांजपे, मामलेदार, यांची कन्या यमूताई नारायणरावांसाठीं पसंत करण्यांत आली. झालें! लग्न ठरलें. वऱ्हाडी मंडळी चिमणाजीपंतांच्या गांवीं जमली. भडगांवचे श्री. रामभाऊ विंझे हे परांजप्यांच्याकडे लग्नासाठीं पाहुणे म्हणून आले होते. त्यांची दहा वर्षांची कन्या विवाहास योग्य झाली होती व तिच्यासाठीं ते ठिकठिकाणीं स्थळें पहातही होते. अशा स्थितींत नवरदेवांचे धाकटे बंधु माधवराव त्यांच्या दृष्टीस पडतांच हेंच स्थळ आपल्या कन्येस योग्य आहे असें त्यांच्या मनानें घेतलें व परांजप्यांच्या मध्यस्थीनें त्यांनीं चिमणाजीपंतांकडे ही गोष्ट काढली.

मुलगी गोरीपान, नाकाडोळ्यांनीं उत्तम व तोंडावर देवीचे किंचित् वण असले तरी दिसण्यांत चांगली आहे, असें पाहून चिमणाजीपंतांनीं त्यांच्या विनंतीस रुकार दिला. इ. स. १८५९ सालीं आठ दिवसांच्या अंतरानें नारायणराव व माधवराव या दोघांचे लग्नसमारंभ थाटानें पार पडले. परांजपे मंडळी श्रीमंत असल्यानें त्यांनीं विहिणींचा मानपान वगैरे गोष्टी यथासांग केल्या. रामभाऊ विंझे कचेरींत कारकून होते! मामलेदाराची बरोबरी कारकून कशी करणार? परंतु आपल्या शक्तीप्रमाणें त्यांनींही सर्व कांहीं हौसेनें केलें. अर्थात् परांजप्यांच्या पुढें त्यांचें विशेष तेज पडलें नाहीं. परंतु एकंदरींत लग्नसमारंभ उत्तम रीतीनें पार पडून लक्ष्मी व पार्वती आपल्यांच्या घरांत आनंदानें व एकीनें नांदूं लागल्या.

अतिशय आनंदाचे प्रसंग घडल्यावर मागोमाग दुःख येतच असतें. आनंदाच्या मागें दुःखाची छाया नेहमींच असते. सुखदुःखांची जोडी कोणत्या पापामुळें मानवांच्या मागें परमेश्वरानें लावून दिली आहे न कळे! अत्यानंदांत मनुष्य रमून गेल्यावर त्याला आपलें विस्मरण होऊं नये, म्हणून तर परमेश्वरानें या विश्वांत दुःख निर्माण करून ठेविलें नसेल ना? या लग्नसमारंभानंतर एखादें वर्षच काय तें आनंदांत गेलें असेल, तोंच विघ्नसंतोषी दुष्ट काळानें आपली क्रूर नजर या सुखी कुटुंबा-वर टाकली व निर्दयपणानें झडप घालून गृहाचा आधारस्तंभ अशा चिमणाजीपंतांस ऐन पन्नाशींत एकाएकी हिरावून नेलें! बगूताईच्यावर दुःखाचा डोंगरच कोसळला! त्यांचें धैर्य खचलें! आपलीं सोन्यासारखीं सहा मुलें व दोघी सुना एवढ्या मोठ्या परिवाराचें पुढें कसें होणार अशी चिंता त्यांस येऊन पडली; कारण वडील चिरं-जीव नारायणराव त्या वेळी केवळ सतरा वर्षांचे होते. त्यांचें शिक्षणही अद्याप पूर्ण झालें नव्हतें; अशा स्थितींत ते कुटुंबपोषण कसें करूं शकणार?

महालकऱ्याला बऱ्यापैकीं पगार असला तरी कुटुंब मोठें असल्यामुळें चिमणाजी-पंतांजवळ फारशी शिल्लक नव्हतीच. त्यांतून दोन्ही मुलांचीं नुक्तींच लग्नें झालेलीं व सुनांच्या अंगावरही चालीरीतीचे सर्व दागिने घातलेले! तेव्हां नानासाहेबांचें शिक्षण पूर्ण होऊन त्यांस नौकरी लागेपर्यंत सर्व कुटुंबाच्या पोषणास आवश्यक इतका पैसा तर त्यांचेजवळ नव्हताच. अशा स्थितींत चिमणाजीपंतांच्या मृत्यूमुळें आपटे-कुटुंबास अत्यंत बिकट परिस्थिति प्राप्त झाली. तेव्हां आतां काय करावें असा पेंच बगूताईच्या पुढें येऊन पडला.

# हरि नारायण आपटे

त्यांचें माहेर खानदेशांतच पाष्टें येथें होतें हें मागें सांगितलेंच आहे. त्यांच्या घरची शेतीवाडीही चांगली असे. सावसावकारीमध्येंही थोडेंबहुत पैसे मिळत. यजमानांच्या मृत्यूनंतर स्वाभाविकपणेंच सर्व मुलाबाळांसह बगूताई माहेरीं पाष्ट्यास आल्या व आईनें अत्यंत आग्रह केल्यावरून वर्ष दोन वर्षेपर्यंत त्या तेथेंच राहिल्या. बगूताईस दोघे भाऊ व दोघी बहिणी अशीं एकंदर चार भावंडें होतीं. सर्व भावंडांत त्याच वडील होत्या. चिमाताई ऊर्फ चिमामावशी त्यांच्या पाठच्या. चिमाताईच्या खालीं एक बहीण होती ती बडोद्यास दिली होती. भिकाजीपंत व रामभाऊ असे दोघे भाऊ त्यांस होते.

चिमामावशींचें सासर पुण्यास साठये यांचेकडे होतें. त्यांचें सासरचें नांव जानकीबाई. त्यांच्या यजमानांस फिरतीची नौकरी असून पगार अगदींच बेताचा होता. चिमामावशींच्या विसाव्या वर्षींच त्यांचे यजमान स्वर्गस्थ झाले ! एकुलता एक मुलगा मृत्युमुखीं पडल्यानें चिमाताईची सासू विरक्त झाली व तिचें सर्व लक्ष देवाधर्माकडे लागलें. सरतेशेवटीं तर त्यांनीं रामदासी पंथाचा स्वीकार केला होता. यजमानांच्या मृत्यूनंतर चिमामावशी आपले मामेसासरे सोवनी यांच्या वाड्यांत खोली घेऊन राहिल्या होत्या. तेथेंच त्यांची जिवलग मैत्रीण ढमढेरीणबाई यांचे बंधु वेलणकर म्हणून होते ते रहात. ते एकमेकांस बहीण–भाऊ असें मानीत. वेलणकरांस दोन बायका होत्या. त्या परस्परांत भांडत. घरांत वडीलधारें कोणीच नसल्यानें त्यांना दाबांत ठेवणें कठीण झालें. तेव्हां मैत्रिणीच्या विनंतीवरून चिमामावशी मूळचा घरोबा असल्यामुळें वेलणकरांच्याकडेच राहूं लागल्या.

बगूताई मुलाबाळांसह पाष्ट्यास आल्या खऱ्या, परंतु मुलांच्या शिक्षणाची आबाळ होऊं लागली. खेडेगांवांत नानाअण्णांच्या शिक्षणाची कसली सोय होणार ! आपले मुलगे चांगले शिकून विद्वान् झाल्याशिवाय आपले पांग फिटणार नाहींत, हें त्यांच्या पूर्ण ध्यानांत आलें. तेव्हां शिक्षणासाठीं मुलांना पाठवावें कोठें हा प्रश्न रात्रंदिवस त्यांस टोचूं लागला. कोणत्याही गोष्टीकडे त्यांचें लक्ष म्हणून लागेना. पुण्यास शिक्षणाची उत्तम सोय आहे असें त्यांनीं ऐकिलें होतें. परंतु पुण्यास दोघां मुलांना ठेवून त्यांच्या शिक्षणाचा खर्च भागविण्याचें त्राण त्यांच्या अंगीं नव्हतें. नानाअण्णा यांस पाष्ट्यास निरुद्योगीपणानें राहणें मुळींच आवडेना. “आमची कांहीं तरी शिक्षणाची सोय कर,” असें ते एकसारखे बगूताईस म्हणूं लागले. शेवटीं

## शिक्षणासाठीं पुण्यास प्रयाण

“ चिमाताई पुण्यास असते, ती आपल्या मुलांची जबाबदारी घेईल काय ? ” असा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला. चिमाताईस त्याबद्दल विचारतांच त्यांनीं या बेतास तत्काळ रुकार दिला. त्यांना स्वतःला कांहीं मूलबाळ नसल्यामुळें आपल्या बहिणीच्या मुलांवर त्यांचा फार जीव असे. झालें ! पुण्यास जाण्याचा बेत ठरला ! नाना व अण्णा यांस अतिशय आनंद वाटूं लागला. नाना वडील असल्यामुळें त्यास स्वतःवरच्या जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. आपण आपल्या पायांवर उभें राहण्यास समर्थ नसल्यामुळें आपल्या आईस व लहान भावंडांस मामाच्या घरीं ठेवून जावें लागत आहे, या विचारानें त्यास खेद वाटल्यावांचून राहिला नाहीं.

बगूताईच्या अंतःकरणास आपल्या दोघां वडील पुत्रांना दूर पाठवितांना किती वेदना होत होत्या हें वर्णन करणें केवळ अशक्य आहे. चिमणाजीपंतांच्या वेळची स्थिति आठवून आठवून त्यांस दुःख होई. आपल्या सोन्यासारख्या मुलांना दूर परक्याच्या घरीं रहावयास पाठविण्याची कल्पना त्यांस दुःसह झाली. आणि खरोखरच परक्याच्या घरीं राहून विद्यासंपादन करण्याचें दुर्दैव ज्यांच्या नशिबीं आलें असेल त्यांचे क्लेश त्यांचें हृदयच जाणे ! परक्या घरीं मनमोकळेपणा कसा वाटणार ? लहानपणींच बालमनावर संकोचाचें आवरण पडल्यावर तीं आंतल्याआंत झुरतच राहणार ! शाळेंत जाण्याच्या वेळीं जेवावयाला मिळालें तर ठीक, नाहीं तर शाळेंत गुरुजींची बोलणीं व छडीचा मार सहन केला पाहिजे; घरीं आल्यावर घरांतील माणसें सांगतील तीं कामें मुकाट्यानें केलीं पाहिजेत; त्यांतून अभ्यासाला जो वेळ मिळेल तो खरा ! परक्या मुलांना प्रेमानें वागविणें सहृदय मनुष्याशिवाय इतरांस साधणें शक्य नाहीं. अशा हालअपेष्टांत विद्यासंपादन करून ज्यांनीं आपलें नांव अजरामर केलें असेल त्या थोर पुरुषांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच होईल. एकंदरींत काय, दारिद्र्याचे क्लेश सहन करणें ही मोठी अवघड गोष्ट होय !

नाना व अण्णा हे निदान आपल्या मावशीजवळ तरी राहणार होते, त्यामुळें कांहीं तरी बरें होतें. नाना व अण्णा यांनीं पुण्यास जाण्याची तयारी केली. अश्रुपूरित नेत्रांनीं बगूताईनीं त्यांस निरोप दिला. अशा रीतीनें इ. स. १८६१ सालीं म्हणजे चिमणाजीपंतांच्या मृत्यूनंतर जवळ जवळ वर्षानें, नानाअण्णांची जोडी विद्यासंपादनार्थ चिमामावशींच्या घरीं पुण्यास येऊन ठेपली.

चिमामावशी वेलणकरांच्या घरीं रहात होत्या हें मागें सांगितलेंच आहे. तेथेंच नाना व अण्णा राहिले. वेलणकरांची सांपत्तिक स्थिति अगदीं साधारण होती व चिमामावशींच्या जवळही विशेष पैसा नव्हता. अशा स्थितींत या बंधु-द्वयांचा भार त्यांजवर येऊन पडला. अर्थात् परक्याच्या घरीं राहण्यानें होणारे क्लेश थोड्या फार प्रमाणांत त्या दोघांनाही सहन करावे लागले. नाना व अण्णा या दोघांनींही सरकारी हायस्कुलांत आपलीं नांवें दाखल केलीं. दोघेही तीक्ष्ण बुद्धीचे, कष्टाळू व विनयशील असल्यानें सर्वांस त्यांच्याबद्दल सहानुभूति वाटे. अभ्यास संभाळून नाना दस्तऐवजांच्या नकला वगैरे करण्याचा उद्योग करी व फी-पुस्तकां-पुरते तरी थोडेबहुत पैसे कमावी. अण्णाही या कामीं त्यास मदत करी. दोघेही भाऊ आपल्या खऱ्या परिस्थितीची जाणीव ठेवून वागत. अशा रीतीनें पुण्यास मावशीच्या घरीं नानानें वर्ष सहा महिने कसेबसे काढले! परक्याच्या घरचें मिंधें अन्न त्यास गोड लागेनासें झालें. चिमामावशींवर दोघांचा सर्वतोपरी भार टाकणें, नानाच्या मानी स्वभावास बरें वाटेना. त्याचा स्वभाव संकोची असल्यामुळें अशा परावलंबी स्थितींत शिक्षण संपादन करण्यापेक्षां शिक्षण सोडून नौकरी करावी, असेच विचार त्याच्या डोक्यांत घोळूं लागले. कारण त्याचें शिक्षण पूर्ण होण्यास अजून किती तरी अवकाश होता! तेव्हां तो नुकताच इंग्रजी सहावींत गेला होता. अशा स्थितींत नौकरी तरी कशी मिळणार? हा विचार त्याला त्रास देई. परंतु दिवसेंदिवस शिक्षण सोडून नौकरी करण्याचा त्याचा विचार ठाम होत चालला.

त्याच सुमारास नाताळच्या सुटींत चिमणाजीपंतांचे भागवत या नांवाचे इन्दुरास असणारे स्नेही पुण्यास आले होते. चिमणाजीपंतांचा व त्यांचा विशेषच घरोबा असल्यामुळें नाना व अण्णा यांच्याबद्दल त्यांनीं येतांक्षणींच विचारपूस केली. चिमणाजीपंतांच्या कुटुंबाची खालावलेली स्थिति पाहून व नानानें नौकरी पतकरण्याची इच्छा व्यक्त केल्यावरून ते त्यास इ. स. १८६२ च्या जानेवारींत इन्दुरास घेऊन गेले. इन्दुरास भागवतांच्या मध्यस्थीनें नानानें प्रारंभीं दहा रुपये दरमहाची खाजगी नौकरी पतकरली. इतक्या लहान वयांत इन्दूरसारख्या दूरच्या ठिकाणीं जाऊन नानासाहेबांनीं दहा रुपयांची यःकश्चित नौकरी पतकरली, सर्व कुटुंबाच्या सौख्यासाठीं स्वतःच्या शिक्षणावर पाणी सोडलें व आपल्या महत्त्वा-कांक्षेस तिलांजलि दिली, या त्यांच्या उदार, निःस्वार्थी स्वभावाचें व स्वाभिमानी

वाण्याचें जेवढें कौतुक करावें तेवढें थोडेंच होईल. अगोदर कुटुंबांतील मंडळींच्या सौख्याचा विचार व नंतर स्वतःविषयींच्या, या त्यांच्या स्वार्थत्यागी वृत्तीनेंच त्यांना इन्दूरसारख्या परप्रांतीं ओढून नेलें. असो. या नौकरींत असतांना स्वतःच्या अंगच्या हुशारीनें, प्रामाणिकपणानें व मेहनतीनें त्यांची उत्तरोत्तर बढती होत गेली व अखेरीस जेव्हां त्यांनीं इन्दूर सोडलें तेव्हां त्यांस दरमहा तीस रुपये पगार मिळूं लागला होता. इन्दुरास त्यांनीं एकंदर तीन चार वर्षेंपर्यंत ही नौकरी केली. इन्दूरचा खर्च भागवून नानासाहेब आपल्या पगारांतून मधून मधून अण्णासाहेबांना पुण्यास पैसे पाठवीत.

इकडे चिमामावशी व वडील बंधु यांच्या मदतीनें माधवरावांचा शिक्षणक्रम सुरळीत चालू होता. बुद्धिमान् व अभ्यासी असल्यामुळें दर परीक्षेंत वर नंबर येऊन त्यांस शिष्यवृत्ति व पारितोषिकें मिळालीं. इ. स. १८६३ सालीं मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेंत उत्तम रीतीनें उत्तीर्ण होऊन त्यांनीं डेक्कन कॉलेजमध्यें आपलें नांव दाखल केलें. कॉलेजांत असतांना सुद्धां आपला अभ्यास संभाळून ते कुटुंबपोषणासाठीं शिकवण्या वगैरे करीत, हें लक्षांत घेतल्यास त्यांच्या यशाचें विशेष कौतुक वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

नानासाहेबांना इन्दुरास ही लहानशी नौकरी मिळाल्यावर कांहीं दिवसांनीं लक्ष्मीबाईस पाठच्याहून आणवून त्यांनीं स्वतंत्र बिऱ्हाड थाटलें व आपल्या नव्या संसारास प्रारंभ केला. भिकूमामांच्या पत्नी भागीरथीबाई मुद्दाम लक्ष्मीबाईच्या बरोबर नवा संसार मांडून द्यावयास गेल्या होत्या. नानासाहेब व लक्ष्मीबाई यांचे दिवस नवीन मिळालेल्या स्वातंत्र्यसुखांत आनंदांत चालले होते. दोघेही हौशी व तारुण्याच्या ऐन उमेदींत असल्यामुळें त्यांच्या सौख्यास पारावार नव्हता.

नानासाहेब दिसण्यांत देखणे असून त्यांचा गौर वर्ण, मध्यम बांधा व तेजस्वी नेत्र पाहणारांच्या मनांत त्यांजविषयीं आदर उत्पन्न करीत. त्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई ऊर्फ ताई ह्या रूपानें काळ्यासांवळ्याच होत्या. त्यांच्या तोंडावर देवीचे किंचित् वण होते; परंतु त्यांचें नाक तरतरीत असून डोळे तेजस्वी होत. ताई फार सरळ व साधी बायको होती. त्यांचा स्वभाव गरीब, मनमिळाऊ, शांत व प्रेमळ होता. त्यांना राग कसा तो माहीतच नव्हता. ताई स्वभावानें गरीब असल्या तरी अत्यंत मानी होत्या. सासऱ्याच्या अकालीं मृत्यूमुळें जरी एकदम दारिद्य आलें असलें

तरी सासरचा कमीपणा त्यांनीं माहेरीं कधींही दाखविला नाहीं. उलट माहेरच्या श्रीमंतीचा डौलही सासरच्या मंडळींपुढें मिरविला नाहीं. त्यांच्या अंगीं बिलकूल गर्व नव्हता. आपल्या जावेशीं—पार्वतीबाईशीं—तर त्या सख्ख्या बहिणीप्रमाणें वागत. माहेरच्या मंडळींनीं दिलेले दागदागिने वगैरे जिन्नस त्यांनीं एकटीनें कधींच वापरले नाहींत. आपल्याला मिळालेल्या उंची उंची चोळ्या व लुगडीं जावेला दिल्यावांचून त्यांस राहवत नसे. त्यांचे वडील गणपतराव परांजपे हेही मोठे प्रेमळ व करारी गृहस्थ होते. ताईच्यावर तर त्यांचें विशेषच प्रेम होतें. परंतु ताई इतक्या निस्पृह होत्या कीं, स्वतः होऊन त्यांनीं आपल्या वडिलांच्या जवळ कधीं कोणताही जिन्नस मागितला नाहीं. त्यांच्या निस्पृहतेची एक गोष्ट सांगतात ती अशीः——

एकदां त्या माहेरीं गेल्या असतां त्यांच्या वडिलांनीं त्यांच्या पुढें रुपयांची एक रास ओतली व म्हटलें, " ताई, यांतून तुला पाहिजेत तितके रुपये घे. " परंतु ताईनें, " मला कांहींच नकोत, " असें नम्रतेनें सांगितलें. गणपतराव त्यांस एकसारखा आग्रह करूं लागले, तेव्हां त्यांनीं त्या राशींतून फक्त एकच रुपया घेतला. त्या आपल्या यजमानांप्रमाणेंच स्वाभिमानी व बाणेदार होत्या. अशा सात्त्विक व सदाचरणी मातापितरांच्या पोटीं हरिभाऊंच्या सारखें रत्न निपजावें यांत कसलें नवल ?

पहिलीच खेप म्हणून ताई बाळंतपणास माहेरीं खानदेशांत गेल्या. त्या वेळीं गणपतराव पारोळ्यास होते. पारोळें मुक्कामीं परांजपे यांच्या घरीं मंगळवार मिति माघ वद्य अमावास्या, शके १७८५, (तारीख ८ मार्च, १८६४) रोजीं हरिभाऊंचा जन्म झाला. अमावास्येस जन्मलेलीं मुलें कीर्तिमान् होतात असें म्हणतात. हरिभाऊंच्या बाबतींत ज्योतिषशास्त्रांतील हा सिद्धान्त खरा ठरून हरिभाऊंचा कीर्तिपरिमल महाराष्ट्रांत दरवळून राहिला.

नातू झाल्याचें वृत्त कळतांच बगूताई व चिमामावशी यांस अत्यानंद झाला. परांजपे मंडळींनाही ताई माहेरीं आल्यासारखी पहिल्याच वेळीं मुलगा झाला म्हणून फार समाधान वाटलें. पुत्रजन्माच्या महोत्सवप्रसंगीं सर्व आप्तजनांस आनंद वाटतो व तो उत्सव मोठ्या समारंभानें साजरा करण्यांत येतो हें योग्यच आहे. कुलाची कीर्ति वाढविणाऱ्या सुपुत्राचें अन्तःकरणपूर्वक कोण स्वागत करणार नाहीं ! कुलदीपक पुत्र होणें ही अपूर्व भाग्याची व आम्हा हिंदु लोकांच्या समजुतीनें पूर्वसंचिताची किंवा दैवयोगाची गोष्ट होय. असो.

## नांव बदललें

बारसें थाटांत होऊन मुलाचें नांव बालकृष्ण ठेविलें. हिंदु स्त्रियांना बालकृष्णा-इतका कोणता देव प्रिय आहे ! मातृप्रेमानें ओथंबलेलीं त्यांचीं हृदयें 'बाल-कृष्णा'च्या भक्तीनें तृप्त होऊन समाधान पावतात. आमचा हा बालकृष्णही दिवसामासानें वाढत जाऊन आपल्या बाललीलांनीं सर्वांचीं अन्तःकरणें प्रफुल्लित करूं लागला. "आम्ही सहाव्या महिन्यांत बाळंतविडा घेऊन गेलों तों 'लंगडा' बाळकृष्ण खरोखरीच रांगूं लागला होता," असें चिमामावशी विनोदानें नेहमीं सांगत. चिमुकला बाळकृष्ण आपल्या मातेची हुबेहुब प्रतिमा होता. नाकाडोळ्यांनीं अगदीं तरतरीत व वर्णानें सांवळी अशी त्याची बालमूर्ति सर्वांचें हृदय आल्हादित करीत असे.

हरिभाऊंचा जन्म झाला त्याच सालीं, म्हणजे इ. स. १८६४ त, सर्वच मंडळी पार्ष्टे सोडून पुण्यास आली व बिऱ्हाड करून राहिली. सहा महिन्यांच्या बालकृष्णास बरोबर घेऊन लक्ष्मीबाई अर्थातच पुण्यास आल्या. पुण्यास आल्या-वर बालकृष्णास 'हरी' हें नांव प्राप्त झालें. कोणी म्हणतात कीं, आपटे घराण्यांत दुसरा एक बाळकृष्ण होता म्हणून त्याचें नांव बदललें ! असो.

नानासाहेबांची धाकटी बहीण बयाताई आतां लग्नास योग्य झाली होती. तिच्यासाठीं स्थळ पाहून तिचें लग्न करून देण्याची जबाबदारी त्यांच्यावरच होती. इ. स. १८६५ सालींच बयाताईचें लग्न जमविण्यासाठीं नानासाहेब इन्दुराहून पुण्यास आले. कस्टमखात्यांत रामभाऊ आठवले म्हणून होते, त्यांच्याशीं बयाताईचें लग्न त्याच सालीं झालें. बयाताई रूपानें चांगल्या असल्या तरी थोड्याशा बाहिऱ्या व बोबड्या होत्या. त्यामुळें त्यांच्याबद्दल नानासाहेब व बगूताई यांस फार काळजी वाटे. अर्थात् त्यांचा विवाह झाल्यावर आपण मोठ्या जबाबदारींतून मुक्त झालों असें नानासाहेबांस वाटलें.

बयाताईच्या लग्नासाठीं म्हणून नानासाहेब जे इन्दुराहून आले ते तिकडे परत गेलेच नाहींत. इन्दूरची नौकरी खाजगी असल्यानें अर्थात् शाश्वतीची नव्हती; पगारांत वाढ होण्याचा संभवही फारसा नव्हता; पुन्हां सर्व मंडळी असणार पुण्यास व आपण एकटेच सर्व कुटुंबापासून फार लांब राहणार ! तेव्हां कांहीं झालें तरी सरकारी नौकरी मिळविण्याची खटपट करावी असें त्यांच्या मनानें घेतलें. पांच सहा महिने धडपड केल्यावर शेवटीं निराश होऊन मुंबईस इ. स. १८६७ च्या आरंभीं त्यांनीं पोस्ट-

खात्यांत अगदीं शेवटची हलकी नौकरी पतकरली व तेथेंच लहानसें बिऱ्हाड थाटलें. सर्वच मंडळींचा मुंबईचा खर्च भागणें तेव्हां शक्य नसल्याकारणानें फक्त लक्ष्मीबाईच त्यांच्याबरोबर गेल्या व बाकीची मंडळी पुण्यांतच राहिली.

पुण्यांतील कुटुंबाच्या निर्वाहासाठीं नानासाहेब पैसे पाठवीत. त्याचप्रमाणें अण्णाही कॉलेजचा अभ्यास संभाळून शिकवण्या वगैरे करून पैसे मिळवी. अण्णा एकदां बी. ए. झाला म्हणजे कुटुंबाची हलाखीची स्थिति जाईल व सर्वच मंडळी सुखांत राहतील असें बगूताईस वाटे. अण्णाच्या बुद्धिमत्तेची तारीफ मधून मधून त्यांच्या कानांवर येई, तेव्हां त्यांस आनंद वाटे. आपला हा पुत्र विद्वान् होऊन कुलाची कीर्ति वाढवील अशी त्यांची दिवसेंदिवस खात्री होत चालली.

इ. स. १८६७ च्या नोव्हेंबर महिन्यांत अण्णांची बी. ए.ची परीक्षा होऊन ते पहिल्या वर्गांत पहिले आले! आपलें दैव उघडलें असेंच बगूताईस वाटलें. हा आनंदाचा प्रसंग पाहण्यास व मुलाचें कौतुक करण्यास चिमणाजीपंत हयात नाहींत या विचारानें त्या तशा आनंदाच्या वेळींही त्यांच्या डोळ्यांतून अश्रू आल्यावांचून राहिले नसतील! अण्णांना फेलोशिप मिळाली. फेलोशिप संपतांच घरच्या परिस्थितीमुळें त्यांस नौकरी शोधणें जरूरच होतें. नानासाहेब मुंबईस होतेच; तेव्हां तेथें जावें व एल्एल्. बी. चा अभ्यास संभाळून नौकरी करावी असा त्यांनीं बेत केला व त्याप्रमाणें ते मुंबईस गेले.

लौकरच अण्णासाहेबांची पारभारोडवरील नानाशंकरशेटच्या शाळेंत हेड-मास्तरच्या जागेवर नेमणूक होऊन त्यांस दरमहा दीडशें रुपये पगार मिळूं लागला. अशा रीतीनें अण्णासाहेबांस ही नौकरी लागल्यावर पुण्याचें बिऱ्हाड मोडून सर्वच मंडळी मुंबईस येऊन राहिली. आतां मुंबईस नानासाहेब, लक्ष्मीबाई, माधवराव, पार्वतीबाई, बगूताई, गोविंदराव, विष्णुपंत व त्याचप्रमाणें माधवरावांचे मेहुणे बळवंतराव विंझे इतकी मंडळी होती. गोविंदराव, विष्णुपंत व बळवंतराव तेथेंच शाळेंत जात.

हरिभाऊंच्या पाठीवर दोन वर्षांनीं म्हणजे इ. स. १८६६ मध्यें लक्ष्मीबाईस एक कन्या झाली. त्याच वेळीं पार्वतीबाईसही पहिला मुलगा झाला. त्याचें नांव गंगाधर. तो पांच वर्षांचा होऊन वारला. हरिभाऊंच्या पाठची बहीण आगगाडींत वारली. ती हकीकत अशीः— आक्का—बगूताईची आई—फार वृद्ध झाल्या होत्या म्हणून

आपल्या लेकीला भेटण्यासाठीं म्हणून मुद्दाम पाष्टयाहून पुण्यास आल्या. आपल्यांचें बिऱ्हाड त्या वेळीं मुंबईस होतें. म्हणून त्या चिमामावशींकडेच उतरल्या होत्या. नातसुनेस व पणतवंडांना पाहण्याची त्यांनीं इच्छा दर्शविल्यावरून लक्ष्मीबाई दोघां मुलांना घेऊन पुण्यास आल्या. पणतवंडांना पाहून आक्कांस फार आनंद वाटला. पुण्यास येऊन जेमतेम आठ दिवस झाले नाहींत, तोंच आक्कांनीं आपली इह-लोकची यात्रा संपविली. लक्ष्मीबाईंची मुलगी पुण्यांत असतांनाच फार आजारी पडली, म्हणून जास्त दिवस पुण्यास न राहतां तिच्या तशा आजारी स्थितींतच आपल्या दोघां मुलांस बरोबर घेऊन लक्ष्मीबाई मुंबईस जाण्यास निघाल्या. वाटेंत मुलीचें दुखणें जास्त होऊन लोणावळ्याच्या स्टेशनवर मुलीचा प्राण गेला! परंतु लक्ष्मीबाई मोठ्या धीराची व सहनशील बायको होती. मन घट्ट करून त्यांनीं आपलें सारें दुःख आंतल्या आंत गिळिलें. आपण शोक करीत बसलों तर हरी घाबरून जाईल व लोकांत मात्र प्रदर्शन होईल, असा विवेक करून मुंबई येईपर्यंत त्या तशाच मुलीला मांडीवर घेऊन बसल्या. स्टेशनवरून गाडी करून दोन्ही मुलां-सह त्या बिऱ्हाडीं गेल्या. गाडी दाराशीं उभी राहतांच मनूताई मुलीला घेण्यासाठीं उत्सुकतेनें गाडीशीं धांवत आल्या, तेव्हां मात्र, "तिला कशाला घेतां? तिच्यांत कांहीं अर्थ राहिला नाहीं," असें सद्गदित कंठानें म्हणून त्यांनीं डोळ्यांस पदर लाविला व घरांत जाऊन इतका वेळपर्यंत हृदयांत दाबून ठेविलेल्या दुःखास बाहेर येण्यास अवसर दिला. मुलीच्या मृत्यूमुळें घरांतल्या मंडळींना वाईट तर वाटलेंच. परंतु, लक्ष्मीबाईच्या धैर्याचें व सहनशीलतेचें सर्वांस अत्यन्त आश्चर्य वाटलें. आपल्या मातेसंबंधाची ही गोष्ट हरिभाऊ पुढें आपल्या घरच्या मंडळींस सांगत व तिच्या प्रसंगावधानाची, धैर्याची व सहनशील स्वभावाची तारीफ करीत.

तिसऱ्या मुलाच्या वेळीं लक्ष्मीबाईंची प्रकृति ढांसळली. प्रसूतीनंतर प्रकृति पूर्ववत् चांगली होईल अशी घरच्या बायकांची समजूत होती. मुंबईची हवा त्यांस मुळींच सोसेना. पहिल्या दोन्ही मुलांच्या वेळीं त्या बाळंतपणास माहेरीं गेल्या होत्या. परंतु या खेपेस मात्र मनूताईच्याकडे पुण्यास जाण्याचा त्यांनीं हट्ट धरिला. शेवटीं बगूताईच्या सांगण्यावरून नानासाहेब त्यांस घेऊन पुण्यास गेले व सुपेकरांच्या वाड्यांत मनूताई रहात तेथें त्यांस पोंचवून मुंबईस परत आले. चिमुकला हरी मात्र आजीचा फार लळा असल्यानें मुंबईसच बगूताईच्या जवळ राहिला.

## हरि नारायण आपटे

पुण्याच्या हवेनें प्रकृतींत सुधारणा होण्याचें यत्किंचित् सुद्धां चिन्ह दिसेना. ताप बिलकूल हटेना! प्रसूतीनंतर प्रकृति सुधारेल या वैद्यबोवांच्या आश्वासनावर मनूताई व चिमामावशी विश्वास ठेवून होत्या. योग्य काळीं प्रसूत होऊन लक्ष्मीबाईस पुत्र-रत्न झालें! परंतु आईच्या जिवावरचा जेथें प्रसंग, तेथें मुलाकडे लक्ष देण्यास कोणास हुरूप वाटणार? दहा दिवसांतच लक्ष्मीबाईचा ताप वाढून त्यांना वात झाला. माहेरीं त्यांच्या प्रकृतीसंबंधानें तार जातांच त्यांचे चुलते दादासाहेब परांजपे तावडतोब पुण्यास निघून आले. माधवरावांसही लक्ष्मीवहिनींबद्दल फार आदर होता. तेही रजा घेऊन मुद्दाम त्यांना भेटण्यासाठीं मुंबईहून पुण्यास आले.

आपल्या मागें हरीची जोपासना कोण करील? त्याला प्रेमानें कोण जवळ घेईल? ही चिंता लक्ष्मीबाईच्या मनास सारखी टोंचीत होती. भावजयीची ही मनःस्थिति लक्षांत येतांच, "मी हरीची सर्व व्यवस्था पाहीन; तुम्ही अगदीं काळजी करूं नका," असें माधवरावांनीं त्यांस वचन दिलें. आपण या दुखण्यांतून घांचत नाहीं अशी लक्ष्मीबाईची आतां खात्री झाली होती. आपण गेल्यावर नानासाहेब दुसरें लग्न करणार व मग आपल्या मुलांकडे कदाचित् त्यांचें दुर्लक्ष होईल अशी शंका त्यांच्या मनास जाचीत असावी!

नानासाहेबांस लक्ष्मीबाईच्या अत्यवस्थ स्थितीबद्दलची तार गेली. तेव्हां ते हरीला बरोबर घेऊन पुण्यास आले. हरीस बाळंतिणीच्या खोलींत पाठवून नाना-साहेब दाराशींच उभे राहिले. दादासाहेब लक्ष्मीबाईच्या जवळ बसले होते. त्या वेळीं त्या शुद्धींत होत्या. त्यांनीं प्रेमानें हरीस जवळ घेतलें व त्याच्या पाठीवरून हात फिरवीत त्या दादासाहेबांच्याकडे वळून म्हणाल्या, "दादा, माझा माहेरचा जीव गेला आहे, पण अजून सासरचा जात नाहीं हो!" (हेच उद्गार हरि-भाऊंनीं 'पण लक्षांत कोण घेतो?' या कादंबरींत यमुनेच्या आईच्या तोंडीं घातले आहेत). आपल्या साडेतीन चार वर्षांच्या अर्भकास जगांत एकटें सोडून जाण्याची कल्पना त्यांस दुःसह झाली. आईविना आपलें बालक काय करील, या कल्पनेनें ती प्रेमळ माता अत्यंत दुःखित झाली. परंतु निर्घृण काळापुढें कोणाचें चालणार! वैद्यांचे उपाय थकले! प्रकृति दिवसेंदिवस खालावत चालली! लक्ष्मीबाईचे पाय या बाळंतपणांतून धरणीला लागत नाहींत, अशी सर्वांची खात्री झाली. हौसनें भावजय आपल्या घरीं आली आणि हा काय चमत्कारिक प्रसंग

ओढवला असें वाटून मनूताईंना फार दुःख झालें. दहा दिवसांच्या आंतच तान्ह्या बाळानें ' राम ' म्हटला व तेराव्याच दिवशीं सासरच्या व माहेरच्या आप्तजनांस शोकसागरांत लोटून लक्ष्मीबाई त्याच्या मागोमाग स्वर्गास निघून गेल्या! लहानगा हरी मात्र मातृसुखास कायमचा आंचवला !

आईच्या मृत्यूमुळें हरीची हानी झाली, बाकी कोणाचें कांहीं वावगें झालें नाहीं! आईवेगळें मूल म्हणून जरी सर्वांनीं त्याचे लहानपणीं लाड केले, बगूताईंस आपल्या नातवास कुठें ठेवूं अन् कुठें न ठेवूं असें जरी वाटत असे, पार्वती-काकूंनीं जरी त्याजवर पुत्रनिर्विशेष प्रेम केलें तरी, मातृप्रेमाची त्याची भूक कधींही शमली नाहीं. निःस्वार्थी, स्वर्गीय मातृप्रेमासाठीं हरिभाऊंचें हृदय तळमळतच राहिलें ! स्वतः मातृविहीन असतां मातृप्रेमाचीं नितान्तरम्य चित्रें त्यांनीं आपल्या कित्येक कादंबऱ्यांत रेखाटलीं आहेत. ' पण लक्षांत कोण घेतो ? ' यांतील यमुनेची आई, ' मी ' मधील सुंदरीची आई, ' कर्मयोगां'तील चंद्रशेखराची आई, यांचीं सुंदर शब्दचित्रें काढून मातृप्रेमाचे उत्कृष्ट आदर्श त्यांनीं समाजापुढें मांडले. आपल्या मातेबद्दल हरिभाऊंना अत्यंत प्रेम व आदर वाटे. आपल्या कादंबऱ्यांत प्रेमळ व कर्तव्यनिष्ठ मातांचीं सुंदर चित्रें रंगवून त्यांनीं मातृप्रेमाची आपली अपुरी राहिलेली हौस पुरी करून घेतली असें म्हणावयास हरकत नाहीं !

---

# प्रकरण दुसरें

## कुटुंबाची फाटाफूट

लक्ष्मीबाई इ. स. १८६८ सालीं स्वर्गस्थ झाल्या. साडेतीन वर्षांच्या हरीला आईच्या मृत्यूमुळें झालेलें अपरिमित नुकसान काय समजणार? लहान मुलाला काय! जें मनुष्य त्याजवर प्रेम करील, त्याला खाऊं घालील तेंच प्रिय होतें. आई आजारी असल्यापासूनच हरीला आजीची व पार्वतीकाकूंची संवय लागली होती. आईच्या मृत्यूनंतर तर तो पार्वतीकाकूंनाच बिलगला. पार्वतीकाकू व लक्ष्मीबाई एकमेकींवर सख्ख्या बहिणींपेक्षांही अधिक प्रेम करीत. कारण दोघीही अत्यंत सुस्वभावी होत्या. त्यांतल्या त्यांत पार्वतीकाकूंचा मुलगा गंगाधर पांच वर्षांचा होऊन वारल्यापासून तर त्यांचा सारा जीव हरीवरच असे. स्वतःच्या मुलाप्रमाणें त्या त्याचा संभाळ करीत व त्याचे हवे ते लाड पुरवीत.

ज्याप्रमाणें पार्वतीबाईंना त्याचप्रमाणें अण्णासाहेबांसही हरी फार आवडत असे. त्याला पाहतांच लक्ष्मीवहिनींस दिलेल्या वचनाची त्यांना स्मृति होई कीं काय न कळे! कामावरून घरीं आले कीं, त्यांचा थोडासा वेळ तरी हरीशीं खेळण्यांत जाई. अण्णासाहेबांचें मन हरीनें इतकें मुग्ध करून टाकिलें होतें कीं, त्यांना भिऊन वागल्यास घरांतील इतर सर्व खोड्यांची त्यास सहज माफी मिळे. गोड बोलून अण्णांचें मन कसें प्रसन्न करावें हें त्यास पूर्णपणें माहीत होतें. प्रारंभीं घरांत मोठें मूल काय तें तेवढेंच, आणि तेंही पुन्हा खेळकर असल्यामुळें प्रत्येकजण त्याचें कौतुक करी. आईवेगळें मूल म्हणून जो तो हरीचे विशेषच लाड करी. जुन्या वळणाचें कुटुंब, त्यांत हा पहिलाच मुलगा, त्यामुळें नानासाहेब मात्र हरीस क्वचितच घेत. परंतु त्याचे लाड पुरविण्यास त्याची आजी समर्थ होती. तेव्हां त्याला काय कमी पडणार?

## आजीचा लाडका नातू

लहानपणीं हरी फारच खोडकर होता. कोणाला चिमटेच घे, कोणाला मारूनच पळ, आजी व काकू तांदूळ निवडण्यास बसल्या कीं ते उडवूनच दे, अशा त्याच्या अक्षय्य खोड्या चालत. कोणी त्यास रागें भरल्यास तो त्याच्याच मागें काठी घेऊन धांवत सुटे. एका दिवाळींत रस्त्यावर फटाके उडविल्याबद्दल स्वारीला पोलीस शिपायानें पकडून सुद्धां नेलें ! कारण मुंबईस रस्त्यावर फटाके उडविण्याची मनाई असे. संध्याकाळची चार साडेचारची वेळ असेल. घरांत पुरुष मनुष्य कोणीच नव्हतें. शेवटीं अण्णासाहेब जेव्हां कोर्टांतून घरीं आले, तेव्हां त्यांस ही सारी हकीकत समजली व मग त्यांनीं या खोडकर स्वारीस रदबदली करून सोडवून आणिलें !

आजीचा नातू लाडका, म्हणून त्यास रागें भरण्याची कोणाची छाती नव्हती. एकदां भूक लागली कीं, क्षणाचाही विलंब त्यास खपत नसे. एखादी वस्तु हवीशी वाटली कीं ती मिळाल्यावांचून स्वारी स्वस्थ रहावयाचीच नाहीं. त्याचा प्रत्येक हट्ट पुरविला जाई. लहानपणचा हा हरिभाऊंचा हट्टी स्वभाव अखेरपर्यंत कायम राहिला. नकला करण्यांत हरीचा हातखंडा असे. कधीं भाजीविक्याचें, तर कधीं गारुड्याचें अथवा कोंकण्या बाळूचें सोंग घेऊन तो सर्वांस हंसवून सोडी. माधवराव आपल्या स्नेहीमंडळींत हरीकडून सर्व नकलांचीं अनेक पारायणें वारंवार करवीत, तेव्हां जो हंशा पिके तो सांगतां पुरवत नाहीं !

इ. स. १८६८ च्या सुमारास आपले धाकटे बंधु गोविंदराव यांचें लग्न नानासाहेबांनीं करून दिलें. त्याच्या दुसऱ्याच दिवशीं माधवरावांचे मेहुणे बळवंतराव बिंझे यांचेंही लग्न झालें. त्यांस राधाबाईची–गोविंदरावांच्या पत्नीची–चुलत बहीण दिली होती. हें लग्न आपट्यांच्याकडेच झालें.

इ. स. १८६९ च्या सुमारास मनूताईचे यजमान भास्करराव वारले. त्या वेळीं त्यांचा गजानन फक्त दहा वर्षांचा होता. याशिवाय त्यांस एक मुलगीही होती, तीही पुढें लौकरच वारली. भास्कररावांच्या मृत्यूमुळें त्यांची सांपत्तिक स्थिति अतिशय खालावली. घरांत मिळवतें असें कोणीच नव्हतें. त्यांचा सासरा अतिशय वृद्ध झाला होता. अशा स्थितींत माहेराखेरीज त्यांना दुसऱ्या कोणाचा आसरा सांपडणार ? नानासाहेबांनीं मनूताईस घरीं चलण्याबद्दल आग्रह केला. परंतु सासूसासरा घरांत असल्यामुळें त्यांनीं सर्व खटलें घेऊन माहेरीं येण्याचें नाकारलें. तेव्हां नानासाहेब त्यांस घरखर्चास म्हणून दरमहा पंधरा रुपये पाठवूं लागले.

## हरि नारायण आपटे

लक्ष्मीबाईच्या मृत्यूनंतर सुमारें दोन वर्षांनीं नानासाहेबांनीं द्वितीय विवाह केला. नानासाहेब लग्न करण्यास प्रथम तयार नव्हते. पुण्याचे श्री. वैद्य यांनीं आपली मुलगी सखूताई मुद्दाम त्यांस दाखवावयास मुंबईस नेली होती. तिला न पाहतांच नानासाहेबांनीं नकार दिला. परंतु बगूताईनीं व घरांतल्या इतर मंडळींनीं, आलेली लक्ष्मी बाहेर घालवूं नका, अशी त्यांची परोपरीनें विनवणी केली, तेव्हां कुठें नाइलाजास्तव ते लग्नास तयार झाले. लग्न मुंबईस खालीं वर असें एकाच चाळींत झालें. ही हरिभाऊंची सापत्न माता स्वभावानें फार चांगली होती. आपल्या सावत्र मुलाचा तिनें कधीं कंटाळा केला नाहीं. त्या नेहमीं नानासाहेबांच्या बरोबर नौकरीच्या गांवीं असल्यानें लहानपणीं हरिभाऊंचा त्यांच्याशीं विशेष संबंध आला नाहीं ही गोष्ट निराळी. तथापि त्यांच्या वागण्यांत दुजाभाव फारसा आढळून येत नव्हता.

या लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं मनूताईच्या सावत्र सासूबाई वारल्या. त्यामुळें घरीं त्या, त्यांचा मुलगा गजानन व वृद्ध सासरा यांखेरीज कोणीच राहिलें नाही. तेव्हां नानासाहेबांनीं त्यांना माहेरीं चलण्याबद्दल अत्यंत आग्रह केला. परंतु " कुटुंब मोठं, त्यांत तुझी दुसरी बायको, कदाचित् माझं कुणाशीं पटायचं नाहीं, भांडणतंटे होतील, " इत्यादि मनूताईनीं पुष्कळ सांगून पाहिलें. परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. तेव्हांपासून म्हणजे इ. स. १८७१ पासून गजाननाचें बी.ए. पर्यंतचें सर्व शिक्षण पूर्ण होऊन त्यास नौकरी लागेपर्यंत त्या आपल्यांच्या घरींच राहिल्या होत्या. गजाननराव हरिभाऊंच्यापेक्षां चार दोन वर्षांनींच काय ते मोठे असतील. मनूताईचा सासरा पुढें अकरा वर्षे जिवंत होता. तोंपर्यंत नानासाहेबांस त्यांचा संभाळ करावा लागला. तथापि नानासाहेबांनीं या मंडळींचा कधींही कंटाळा केला नाहीं. त्यांचा स्वभाव जात्याच प्रेमळ व अन्तःकरण उदार असल्यामुळें त्यांनीं त्यांचा मोठ्या प्रेमानें प्रतिपाळ केला. भावावर आपल्या संसाराचा बोजा पडतो याबद्दल मनूताईस फार संकोच वाटे. त्यासुद्धां सुस्वभावी, प्रेमळ व कर्तृत्ववान् होत्या. घरकामासाठीं त्या दुसरें मनुष्य ठेवूं देत नसत. पहांटे चार वाजल्यापासून उठून मुलाबाळांचें त्या व्यवस्थित करीत. सर्वांचा स्वयंपाक त्याच करीत. सर्व मुलांना त्यांचाच लळा असे. नानासाहेबांच्या व त्यांच्या स्वभावांत फार साम्य होतें. पुष्कळ करावें नी पुष्कळ द्यावें असा त्यांचा उदार स्वभाव असे. चिमामावशी

आपट्यांच्या घरांत येईपर्यंत एवढ्या मोठ्या संसाराची सर्व जबाबदारी बगूताईच्या मदतीनें त्यांनींच संभाळली होती असें म्हणावयास हरकत नाहीं. असो.

इकडे नानाशंकरशेटच्या शाळेंतील आपलें काम संभाळून अण्णासाहेबांचा एल्एल्. बी.चा अभ्यास चालू होता. नोकरीमुळें अभ्यासास जितका वेळ पाहिजे तितका मिळत नसे. तेव्हां परीक्षेचा फॉर्म पाठवून दिल्यावरही परीक्षेस बसूं नये असें त्यांनीं ठरविलें. परीक्षेस जाण्याची वेळ होत आली तरी ते घरींच बसून राहिले ! शेवटीं मनूताई व बगूताई यांनीं आग्रह करून त्यांस परीक्षेच्या मंडपांत पाठवून दिलें. अण्णासाहेबांची भीति अगदीं व्यर्थ ठरली ! कारण परीक्षेच्या निकालाच्या दिवशीं पाहतात तों त्यांचें नांव पहिल्या वर्गांत पहिलें ! याचें कारण ते असें सांगत कीं, परीक्षेंत विचारलेल्या प्रश्नांसंबंधीं मजकूर त्यांनीं सहज आदल्या दिवशीं वाचला होता. या त्यांच्या अपूर्व यशामुळें घरांत जो आनंदी-आनंद पसरला त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. विशेषतः आपला हेतु पूर्ण झाला म्हणून बगूताईस, आपला शिक्षणक्रम यशस्वी रीतीनें पार पडला म्हणून अण्णा-साहेबांस व धाकट्या बंधूनें अपूर्व यश संपादन केलें याबद्दल नानासाहेबांस फार फार आनंद झाला व अत्यंत समाधान वाटलें. ही त्यांची परीक्षा इ. स. १८७१ सालीं उतरली.

याच सुमारास अलिबागच्या मुन्सफाची जागा रिकामी झाली होती. एल्एल्. बी. मध्यें इतकें उत्तम यश मिळविल्यामुळें सरकारनें ती जागा त्यास देऊं केली ! माधवरावांस काय करावें तें समजेना ! त्यांची खरी इच्छा एखादा स्वतंत्र धंदा करण्याची होती. विष्णुपंत रानडे वगैरे त्यांची मित्रमंडळी त्याच मताची होती. विष्णुपंत रानडे तर त्यांस स्वतंत्रपणें वकिली करण्याचा एकसारखा आग्रह करूं लागले. माधवरावांस मोठा पेंच पडला. अनायासें घरीं चालून आलेली मानाची जागा धिक्कारणें त्यांच्या अगदीं जिवावर आलें. अशा रीतीनें परस्परविरोधी विचारांचें त्यांच्या हृदयांत तुमुल युद्ध चाललें असतां, त्यांनीं एक दिवस सहज हरीस जवळ घेऊन विचारलें, " काय रे हरि, जन्मभर गुलामगिरींत राहून नोकरी करावी, कीं स्वतंत्र धंदा ? " आपले तेजस्वी डोळे अण्णासाहेबांवर रोखून हरीनें चटकन् उत्तर दिलें, " स्वतंत्र धंदा." या विलक्षण उत्तरानें अण्णासाहेबही क्षणमात्र चकित झाले ! हरीनें सहज उच्चारलेल्या या शब्दांत केवढा गहन अर्थ भरला होता !

त्यानें त्या वेळीं उच्चारलेल्या शब्दांचा खरा अर्थ त्यास स्वतःसही समजला नसेल! कांहीं मुलांना विचारलेल्या दोन प्रश्नांपैकीं शेवटीं जें विचारावें त्याचें होकारार्थी उत्तर देण्याची संवय असते. तसेंच कदाचित् हरीचें हें उत्तर असेल! कांहीं असो, परंतु या बाणेदार उत्तरांतच हरिभाऊंचें जीवनरहस्य नाहीं काय? सरकारी नौकरीबद्दलचे अनुदार उद्गार बालपणापासून त्यांच्या कानीं पडत, त्यामुळेंच कदाचित् सरकारी नौकरीबद्दलची त्यांच्या मनांत कायमची अढी बसली असावी! तें कसेंही असो, पण सरकारी गुलामगिरीचा विटाळ त्यांनीं आजन्म आपणांस होऊं दिला नाहीं, ही गोष्ट मात्र खरी. हो ना करतां करतां शेवटीं अण्णासाहेबांनीं सब-जज्जाची जागा पतकरली व ते अलिबागेस गेले.

ज्या वर्षी अण्णासाहेबांची अशी बढती झाली, त्याच वर्षी त्यांच्यावर त्यांच्या आयुष्यांतील अत्यंत शोकजनक प्रसंग येऊन गुदरला! तो प्रसंग म्हणजे त्यांच्या पत्नी पार्वतीबाई यांचा मृत्यु होय! सोन्याची लक्ष्मी प्राप्त झाली खरी, परंतु गृह-लक्ष्मी निघून गेली! ती गृहलक्ष्मी त्यांस सोडून स्वर्गी जातांच त्यांच्या आयुष्य-क्रमास विपरीत स्वरूप प्राप्त झालें! पार्वतीबाईच्या अकालीं मृत्यूमुळेंच त्यांचा नैतिक अधःपात झाला यांत शंका नाही!

बिचाऱ्या हरीस तर दुसऱ्यांदां आई नाहीशी झाली. त्यास स्वतःच्या आईची फारशी स्मृति नसली, तरी चुलतीची मात्र राहिली. हरीची मुंज थाटांत करावी अशी पार्वतीकाकूंची फार इच्छा! त्या हौशी असल्यामुळें हरीला सातवें वर्ष लागल्यापासूनच त्यांचीं मुंजीबद्दलचीं मनोराज्यें चालत. परंतु, मनुष्य मनांत योजतो एक आणि होतें भलतेंच! गंगाधराच्या पाठीवर पार्वतीबाईस एक मुलगा झाला. तेव्हांपासून त्या आजारीच होत्या. तें दुखणें शेवटीं क्षयावर गेलें व अखेरीस क्षयरोगानें झिजून झिजून इ. स. १८७२ च्या डिसेंबर महिन्यांत त्या आपल्या वडील जावेस भेटण्यासाठीं निघून गेल्या! लक्ष्मीबाईच्या मागोमाग दोनचार वर्षांतच पार्वतीबाईनीं स्वर्गाची वाट धरिली!! हरीस एक खऱ्या निःस्वार्थी प्रेमाचें मनुष्य नाहींसें झालें! पार्वतीबाईचा मुलगा त्यांच्या मागून दहा महिन्यांनीं वारला. एक चमत्कारिक योगायोग म्हणून हरिभाऊ सांगत की, लक्ष्मी-बाई वारल्या तेव्हां पार्वतीकाकूंनीं त्यांना न्हायला वगैरे घातलें व त्यांच्या कानांत "मला लौकर घेऊन जा" असें सांगितलें. त्यानंतर चार वर्षांनीं त्या गेल्याच!

## हरीची मुंज व वाङ्निश्चय

पार्वतीबाईच्या आजारामुळें हरीची मुंज लांबली. हरीस नववें वर्ष लागलें होतें. खरें पाहिलें असतां तो आतां मुंजीस मोठाच झाला होता. पार्वतीबाई वारल्यामुळें मुंबईस मुंज करण्याची कोणासच हौस नव्हती. चिमामावशी पुण्यांत होत्या. म्हणून पुण्यांतच मुंज करण्याचा बेत ठरला. जमखिंडीकरांच्या समोरच्या सोहनीच्या वाड्यांत हरीची मुंज थाटांत झाली. वाजंत्री लावून मुंजीची अक्षत घरोघरीं नेली होती. मुंजीच्या अगोदर चार दिवस मोठ्या समारंभानें कसब्याच्या गणपतीस अक्षत नेण्यांत आली. मुंजींत शंभर ब्राह्मणांचें ब्राह्मणभोजन झालें. वैदिक ब्राह्मणांची सभा करून त्यांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें दक्षिणा देण्यांत आली. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें राजपुरोहित श्रीमंत भाऊमहाराज यांस त्यांच्या लवाजम्यासह पालखींतून वाजत गाजत आणलें होतें. प्रथम त्यांची पूजा करून एक पुतळी दक्षिणा देण्यांत आली. मुंजीसाठीं जमलेल्या ब्राह्मणांना चार चार आणे दक्षिणा व महाराजांबरोबरच्या लवाजम्यांतील मंडळींना नारळ देण्यांत आले. रात्रीं पालखींतून भिक्षावळ मिरविली. मुंजीस बहुतेक सर्व नातलग मंडळी हजर होती. हरीच्या आजोळच्या परांजपे मंडळींपैकी मात्र कोणीच आलें नाही. पार्वतीबाईच्या मृत्यूमुळें अत्यंत उदासीन होऊन अण्णासाहेबही मुंजीस आले नाहीत. मुंज अतिशय थाटांत झाली खरी, परंतु पदोपदी पार्वतीबाईंची आठवण होऊन वगूताईंनी मुंजीच्या दिवशीं दहादां डोळयांतून पाणी काढलें!

सोहनींच्या शेजारच्या घरांत कै. दामोदर विश्वनाथ गोखले वकील रहात असत. त्यांची पत्नी राधाबाई आपल्या लहान मुलीस—मथूताईस—घेऊन मातृभोजनास आली होती. त्या तरतरीत बुद्धिमान् मुंजमुलास पाहतांच गोखलीणबाई भरपंक्तींत म्हणाल्या, “आजी, आमची मथुरी हरीला द्यायची बरं का? या दोघांचा जोडा मोठा सुंदर शोभेल!” हे त्यांचे उद्गार ऐकून वगूताईस फार आनंद व अभिमान वाटला. शहाजीजिजाबाईचें लग्न जसें रंगपंचमीच्या दिवशीं ठरलें त्याचप्रमाणें मातृभोजनाच्या मंगल प्रसंगीं सहज ठरलेला हा वाङ्निश्चय पुढें खरा होऊन मथूताईचें लग्न हरिभाऊंशींच झालें! असें सांगतात की, मरतेसमयीं मथूताईच्या आईनें आपली मुलगी हरिभाऊंना देण्याची आपली इच्छा नवऱ्यास सांगून त्याचेकडून तसें वचन घेतलें व नंतर प्राण सोडला. गोखले वकील व अण्णासाहेब यांचा विशेष स्नेह असल्यामुळें मथूताईच्या आईची इच्छा पूर्ण होऊं शकली.

## हरि नारायण आपटे

अण्णासाहेबांचा स्वभाव जात्याच किंचित् तुसडा व चिडखोर होता. पार्वतीबाई जिवंत होत्या, तोंपर्यंत त्यांनीं आपल्या सुस्वभावानें कुटुंबांत फूट पडूं दिली नाहीं. त्यांच्या मृत्यूमुळें अण्णासाहेबांचा चिडखोरपणा अधिकच वाढला. सर्व कुटुंबांत तेच अत्यंत हुषार व शिकलेले होते. शिवाय लक्ष्मीचीही त्यांचेवर विशेष मेहेरनजर होती. संपत्तीच्या वैभवाखालीं त्यांच्या हृदयांतील मृदुलता दबली गेली. हाडाचे प्रेमळ असूनही त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारचा अभिमान व स्वजनांविषयींची बेपर्वाई उत्पन्न झाली ! ऐश्वर्य वाढलें, परंतु त्याबरोबरच हृदयाची उदारता कमी झाली. लक्ष्मीचा महिमाच असा आहे ! तिच्या पुढें मी मी म्हणविणारे देखील नम्र होतात ! अण्णासाहेबांच्या वृत्तींत असा फरक झाला यांत कांहींच नवल नाहीं. घरांत फार मंडळी असलेली त्यांस आवडत नसत. नानासाहेबांस मात्र सर्व मंडळी हवीशी वाटत व त्यांची प्रीति जरी मर्यादित असे तरी ते सर्वांचा योग्य परामर्श घेण्यास चुकत नसत. वस्तुतः पाहतां त्यांच्याच आग्रहावरून मनूताई आपला मुलगा गजानन व वृद्ध सासरा यांसह मुंबईस आपल्यांच्या घरीं रहावयास आल्या होत्या. मनूताई मुंबईस येऊन राहिल्या ही गोष्ट अण्णासाहेबांस कांहीं आवडली नाहीं. एकदां कांहीं कामानिमित्त म्हणून ते पायींच बाहेर निघाले असतां मनूताई सहज म्हणाल्या, " अण्णा, आतां तुम्ही मानानें मोठे झालांत. पैसेही चांगले मिळूं लागले आहेत. आतां गाडीत बसून बाहेर जात जा. " हें त्यांचें बोलणें ऐकून अण्णासाहेबांनी किंचित् रागांतच म्हटलें, " तुम्ही आहांत ना गाड्या ! मग मी गाडीत कसा बसूं ? "

मनूताई सर्वस्वीं आपल्या भावांवर अवलंबून होत्या. अर्थात् हे उद्गार त्यांस वर्मी झोंबले. तो सर्व दिवस त्यांनीं रडून घालविला व रात्री सुद्धां कोणाशीं एक शब्दही न बोलतां त्या उपाशीच निजल्या. त्यांच्या मानी स्वभावास अण्णासाहेबांचें बोलणें सहन झालें नाहीं. त्याच दिवशीं रात्रीं नानासाहेबांस ही गोष्ट समजतांच त्यांस फार वाईट वाटलें. परंतु अण्णासाहेबांस अधिक उणा शब्दही न बोलतां दुसऱ्याच दिवशीं मुकाट्यानें त्यांनीं फणसवाडींत एक दुसरी जागा पाहिली व ताबडतोब स्वतःचें कुटुंब व मनूताई यांसह ते दुसरें बिऱ्हाड करून राहिले. आपल्या बोलण्याचा इतका भयंकर परिणाम होईल अशी अण्णासाहेबांची बिलकूल कल्पना नव्हती. झाल्या गोष्टीबद्दल खेद प्रदर्शित करून निराळें बिऱ्हाड न

करण्याबद्दल नानासाहेबांस त्यांनीं परोपरीनें विनवून सांगितलें. परंतु, नानासाहेबांचा निश्चय फिरला नाहीं. ते अत्यंत मानी व करारी स्वभावाचे होते. मनूताई नको नको म्हणत असतां आपण तिला आग्रहानें घरी घेऊन आलों; दुर्दैवानें बिचारी माहेरीं येऊन राहिलेली ! तिचा असा अपमान व्हावा ही गोष्ट त्यांना बिलकूल खपली नाहीं. तिचा अपमान तो आपलाच अपमान असें समजून ते मनूताईस घेऊन घराबाहेर पडले. जेथें बहिणीचा अपमान झाला तेथें तिला रहावयास लावण्याची कल्पना त्यांस असह्य वाटली. अण्णासाहेबांची दरमहाची प्राप्ति फार मोठी होती. तथापि, नानासाहेबांचा उदार व खर्चिक स्वभाव, विशेषतः आपल्या सर्व आप्त मंडळींचा परामर्श घेण्याची त्यांची वृत्ति अण्णासाहेबांस पसंत पडत नसावी हेंच या फाटाफुटीचें प्रमुख कारण दिसतें. नानासाहेबांनीं स्वतंत्र बिऱ्हाड केलें खरें. परंतु त्यांच्या एकट्याच्या पगारांत सर्वांचा मुंबईचा खर्च भागेनासा झाला. तेव्हां त्यांनीं मनूताई, गजानन, हरिभाऊ, गोविंदराव, राधाबाई व विष्णुपंत या सर्वांस पुण्यास बिऱ्हाड करून दिलें आणि आपलीं दोन मुलें व बायको यांसह ते मुंबईस राहिले. बगूताईंना पुत्रस्नेह आवरणें शक्य नव्हतें. त्या मात्र अण्णासाहेबांच्या जवळ राहिल्या. अशा रीतीनें १८७८ सालीं आपटे मंडळी पुण्यास शेवड्यांच्या बोळांतील जानवेकरांच्या वाड्यांत बिऱ्हाड करून राहिली. याच सुमारास चिमामावशींचें वेलणकर मंडळींशी बिनसलें म्हणून त्याही आपल्या बहिणीच्या घरीं येऊन राहिल्या. या पुण्याच्या बिऱ्हाडाचा सर्व खर्च नानासाहेबच करीत. नानासाहेबांनीं स्वतंत्र बिऱ्हाड केलें व सर्व कुटुंबाची जबाबदारी आपणांवर घेऊन कुटुंबाच्या खर्चासाठीं त्यांनीं एक पैमुद्धां आपणांपाशीं मागितली नाहीं, हें पाहून अण्णासाहेबांस कसेंसेंच वाटलें. कुटुंबपोषणाची जबाबदारी जशी नानासाहेबांवर तशीच आपणांवरही आहे ही जाणीव त्यांस स्वस्थ बसूं देईना. नानासाहेबांचा पगार मोजका, असें असूनही त्यांनीं कुटुंबपोषणाचा सर्व भार सहन करावा आणि आपणांस हजारों रुपये मिळत असतांही आपण मात्र त्यापैकीं कांहींच बोजा पतकरीत नाहीं याबद्दल त्यांचें मन त्यांस खाऊं लागलें व शेवटीं त्यांनीं यांतून एक तडजोडीचा मार्ग काढला. त्यांच्या जवळ आतांपर्यंत वीस हजार रुपये जमले होते. ते त्यांनीं चौघा भावांत वांटून द्यावयाचें ठरविलें. परंतु, "तूं श्रम करून मिळविलेला पैसा मला नको," असें नानासाहेबांनीं त्यांस निक्षून सांगितलें. गोविंद-

रावांनीही आपल्या नांवची पांच हजार रुपयांची वांटणी स्वीकारण्याचें नाकारिलें. धाकटे बंधु विष्णुपंत यांनी मात्र अण्णासाहेबांकडून पांच हजार रुपये घेतले ! नानासाहेबांच्या या सडेतोड व न्याय्य वर्तनामुळें अण्णासाहेबांस अधिकच वाईट वाटलें. पण कुटुंबास हातभार लावण्याचा मार्ग त्यांस कांहीं केल्या दिसेना. अशा स्थितींत कांहीं वर्षें गेलीं. मध्यंतरी अण्णासाहेबांची इस्टेट व्यसनांच्या पायीं वाटेल तशी खर्ची पडूं लागली व चोरापोरीं बराच पैसा जाऊं लागला. हें पाहून मात्र चिमामावशींस स्वस्थ बसवेना ! सर्व कुटुंबाचा भार एकट्या नानासाहेबांनीच सोसावा हें त्यांस रुचेना. जेव्हां जेव्हां अण्णासाहेब पुण्यास येत तेव्हां तेव्हां त्या अण्णासाहेबांस याबद्दल निर्भीडपणें बोलत. " मला त्याचा एक पैसाही नको, " असें नानासाहेब म्हणत. परंतु " तुला नको तर तूं घेऊं नकोस. आम्ही आमच्या करितां घेऊं," असें म्हणून चिमामावशी त्यांस मोडून काढीत. अशीं आणखी कांहीं वर्षें गेलीं. शेवटीं नाहीं होय करितां करितां अण्णासाहेबांकडून दरमहा शंभर रुपये येतील ते चिमामावशींनी सर्व कुटुंबाच्या खर्चाकरितां घ्यावेत असें ठरलें.

भाऊराव ऊर्फ विष्णुपंत हे वडील वारले त्या वेळीं अवघे दोन वर्षांचे होते. त्यामुळें त्यांचे अतिशय लाड झाले. लाडाचा परिणाम जो व्हायचा तो झालाच ! दोन चार इयत्तांपर्यंत शिक्षणाची मजल गेली नाहीं तोंच ते शाळा सोडून देऊन घरीं बसले. पुढें अतिशय आर्जव करून त्यांस एकदांचें पुण्यास सब्‌ओव्हर्‌सिअरच्या वर्गांत घातलें. कसेंबसें लग्न होईपर्यंत ते त्या क्लासांत टिकले. परंतु पुढें एक-दोन वर्षांतच त्यांनीं शिक्षणास कायमचा रामराम ठोकला. यांचें पहिलें लग्न नाशिक येथील नित्सुरे यांच्या कन्येशीं इ. स. १८७४ सालीं झालें. ही मुलगी लवकरच वारली. त्यानंतर इ. स. १८७७ च्या सुमारास त्यांचें दुसरें लग्न झालें. मंगळवेढ्याच्या किल्लेदारांकडे त्यांची सासुरवाडी होती. शिक्षण सोडून देऊन आपल्या वांटणीचें वडिलार्जित घर विकून त्याचे आलेले पैसे व अण्णासाहेबांनीं दिलेले पांच हजार रुपये घेऊन ते मंगळवेढ्यास सासुरवाडीस गेले व तेथेंच शेतीभाती करून राहिले.

गोविंदराव कधीं मुंबईस तर कधीं पुण्यास असे असत. त्यांचें शिक्षण सरासरीं मॅट्रिकपर्यंत झालें होतें. नानासाहेबांनीं व्यापारासाठीं त्यांना अनेकदां भांडवल दिलें. परंतु त्यांचा स्वभाव कांहींसा चमत्कारिक होता. कुठें कापडाचें दुकान घाल

तर कुठें मोत्यांचा व्यापार कर, असे त्यांनीं पुष्कळ धंदे केले. परंतु त्यांत त्यांस यावें तसें यश आलें नाहीं. यामुळें त्यांच्या कुटुंबाचा सर्व भार नानासाहेबांवरच येऊन पडला.

बयाताईंच्या लग्नानंतर पहिलीं कांहीं वर्षें सुखांत गेलीं. परंतु पुढें त्यांच्या यजमानांस ज्योतिषाचा नाद लागून त्यांनी इ. स. १८७३ मध्यें नौकरी सोडून दिली. घरांतील भांडीं, दागिने वगैरे मोडून टाकण्याचा त्यांनीं सपाटा चालविला. बयाताईंना मिळालेल्या देणग्यांचा सुद्धां ते अपहार करूं लागले. मधून मधून नौकरी धरीत व पैसे मिळवीत. पण एकंदरींत त्यांची वृत्ति केव्हांच स्थिर नव्हती. ते अगदीं भ्रमिष्टासारखें करीत. इ. स. १८७३ पासूनच बयाताईंना आपल्या मुलाबाळांना नानासाहेबांच्या घरीं नाइलाजास्तव ठेवावें लागलें. त्या मात्र नेहमीं नवऱ्याजवळच रहात. बयाताईंचा स्वभाव मनमिळाऊ होता. त्या नवऱ्याला कांहींच बोलत नसत. परंतु नवऱ्याच्या विचित्र स्वभावामुळें त्या दोघांचें फारसें पटत नसे. माधवराव त्यांस दरमहा १५ रुपये देत. रामभाऊ म्हणजे ' मी 'मधील ' रावजी 'च होत. परंतु बयाताईंचा स्वभाव मात्र ' मी 'मधील आईशीं अगदीं विसदृश होता. त्यांच्या दोन्ही मुलींचीं लग्नकार्यें व मुलांचें शिक्षण नानासाहेबांनींच केलें.

अलिबाग येथील सरकारी नोकरी अण्णासाहेबांनी थोड्याच वर्षांत सोडली. स्वतंत्रपणें वकिली करूं लागल्यावर त्यांस हजारों रुपये मिळूं लागले. परंतु कुटुंबाचा परामर्श घेऊन नानासाहेबांस हातभार लावण्याची त्यांस मनापासून फारशी इच्छा नव्हती हें मागें सांगितलेंच आहे. चिमामावशींच्या आग्रहास्तव ते पुढें घरखर्चासाठीं पैसे देऊं लागले ही गोष्ट वेगळी ! तसें त्यांचें घराकडे अगदींच लक्ष नव्हतें असें म्हणतां यावयाचें नाहीं. खाऊ म्हणून, 'पॉकेटमनी ' म्हणून, ते मुलांना वरचेवर पैसे देत, किंवा त्यांना कपडेलत्ते करून देऊन, या नाहीं त्या रूपानें आपल्या कुटुंबांतील मंडळींचें ते करीत व प्रसंगानुसार महिना पंधरा दिवस मंडळींना मुंबईसही घेऊन जात. तरी पण नानासाहेब व अण्णासाहेब यांच्या वृत्तींत मोठाच फरक होता हें नाकबूल करितां यावयाचें नाहीं. एक कुटुंबाप्रीत्यर्थ सर्व पैसा खर्च करी, तर दुसऱ्यास फारसें देण्याची इच्छा नव्हती. आपणांस जें मिळेल तें सर्वांस देऊन घरांतील मंडळींस सुखी करावें ही नानासाहेबांची स्वाभाविक वृत्ति होती. कुटुंबासाटी पडेल ती झीज सोसणें हें आपलें कर्तव्य आहे, असें त्यांस अन्तःकरण-

पूर्वक वाटे. घरांतील सर्व कुटुंबीयांचा परामर्श घेण्याचा हा त्यांचा उदार स्वभाव हरिभाऊंच्या अंगीं उतरला होता.

एकाच हाताचीं पांच बोटें, पण तीं कुठें सारखीं असतात ? गोविंदराव व भाऊराव या दोघांतही कांहीं अर्थ नव्हता. अण्णासाहेब सामान्यतः कुटुंबाशीं फटकूनच वागत. परंतु जो कोणी विपत्तींत सांपडेल त्याच्या मदतीस धांवून जाऊन त्याचा कळकळीनें समाचार घेणारे एकटे नानासाहेबच होते. या दृष्टीनें पाहिल्यास चारी भावांत तेच श्रेष्ठ ठरतात.

अण्णासाहेबांची धंद्यांत उत्तरोत्तर भरभराट होत जाऊन ते मुंबईच्या सामाजिक चळवळींत पुढाकार घेऊं लागले. न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे, रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित, रा. रा. वामन आबाजी मोडक, न्यायमूर्ति काशिनाथ त्रिंबक तेलंग इत्यादि समाजसुधारकांच्या सामाजिक कार्यास त्यांची त्या वेळीं मनःपूर्वक सहानुभूति होती. त्यामुळें अण्णासाहेबांची गणना मुंबईच्या प्रमुख सुधारकांत होऊं लागली. परंतु, त्यांचा मुंबईच्या सुधारकांशीं जसजसा निकट संबंध येऊं लागला, तसतशी त्यांची कृतिशून्यता त्यांच्या नजरेस येऊं लागली. त्यामुळें त्यांच्यावर ते बरेंच तोंडसुख घेत. विशेषतः पुनर्विवाहाची संधि आली असतांनाही रा. ब. रानडे यांनीं पुनर्विवाह केला नाहीं याबद्दल त्यांच्यावर अण्णासाहेबांचा बराच राग होता.

रावबहादुर रानडे पुनर्विवाहास अनुकूल होते खरे, परंतु त्यांची पितृभक्ति अप्रतिम होती. पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर पुनर्विवाह करण्याची त्यांची मनापासून इच्छा होती. परंतु, त्यांच्या वडिलांस ही बातमी समजतांच त्यांनीं त्यांस बोलावून समक्ष सांगितलें कीं, “ तुम्ही पुनर्विवाह केल्यास तुमचाआमचा संबंध संपला. ” रावबहादुर रानडे यांस काय करावें तें समजेना ! शेवटी पितृप्रेमाचा विजय झाला. विधवेशीं लग्न करून वडिलांच्या प्रेमास मुकण्यास त्यांचें प्रेमळ मन तयार न होऊन शेवटीं त्यांनीं एका अकरा वर्षांच्या कुमारिकेशीं विवाह केला ! या त्यांच्या कृत्याबद्दल समाजसुधारकांनीं त्यांजवर टीकेचा अग्निवर्षाव केला व विधवाविवाहपक्षाशीं दगलबाजी केल्याचा आरोप त्यांजवर ठेवण्यांत आला !

पुनर्विवाह केला नाहीं म्हणून अण्णासाहेबांनीं रावबहादुरांवर कडक टीका केली व “ मजवर असा प्रसंग येता, तर मी खास पुनर्विवाह केला असता, ” असें मित्रमंडळींत बोलून दाखविलें. ‘ परोपदेशे पांडित्य ’ कोण करीत नाहीं ? दुसऱ्या-

## “आजन्म विवाह करणार नाहीं”

वरचा प्रसंग जेव्हां स्वतःवर येऊन बेततो, तेव्हांच मनुष्याची खरी परीक्षा होते. मित्रमंडळींत रावबहादुर रानडे यांच्यावर जेव्हां अण्णासाहेबांनीं टीका केली तेव्हां त्यांची पत्नी जिवंत होती व पत्निवियोगाचा दुर्धर प्रसंग आपणांवर येईल असें त्यांस स्वप्नांत सुद्धां भासलें नव्हतें! तो प्रसंग येतांच मात्र अण्णासाहेबांची त्रेधा उडाली! पुनर्विवाह करून पितृतुल्य वडील भावाचा, वयोवृद्ध मातेचा व कुटुंबांतील इतर नातेवाइकांचा संबंध पूर्णपणें तोडून त्यांच्या प्रेमास आजन्म मुकण्याची कल्पना त्यांस सहन होईना. पुनर्विवाह करणें म्हणजे बहिष्कृत होणें असेंच त्या काळीं मानीत. कुमारिकेशी विवाहबद्ध होऊन आप्तजनांस संतुष्ट करावें तर, समाज-सुधारक विरोधी टीकेचा वर्षाव करणार! कोणासच दुखविण्याची त्यांची इच्छा नव्हती! शेवटी बगूताई व चिमामावशी दुसरें लग्न करण्याचा एकसारखा आग्रह करीत असतांही, “मी आजन्म विवाह करणार नाहीं,” असा निश्चय जाहीर करून त्यांनीं तो प्रश्न तात्पुरता सोडविला!

अण्णासाहेबांनी लग्न न करण्याची प्रतिज्ञा केली खरी; परंतु संन्यस्त वृत्तीनें त्यांस आयुष्यक्रम घालवितां आला नाहीं! लक्ष्मीनें आपला वरदहस्त त्यांच्या डोक्यावर ठेवून त्यांस व्यसनासक्त केलें! व्यसनांची मजल शेवटीं इतकी वाढत गेली कीं, प्रत्यक्ष त्यांच्या मातेस सुद्धां त्यांच्याजवळ राहणें अशक्य होऊन गेलें! त्यांचा काळ ऐषआरामांत जाऊं लागला व घरच्या मंडळींची त्यांस कांही काळ विस्मृति पडल्यासारखी झाली! अण्णासाहेबांची व्यसनासक्ति पाहून बगूताईचे प्राण कासावीस होत व नानासाहेबांसही अत्यंत दुःख होई! व्यसनापायीं अलोट संपत्ति त्यांस उधळतांना पाहून चिमामावशींचा जीव थोडा थोडा होई! परंतु करणार काय?

या अशा चमत्कारिक परिस्थितींत त्यांचें शरीर व पैसा यांस कोणी जपलें असेल तर तें त्यांच्या जवळ असणाऱ्या बाई! दैवाच्या फेऱ्यांत सांपडून या ब्राह्मण मुलीस लाजिरवाणें जीवन कंठण्याचा प्रसंग आला होता! तरीही घरच्या मालकिणीप्रमाणें एकनिष्ठपणें त्या अण्णासाहेबांची सर्व व्यवस्था करीत. या बाई अंतःकरणानें दुष्ट नव्हत्या. हरिभाऊ, अण्णासाहेब बोलावीत म्हणून, पुढें, विशेषतः कॉलेजांत असतांना, पुष्कळदां मुंबईस जात. त्यांनीं एकदां या बाईना चार उप-देशाच्या गोष्टी सांगितल्या व अण्णासाहेबांशीं एकनिष्ठतेनें राहण्यास व त्यांचा

कुटुंबांतील इतर मंडळींशीं असलेला संबंध न तोडण्यास त्यांस नीट बजाविलें ! या उपदेशाचा बाईच्या मनावर फारच परिणाम झाला ! घालवीत असलेल्या जीवनक्रमाबद्दल त्यांस पश्चात्ताप झाला ! हरिभाऊंच्या संबंधीं त्यांस फार आदर व दरारा वाटे. प्रथम प्रथम हरिभाऊंचें मुंबईस येणें त्यांस आवडत नसे. कारण पुढें-मागें अण्णासाहेब सर्व इस्टेट त्यांस देऊन टाकतील, अशी त्यांस भीति वाटे. परंतु पुढें मात्र हरिभाऊंच्या बद्दल त्यांस इतका आदर व विश्वास वाटूं लागला. कीं, संकटप्रसंगीं त्या हरिभाऊंचाच सल्ला घेत. या बाई धूर्त व हुषार असल्यानें हरिभाऊंची खरी योग्यता त्या जाणून असत. अण्णासाहेबांचें हरिभाऊंवरील प्रेम कमी झालें नाहीं. पहिल्या प्रथम बाईनीं हरिभाऊंचा कंटाळा केला असला तरी, पुढें मात्र अण्णासाहेबांचें त्यांच्यावरील पुत्रप्रेम जाणून त्या त्यांचें अगत्य करीत. असो.

हरिभाऊ सुट्टींत कधींमधीं मुंबईस जात असले तरी, इ. स. १८७८ पासून त्यांची मुंबई सुटली ती सुटलीच. मनूआत्यांचा गजानन व हरिभाऊ आतां पुण्यास शाळेंत जाऊं लागून त्यांचा शिक्षणक्रम व्यवस्थित रीतीनें सुरू झाला होता.

## प्रकरण तिसरें

# सरस्वतीच्या मंदिरांत प्रवेश

मुंबईस असतांना वयाच्या सहाव्या वर्षीच अण्णासाहेबांबरोबर हरी नानाशंकर-शेटच्या शाळेंत जाऊं लागला. त्या वेळी अण्णासाहेबच शाळेचे हेडमास्तर असल्या-मुळें सर्व शिक्षक लहानग्या हरीचें कौतुकच करीत असतील! तेथें मराठी चार इयत्ता झाल्यावर त्याचें नांव गिरगांव बॅकरोडवरील 'बिशप हायस्कूल'मध्यें घातलें.

अण्णासाहेब हरीस वाचावयास बुकें देत. त्यामुळें वाचनाची गोडी त्यास अगदीं बालवयांतच लागली. त्यास खेळापेक्षां वाचनाचाच नाद अधिक असे. शाळेंत घातल्यापासून स्वारीच्या खोड्याही बऱ्याच कमी झाल्या. अशा रीतीनें कोणताही अडथळा न येतां बिशप हायस्कूलमध्यें हरिभाऊंच्या इंग्रजी तीन इयत्ता झाल्या.

पुढें पार्वतीकाकूंच्या मृत्यूनंतर सारीच गृहास्थिति बदलल्यामुळें नानासाहेबांनीं सर्व मंडळींस पुण्यास पाठविलें हें मागें सांगितलेंच आहे. इ. स. १८७८ सालीं शेकड्यांच्या बोळांतील जानवेकरांच्या वाड्यांत आपट्यांचें बिऱ्हाड आलें. तेव्हां हरी व गजानन या दोघांचींही नांवें सरकारी हायस्कुलांत घातली.

बिशप हायस्कूलच्या ख्रिश्चन वातावरणापेक्षां पुना हायस्कूलचें वातावरण किती तरी भिन्न होतें! ख्रिश्चन मिशनऱ्यांसारख्या परकीयांकडून मिळणारें शिक्षण व स्वकीयांकडून मिळणारें शिक्षण यांत फरक हा पडावयाचाच! बिशप हायस्कुलांत ब्राह्मणांपेक्षां इतर जातींच्या विद्यार्थ्यांचाच अधिक भरणा असे. त्या सार्वजातीय वातावरणांतून निघून हरिभाऊ आतां अगदीं पक्क्या महाराष्ट्रीय वातावरणांत येऊन पडले! हरिभाऊंच्या भावी आयुष्याच्या दृष्टीनें त्यांचें मुंबईहून पुण्यास झालेलें हें स्थलांतर अत्यंत श्रेयस्कर ठरलें!

## हरि नारायण आपटे

या शाळेच्या चिमुकल्या जगांतच विष्णुशास्त्री चिपळूणकरांसारख्या थोर विभूतीचा त्यांस परिचय आला. या विद्यालयाच्या आवारांतच त्यांनीं आपल्या अनेक सहाध्यायांची एकतान मैत्री संपादन केली. खरोखर प्रत्येक मुलाच्या आयुष्यांत विद्यार्थिदशेचा काल क्रांतिकारक ठरतो. बाळपणीं मूल आपल्या आईबापांचें अनुकरण करून जणूं त्यांच्याच पूजनांत दंग असतें ! परतु शाळेच्या आवारांत त्यानें एकदां पाऊल टाकलें कीं, त्याच्या विचारांत व मनोवृत्तींत एकदम बदल होतो ! आईबापांचें अनुकरण आतां बंद होऊन शिक्षकांच्या व बरोबरीच्या मित्रांच्या ठिकाणीं चित्त स्थिर होऊं पहातें. या कालांत त्यांच्या हृदयावर जे ठसे उमटतात ते बहुधा चिरकालिक स्वरूपाचे असतात! हरिभाऊंच्या विद्यालयांतील शिक्षकांच्या शिकवणीमुळें कोणतें परिवर्तन झालें हें वाचकांस यथावकाश कळेलच. आतां ज्या पूना हायस्कूलमध्यें हरिभाऊंनी प्रवेश केला, तेथील शिक्षकांची थोडी ओळख करून घेऊं या.

शाळेचे सुपरिंटेंडंट कै. महादेव मोरेश्वर कुंटे ही तत्कालीन समाजांत अत्यंत प्रसिद्ध व्यक्ति असे. कै. कुंटे यांचा विद्वत्तेसंबंधी व संस्कृत वाङ्मयांतील प्रावीण्यासंबंधीं जसा लौकिक होता, त्याचप्रमाणें त्यांच्या बेसुमार बोलण्यासंबंधींही होता. विद्यार्थ्यांच्या पुढें काय बोलावें नी काय बोलूं नये याचें त्यांस बिलकूल ताळतंत्र नसे. अर्थात् विद्यार्थिवर्गांत ते लोकप्रिय असण्याचा संभव नव्हताच.

प्रो. जिन्सीवाले संतापी असले तरी संस्कृत उत्तम शिकवीत. त्यांच्या मार्मिक शिक्षणपद्धतीमुळें हरिभाऊंना संस्कृत वाङ्मयाची गोडी लागली. विद्यार्थ्यांचें उत्तर चुकलें तर ते छडीऐवजीं सोडग्यानें मारीत. त्यामुळें विद्यार्थी त्यांजपुढें चळचळां कांपत. आपल्या जुन्या वाङ्मयाचा त्यांस फार अभिमान असे. एकदां ते भांडारकरांचें पहिलें पुस्तक हरिभाऊंच्या वर्गांत शिकवीत होते. " अस्यैवासीन्महति शिखरे गृध्रराजस्य वासः । " या वाक्यांत " गृध्रराज कोण ? " असा प्रश्न त्यांनीं विचारिला. एका विद्यार्थ्यानें " जटायू " म्हणून उत्तर दिलें ! परंतु पुढें " जटायू कोण ? " असा प्रश्न विचारतांच हरिभाऊ आदिकरून सर्व हुशार विद्यार्थी गडबडून गेले ! कोणासच या प्रश्नाचें उत्तर देतां आलें नाहीं ! तेव्हां ते रागावून म्हणाले, " तुम्हांला आपल्या पुराणांची माहिती नाहीं ! एडवर्ड दि थर्डची बायको कोण होती हें तुम्ही चटकन् सांगाल ! परंतु हिंदु असून तुम्हांला जटायू कोण हें माहीत

नाहीं ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे ! " असें म्हणून त्यांनीं प्रत्येक विद्यार्थ्यास सोडग्यानें मारिलें! परंतु, असा जरी त्यांचा अति रागीट स्वभाव होता तरी, आपल्या जुन्या संस्कृत वाङ्मयासंबंधीं अभिमान त्यांनीं आपल्या शिष्यजनांत उत्पन्न केला. हरिभाऊंना संस्कृत वाङ्मयाची इतकी गोडी लागण्याचें कारण म्हणजे प्रो. जिन्सीवाले यांची संस्कृत शिकविण्याची अप्रतिम हातोटी हेंच होय.

निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर हेही पूना हायस्कुलांत शिक्षक होते. ते इतिहास, संस्कृत, भाषांतर इत्यादि विषय शिकवीत असत. निबंधमालाकारांच्या विद्वत्तेची कीर्ति शाळेंत जाण्यापूर्वींच हरिभाऊंच्या कानीं पडल्यामुळें त्यांस त्यांच्या बद्दल अत्यंत आदर वाटे. विष्णुशास्त्री यांस शिकविण्याची हौस असून ते पद्धतशीर शिकवीत. परंतु ते वर्गावर वेळच्या वेळीं जात नसत. एकदां कां ग्रंथसंग्रहालयांत ते वाचावयास बसले कीं, तेथेंच तंद्री लागून वर्गावर शिकविण्यास जाण्याचें त्यांस विस्मरण होई. गणित वगैरे शिकविणें त्यांस आवडत नसे. वर्गातील शिस्तीकडे व टापटिपीकडे त्यांचें बिलकूल लक्ष नसे. त्यामुळें कुंटे व विष्णुशास्त्री यांचे वारंवार खटके उडत. पुढें पुढें त्यांच्यांतील बेबनाव इतका वाढला कीं, ते परस्परांची विद्यार्थ्यांतही निंदा करीत. चूक दोघांकडेही असली तरी विद्यार्थिवर्गाची सहानुभूति विष्णुशास्त्री यांजकडेच असे.

हरिभाऊंच्या मनावर तर विष्णुशास्त्र्यांची इतकी छाप पडली होती कीं, विष्णुशास्त्र्यांप्रमाणें उत्तम लेखक होण्याची महत्त्वाकांक्षा त्यांच्या उदाहरणावरून त्यांनीं धरिली. पूर्वी लहानपणीं अण्णासाहेबांप्रमाणें वकील होऊन स्वतंत्र धंदा करण्याचें ध्येय त्यांनीं आपल्यापुढें ठेविलें होतें. हायस्कुलांत प्रवेश करतांच पहिलें ध्येय लयास जाऊन त्याच्या जागीं उत्तम ग्रंथकार होण्याचें नवीन ध्येय आलें. सारांश, पुण्यास आल्यामुळें हरिभाऊंनीं एक प्रकारच्या उच्च वातावरणांत प्रवेश केला ही गोष्ट मात्र खरी.

पुण्यास आल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांच्या घराशेजारींच राहणाऱ्या नारायण सखाराम पानसे यांच्याशीं हरिभाऊंची मैत्री जमली. दोघेही एकाच शाळेंत असून एकाच वर्गात शिकत. पानसे हे अभ्यासी विद्यार्थी असल्यामुळें ते दोघेही एकमेकांच्या घरीं जाऊं येऊं लागले. अशा तऱ्हेनें वयाच्या चौदाव्या वर्षीं जडलेला हा स्नेह अखेरपर्यंत टिकला. त्या वेळचे दुसरे सहाध्यायी मित्र म्हणजे कृष्णराव

वाघळे, नरहरपंत जेजुरीकर, शिवरामपंत साठे, आत्मारामपंत देशमुख, गंगाधरपंत महाजनी हे होत. त्याचप्रमाणें, प्रो. वैजनाथ काशिनाथ राजवाडे, प्रो. आर्ते, कै. वामनराव लेले, क. हरि कृष्ण परांजपे, प्रि. बापूसाहेब ढेकणे इत्यादि मंडळींचा परिचय त्यांस पूना हायस्कूलमध्येंच झाला.

नानासाहेबांची बदली १८८० त सातार्‍यास झाली. त्यामुळें ते नौकरीच्या गांवी असत. अण्णासाहेब मुंबईला रहात. गोविंदराव कधीं मुंबईस तर कधीं पुण्यास असत. तेव्हां जानवेकरांच्या वाड्यांत राहूं लागल्यापासून हरिभाऊच घरांतील कर्ते (?) पुरुष झाले होते. त्यांच्या अभ्यासावर, वर्तनावर वगैरे देखरेख करण्यास कोणीच पुरुष मनुष्य नव्हतें. बगूताई, चिमामावशी यांस ते काय दाद देणार? हरीस नवीन वस्तूंची लहानपणापासूनच अतिशय आवड ! दोन चार महिने वापरून पुस्तक जुनें झालें कीं, त्यास तें आवडेनासें होई. जवळ पुस्तक असतां कदाचित् आपणांस तें दुकानांतून आणून देणार नाहीत, म्हणून त्यांनी पुस्तक नकोसें झालें कीं, पोत्यांत घालून अडगळीच्या खोलीत टाकून द्यावें ! अर्थात् नवीन पुस्तक त्यांना ताबडतोब मिळे. तेवढाच मुलगा शिकावयाचा, तेव्हां त्याचे वाटेल ते लाड पुरविले जात. जानवेकरांच्या वाड्यांतून बिर्‍हाड बदललें, तेव्हां एका पोत्यांत भरलेली जुनी पुस्तकें सांपडली ! हरीची ही युक्ति पाहून सर्वांस हसतां हसतां पुरेवाट झाली.

अण्णासाहेबांस संस्कृताची विशेष आवड असल्यामुळें त्यांनीं कृष्णशास्त्री नांवाचे एक शिक्षक हरिभाऊंस घरीं संस्कृत शिकविण्यासाठीं ठेविले ! त्यांना आतेभाऊ गजानन व नारायण नांवाचा एक गरीब विद्यार्थी हेही शास्त्रीबोवांच्या पाशीं शिकावयास बसत. अगोदर हरीस नकला करण्याची कमीच हौस, त्यांत हे एकाक्ष व डोक्यास टक्कल पडलेले शिक्षक भेटले ! चौदा वर्षांचें वय झालें, तरी अंगांतल्या खोड्या अजून कमी झाल्या नव्हत्या. "तुमच्या गुळगुळीत डोक्यावरून हात फिरवूं द्याल तर श्लोक पाठ करीन," असा हरी हट्ट घेऊन बसे, तर कधीं त्यांच्या डोक्यावर खारका उडवी ! अशा विलक्षण अटीच्या पुढें शास्त्रीबोवा काय करणार ? हरीची मनधरणी करून शिकवतां शिकवतां त्यांची त्रेधा उडे. हरीच्या खोड्या मोठ्या माणसापर्यंत बहुधा जात नसत. पोटार्थी शास्त्रीबुवा गरीब असल्यामुळें ते आपल्या शिष्याच्या थट्टेकडे व खोड्यांकडे विशेष लक्ष देत नसत. या शास्त्रीबुवांच्या जवळ हरिभाऊंनीं अमरकोश, शाकुंतल, रघुवंश, विक्रमोर्वशीयम्

इत्यादि ग्रंथांचें अध्ययन केलें. पण संस्कृत व्याकरणापेक्षां त्यांस वाङ्मय अधिक प्रिय असे. व्याकरणावर ते विशेष परिश्रमही करीत नसत. काव्य, नाटकें मात्र ते स्वतंत्र रीतीनेंही वाचीत.

इंग्रजी, संस्कृत, मराठी इत्यादि आवडत्या विषयांचा अभ्यास ते हौसेनें करीत. वर्गातील इतर मुलांच्या मानानें त्यांचें इंग्रजी व संस्कृत वाङ्मयाचें वाचन विस्तृत असे. त्यामुळें अर्थातच या विषयांत त्यांस सर्वांपेक्षां अधिक गुण मिळत. गणितविषय त्यांचा अगदीं नावडता ! त्या विषयाकडे ते अगदी दुर्लक्ष करीत ! वर्गात पहिला नंबर यावयाचा झाल्यास सर्वच विषय उत्तम असावे लागतात. गणितांत कच्चे असल्यामुळें हरिभाऊंचा पहिला नंबर कधींच आला नाहीं. एवढेंच नव्हे तर, वर्गात पहिला नंबर यावा अशी त्यांना महत्त्वाकांक्षाही नसे. आवडत्या विषयांकडे सर्व लक्ष, नावडत्यांकडे वक्रदृष्टि अशी त्यांची अभ्यास करण्याची पद्धति असल्याकारणानें कित्येकदां सामान्य बुद्धीचे परंतु मेहनती विद्यार्थी ह्यांच्या वर नंबर पटकावीत. अक्षर नीटनेटकें व व्यवस्थित काढण्याकडेही ते विशेष लक्ष पुरवीत नसत.

लहानपणापासूनच त्यांच्या अंगीं जबर निरीक्षणशक्ति होती. कोणाही व्यक्तींतले गुणदोष सहज त्यांच्या लक्षांत येत. लेखनाची हौसही त्यांस असे. वयाच्या चौदाव्या वर्षापासूनच ते लहान लहान गोष्टी व कविता लिहूं लागले. स्फुट गोष्टींमधील ' पुरी हौस फिटली ' ही गोष्ट त्यांनीं इंग्रजी पांचवीत असतांना वर्गात लिहून काढली व दुपारच्या सुट्टीत आपल्या मित्रमंडळीत वाचून दाखविली. केव्हां केव्हां इंग्रजी चुटक्यांचेंही ते कवितेंत भाषांतर करीत. लहानपणचा नकली स्वभाव अजूनही असल्यामुळें ते वारंवार शिक्षकांच्या वगैरे नकला करून आपल्या मित्रमंडळींस हंसवून सोडीत. प्रत्येक गोष्ट बारीक दृष्टीनें पाहून तिचें हुबेहूब चित्र वठविण्याची संवय तेव्हांपासूनच त्यांस लागली होती. शनीच्या पाराजवळ असलेल्या ठोसरांच्या वाड्यांतील तात्यापंतोजींची गंमत पाहण्यास ते आपल्या मित्रमंडळींसह मुद्दाम जात असत. या तात्यापंतोजींचें सुंदर विनोदी चित्र त्यांनीं पुढें 'मी' या कादंबरीत रेखाटलें.

इंग्रजी चवथ्या इयत्तेपासूनच त्यांस इंग्रजी व मराठी कादंबऱ्या वाचण्याचा नाद लागला. कै. शंकर मोरो रानडे यांच्या 'नाट्यकथार्णव' मासिकामुळें त्यांना मराठी

कादंबऱ्यांची गोडी लागली. जितक्या आतुरतेनें पुढें लोक त्यांच्या ‘ करमणूक ’ पत्राची वाट पहात, तितक्याच उत्सुकतेनें हरिभाऊ ‘ नाट्यकथार्णव ’ मासिकाच्या अंकाची प्रतीक्षा करीत. कै. शंकर मोरो रानडे हे जसे मार्मिक लेखक तसेच कवीही होते. त्यांच्या ‘ नाट्यकथार्णवांतील लेखनानें हरिभाऊंस स्फूर्ति होऊन त्यांनीं मेडोज टेलर याच्या ‘ पांडुरंग हरि ’ या इंग्रजी कादंबरीचें ‘अनाथ पांडुरंग ’ हें भाषांतर केलें. त्यांतील बराच भाग त्यांनीं आपल्या मित्रमंडळींत वाचूनही दाखविला होता. इंग्रजी सहावींत असतांना मेडोज टेलरच्याच ‘ तारा ’ नामक कादंबरीचें हरिभाऊंनीं आणखी एक भाषांतर केलें होतें, असें त्यांचे मित्र सांगतात. हीं भाषांतरें दुर्दैवानें उपलब्ध नाहींत. परंतु इंग्रजी कादंबऱ्या वाचून त्यांचें भाषांतर करण्याइतकें इंग्रजीचें ज्ञान त्यांस शाळेंत शिकत असतांनाच झालें होतें ही गोष्ट मात्र यावरून स्पष्ट दिसते.

हरिभाऊंना हायस्कुलांत येऊन वर्ष दीड वर्ष लोटलें नाहीं तोंच, पुण्यांत हायस्कूलशीं स्पर्धा करणारी राष्ट्रीय शिक्षणसंस्था स्थापन झाली. सरकारी शिक्षण-खात्यांतील गुलामगिरी असह्य होऊन विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं एक खाजगी नवीन शाळा स्थापन करण्याचा निश्चय केला. सरकारी नोकरीची सोनेरी शृंखला तोडून टाकून विष्णुशास्त्री नवीन शाळा काढणार ही बातमी त्यांच्या शिष्यवर्गांत पसरतांच मोठी खळबळ उडाली. शास्त्रीबुवांचा जाज्वल्य देशाभिमान, तेजस्वी बाणेदारपणा व स्वार्थत्याग यांनीं त्यांचे शिष्यजन अगदीं मोहित होऊन गेले !

शास्त्रीबोवांच्या या सत्कार्यास साहाय्य करण्यास त्यांच्याच सारखे दोघे तिघे बाणेदार, विद्वान् व देशाभिमानी तरुण पुढें सरसावले. इ. स. १८७९ च्या सप्टेंबर महिन्यांत एके रात्रीं टिळक व आगरकर हे शास्त्रीबोवांस त्यांच्या घरीं येऊन भेटले. टिळक व आगरकर या दोघांनींही सार्वजनिक कार्यांत—विशेषतः शिक्षणविषयक कार्यांत आपलें आयुष्य वेंचण्याचा निश्चय कॉलेजांतच केला होता. शास्त्रीबोवांच्या नवीन शाळेसंबंधी बातमी ऐकून त्यांत भागीदार होण्यासाठीं ते आपण होऊन त्यांच्याकडे आले ! त्या विद्वान्, हौशी, देशाभिमानी व स्वार्थ-त्यागी तरुणांस पाहून शास्त्रीबोवांस किती आनंद झाला असेल बरें ! विष्णुशास्त्री यांनीं त्याच सुमारास आपल्या धाकट्या बंधूंस पत्र लिहून कळविलें कीं, “ टिळक, आगरकर, करंदीकर व भागवत यांनीं आपण होऊन मजकडे येऊन माझ्या

धाडसाच्या कृत्यांत सामील होण्याचें स्वतःच्या खुषीनें कबूल केलें आहे. ता. १ जानेवारी, १८८०, हा दिवस आमचें निशाण उभारण्यासाठीं आम्ही मुक्रर केला आहे. अशा तोफखान्यापुढें हायस्कूल किती वेळ टिकाव धरणार ?"

न्यू इंग्लिश स्कूलची जाहिरात वर्तमानपत्रांत फडकूं लागली. परंतु तत्पूर्वीच हायस्कूलच्या विद्यार्थिजनांत ही बातमी पसरून ते आतुरतेनें नवीन शाळेच्या स्थापनेची वाट पहात बसले. सप्टेंबरमध्यें वार्षिक परीक्षा होतांच कित्येक विद्यार्थी हायस्कुलास शेवटचा रामराम ठोकून घरीं बसले. ज्याप्रमाणें विद्यार्थ्यांच्या त्याचप्रमाणें त्यांच्या पालकांच्याही मनांत विष्णुशास्त्री यांच्याबद्दल अत्यंत आदर वसत होता. "जानेवारींत विष्णुशास्त्री नवीन शाळा काढणार, तेव्हां आम्ही त्यांच्याच शाळेंत जाणार," असा हट्ट मुलांनीं धरिला व "विष्णुशास्त्री चिपळूणकरांची शाळा, तेव्हां ती उत्तमच असणार," अशी पालकांचीही खात्री असल्यामुळें त्यांनीं मुलांचा हा हट्ट चालू दिला. अशा रीतीनें सप्टेंबरपासून जानेवारीपर्यंत चार महिने ज्यांनीं सुट्टी घेतली त्यांमध्यें हरिभाऊ, प्रो. राजवाडे व प्रो. पानसे इत्यादि हरिभाऊंची मित्रमंडळी प्रमुख होती.

शाळा उघडेपर्यंत एक दिवसाआड हरिभाऊ आपल्या एकदोन मित्रांसह शास्त्रीबोवांच्या घरीं जात व "शाळा केव्हां सुरू करणार ?" असा प्रश्न विचारीत. त्या वेळीं बहुधा टिळक व नामजोशी चिपळूणकरांच्या घरीं शाळेसंबंधीं चर्चा करीत बसलेले असावयाचे ! विद्यार्थ्यांची आपल्या नवीन शाळेबद्दलची ही आतुरता पाहून चिपळूणकर व टिळक यांस जास्त उत्साह वाटला असेल यांत शंका नाहीं.

तारीख १ जानेवारी, १८८०, रोजीं मोरोबादादा फडनवीस यांच्या वाड्यांत ही नवीन शाळा उघडण्याचा समारंभ झाला. हरिभाऊ व त्यांचें उत्साही मित्रमंडळ शाळेच्या पहिल्या दिवशींच हजर असेल यांत नवल नाहीं. पहिल्या दिवशीं १९ मुलेंच हजर असलीं तरी हजिरीपटावर दीडशें मुलांचीं नांवें होतीं. शाळेच्या स्थापनेच्या दिवशीं विष्णुशास्त्री व टिळक हे दोघे असून शिवाय माधवराव नामजोशी, वासुदेवशास्त्री खरे, हरि कृष्ण दामले, नंदर्गीकरशास्त्री वगैरे उत्साही मंडळी होती. १८८० च्या ऑगस्ट महिन्यांत वामन शिवराम आपटे हे शास्त्रीबोवांस येऊन मिळाले व एम्. ए. ची परीक्षा आटोपतांच कै. आगरकर हेही संस्थेंत येऊन दाखल झाले.

तरुण, स्वार्थत्यागी व विद्वान् चालक मंडळी, नवीन संस्था व उत्साही शिष्यजन असा योग जमल्यामुळें शाळेची उत्तरोत्तर भरभराट होत चालली. त्याच सालीं मे महिन्याच्या सुट्टीनिमित्त शाळा बंद होण्याच्या दिवशी शास्त्रीबोवांनीं एक इंग्रजी भाषण केलें. त्यांत अवघ्या तीन महिन्यांत शाळेंतील विद्यार्थ्यांची संख्या ५०० पर्यंत गेल्याचा उल्लेख केला आहे. त्या वेळच्या हायस्कूलच्या प्रिन्सिपॉलसाहेबांनीं त्या तरुण मंडळींस आपल्या वार्षिक अहवालांत शेलक्या विशेषणांचा अहेर केला होता. त्यांस ' उनाड व हुच्चे तरुण ' अशी संज्ञा देऊन सरकारी हायस्कुलास त्यांजपासून भीति नाहीं असेंही त्यांनीं प्रतिपादन केलें होतें. या प्रिन्सिपॉलसाहेबांचा आपल्या भाषणांत शास्त्रीबोवांनीं योग्य समाचार घेतला.

विष्णुशास्त्री, आगरकर, टिळक, वामन शिवराम आपटे इत्यादि थोर अध्यापकांच्या हाताखालीं ज्ञानसंपादन करण्याचें भाग्य हरिभाऊंस लाभलें. अध्यापकांची उदात्त विचारसरणी, स्वार्थत्यागी वृत्ति व त्यांचा देशाभिमान हरिभाऊंच्या नेत्रांसमोर सतत असल्यामुळें त्यांचेंही अन्तःकरण उदात्त विचारांनी भरून गेलें. चिपळूणकरांप्रमाणें देशसेवेचें असिधाराव्रत आपण स्वीकारावें व सार्वजनिक कार्यांत आयुष्य घालवावें अशा तऱ्हेचे विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले. हजारों व्याख्यानांनीं जें कार्य होऊं शकणार नाहीं तें एका प्रत्यक्ष उदाहरणानें सहज झालें. हरिभाऊ व त्यांच्या कंपूंतील मित्र सरकारी नौकरीबद्दलचा तिरस्कार उघड व्यक्त करूं लागले. " सरकारी नौकरीची गुलामगिरी न पतकरतां, शास्त्रीबोवा, टिळक, आगरकर यांच्याप्रमाणें मी स्वतंत्र व्यवसाय करणार, " असें हरिभाऊ आपल्या मित्रांस तेव्हां सुद्धां बोलून दाखवीत.

न्यू इंग्लिश स्कूलमध्यें त्यांनीं प्रवेश केला त्या वेळी हरिभाऊ इंग्रजी सहावीच्या वर्गांत शिकत होते. त्यांच्या शिक्षकवर्गांत चिपळूणकर, टिळक, नामजोशी, नंदर्गीकरशास्त्री, वासुदेवशास्त्री खरे, धारप वगैरे मंडळी होती. विष्णुशास्त्री व आगरकर इंग्रजी शिकवीत. टिळक गणित घेत, तर आपटे, खरे व नंदर्गीकर शास्त्री संस्कृत शिकवीत. आगरकर इतिहास विषयही घेत.

सर्व शिक्षकांचें हरिभाऊंच्या विषयीं चांगलें मत असे. त्यांच्या लेखनाची कीर्ति शिक्षकवर्गांतही पसरल्यामुळें एक हुशार, बुद्धिमान् विद्यार्थी याच दृष्टीनें शिक्षक त्यांजकडे पहात. त्यांच्या संस्कृत लिटरेचरच्या पेपरवर वामन शिवराम

आपटे हे खूष असत. कालिदासाचीं नाटकें, बाणाची कादंबरी, दशकुमार-चरित स्वतः कोणाच्याही मदतीशिवाय वाचून त्यांनीं त्यांचीं अनेक पारायणें केलीं होतीं. तेव्हां संस्कृत लिटरेचरच्या भागांत त्यांची बरोबरी कोणीही विद्यार्थी करूं शकत नसे. कोणताही कठीण नवीन संस्कृत श्लोक असो, इतर मुलांच्या मानानें तो त्यांस लवकर समजे व त्याबद्दल शिक्षक त्यांचें कौतुकही करीत.

संस्कृतप्रमाणेंच इंग्रजी वाङ्मयाचेंही अवांतर वाचन त्यांनीं पुष्कळच केलें होतें. अवांतर इंग्रजी वाचण्याची गोडी त्यांना विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्यामुळेंच लागली. शास्त्रीबुवांना रेनॉल्ड्स्च्या कादंबऱ्या वाचतांना त्यांनीं अनेकदां पाहिलें होतें. त्यामुळें हरिभाऊही रेनॉल्ड्स् वाचूं लागले. रेनॉल्डसशिवाय शाळेंत असतांनाच मिल्टन, शेक्स्पिअर, स्कॉट, शेली, कीटस्, मोलीएरच्या कॉमेडीज्, थॅकरे, डिकन्स्, जेन ऑस्टिन् इत्यादि नामांकित इंग्रजी कवींचे व कादंबरी-कारांचे ग्रंथ त्यांनी समग्र वाचून काढले होते. ते स्वतः तर वाचन करीतच; परंतु आपल्या मित्रमंडळीतही आपण वाचलेल्या ग्रंथांची स्तुति करीत. हरि-भाऊंच्या संगतीमुळें त्यांच्या मित्रांनी अवांतर इंग्रजी पुस्तकांचें वाचन करावें. हरिभाऊंनीं एक पुस्तक वाचलें की, तेंच त्या मित्रमंडळींत आठ पंधरा दिवस फिरत राही.

इंग्रजीच्या वर्गांत कित्येकदां शिक्षकांनी सांगितलेल्या अर्थापेक्षां ते वेगळा अर्थ सुचवीत व शिक्षकही त्यांचा अर्थ अधिक चांगला म्हणून त्याचा स्वीकार करीत. एकदां श्री. आगरकर मॅट्रिकच्या वर्गांत Pope's *Essay on Man* शिकवीत असतां हरिभाऊंनी सुचविलेल्या अर्थाचा त्यांनी स्वीकार केला होता. कै. आगर-करांस विद्यार्थ्यांच्या सूचनांचा कधींही राग येत नसे. हरिभाऊंच्या इतका वाचनाचा नाद कोणासच नव्हता. " हरिभाऊंच्या मुळें आम्ही कित्येक कादंबऱ्या वाचल्या," असें त्यांचे मित्र सांगतात.

त्यांची अभ्यास करण्याची पद्धति व्यवस्थित नव्हती. अक्षरही नीटनेटकें लिहिण्याकडे त्यांचें विशेष लक्ष नसे. " अक्षर नीट काळजीपूर्वक लिहीत जा, " असें आपटे त्यांना जरी अनेक वेळां सांगत असले तरी, इतर विद्यार्थ्यांप्रमाणें त्यांस कधींही छड्या बसल्या नाहींत. एकाद्या कवीचे फक्त एकदोन चुटकेच परीक्षेस असल्यास तो कवि समग्र वाचून काढल्याशिवाय त्यांचें कधींही समाधान

होत नसे. त्यांच्या इंग्रजी, संस्कृत व मराठी या तिन्ही विषयांतील प्रावीण्याबद्दल त्यांच्या शिक्षकांस फार अभिमान वाटे. गणिताची पर्वा त्यांनीं कधींच केली नाहीं. त्याच्यावर परिश्रम करण्याचा त्यांना कंटाळा असे. त्यामुळें आपटे त्यांस विनोदानें " The Great Hero in Mathematics " असें म्हणत.

इ. स. १८८२ सालीं न्यू इंग्लिश स्कूलचे ग्रह अनिष्ट असले पाहिजेत. कारण याच वर्षी शाळेवर एकामागून एक भयंकर आपत्ति येऊन कोसळल्या. विष्णुशास्त्री चिपळूणकर मार्चच्या १५ व्या तारखेस एकाएकी आजारी पडले व १७ तारखेस पहांटे साडेपांच वाजतां आकस्मिक रीतीनें त्यांचा अंत झाला. पुण्यांतील कित्येक लोकांस शास्त्रीबोवा आजारी असल्याची सुद्धां खबर नव्हती. त्यामुळें त्यांच्या या शोचनीय व अकालीं निधनाची दुःखद वार्ता कानी येतांच सर्व लोक चकित होऊन त्यांस अत्यंत दुःख वाटलें. न्यू इंग्लिश स्कूल व हायस्कूलमध्यें ही बातमी समजतांच विद्यार्थ्यांचे थवेच्या थवे या थोर पुरुषाचें शेवटलें दर्शन घेण्यासाठीं धांवत आले. गांवांतील प्रतिष्ठित मंडळीही त्यांच्या घरीं जमली.

हरिभाऊंना विष्णुशास्त्री यांच्या निधनानें अत्यंत दुःख झालें. शास्त्रीबोवांच्या चारित्र्याचा व त्यांच्या अंगच्या अमोलिक गुणांचा हरिभाऊंच्या अन्तःकरणावर अतिशय परिणाम झाला होता. त्यांनी आपल्यासमोर शास्त्रीबोवांचा आदर्श ठेविला असून, त्यांच्या प्रमाणें उत्तम, मार्मिक ग्रंथकार होण्याची महत्त्वाकांक्षा मनांत धरिली होती. विष्णुशास्त्री यांच्या बद्दल त्यांना जितका आदर, अभिमान व प्रेम वाटत होतें तितकें कोणाबद्दलच नव्हतें. त्यामुळें त्यांच्या मृत्यूचें वर्तमान कानांवर येतांच त्यांची वृत्ति बेभान होऊन ते धांवतच चिपळूणकरांच्या घरीं आले ! ज्यांच्या उज्ज्वल चारित्र्यामुळें त्यांचें मन विकास पावून उदात्त झालें होतें, त्या विभूतीचें अचेतन कलेवर पाहतांच त्यांच्या चित्तास काय वाटलें असेल बरें ?

सकाळीं ११ वाजतां प्रेतयात्रा निघाली. हरिभाऊही त्यांच्या बरोबर स्मशानांत गेले होते. तेथें शेंकडों मंडळी जमली होती. हरिभाऊंचे वर्गबंधु रामभाऊ साने यांनीं शास्त्रीबोवांच्या गुणवर्णनपर भाषण केल्यावर दहनविधि झाला. झालें! महाराष्ट्रांतील एक लोकोत्तर पुरुष नाहींसा झाला. न्यू इंग्लिश स्कूल, किताबखाना, चित्रशाळा, आर्यभूषण इत्यादि त्यांनीं स्थापिलेल्या अनेक संस्था पोरक्या झाल्या. कोल्हापूरप्रकरणाच्या वावटळींत आगरकर व टिळक सांपडल्यामुळें, केसरी व

## ' शिष्यजन–विलाप '

मराठा या पत्रांचें जीवित धोक्यांत पडलें व तीं त्यांतून निर्विघ्नपणें पार पडतील किंवा नाहीं अशी काळजी उत्पन्न झाली. हरिभाऊ आदिकरून शास्त्रीबोवांना मानणारे विद्यार्थी यांचीं तोंडें चिमणीसारखीं होऊन त्यांस आपला मोठा आधार-स्तंभ कोसळला असेंच वाटलें. हरिभाऊ खिन्न मनःस्थितींत स्मशानांतून घरीं गेले, परंतु त्यांस बिलकूल चैन पडेना ! त्याच दिवशी त्यांच्या दुःखानें खवळलेल्या चित्त-सागरांतून ' शिष्यजनविलाप ' या काव्यरत्नाचा जन्म झाला. हरिभाऊंचे एक मित्र सांगतात कीं, " हरिभाऊ स्मशानांतून आले तोंच, पद्यबद्ध बोलूं लागले. रात्रंदिवस परिश्रम करून त्यांनीं हें काव्य रचलें. लेखनासाठीं एकांत मिळावा म्हणून ते जमखिंडीकरांच्या वाड्यांत जाऊन लिहीत बसत. हरिभाऊ काव्यरचना करीत आहेत हें कळतांच त्यांचे मित्र त्यांस " कविता संपली कां ? " असें वारंवार विचारीत. ' होत आली आहे, ' असें त्यावर हरिभाऊ उत्तर देत. कविता लिहून झाल्यावर हरिभाऊ आपले मित्र श्री. दत्तोपंत जोशी यांस बरोबर घेऊन ' नाट्य-कथार्णव 'कर्ते श्री. शंकर मोरो रानडे यांजकडे गेले व त्यांना कविता तपासून देण्याबद्दल हरिभाऊंनीं विनंति केली. वृत्तभंग टाळण्यासाठीं त्यांनी ' दाक्षिणादिशा ' याबद्दल ' पितृवन ' हा शब्द सुचविला व एकंदरीत ' कविता सुंदर आहे ' असा अभिप्राय दिला. दुसऱ्याच दिवशी श्री. दत्तोपंत जोशी यांनीं कवितेस प्रस्तावना लिहून ती छापावयास दिली. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या दहाव्या दिवशीं कविता प्रसिद्ध करण्याचा पूर्वसंकल्प पार पडला. दोन दिवसांत हजार प्रती खपल्या. किंमत फक्त दोन आणे ठेविल्यामुळें, शाळेंतील शेंकडों विद्यार्थ्यांनीं पुस्तक विकत घेतलें. आपलें नांव कोणांस कळूं नये अशी इच्छा असल्यानें मुखपृष्ठावर कवीचें नांव छापलें नव्हतें. परंतु कर्णोपकर्णीं शेवटीं कवीचें नांव उघडकीस आलेंच. न्यू इंग्लिश स्कूल-मध्यें शास्त्रीबोवांच्या अकालीं निधनानिमित्त दुःख प्रदर्शित करण्यासाठीं जी सभा झाली तींत आगरकरांनीं शास्त्रीबोवांच्या गुणवर्णनपर भाषण केलें. त्या वेळीं त्यांनीं 'शिष्यजनविलाप' या काव्यांतील कांहीं भाग वाचून दाखविला व कवीची स्तुति करून म्हटलें, " ज्या संस्थेंत शिक्षण घेणारे विद्यार्थी इतकें सुंदर काव्य निर्माण करूं शकतात, त्या संस्थेचा भविष्यत्काळ उज्ज्वल स्वरूपाचा खात्रीपूर्वक होईल. " ही कविता विद्यार्थिवर्गास फार प्रिय होऊन तिच्या सर्व प्रती दोन महिन्यांतच खलास झाल्या व उत्तम कवि म्हणून हरिभाऊंचें नांव सर्वांच्या तोंडीं झालें.

पहिली आवृत्ति ताबडतोब खलास झाल्यामुळें लोकाग्रहास्तव लगेच त्याची दुसरी आवृत्ति काढण्यांत आली यावरून या काव्याच्या लोकप्रियतेची साक्ष पटते.

'शिष्यजनविलाप' ही कविता वाचून या बालकवीचें खरोखर अतिशय कौतुक वाटतें. काव्याची मांडणी सुंदर आहे. उपक्रम, विलाप, गुणवर्णन, देशहितार्थ कृत्यें व उपसंहार असे कवितेचे भाग पाडून शास्त्रीबोवांचा थोरपणा व त्यांची कामगिरी यांचें त्यांनीं उत्कृष्ट वर्णन केलें आहे. शिष्यजनांस विष्णुशास्त्र्यांच्या निधनानें झालेल्या दुःखाचें वर्णन अत्यंत भावनामय असून

" हृदय जळतें सारें हा! हा!! तुझ्या विरहानलें !
सलिल न खळे डोळ्यांचें या सदा जरि वारिलें. "

हे त्यांनीं काढिलेले शिष्यजनांचे शोकोद्गार अगदीं हृदयापासून निघालेले आहेत असें वाटतें. शास्त्रीबोवांच्या पत्नीचें वर्णन तर अत्यंत हृदयस्पर्शी झालें आहे.

" शिव ! शिव ! अहा ! कांता तूझी तशीच इथें रडे,
वपु थरथरां कांपे कर्णीं तिचा रव जों पडे,
बघुनि तिजला येते आम्हां क्षणीं बघ मूर्च्छना,
परि तुजसि रे कैशी ना ये दया अतिनिर्घृणा ? "

शास्त्रीबोवांचें गुणवर्णन करितांना तर शास्त्रीबोवांवर कराल कृतांतानें झडप घालून " पुण्याचें, अहा ! सर्व सौंदर्य नेलें " असें त्यांनीं म्हटलें आहे.

त्यांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, मराठीबद्दलचा अभिमान, त्यांचा धार्मिकपणा, स्वातंत्र्यप्रियता व टीका करण्याची जोरदार शैली यांची प्रशंसा करून, निबंधमाला, चित्रशाळा, न्यू इंग्लिश स्कूल, आर्यभूषण छापखाना, केसरी व मराठा, काव्येतिहाससंग्रह व किताबखाना इत्यादि त्यांनीं निर्मिलेल्या संस्थांचें व सार्वजनिक कामगिरीचें हरिभाऊंनीं उत्कृष्ट वर्णन केलें आहे.

उपसंहारांतील पुढील श्लोकांत जसें शास्त्रीबोवांच्या तसेंच हरिभाऊंच्या जीविताचेंही रहस्य सांपडतें :

" अस्मत्सत्यहितार्थ तों झिजविलें त्वां आत्मदेहा सदा,
अस्मद्भूति करावयास्तव निजा त्वां नाशिली संपदा,
अस्मद्देशसुकीर्तिपूर्ति करण्या, देशाभिमान्यग्रणे,
केलें काय तुवां न, हाय ! अमुच्या प्रीत्यर्थ विद्वन्मणे ? "

# न्यू इंग्लिश स्कूलवरील दुसरें गंडांतर

" शिक्षा देतां अम्हांला हृदयिं भरविला जो स्वदेशाभिमान
तो या चित्तामधोनीं कधिंहि न निघणें अन्यविद्यांसमान. "

ही कृतज्ञतेची जाणीव असल्यामुळें

" विष्णो, सच्छिष्य आम्ही सकल जरि असूं चंडधैर्या तुझे ते
सारे आम्ही तरी रे सफल करुनिया दावुं त्या शिक्षणातें. "

असें आश्वासन देऊन हरिभाऊंनीं सर्व शिष्यजनांच्या तर्फे

" जो जो कृत्यसमूह या पुरिमधें धैर्यें तुवा स्थापिला
तो तो चालविण्यासि जन्म खरचूं सारा अम्ही आपुला. "

अशी जणूं कांही प्रतिज्ञाच केली. शाळेंत केलेली ही प्रतिज्ञा हरिभाऊंनीं आपल्या आयुष्यांत खरोखर सफल करून दाखविली. यावरून शास्त्रीबोवांच्या तेजस्वी व विमल चारित्र्याचा त्यांच्या मनावर केवढा परिणाम झाला होता हें लक्षांत येतें ! शास्त्रीबोवांनीं देशप्रीत्यर्थ केलेल्या कामगिरीनें स्फूर्ति उत्पन्न होऊन हरिभाऊ व त्यांचे कित्येक मित्र यांनीं देशसेवेस आपलें आयुष्य अर्पण केलें ! !

विविध प्रकारच्या वृत्तांत रचलेली ही एकुणनव्वद श्लोकांची कविता हरिभाऊंनीं केवळ मॅट्रिकच्या वर्गांत असतांना लिहिली, हें पाहून विशेषच आश्चर्य वाटतें. त्यांची संस्कृतप्रचुर, अर्थगंभीर व शोकगीतास साजेशी समर्पक भाषा, त्यांनी उपयोजिलेले नाना अलंकार व सुंदर कल्पना यांचें परीक्षण केलें असतां कै. आगरकर यांनी त्यांची केलेली प्रशंसा योग्य वाटते. असो.

इ. स. १८८२ चा जुलै महिना न्यू इंग्लिश स्कूलच्या चालक मंडळींस व त्याचप्रमाणें त्यांतील विद्यार्थिवर्गास अत्यंत कष्टाचा गेला. कोल्हापूरप्रकरणासंबंधीं बनावट पत्रें ' केसरी ' व ' मराठा ' या पत्रांत प्रसिद्ध केल्याचा टिळक व आगरकर यांजवर आरोप ठेवण्यांत येऊन त्यांच्यावर खटला भरण्यांत आला. ता. १७ जुलै रोजीं दोघांवरचा आरोप शाबीत होऊन त्यांस चार महिने साध्या कैदेची शिक्षा ठोठावण्यांत आली. आगरकर व टिळक यांची दंडावर सुटका न करतां त्यांना कैदेची शिक्षा देण्यांत आली, याबद्दल पुणेकर मंडळींत फार खळबळ उडाली. जागोजागीं सरकारच्या निषेधपर सभा भरविल्या गेल्या. डेक्कन कॉलेजचे प्रि. वर्ड्स्वर्थसाहेब, ना. मंडलीक, वगैरेसारख्या लोकमान्य गृहस्थांनीं पुढाकार घेऊन त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन यांजकडे पत्र

पाठवून आगरकर टिळकांना क्षमा करून त्यांस बंधमुक्त करावें अशी विनंति केली. परंतु या अर्जाचा कांहींएक उपयोग झाला नाहीं.

श्री. आगरकर व टिळक हे दोघेही शिष्यवर्गांत प्रिय होते. या खटल्यामुळें तर विद्यार्थ्यांची त्यांजवर विशेषच भक्ति जडली व त्यांच्या बद्दलचा त्यांचा आदर द्विगुणित झाला. हरिभाऊ या वेळीं मॅट्रिक्युलेशनच्या वर्गांत होते. आगरकर-टिळक यांच्यासारख्या पुरुषांस सरकारनें विनाकारण तुरुंगांत डांबून ठेविलें, याबद्दल त्यांस अत्यंत वाईट वाटलें. त्यांनीं व त्यांच्या कांहीं मित्रांनीं तर आगरकर-टिळक तुरुंगांतून मुक्त होईपर्यंत अभ्यास वर्ज्यच केला. शाळेंतील प्रत्येक वर्गांत जाऊन हरिभाऊ व त्यांचे मित्र यांनीं व्याख्यानें देण्याचा क्रम सुरू करून विद्यार्थ्यांच्या कडून Defence Fund गोळा केला. आगरकर-टिळक तुरुंगांत असतांना शाळेंत व्यवस्थित अभ्यास चालत नसत. विशेषतः वरच्या वर्गांतील विद्यार्थी सुट्टींत शाळेच्या आवारांत ठिक-ठिकाणीं जमून कोल्हापूरप्रकरणाबद्दलच चर्चा करीत.

ऑक्टोबर तारीख २६ रोजीं आगरकर-टिळकांची सुटका होणार हें वृत्त पुणेकरांस कळतांच त्यांचा जाहीर सन्मान करण्याचें मंडळींनीं ठरविलें. खडकी स्टेशनवर डेक्कन कॉलेजांतील विद्यार्थी व प्रोफेसर यांनीं या मुक्त झालेल्या तरुण वीरांचा सत्कार केला. पुण्याच्या स्टेशनवर शेंकडों लोक जमले होते. हरिभाऊ व त्यांची मित्रमंडळीही न्यू इंग्लिश स्कूलच्या विद्यार्थ्यांच्या तर्फे आपल्या पूज्य आचा-र्यांचें स्वागत करण्यासाठीं हारगजरे घेऊन स्टेशनवर हजर होती. तेथें जमलेल्या लोकांनीं आगरकर-टिळक यांस मोठ्या समारंभानें गांवांत आणिलें व सायंकाळीं मोरोबादादांच्या वाड्यांत त्यांच्या सन्मानार्थ जाहीर पानसुपारी करण्यांत आली. डोंगरीच्या तुरुंगवासामुळें या दोघां बाणेदार देशसेवकांनीं लोकप्रियता संपादन केली, एवढी गोष्ट खरी! Defence Fund जमविण्याच्या कामीं हरिभाऊ व त्यांचे मित्र यांनीं अविश्रांत काम करून या आपल्या दोघां गुरूबद्दलची निष्ठा व्यक्त केली.

इ. स. १८८२ सालीं शास्त्रीबोवांचें अकालीं निधन व श्री. आगरकर व टिळक यांचा तुरुंगवास या दोन आपत्ति एकाएकीं कोसळल्यामुळें मॅट्रिकच्या वर्गांतील मुलांचें चित्त अभ्यासाकडे लागेना. विशेषतः हरिभाऊ व त्यांचे मित्र यांनीं आपला अभ्यासाचा वेळ व्याख्यानें देण्यांत, फंड जमविण्यांत खर्च केला. साहजिकच त्यांचें अभ्यासाकडे दुर्लक्ष होऊन त्याचा परिणाम शेवटीं प्रवेशपरीक्षेवर झालाच!

## प्रवेशपरीक्षेचें दिव्य

विद्यालयाच्या परीक्षेस बसण्यापूर्वी विद्यार्थ्यांची शाळेंत जी चांचणी घेतली गेली, तींत हरिभाऊंना अपयश आलें. इतर विषयांचे कागद चांगले गेले. परंतु गणितानें, त्याजकडे दुर्लक्ष केल्याबद्दल, हरिभाऊंवर सूड उगवला! त्या विषयांत त्यांस अवघे पांच गुण पडल्यानें परीक्षेला त्यांस पाठविण्यांत आलें नाहीं. त्यामुळें हरिभाऊंची मोठी नाउमेद होऊन अत्यंत निराशा झाली. परंतु दुःखांत सुख एवढेंच कीं, हरिभाऊंच्या साह्यकारी मित्रांचीही तशीच स्थिति होती.

अशा रीतीनें परीक्षेंत अपयश आल्यामुळें घरची मंडळी त्यांच्यावर नाखूष झाली. अभ्यास न करतां भलत्या उठाठेवींत हरिभाऊ आपल्या काळाचा अपव्यय करितात अशीच त्यांची समजूत झाली. तेव्हां इ. स. १८८३ सालीं त्यांनीं आरंभापासून नियमितपणें अभ्यास सुरू केला. गणितविषयाकडेही ते काळजीपूर्वक लक्ष देऊं लागले. इंग्रजी, संस्कृत, मराठी व इतिहास हे विषय त्यांचे उत्तम होतेच. एकदां अपयश आल्याकारणानें त्यांचा आत्मविश्वास पार उडून गेला होता. तथापि चांचणीपरीक्षा झाली तींत हरिभाऊंस प्रवेशपरीक्षेस बसण्याची परवानगी मिळाली. परीक्षेचा दिवस उजाडला. Engineering College च्या पटांगणांत परीक्षेचा मंडप होता. हरिभाऊ रोज परीक्षेला जाते वेळीं आपल्या आजीस व चिमामावशीस नमस्कार करून जात. एकदांची परीक्षा पार पडली आणि कागदही बरे गेले.

परंतु जसजसा परीक्षेच्या निकालाचा दिवस जवळ जवळ येत चालला, तसतशी त्यांस अधिकाधिक काळजी वाटूं लागली. निराशेच्या भरांत "आपण कसले पास होतों?" असा विचार त्यांच्या डोक्यांत येई. परीक्षेच्या निकालाचा दिवस येऊन ठेपला. हरिभाऊंना घरीं बिलकुल चैन पडेना, म्हणून ते आपल्या स्नेह्याच्या घरीं गेले. तो स्नेहीही त्यांच्याच सारखा काळजी करीत बसला होता! दोघेही एकाच मनःस्थितींत होते; परंतु, वर वर मात्र एकमेकांस धीर देत. परीक्षेच्या निकालास फक्त एक तास राहिला. हरिभाऊंची अधीरता व निराशा पराकोटीस पोहोंचली. अमका पास झाला, तमक्याची तार आली, अशा बातम्या येतच होत्या! हरिभाऊंची व त्यांच्या मित्राची तार अजूनही आली नव्हती! शेवटीं अतिशय खिन्नतेनें हरिभाऊ आपल्या मित्रास म्हणाले, "इतकीं शेंकडों मुलें परीक्षेला बसलीं, त्यांत आपलं नांव कोण छापतं?" हे उदासवाणे उद्गार त्यांच्या तोंडून निघाल्यानंतर थोड्याच वेळांत हरिभाऊ परीक्षेंत यशस्वी झाल्याची तार आली. त्यांच्या

त्यांसही तार आली; मग जो आनंदीआनंद झाला त्याची कल्पना जे जे कोणी परीक्षेस बसून पास झाले आहेत त्यांनाच होईल !

हरिभाऊंच्या परीक्षेच्या निकालाची बातमी घरीं पोहोंचतांच, आजीस अत्यानंद होऊन तिच्या नेत्रांतून आनंदाश्रु गळूं लागले. सर्व नातवंडांत हरिभाऊंच्यावर आजीचें विलक्षण प्रेम असे. नानासाहेबांसही हरिभाऊ पास झाल्याचें ऐकून संतोष वाटला. घरांतील मंडळींचा आनंद पाहून हरिभाऊंचाही आनंद द्विगुणित झाला. सर्व परीक्षांमध्यें विद्यार्थी प्रवेश-परीक्षेस जितकें महत्त्व देतात तितकें सहसा दुसऱ्या कोणत्याच परीक्षेस देत नसतील ! शाळा व विश्वविद्यालय यांस सांधणारी ही संधि-परीक्षा विद्यार्थ्यांस जितका आनंद देते तितकेंच त्यांच्या हृदयांत भयही उत्पन्न करते ! शाळेच्या जीवनांतील ही अंतिम परीक्षा सरस्वतीच्या भव्य प्रासादांतील अंतर्दालनांचें द्वार खुलें करते. ज्ञानाच्या विशाल विश्वांत नेऊन सोडणारी ही चिमुकली दूती मोठा प्रभावशाली असते यांत शंका नाहीं ! असो. शाळेच्या संकुचित जगांतून हरिभाऊंनीं आतां विश्वविद्यालयाच्या विस्तीर्ण विश्वांत पदार्पण केलें एवढी गोष्ट मात्र खरी.

हरिभाऊंच्या शाळेंतील लेखनव्यवसायाबद्दल मागें एकदां लिहिलेंच आहे. अभ्यासापेक्षां लेखन त्यांस प्रियतर होतें. शाळेंतील आयुष्यक्रमांत त्यांनीं वर्तमान-पत्रांत किती तरी लेख लिहिले ! इ. स. १८८१ सालीं, 'कालिदास, शेक्स्पिअर व भवभूति' या विषयावर श्री. आगरकर यांनीं केसरींत एक लेखमाला लिहून त्यांत कालिदासापेक्षां भवभूतीच श्रेष्ठ आहे असें प्रतिपादन केलें. हरिभाऊंचें संस्कृत वाङ्मयाचें वाचन विस्तृत असून कालिदास हा कवि त्यांचा अत्यंत आवडता होता. शेक्स्पिअर, भवभूति व कालिदास या तिघांची तुलना करून श्री. आगरकर यांनीं कालिदासास शेवटचा नंबर दिला ही गोष्ट त्यांस रुचली नाहीं. आपल्या आवडत्या कालिदासास श्री. आगरकरांनीं भवभूतीपेक्षां कमी लेखलेलें पाहून त्यांस बिलकुल चैन पडेना ! शेवटीं २९ मार्चच्या केसरीच्या अंकांत

' अप्राप्तकालं वचनं बृहस्पतिरपि ब्रुवन्
लभते बुध्द्यवज्ञानमपमानं च पुष्कलम् '

हा श्लोक उद्‌धृत करून ' बिचारा ' या नांवाखालीं केसरीकारांस उद्देशून त्यांनीं एक पत्र प्रसिद्ध केलें. भवभूतीच्या नाटकांतील लवंगिकादि स्त्रीपात्रांच्या

तोंडच्या लांबच लांब पाल्हाळिक भाषणांपेक्षां कालिदासाच्या नाटकांतील प्रियंवदा, अनसूया इत्यादि पात्रांची भाषणें खुबीदार असून चटकदार आहेत, असें त्यांनीं मुद्देसूद रीतीनें दाखविलें ! त्याचप्रमाणें 'शकुन्तलेस पाहून दुष्यन्ताच्या मनांत उद्भवलेल्या प्रेमापेक्षां मालतीला पाहून माधवाच्या मनांत उद्भवलेलें प्रेम विशेष मजेचें व मनास चटका लावणारें आहे', हें केसरीकारांचें मत त्यांनीं खोडून काढलें. कालिदासास भवभूतीसारखा करुणरस साधला नाहीं, या केसरीकारांच्या मताचें खंडन करतांना, त्यांनीं कालिदासाच्या शाकुन्तल, विक्रमोर्वशीयम् या नाटकांतील व मेघदूत काव्यांतील अनेक श्लोक निर्दिष्ट करून, त्यांतील करुणरसापेक्षां 'उत्तररामचरितम्' अथवा 'मालतीमाधव' यांतील कोणताही श्लोक अधिक करुणरसपूर्ण नाहीं असें स्पष्टपणें ठासून सांगितलें. कालिदासाच्या अचाट कल्पनाशक्तीचें वर्णन करून अशा थोर कवीस केसरीकारांनी शेवटचें स्थान देण्यांत अविचारीपणा केला, किंबहुना "हा लेख लिहितांना ते निद्राजननीच्या स्वाधीन" झाले होते असें लिहिण्यास सुद्धां त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं !

यावर केसरीकारांनीं लिहिलें, "उत्तररामचरितां"तील तिसरा व सहावा हे अंक मननपूर्वक वाचून खात्री करून घ्यावी. 'यास्यत्यद्य' हा करुणरस कोणीकडे व 'प्रियानाशे कृत्स्नं' ह्यांतील रस कोणीकडे ? सृष्टिवर्णन, प्रेमाचें गंभीरत्व व करुणरसाचा हृदयमर्मभेदी आविर्भाव या गोष्टींमध्यें भवभूति अधिक श्रेष्ठ आहे, हें आमचें मत कायम आहे." अशा रीतीनें या वादाचा समारोप झाला तरी, हा टीकात्मक लेख मॅट्रिकच्या वर्गांत शिकत असलेल्या एका विद्यार्थ्यानें लिहिला ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे, हरिभाऊंच्या चिकित्सक बुद्धीचें व धारिष्टाचें कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं. पुनः ही टीका शिष्यानें आचार्यावर केलेली ! "शिष्यादिच्छेत् पराजयम्" अशी गुरूचीही उदार वृत्ति असल्यानें त्यांनीं या टीकालेखास आपल्या पत्रांत जागा दिली, एवढेंच नव्हे तर लेखकाचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन केलें. श्री. वामन शिवराम आपटे यांनींही हरिभाऊंच्या या लेखाची फार प्रशंसा केली. त्याच वेळीं हरिभाऊंनीं प्रतिपादन केलेल्या मतास पुष्टि देण्यासाठीं डेक्कन कॉलेजांतील हुषार विद्यार्थी श्रीयुत सदाशिवराव फडकुरे (प्रोफेसर, उज्जैन कॉलेज) यांनीं 'न' या टोपण नांवाखालीं आणखी एक लेख केसरींत प्रसिद्ध केला होता.

## हरि नारायण आपटे

हरिभाऊंचे चुलते अण्णासाहेब यांस संस्कृत वाङ्मयाची अतिशय आवड असे. हरिभाऊ अनेक वेळां त्यांच्याशीं वादविवाद करीत. आपलीं विधानें सप्रमाण सिद्ध करण्याची हरिभाऊंची हातोटी व त्यांचा मार्मिकपणा यांबद्दल अण्णा-साहेबांस कौतुक वाटे. चुलत्यापुतण्यांचे वाङ्मयविषयक वादविवाद कधीं कधी पत्रद्वारेंही चालत.

याच सुमारास हरिभाऊंनीं लाँगफेलोच्या The Psalm of Life या कवितेचें 'जीवितसार' हें भाषांतर केलें व त्याचप्रमाणें 'केसरी'वरील संस्कृत श्लोकाचें मराठी भाषांतर करून ती कविता ' विद्यार्थी ' या सहीनें श्री. आगरकर यांजकडे पाठवून दिली व श्री. आगरकरांनींही तिचा स्वीकार केला. ही कविता आपला विद्यार्थी हरि नारायण आपटे यानें केलेली आहे हें श्री. आगरकरांस माहीत नसूनही त्यांनीं ह्या कवितेचा स्वीकार करावा यांतच हरिभाऊंच्या कवित्वशक्तीचा गौरव आहे. हरिभाऊंनीं जगन्नाथ पंडिताच्या 'स्थितिं नो रे दध्याः' या श्लोकाचें केलेलें भाषांतर पुढीलप्रमाणें आहे :

" द्विपेंद्राच्या नाथा, क्षणभरिहि या दुर्धर वनीं,
मदांधा रे, येथें वसति करणें आण न मनीं.
गजांच्या भ्रांतीनं प्रखर नखरांनीं गुरु शिला
विदारोनि आहे बघ गिरिमधें सिंह निजला. "

' जीवितसार ' व वरील कविता यांवरून हरिभाऊंना कवितांचें भाषांतर उत्तम साधत असे असें स्पष्ट दिसतें. अशाच प्रकारचीं फुटकळ भाषांतरें ते लहरीप्रमाणें मधून मधून करीत. परंतु भाषांतरात्मक काव्यरचनेच्या नादीं लागण्यापेक्षां त्यांनीं स्वतंत्र काव्यरचनेकडे अधिक लक्ष पुरविलें असतें तर किती तरी चांगलें झालें असतें !

शाळेंत असतांना त्यांनीं फक्त एकच स्वतंत्र काव्य लिहिलें व तें म्हणजे मागें उल्लेखिलेलें ' शिष्यजनविलाप ' हें होय. त्यांचा दुसरा महत्त्वाचा लेख म्हणजे त्यांनीं 'निबंधचंद्रिकें'त प्रसिद्ध केलेली, श्री. आगरकरकृत हॅम्लेटचें भाषांतर 'विकार-विलसित' यावरील बहात्तरपानी टीका होय. हा लेख त्यांनीं इ. स. १८८२ सालीं म्हणजे केवळ आपल्या वयाच्या अठराव्या वर्षी लिहिला. या लेखाचा पूर्वेतिहास थोडा मजेचा आहे. श्री. आगरकर यांनीं आपलें हॅम्लेटचें भाषांतर आर्यभूषण

छापखान्यांत छापावयास दिलें होतें. त्यांचीं प्रुफें हरिभाऊ व त्यांचे मित्र वामनराव रानडे, गोविंदराव कानिटकर वगैरे मंडळी कांहीं कामाकरितां आर्यभूषण छापखान्यांत गेली असतां त्यांच्या दृष्टीस पडलीं. त्याची बरीच चेष्टा करून यापेक्षां सरस भाषांतर करणें शक्य आहे असें त्यांनीं बोलून दाखविलें. त्यावरून कल्पना निघून रा. सा. कानिटकर यांनीं हॅम्लेटचें एक नवीन भाषांतर करावें असें ठरलें. असो.

हरिभाऊंचा आपल्या नाटकावरील हा विस्तृत टीकालेख वाचून श्री. आगरकर यांस यत्किंचितही वैषम्य न वाटतां उलट फार आनंद वाटला. असा चिकित्सक टीकालेख आपल्या शाळेंतील विद्यार्थ्यानें लिहिला याबद्दल त्यांस अभिमान वाटून त्यांनीं हरिभाऊंचें मनःपूर्वक अभिनंदन केलें. एवढ्या लहान वयांत हरिभाऊंनीं शेक्स्पिअरच्या नाटकांचा इतका सूक्ष्म दृष्टीनें अभ्यास केलेला पाहून कोणास आश्चर्य वाटणार नाहीं !

---

# प्रकरण चवथें

## पहिलें लग्न

चिमामावशी घरांत रहावयास आल्यापासून बगूताईनी संसारांतून आपलें लक्ष काढून घेतलें. एक तर वडील मुलगी मनूताई घरीं आली त्यामुळें त्या अतिशय उदास असत. पण विशेषतः अण्णासाहेबांच्या जीवनक्रमानें म्हातारी अत्यंत दुःखित झाली. अर्थात् संसारांतील गोष्टींत त्यांना मौज वाटेना. पुन्हा एका घरांत दोघीं तिघींचा अंमल चालणें अशक्य असतें ! चिमामावशी हौशी व कर्तृत्ववान् असल्यानें त्यांची सर्वांवर छाप बसली. बहीण आपलाच संसार संभाळते आहे हें जाणून बगूताई संसारांतील जबाबदारींतून मुक्त होऊन ईशचिंतनांत आपला काळ घालवूं लागल्या. कोणीं कांहीं प्रश्न केल्यास त्या चिमामावशींच्याकडे बोट दाखवीत. देवघरांत बसून पूजाअर्चा करावी, जप करावा, मुलांच्या बरोबर जेवावें, दुपारीं थोडी वामकुक्षी करून चार वाजतां देवळांत पुराण ऐकण्यास जावें, संध्याकाळीं नातवंडांस जवळ घेऊन त्यांना गोष्टी सांगाव्या, रात्रीं चार दाणे खाऊन व नंतर थोडें भजन करून झोपीं जावें, असा त्यांचा नित्यक्रम असे. घरांतील कोणत्याही भानगडींत त्यांचें अंग नसे. हरिभाऊ त्यांचे अत्यंत लाडके असत. इतर नातवंडें त्यांस आवडत नसत असें नाहीं, परंतु हरिभाऊंच्यावर त्यांचा विशेषच जीव होता. देवघरांतील फडताळांत बगूताईचा सारा खजिना असे. घरांत कोणतीही वस्तु केली व हरिभाऊ घरांत नसले कीं, त्या त्यांच्यासाठीं तो पदार्थ राखून ठेवून ते घरीं आल्यावर त्यांस देत. या त्यांच्या पक्षपाताबद्दल घरांतली मंडळी त्यांची चेष्टा करीत. परंतु त्या तिकडे लक्ष देत नसत. “ तुम्हांला तुमच्या आया आहेत द्यायला. त्याला कोण आहे ! मीच त्याचं केलं पाहिजे.” असें त्यांचें ठराविक उत्तर असे. पुढें पुढें त्यांस

अगदीं दिसेनासें झालें. आजी हरिभाऊंस मात्र खाऊ देते व आपणांस देत नाहीं म्हणून तिची मौज करण्याचा गजानन वगैरे इतर नातवंडांनीं एके दिवशीं बेत केला. अगदीं संध्याकाळ झाली होती. आजी देवघरांत देवापाशीं जपाची माळ घेऊन बसली होती. मुलांची चाहूल लागतांच तिनें विचारलें, " कोण, तात्या, (पुढें हरिभाऊंस 'तात्या' म्हणत) आलास ?" मुलानें उत्तर दिलें, " होय आई." तो तात्याच आहे असें समजून आजीनें त्या मुलास जवळ बोलावून त्याच्या अंगावरून हात फिरवून म्हटलें, "तात्या, फडताळांत तुझ्यासाठीं दाणे ठेवले आहेत, ते घे बरं ?" तोतया तात्यानें पडत्या फळाची आज्ञा घेऊन फडताळांतून दाणे घेतले व तोंडांत टाकून यःपलायन केलें ! आजीची कशी मौज झाली हें पाहून सर्वजण जमून जोरानें हसूं लागलीं. सर्व प्रकार आजीच्या ध्यानांत आला, तेव्हां, " हा रे मेल्यांनो ! मला फसवतां का ? " असें तिनें म्हटलें. अशा तऱ्हेचे गंमतीचे प्रकार नेहमीं चालत ! जसें आजीचें हरिभाऊंच्यावर तसेंच हरिभाऊंचेंही आजीवर प्रेम असे. संध्याकाळीं तिच्याजवळ बसून गोष्टी केल्यावांचून त्यांस चैनच पडत नसे. आजी गोऱ्यापान असून म्हातारपणीं सुद्धां तेजस्वी दिसत. त्यांच्या गरीब, सालस स्वभावामुळें त्यांजविषयीं सर्वांस फार आदर वाटे.

चिमामावशी बगूताईची अगदीं पाठची बहीण ! पण दोघींच्या बाह्यरूपांत व स्वभावांत किती अंतर होतें ! बगूताई जितक्या सुस्वरूप तितक्याच चिमामावशी कुरूप होत्या. चिमामावशी मोठ्या जहांबाज बाई होत्या. घरांतील सर्व गोष्टी त्यांच्या आज्ञेनें चालत. घरांतील मंडळींस वागविण्याची मावशींची शैली उत्कृष्ट होती. त्यांचा कायदेशीरपणा, व्यवस्था, टापटीप, कोणासही न दुखवितां आपलाच हेतु पार पाडण्याची विलक्षण हातोटी वर्णनीय होती. घरांतल्या प्रत्येक माणसाची किंमत ओळखून त्या वागत. चिमामावशी अतिशय मुत्सद्दी होत्या. ज्या ज्या वेळीं जें जें योग्य तें तें केल्यावांचून त्या कधींही राहात नसत. एवढें मोठें कुटुंब सुरळीत रीतीनें चालविण्याचें अजब कौशल्य पाहून नानासाहेब त्यांस चेष्टेनें 'अहिल्याबाई' या नांवानें संबोधीत. अण्णासाहेब मुंबईस व नानासाहेब नौकरीच्या गांवीं असल्यानें घरांतील कर्त्या पुरुषांनी करावयाचीं सर्व कामें चिमामावशीच् करीत. दागदागिने त्याच घडवीत. प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणें त्या त्यास कपडालत्ता करीत. वर्षाचें सर्व प्रकारचें धान्य वगैरे विकत घेऊन त्याची बेगमी करणें, वेळच्या वेळीं माहेर-

वासिनींना सासरीं पाठविणें, सासुरवासिनींना सासरीं आणणें किंवा माहेरीं धाडणें, मुलींच्या साठीं योग्य स्थळें पाहणें, मुहूर्त पाहून लग्नमुंजी ठरविणें, इत्यादि सर्व गोष्टी चिमामावशी करीत. कार्य निघालें म्हणजे घरांत मावशींनीं सर्व तयारी करावी व आयत्या वेळीं नानासाहेबांस पत्र लिहून बोलवावें अशीच रीत पडली होती. त्यांना विचारल्यावांचून कोणतीही गोष्ट करण्याची प्रत्यक्ष नानासाहेबांची सुद्धां छाती नसे ! मग इतरांची कथा काय ? मावशींच्या कर्तृत्वाची पूर्ण खात्री असल्यामुळेंच नानासाहेब त्यांच्यावर सर्व जबाबदारी टाकून स्वस्थ असत. मावशी प्रसंगास योग्य तेंच करतील असा त्यांचा विश्वास होता. सुनांना कामाची ओळ लावणें, नोकरांच्या कडून कामें करवून घेऊन घरांतील एकंदर व्यवस्थेवर देखरेख करण्याचें काम मावशी उत्कृष्ट रीतीनें बजावीत. घरांत ब्राह्मण असला तरी सासुरवासिनींचीं कामें सासुरवासिनींनींच केलीं पाहिजेत, असा मावशींचा कडक कायदा होता. लहान मुलांचीं सकाळचीं, दुपारचीं व संध्याकाळचीं जेवणें वेळच्यावेळींच झालीं पाहिजेत, याविषयीं मावशींचा कटाक्ष असे. “ आपट्यांच्या घरचा बेत उत्कृष्ट असतो, ” अशी त्या वेळीं पुण्यांत ख्याति होती व हा बेत राखणाऱ्या मावशीच असत हें सांगावयास नकोच.

हरिभाऊंस पंधरावें वर्ष सरून सोळावें लागतांच त्यांच्या लग्नाची वाटाघाट सुरू झाली. त्या काळच्या पद्धतीप्रमाणें त्यांचें वय लग्नाचें झालें होतें ! मुंजींतच वाङ्‌निश्चय झाला होता. त्या वेळचे लोक एकवचनी असत. एकदां वचन दिलें म्हणजे सहसा तें फिरत नसे. श्री. दामोदरपंत गोखले, वकील, यांची कन्या मथूताई सर्वांच्या परिचयाची होतीच. तिला मुद्दाम पहावयास जाण्याची वस्तुतः गरज नव्हती. पण पद्धतीप्रमाणें हरिभाऊंस मथूताई सांगून आली व चिमामावशी मुलीस पाहून आल्या. मुलगी काळीसांवळी परंतु नाकाडोळ्यांनीं अगदीं तरतरीत होती. रंग सांवळा असला तरी मथूताई देखणी दिसे.

तिथिनिश्चय झाला. १८७९ सालच्या मे महिन्याच्या १६ व्या तारखेस हा लग्नसमारंभ होण्याचें ठरलें. जानवेकरांच्या वाड्यांत वऱ्हाड जमलें. हरिभाऊंची आजी व मामी लग्नासाठीं वऱ्हाडांतून पुण्यास आल्या. अण्णासाहेबांच्या खेरीज आपटे घराण्यांतील सर्व मंडळी व इतर नातेवाईक जमून लग्नघर गजबजून गेलें. लग्नाचें सर्व साहित्य चिमामावशींनीं घरांतील बायकांच्या मदतीनें यथास्थित केलें ! जानवेकरांच्या अंगणांत मोठा मांडव घातला होता. अक्षतसमारंभाचें विशेष महत्त्व

लोकांना पूर्वी वाटत असे. सायंकाळीं सहा वाजतां बँड, बाजंत्री, चौघडा लावून अक्षतीची मिरवणूक थाटानें गणपतीस गेली. चार दिवस अगोदर घरोघरों अगत्यानें अक्षत नेल्यामुळें मिरवणुकींत बायकांचा मोठा जमाव होता. गणपती व जोगेश्वरी या दोन्ही देवळांत जाऊन थाटामाटानें वाजत गाजत अक्षत परत आली. परंतु घरी येतांच एका शोकजनक बातमीनें सर्व लोकांचीं अंतःकरणें विव्हल करून सोडलीं. विश्रामबाग वाडा व बुधवार वाडा जळाल्याची वार्ता कळतांच सर्वांस अत्यंत वाईट वाटून एखादें नातलग जावें असेंच दुःख सर्वांना झालें ! लग्नसमारंभास आलेल्या लोकांच्या आनंदी चेहऱ्यांवर आतां उदासीनता दिसूं लागली. असो.

सीमान्तपूजनादि सभारंभ थाटानें पार पडले. बगूताईनीं हुंडा घेण्याचें नाकारून " माझ्या मुलाचें नशीब मला विकावयाचें नाहीं." असें स्पष्ट सांगितल्यानें गोखले मंडळींनीं करणी चांगली केली. इकडे चिमामावशी तर तिकडे मथूताईची आजी दुर्गाताई सर्व कारभार करीत. त्या दोघी म्हणतील ती गोष्ट प्रमाण मानली जात असे. मथूताई आईवेगळी व आजीची अत्यंत लाडकी असल्यानें लग्न थाटांत व्हावें अशी तिची साहजिक इच्छा होती. आपल्या नातवाच्या लग्नासाठीं आलेल्या हरिभाऊंच्या आजीलाही या समारंभानें आनंद वाटला. आपली मुलगी हा सोहळा पाहावयास जिवंत नाहीं हें पाहून त्यांना वाईट वाटणें स्वाभाविक होतें. परंतु त्यांनीं तसें कांहींच बाहेर दिसूं दिलें नाहीं. हरिभाऊंची सावत्र आई म्हणजे आपलीच मुलगी असें समजून त्या वागत. यमूताईची आठवण करून त्यांनीं लोकांदेखत डोळ्यांला पाणी येऊं दिलें नाहीं. त्यांच्या येण्यानें सर्वांना आनंद झाला व चिमामावशींनींही त्यांचा अतिशय आदरसत्कार केला.

लग्नाच्या दिवशीं जानवेकरांच्या घरापासून वाजत गाजत घोड्यावर बसून नवरा मुलगा गोखल्यांच्या घरीं गेला. लग्न लागलें. " आपली मथू आतां परक्याची झाली. " या विचारानें दुर्गाताई व माई ( मथूताईची सावत्र आई ) यांच्या डोळ्यांस पाणी आलें ! ' शुभमंगल सावधान ' असें म्हणून भटजी मंगलाष्टकें म्हणत असतां मुलीच्या आईच्या, मावशीच्या व आजीच्या नेत्रांतून नेहमींच अश्रु वहात असतात व इतर नातेवाईक स्त्रियाही सद्गदित होतात. आपण प्रेमानें लाडांत वाढविलेली मुलगी परक्यास देऊन टाकीत आहोंत हा विचारच मोठा चमत्कारिक स्वरूपाचा असतो यांत शंका नाहीं! असो.

लग्नांत मानपानासंबंधीं थोडी रुसवारुसवी झाली. एकदां माईनीं ( नवऱ्या मुलीच्या आईनें ) लक्ष्मीबाई व राधाकाकू यांस पाय धुवून घेण्याचा अत्यंत आग्रह केला; म्हणून दोघीही पाटावर बसल्या. माई पाय धुणार तोंच, चिमामावशींना बोलाविण्याचें राहिलें अशी त्यांना आठवण झाली. मावशी माडीवर कांहीं कामांत होत्या, तेथें दोघीही सुना भीत भीत गेल्या व त्यांस खालीं मांडवांत येण्यासाठीं आग्रह करूं लागल्या. चिमामावशींनीं विचारलें, "तुम्ही पाटावर बसलां होतां ना? मग मी नाहीं खालीं येत." आपल्याला अगोदर विचारल्याशिवाय पाय धुवून घेण्याची कल्पना सुनांच्या मनांत आली तरी कशी ! म्हणून चिमामावशींस अत्यंत राग आला. हा आपला अपमान झाला असें वाटून त्या कांहीं केल्या उठेनात. दोघीही सुना खजिल झाल्या. कोणत्या प्रकारें मावशींची विनवणी करावी हें त्यांना समजेना. शेवटीं दोघींनींही पायां पडून क्षमा मागितली तेव्हां कुठें मावशी एकदांच्या उठल्या ! असा सुनांना त्यांचा मोठा धाक वाटे. असो.

वरातीच्या दिवशींही मौज झाली. विश्रामबाग वाडा व बुधवार वाडा जळाल्यानें जिकडे तिकडे रस्त्यावर पोलिसचा बंदोबस्त होता. शिवाय ठरल्याप्रमाणें मिरवणूक जमखिंडीकरांच्या जवळील गोखल्यांच्या घरापासून विश्रामबाग वाड्यावरून न्यावयाची होती ! रात्रीं अकरा वाजण्याच्या पुढें कोणत्याही प्रकारची मिरवणूक रस्त्यानें नेण्याची सक्त बंदी झाली असल्यामुळें सर्वांचा अगोदरच विरस झाला होता ! त्यांत पालखी मिळेना ! शेवटीं घोड्यांची गाडी घेऊनच आपटे मंडळी गोखल्यांच्या घरीं गेली ! बिंदी, पट्टा, गोट, पाटल्या, तोडे, पेट्या, पुतळ्यांची माळ इत्यादि सर्व अलंकार मथूताईस घातले होते ! नातीस पुष्कळ दागिने मिळाले हें पाहून दुर्गाताईस फार आनंद वाटला. परंतु वरात पालखींत न जातां गाडींतून जाणार हें कळतांच त्यांस आपटे मंडळींचा राग आला व वाईटही वाटलें. मुलीला पालखी मिळाली नाहीं म्हणून त्यांनीं डोळ्यांतून पाणीसुद्धां काढलें व ही गोष्ट म्हातारीच्या मनाला फार लागून राहिली. मथूताईचें सासरचें नांव ' रमा ' असें ठेवण्यांत आलें. परंतु पहिलीच सून म्हणून तिला सर्व सासरचीं माणसें ' मथू ' च म्हणत.

मांडव परतण्याच्या आदल्या दिवशीं संध्याकाळीं मशाली लावून आपट्यांच्या येथील बायकांनीं पायघड्या घेतल्या. पहांटे मशाली लावून नवऱ्यामुलाकडील स्त्रिया रासनहाणी घेण्यासाठीं वाजत गाजत मुलीच्या घरीं जात असत. परंतु

या लग्नांत संध्याकाळीं पायघड्या घेण्यांत आल्यामुळें, "दिवसा मशाली लावून आपट्यांकडील बायकांनीं पायघड्या घेतल्या," अशी बातमी पुण्यांत उठली! गोखले मंडळीनीं मुलाकडील बायकांचा यथास्थित मानपान केला.

अशा रीतीनें लग्न व्यवस्थित रीतीनें पार पडून बगूताईस नातसून आली. लग्न हौसेनें झालें. परंतु ज्यांच्या आयुष्यांत हें स्थित्यंतर झालें त्या हरिभाऊंचे विचार त्या वेळी काय असतील कोण जाणे! इंग्रजी पांचवी इयत्ता शिकणाऱ्या मुलाचे विचार ते काय असणार? त्यांच्या वर्गांतील महाध्यायांची सुद्धां लग्नें झालीं होती! पंधरावें सोळावें वर्ष लागलें की, मुलाचें लग्न बहुधा झालेलें असावयाचेंच. बाहुलाबाहुलीचीच लग्नें हीं! ताशा, वाजंत्री, बँडच्या कडाक्यांत व विहिणीच्या मानपानांच्या धांदलीत लग्नासारख्या अत्यंत गंभीर स्वरूपाच्या प्रसंगाचें खरें महत्त्व कोणाच्या ध्यानी येणार? ज्या शपथांचें जन्मभर पालन करावयाचें त्यांतील एका शब्दाचा तरी अर्थ समजण्याची पात्रता या बालवयांत वधूवरांस असते काय? 'लग्न' म्हणजे एक प्रकारची मौज यापेक्षां त्या वयांत मुलामुलींना अधिक कांहीं समजत असेल असें वाटत नाही. अशा स्थितीत 'संसार' म्हणजे काय याची अस्पष्ट सुद्धां कल्पना नसतां हरिभाऊंनी आपल्या आयुष्यांतील दुसऱ्या व अत्यंत महत्त्वाच्या आश्रमांत पाऊल टाकलें.

लग्न झाल्यापासून हरिभाऊंस घरांतील वडील मंडळी 'हरि' न म्हणतां 'तात्या' म्हणूं लागली! नोकर चाकर तर तात्यासाहेब म्हणून हांक मारीत. यामुळें आतां आपण मोठे झालों असा अभिमान तात्यास झाला असला तर कांहीं नवल नाहीं.

लग्न झाल्यावर वर्षभर वटसावित्री, आषाढपाटी, श्रावणपाटी, नागपंचमी, दिवाळी, संक्रांत इत्यादि सण मोठ्या हौसेनें साजरे करण्यांत आले. मथूताईची आजी दुर्गाताई यांची पालखीची हौस पुरली नाही, म्हणून वटसावित्रीच्या दिवशीं चिमामावशींनी मुद्दाम पालखी आणविली व तात्या आणि मथूताई ह्यांस पालखींत बसवून पालखी गोखल्यांच्या दारावरून वाजत गाजत नेऊन वटसावित्रीच्या पूजेस त्यांस पाठविलें!

मथूताई बगूताईची व चिमामावशींची फार लाडकी होती! माहेरीं आजी व सासरीं आजेसासू व मावस आजेसासू लाड पुरवावयास असल्यानें मथूताईस काय कमी पडणार? मुलगी लहान म्हणून सकाळीं सासरीं येऊन संध्याकाळीं माहेरीं

जाई. पहिल्या वर्षी तर कधीं माहेरीं तर कधीं सासरीं अशा मेजवान्या चालू होत्या. लग्न झाल्यावर चार पांच वर्षे मथूताई येऊन जाऊनच असे. पहिल्या पहिल्यानें तिला कोणीं कांम सांगितलेलें चिमामावशींस आवडत नसे. परंतु थोडीशी मोठी झाल्यावर घरांतील लहानसहान कामें मथूताईस करावीं लागत. माहेरीं कामाची मुळींच संवय नसल्यानें तेवढें काम करणें सुद्धां तिला जड जाई. हरिभाऊंचे आतेभाऊ गजाननराव यांचें लग्न हरिभाऊंच्या अगोदर दोनच वर्षे झालें होतें. त्यांची बायको मथूताईच्या बरोबरीचीच होती ! आपण आजेसासरीं आहोंत तेव्हां हुषारीनें कामें करून सासरच्या मंडळींची मर्जी संपादन केली पाहिजे, असें त्या चाणाक्ष मुलीनें ओळखलें. सासुरवासिनींनीं करावयाचीं सर्व कामें ती हौसेनें झटपट उरकून टाकी. त्यामुळें तिची व मथूताईची नाहीं म्हटलें तरी तुलना होई. मथूताईस कामाची बिलकुल हौस नव्हती व तिचा स्वभाव जात्याच भोळा व भित्रा असल्यानें कोणतेंही काम जबाबदारीनें अंगावर घेऊन पार पाडण्याचें सामर्थ्य तिच्यांत नव्हतें. चिमामावशी तिला कांहीं बोलत नसत. परंतु इतर सासुरवासिनींना मात्र बोलत. तिच्या दोघांही सासऱ्यांस चांगला पगार मिळतो, तेव्हां तिला कोणी बोलूं नये अशी चिमामावशींची इच्छा असे. तिच्या बाबतींत असा पक्षपात केलेला पाहून घरांतल्या दुसऱ्या सासुरवासिनींना वैषम्य वाटणें साहजिकच होतें. पण चिमामावशींच्या पुढें ‘ ब्र ’ काढण्याची कोणाचीही छाती नव्हती. सासुरवासिनींस पानें मांडणें, लहान मुलांच्या पंक्तीस वाढणें, स्नानास पाणी काढणें, दुपारच्या प्रहरीं धान्य निवडून टिपून ठेवणें, संध्याकाळचा स्वयंपाक करणें, इत्यादि कामें करावीं लागत. घरांतील म्हाताऱ्या बायकांचें सोंवळें अतिशय कडक असल्यानें सकाळच्या स्वयंपाकांत मात्र त्यांस शिवूं देत नसत. मथूताई हीं कामें अगदींच करीत नसे असें नाहीं. परंतु तिच्यांत कामाचा उरक नसल्यानें ती आपलें स्वतःचें लुगडें धुवून घरांत येते तों बहुधा मुलांचीं जेवणें चाललेलीं असावयाचीं ! मग मथूताईस ओशाळवाणें होई. पुढें हरिभाऊंना सुद्धां बायकोनें हुषारीनें सर्व गृहकृत्यें करावींत असें वाटत असे. परंतु लहान कामें करतां करतांच मथूताई जिकिरीस येत असे ! श्रीमंताची मुलगी व श्रीमंताची सून असल्यानें मथूताईस कामासाठीं सास्वांचीं बोलणीं खावीं लागलीं नाहींत ही गोष्ट वेगळी ! बगूताई आणि चिमा मावशी यांची जर मथूताई लाडकी नसती तर तिची काय अवस्था झाली असती !

# मनोराज्यांतील रम्य चित्रें

मथूताईस लग्नापूर्वी लिहितांवाचतां येत नव्हतें. कॉलेजांत जाऊन हरिभाऊंचीं मतें प्रगतिपर झालीं होतीं. इंग्रजी ग्रंथांच्या अध्ययनानें स्त्रियांस शिक्षण देण्याचें महत्त्व त्यांना पटलें होतें. आगरकरांचे लेख वाचून स्त्रियांस शिक्षण देऊन सुसंस्कृत करणें हाच समाजोन्नतीचा खरा राजमार्ग आहे, असें त्यांस वाटूं लागलें. सुशिक्षण हाच गृहसौख्याचाही पाया आहे असें त्यांच्या मनानें घेतलें ! पाश्चात्य स्त्रियांचे विचार, त्यांचें ग्रंथकर्तृत्व, त्यांची सुशीलता, समाजविषयक चळवळींतील पुढाकार, इत्यादि गोष्टी ऐकून व वाचून आपल्या देशांतील स्त्रिया सुसंस्कृत व सुशिक्षणानें भूषित होऊन देशाच्या उद्धारार्थ केव्हां प्रयत्न करतील अशी उत्कंठा त्यांस लागून राहिली. जॉन स्टुअर्ट मिलचें ‘ सब्जेक्शन् ऑफ वुइमेन ’ हें पुस्तक वाचून स्त्रियांच्या उन्नतीप्रीत्यर्थ आयुष्य खर्चण्याचा त्यांचा निश्चय ठरला. कॉलेजमध्यें शिकत असतां ‘ सब्जेक्शन् ऑफ वुइमेन ’ हें पुस्तक गीतेप्रमाणें पवित्र मानून त्यांनीं त्याचीं अनेक पारायणें केलीं व त्यांतील विचार व तत्त्वें आत्मसात् करून टाकलीं !

लौकरच शिक्षणानें ज्यांचीं मनें सुसंस्कृत झाली आहेत, अशा स्त्रिया समाजास भूषणभूत होऊन त्यास उन्नतीच्या मार्गावर नेत आहेत अशीं हरिभाऊंचीं मनोराज्यें सुरू झाली. परंतु वस्तुस्थितीकडे लक्ष जातांच आपल्या मनोराज्यांतील रम्य चित्रांपासून आपण कितीतरी लांब आहोंत असें मनांत येऊन त्यांच्या चित्तास उदासीनता येई. आपण शिक्षण देण्यास सुरुवात केली तर आपली पत्नी अगदींच तयार होणार नाहीं असें नाहीं, असा विचार करून त्यांनीं मथूताईस शिक्षण देण्याचा बेत केला. हरिभाऊंचे कॉलेजांतील एक स्नेही नीळकंठराव बापट यांच्या भगिनी काशीताई या अण्णासाहेबांचे जिवलग स्नेही वासुदेव बापूजी कानिटकर यांचे चिरंजीव श्री. गोविंदराव यांस दिल्या होत्या. गोविंदराव विद्वान् व सुधारणावादी असून त्यांस स्त्रियांस शिक्षण देण्याची हौस होती. पतीची इच्छा म्हणून घरांतील जुन्या मतांच्या वडील बायकांच्या विरोधास न जुमानतां काशी-ताईनीं अत्यंत कष्टानें मराठी व इंग्रजी भाषांचें ज्ञान करून घेतलें होतें. घरांतील कामधाम संभाळून स्वतःचें मन सुसंस्कृत करण्यासाठीं काशीताईनीं जे परिश्रम चालविले होते त्यांची हकीकत नीळकंठरावांकडून हरिभाऊंना समजत असे. हरिभाऊंचे चुलते अण्णासाहेब व गोविंदराव यांची ओळख असल्यानें त्यांचा व हरिभाऊंचाही परिचय झाला होता. या सुशील व सुसंस्कृत दांपत्याबद्दल हरिभाऊंच्या मनांत अत्यंत

आदर असे. विशेषतः कसल्याही अडचणी आल्या तरी शिक्षण संपादन करण्याचा काशीताईचा दृढ निश्चय पाहून त्यांना त्यांच्याबद्दल अभिमान व कौतुक वाटत असे. माहेरच्या व सासरच्या मंडळींची व हरिभाऊंची ओळख असल्यामुळें पुढें काशीताईचा व हरिभाऊंचाही परिचय झाला. सौ. काशीताई यांच्या उदाहरणावरून पत्नीस शिक्षण देऊन तिला सुशिक्षित करणें प्रयत्नसाध्य आहे, अशी त्यांची खात्री होती. डेक्कन कॉलेजच्या वसतिगृहांत ते अभ्यासासाठीं रहात होते. परंतु शनिवारीं रविवारीं ते घरीं येत. तेव्हां सुट्टीच्या दिवशीं पत्नीस तास दोन तास शिकविण्याचा त्यांनी निश्चय केला. एके दिवशीं पाटीपुस्तकें आणून त्यांनी मथूताईस शिकविण्यास सुरुवात केली. घरांतील वडील बायका रागें भरतील, जावा टोंचून बोलतील, म्हणून मथूताईनें हरिभाऊंस पुष्कळ सांगून पाहिलें. परंतु " त्यांना कळूं देऊं नये, " असें सांगून हरिभाऊंनीं आपलेंच म्हणणें शेवटीं खरें केलें ! हरिभाऊ सांगतील तें ऐकावयाचें असा तिचा स्वभाव होता. म्हणून नाहीं होय करतां करतां तीही शिकण्यास तयार झाली. दर शनिवारीं व रविवारी हरिभाऊ घरी आले म्हणजे मथूताईस शिकवीत. अशा रीतीनें मथूताईच्या शिक्षणास प्रारंभ तर झालाच! काशीताईच्या व पाश्चात्य देशांतील विद्वान् स्त्रियांच्या अनेक गोष्टी सांगून हरिभाऊ तिला उत्तेजन देत व अशा गोष्टी ऐकल्या म्हणजे मथूताईसही आपण शिकून विद्वान् व्हावें असें वाटे.

परंतु मनापासून शिकण्याची तिला विशेष हौस नव्हती ! हरिभाऊ कॉलेजमध्यें गेल्यावर ती पुस्तकें घेऊन बसली तर घरांतील बायकांचीं बोलणीं तिला ऐकून घ्यावीं लागत. चिमामावशी, बगूताई व घरांतील इतर स्त्रियांस बिलकूल लिहितां-वाचतां येत नव्हतें. बायकांनीं हातांत पुस्तक घेणें म्हणजे ' अब्रह्मण्यम् ' अशी त्यांची समजूत होती. तेव्हां हरिभाऊंनीं आपण होऊन आपल्या पत्नीस शिकविण्यास सुरुवात केली म्हणून त्यांस अत्यंत राग आला ! त्यांत आपली अमर्यादा होत आहे असेंच त्यांना वाटलें. चिमामावशींच्या मानापमानासंबंधींच्या कल्पना कोणत्या प्रकारच्या होत्या याची वाचकांस कल्पना आहेच. " मुलें आमचा अपमान करूं लागलीं, आतां आमची घरांत राहण्याची काय शोभा ? " असे उद्गार मथूताईच्या कानीं पडूं लागले. सासुरवासिनीनें हातांत पुस्तक घेणें म्हणजे घरांतील वडील स्त्रियांचा अपमानच करणें होय, असें चिमामावशींचें मत असल्यानें मथूताईस घरांत अतिशय त्रास होऊं लागला. तिला माहेरचा ओढा अतिशय होता. माहेरीं जाऊन

शिकावें म्हटलें तर तिकडच्या माणसांनाही तिचें शिक्षण पसंत नव्हतें. म्हणून एका रविवारीं हरिभाऊ कॉलेजांत गेले कीं, पुढचा शनिवार येईपर्यंत मथूताई व पुस्तकें यांची गांठ बहुधा पडलेली नसावयाचीच ! हरिभाऊंनीं शिकावयास बोलाविलें म्हणजे पुस्तकपाटी शोधण्यास सुरुवात होई ! पुनः आठ दिवसांत पुस्तकाचें दर्शन सुद्धां न झाल्यानें मागलें शिकविलेलें सारें मथूताई विसरून जात असे. मथुताईनें सुशिक्षित व्हावें म्हणून हरिभाऊंची मनापासूनची इच्छा ! कॉलेजांत असतां त्यांनीं गृहसौख्याचीं सुंदर चित्रें काढावीं ! परंतु घरीं येऊन मथूताईचें शिक्षणासंबंधीं औदासीन्य पाहून त्यांना वाईट वाटे व ते अगदींच निरुत्साह होत. अभ्यास न करण्याबद्दल हरिभाऊ रागावले कीं, मथूताई डोळ्यांतून पाणी काढी व मग तिच्या डोळ्यांत पाणी आलेलें पाहून हरिभाऊ किंचित् शांत होऊन पुनः ममतेनें शिकविण्यास प्रारंभ करीत.

मथूताईस शिकण्याची हौस वाटावी म्हणून त्यांनीं मुद्दाम एके दिवशीं तिची व काशीताईची ओळख करून दिली ! काशीताई पुण्यांत असल्या म्हणजे " त्यांना भेटावयास जात जा, " असें हरिभाऊ बजावीत ! परंतु " काशीताईच्याकडे जात्यें " म्हणून सासरीं सांगण्याची सोय नव्हती ! पुनः त्यांच्याकडे न गेलें तर हरिभाऊंना आवडणार नाहीं ही भीति ! तेव्हां माहेरीं गेल्यावर तिकडून परस्पर ती काशीताईस जाऊन भेटे. कोठून तरी ही गोष्ट सासरच्या वडील माणसांच्या कानांवर हटकून जाई व त्यांचीं घालून पाडून बोलणीं तिला नेहमीं सहन करावीं लागत ! वडील मंडळींची एक इच्छा व पतीची एक इच्छा असें झालें म्हणजे बायकांचें मोठें पाप उभें राहतें ! अशा कात्रींत सांपडल्यानें भोळी बिचारी मथूताई गांगरून जाई. काशिताई परगांवीं असल्या म्हणजे हरिभाऊ त्यांना पत्र लिहिण्याचा मथूताईस अत्यंत आग्रह करीत !

हरिभाऊंच्या सांगण्याप्रमाणें तिनें एके दिवशीं काशीताईना पत्र लिहून तें हरिभाऊंच्या जवळ वाचावयास दिलें. या महत्त्वाच्या पत्राची हकीकत हरिभाऊंनीं काशीताईस कळविली. ती गमतीदार वाटल्यावरून खालीं दिली आहे :

" हो, आणखी एक गोष्ट मी आपल्याला बरेच दिवस लिहिणार आहें. आपण या लिहिण्याच्या फायद्याविषयीं व गोडीविषयीं जर आपल्या भावजयीला पत्र लिहून थोडीशी कानउघाडणी कराल तर फार उत्कृष्ट होईल ! मी आपल्याकडून

पुष्कळ सांगून पाहतों, पण तेथें सारें अळवावरच्या पाण्याप्रमाणें होतें. जोंपर्यंत पानावर पाणी आहे तोंपर्यंत मोत्यांची प्रभा एकीकडे आणि त्याची प्रभा एकीकडे. परंतु तें एक वेळां हलून निघून गेलें म्हणजे एक लवलेश देखील त्या जागीं मिळावयाचा नाहीं. मी आपल्याकडून एक हजार वेळां व्याख्यानें झोडलीं असतील, पण त्याच्यापासून हवा तितका फायदा झाला नाहीं. आपण तरी आतां लिहून पहा. तिला फक्त लिहावयास म्हणजे जेमतेम ओळखतील अशीं अक्षरें काढायला येतात. वाचायला मात्र बरें येतें. मी आपलें उदाहरण तर तिला कितीदां दिलें! एकदोनदां आपल्याला पत्र लिहावें म्हणूनही सांगितलें. एक वेळां एक पत्र आपल्याला लिहिलें होतेंही; परंतु मीच जेव्हां, तें सारें गचाळ वाईट आहे असें म्हटलें, तेव्हां तें तितकेंच राहिलें. आतां पुनः लिहा म्हणून म्हटलें तर, " नको, मला इथेंच हंसणें झालें तेवढें पुरे; आणखी त्यांनीं नको हंसायला. " असें उत्तर मिळतें. म्हणून आपणच एक उपदेशपर पत्र लिहिलें म्हणजे उत्तर म्हणून चार ओळी लिहिल्या जातील. आणखी दुसरी गोष्ट अशी आहे कीं, ' सर्वः सगन्धेषु विश्वसिति, ' ज्याचा त्याचा आपल्या जातीवर विश्वास असतो. मला थोडेंसें स्वातंत्र्य असतें तर मी तिला सुधारली असती. आणि वाचनलेखनाची एकदां गोडी लागली म्हणजे ज्याचा तोच स्वतः ती वाढवीत असतो. जोंपर्यंत ती गोडी नाहीं तोंपर्यंतच पंचाईत. परंतु ही गोडी लावायला जीं कांहीं साधनें लागतात तीं मला नाहींत. आठपंधरा दिवसांनीं एकदां भेट होणार, तेवढ्या वेळांत काय होईल तितकें वाचून व लिहून घेतों व पुनः भेट होईपर्यंत अमुक पुस्तकाचीं अमुक पृष्ठें वाचून झालीं पाहिजेत, अशी ताकीद देऊन येतों. पण त्यापासून तादृश फायदा होत नाहीं. "

हरिभाऊंनीं लिहिल्यावरून काशीताईनीं मथूताईस पत्र लिहिलें. तेव्हां तिनें उत्तर म्हणून जें पत्र लिहिलें, त्याविषयीं हरिभाऊ काशीताईना लिहितात : " आपल्या भावजयीस पत्र दिलें तें वाचून तिला मोठा आनंद झाला. परंतु पत्र लिहिण्यास धीर होईना. सरतेशेवटीं एक पत्र बराच वेळ जाग्रण करून लिहिलें. तें माझ्याकडून आपल्याकडे पाठविणें होत नाहीं. कारण त्या पत्राचें दर्शन झाल्या-बरोबर तुम्हांस इतकें हसूं येईल कीं, पोटें दुखून येतील. तिला अजून साधारणही लिहितां येत नाहीं हें पाहून मला फार वाईट वाटतें. परंतु नाइलाज आहे.

तुम्हांला एक तिच्या लिहिण्याचा मासला सांगूं कां ? ' ऱ्हस्व ' हा शब्द कसा लिहायचा ? ' रसव ' असा ! आजपर्यंतचे सारे ग्रंथ चुकले आहेत ! तें पत्र लिहून झाल्याबरोबर तिनें मोठ्या आनंदानें मला पहावयास दिलें. तें लिहिलें जात असतांना त्याचा कोण बडीजाव ! ' आम्हांला दाखवा ? '–' सारं झाल्याखेरीज नाहीं दाखवायचं आमचं पत्र ! ' पण सरतेशेवटीं जेव्हां भ्रमाचा भोपळा फुटला, तेव्हां माझें हसतां हसतां पोट दुखूं लागलें. मी म्हटलें, ' लंडनमध्यें हल्लीं प्रदर्शन चाललें आहे त्यांत पाठविलें पाहिजे.' ' बरें, इतकें हिणवायला नको कांहीं ! मला येईल कधीं तरी चांगलें. ' असें उत्तर मिळालें. आपल्या पत्रापासून लिहिण्या-वाचण्याचा हुरूप मात्र जबर आला आहे ! एकंदरीत त्या दिवशीं बहार झाली खरी ! आपला आग्रहच असला तर मी तें पत्र पाठवीन आपल्याकडे; पण पोट दुखावयास लागेल त्याच्या औषधाची तयारी करून ठेवा. वेळीं उगाच शोधा-शोधी करावयास लागेल, म्हणून आधीं सूचना करून ठेविली आहे. मी पत्र न पाठवितां असें लिहीन म्हणून आपल्या वहिनीला सांगितलें आहे व त्यामुळें थोडासा रागही करून घेतला आहे. "

या पत्रावरून हरिभाऊंच्या आकांक्षांची, गृहस्थितीची व मनःस्थितीची उत्तम कल्पना येते. असो. यापुढें डेक्कन कॉलेजांत प्रवेश करून उच्च शिक्षण संपादन करण्यासाठीं हरिभाऊंनीं काय केलें तें पाहूं या.

## प्रकरण पांचवें

## उच्च शिक्षण व लेखनव्यवसाय

इ. स. १८८३ सालीं न्यू इंग्लिश स्कूलच्या मर्यादित जगांतून हरिभाऊंनीं डेक्कन कॉलेजच्या विशाल विश्वांत प्रवेश केला. शाळेंतून कॉलेजमध्यें प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्यांची वृत्ति कांहींशी नुकत्याच पंख फुटलेल्या पांखराप्रमाणें असते. शाळेच्या कडक बंधनांतून सुटका झाल्यानंतर या नवीन स्वतंत्र वातावरणांत मनमुराद वागडण्याची त्यास इच्छा होते. कॉलेजची ती भव्य इमारत, गाऊन घातलेले विद्वान् प्रोफेसर्स, तो ग्रंथालयांतील विपुल ग्रंथसंग्रह ही पाहून नवशिक्या विद्यार्थ्यांचे डोळे दिपून जाऊन, आपण अगदीं भिन्न जगांत आहोंत, याची त्यास जाणीव होते. अपवाद सोडून दिले तरी कॉलेजची इमारत बहुधा शहरापासून बरीच दूर असावयाची हा ठराविक संकेत आहे. कारण शहरांतील संकुचित वातावरणापेक्षां निसर्गाच्या सहवासांत उदात्त विचार साहजिक सुचतात. याकरितांच आमचीं प्राचीन गुरुकुलें नगरांपासून दूर वनांत नदीच्या तीरी वसलेलीं असत. व्यावहारिक जगांतील कांटेतोल घडामोडींपासून अलिप्त असल्याशिवाय सरस्वतीच्या पूजनांत एकतानता कशी येणार ? सरस्वतीच्या मंदिराचें पावित्र्य दूषित होऊं नये म्हणून तें शहरापासून दूरच असलें पाहिजे.

डेक्कन कॉलेज शहरापासून तीन चार मैलांवर आहे. कॉलेजची इमारत भव्य असून तिच्या वरच्या टॉवरवरून पुणें शहरचा, कँपचा व खडकीचा देखावा रमणीय दिसतो. विशेषतः पावसाळ्यांत कॉलेजच्या आसमंतांतील प्रदेश फारच सुंदर दिसतो. येरवड्याच्या डोंगरामधून वहात येणारे लहान लहान ओढे, कॉलेजच्या आसमंतात् उगवलेली हिरवळ व तिच्यावर उमललेलीं विविध रंगांची चित्रविचित्र रानफुलें यांनीं

तो देखावा अत्यंत मनोहर दिसतो. कॉलेजच्या दक्षिणेस मुळा नदीचा सुंदर प्रवाह वहात असून तिच्या दोन्ही तीरांवर गर्द झाडी आहे. तेथें विद्यार्थ्यांना नौकाविहार करण्याची उत्कृष्ट सोय आहे. मात्र पाणी फार घाण असल्यामुळें पोहण्याचें सुख सध्यांच्या विद्यार्थ्यांना मिळत नाहीं. ईशान्येच्या बाजूस टेंकडीवर शादिलबोआचें देऊळ आहे. सायंकाळच्या शांत वेळीं आपल्या स्नेह्यांसह त्या टेकडीवर सहल करण्यास कित्येक विद्यार्थी जातात. पलीकडच्या बाजूस बंडगार्डन असून तेथें सायंकाळीं व केव्हां केव्हां चांदण्या रात्रीं फिरण्याची मौज असते.

कॉलेज शहरापासून बरेंच लांब असल्यामुळें बहुतेक विद्यार्थी वसतिगृहांत रहात. कॉलेजांत सुमारें शंभर विद्यार्थी असत. सीनिअर विद्यार्थ्यांस वसतिगृहांत स्वतंत्र खोली मिळे, तर ज्यूनिअर विद्यार्थ्यांस एका खोलींत दोघांस रहावें लागे. हल्लींच्या मानानें विद्यार्थ्यांना अभ्यास थोडा असून त्यांच्या मागें परीक्षांचाही इतका लकडा नसे. कॉलेजमध्यें प्रत्येक तासास हजर राहिलेंच पाहिजे असा सक्त नियम नसल्यानें कित्येक विद्यार्थी कॉलेजांत फक्त हजिरी लावून आपल्या खोलींतच वाचीत बसत. त्या काळीं सरकारी नौकऱ्या सहज मिळत. अर्थात् विद्यार्थ्यांना उपजीविकेची हल्लींप्रमाणें काळजी करण्याची फारशी जरूरी नसे. समवयस्क हौशी तरुण स्नेही, प्रि. ऑक्सन्हॅम, प्रो. सेल्बी, डॉ. भाण्डारकर, यांसारखे विद्वान् आचार्य, विपुल ग्रंथ-संग्रह, राहण्यास स्वतंत्र जागा, अभ्यास करण्यास सुंदर व भव्य इमारत, अशी सर्व उत्कृष्ट परिस्थिति असतां विद्यार्थ्यांचें कॉलेजांतील जीवन सुखी होईल यांत नवल काय ?

अशा तऱ्हेच्या सर्वतोपरी रमणीय व आनंददायक वातावरणांत हरिभाऊ राहूं लागले. कॉलेजांत परीक्षेला नेमिलेल्या पुस्तकांच्या अभ्यासापेक्षां इतर ग्रंथांचें अध्ययन करण्यांतच त्यांचा बहुतेक वेळ जाई. कॉलेजच्या पहिल्या एक दोन वर्षांत हर्बर्ट स्पेन्सर व जॉन स्टुअर्ट मिल् यांच्या ग्रंथांकडे त्यांचें फार लक्ष वेधलें. या दोघां ग्रंथकारांच्या मतांचा त्यांच्यावर अतिशय परिणाम झाला. मेकॉले, बेकन, बर्क, जॉन्सन्, यांचे सर्व ग्रंथ त्यांनीं वाचले. डिकन्स्, थॅकरे यांच्या साऱ्या कादंबऱ्या त्यांनीं पालथ्या घातल्या. शेक्स्पिअरचा त्यांचा दांडगा व्यासंग होता. कॉलेजच्या पहिल्या वर्षींच 'रोमिओ अँड ज्यूलिएट' यावर 'निबंधचंद्रिके'त हरिभाऊंनीं एक निनांवी लेख प्रसिद्ध केला. स्कॉट, जेन आस्टेन, रेनॉल्ड्स् यांचीं त्यांनीं अनेक

पारायणें करावीं. काव्य, नाटकें, कादंबऱ्या वगैरेवर ते झोड देत; तर राजकारण, अर्थशास्त्र, धर्म, तत्त्वज्ञान ह्या विषयांचाही ते मधूनमधून चावा घेत. हॅलमचें 'ब्रिटिश राज्यघटनेचा इतिहास' हें पुस्तक त्यांनीं वाचलें होतें. ते रात्रींच्या रात्रीं जागरण करून वाचीत. या ग्रंथवाचनाच्या अतिरेकाचा पुढें त्यांच्या डोळ्यांवर व हृदयावर परिणाम झाला. त्यांचें कॉलेजच्या वर्षांतील वाचन पाहून मन थक्क होतें. कॉलेजच्या ग्रंथसंग्रहालयांतील इंग्रजी व संस्कृत वाङ्मयांतील उत्तमोत्तम ग्रंथांचें त्यांनीं उत्कृष्ट अध्ययन केलें. या सर्व वाचनाचा पुढें ' करमणूक ' लिहितांना त्यांना अतिशय उपयोग झाला.

त्या वेळीं डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपॉल प्रो. ऑक्सन्हॅम हे असून, प्रो. सेल्बी, डॉ. रामकृष्ण गोपाळ भाण्डारकर, प्रो. श्रीधरपंत भाण्डारकर, प्रो. फॉरेस्ट, प्रो. बॅरेट प्रो. गोविंदराव करकरे हे हरिभाऊंचे अध्यापक होते. श्री. वैजनाथ काशिनाथ राजवाडे (प्रोफेसर) व श्री. रामचंद्र मल्हार देशपांडे हे फेलो असून शिवाय सुप्रसिद्ध पंडित वे. शा. सं. वामनाचार्य झळकीकर हे संस्कृत शिकविण्यासाठीं शास्त्री म्हणून होते.

प्रि. ऑक्सन्हॅम यांचा शेक्स्पिअरचा व्यासंग उत्कृष्ट होता. परंतु, त्यांच्या अध्यापनपद्धतींत शिस्त बेतार्चीच असे. दहा पंधरा मिनिटें उशिरां येऊन तास संपण्यापूर्वींच दहा मिनिटें ते वर्गांतून जात. पुस्तकांचीं पानें चाळीत, विनोदानें थट्टा मस्करी करून ते मुलांस खूष करीत. शेक्स्पिअरचीं नाटकें शिकवितांना अभिनय करून त्यांतील नाट्यप्रसंग ते विद्यार्थ्यांच्या अंतःकरणांवर ठसवीत. दहा पांच ओळी वाचाव्या, पांचपन्नास गाळाव्या, व शब्दांचा खोल अर्थ पहात न बसतां, उडत उडत शिकवावें अशी त्यांची पद्धति होती. त्यांचा अभिनय व विनोद यांमुळें साऱ्या विद्यार्थ्यांस ते प्रिय होते.

परंतु त्यांच्या कारकीर्दींत डेक्कन कॉलेजांत अगदींच शिस्त नव्हती. विद्यार्थी आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तसें वागत. कारण विद्यार्थ्यानें तासास हजर राहिलेंच पाहिजे अशी सक्ती नव्हती. त्या वेळच्या विद्यार्थ्यांचा पोषाख गबाळ्यासारखा असे. कोणी डोक्यास टोपी न घालतां आपल्या लांबच लांब शेंड्या पाठीवर सोडून व गळ्यास उपरणें गुंडाळून येत, तर कोणी डोक्यास चक्रीदार पागोटें व अंगांत बाराबंदी अंगरखा घालून वर्गास येत. कॉलेजाजवळ तमाशास गेलें असतां किंवा

गांवांत नाटकें पाहण्यास गेलें असतां प्रिन्सिपॉल रागावतील अशी विद्यार्थ्यांस धास्ती बाळगण्याचें कारण पडत नसे. कोणी विद्यार्थी चार चार दिवस गैरहजर राहिला, तरी त्यास कोणी बोलत नसे. कॉलेजची फी भरली, प्रिलिमिनरीला बसून, परीक्षेला हजर राहिलें कीं विद्यार्थ्यांचें काम संपलें, अशी मोठी गंमतीची परिस्थिति त्या वेळीं कॉलेजांत होती. पण पुढें सेल्बीसाहेब प्रिन्सिपॉल झाल्यावर सर्व रंग बदलला व कडक शिस्त सुरू झाली.

प्रो. सेल्बी सुद्धां नामांकित शिक्षक होते. प्रि. ऑक्सन्हॅमसाहेबांच्या नंतर त्यांस प्रिन्सिपॉलची जागा मिळाली. कॉलेजांत शिस्त ठेवण्याच्या बाबतींत मोठे कडक अंमलदार अशी त्यांची ख्याति होती. ते नियमित व करारी होते. कॉलेजांत वेळच्या वेळीं येऊन आपलें काम चोख करावें असा त्यांचा क्रम होता. ते तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान व इंग्रजी वाङ्मयांतील बेकन व बर्क यांचे ग्रंथ मार्मिक रीतीनें शिकवीत. परीक्षेस नेमिलेल्या पुस्तकांवर त्यांनीं उपयुक्त टीपा लिहून विद्यार्थ्यांची गैरसोय दूर केली. परीक्षेंत यश मिळविण्यास कशाची जरूर आहे तें लक्षांत घेऊन त्याच धोरणानें सेल्बीसाहेब शिकवीत. त्यांचें बोलणें हलक्या आवाजांत व जलद असल्यानें नवीन विद्यार्थ्यांची टिपणें करून घेतांना त्रेधा उडे. त्यांच्या व्याख्यानांत बिलकूल विनोद नसे. त्यांची शिकविण्याची पद्धति गंभीर व शांत असे. एकंदरींत सेल्बीसाहेब उत्तम शिक्षक होते.

अध्यापकवर्गापैकीं डॉ. भाण्डारकर यांना हरिभाऊंच्या बुद्धिमत्तेविषयीं अत्यंत आदर होता. एकदां शाकुंतलांतील एका श्लोकाचा निराळा अर्थ हरिभाऊंनीं वर्गांत सुचविला असतां त्या वेळीं त्यांनीं तो स्वीकारला नाहीं. दुसरे दिवशीं वर्गांत आल्यावर मात्र हरिभाऊंनीं सुचविलेला अर्थच अधिक समर्पक असल्याचें सर्वांसमक्ष त्यांनीं कबूल केलें. काव्याचें हृद्गत जाणण्याची हरिभाऊंची हातोटी अनेकदां त्यांच्या लक्षांत आली होती. प्रो. बुल्हर, डॉ. भाऊ दाजी, कीलहॉर्न यांच्या बरोबरीनें प्राचीन लेखांचें संशोधन करण्याची विद्वत्ता डॉक्टरसाहेबांच्या अंगी होती. तर्क, न्याय, व्याकरण, वेदांत इत्यादि शास्त्रांत व संस्कृत वाङ्मयांत वरील तिन्ही विद्वानांपेक्षां त्यांची अधिक गति होती. पाश्चात्य विद्येच्या संस्कारानें त्यांच्या ठिकाणीं चिकित्सक बुद्धीचाही विकास झाला होता. ते इंग्रजींत सफाईनें लिहीत. संस्कृत नाटकें, तर्कशास्त्र, शांकर-भाष्य, ऋग्वेदांतील ऋचा इत्यादि विषय चिकित्सक दृष्टीनें विद्यार्थ्यांस समजावून

देण्याची त्यांची हातोटी वर्णनीय होती. अत्यंत आदरणीय व उत्कृष्ट अध्यापक असा शिष्यवर्गात त्यांचा लौकिक होता.

अभ्यासापेक्षां कॉलेजच्या इतर चळवळींत हरिभाऊ प्रामुख्यानें चमकत. कोणताही वादविवादाचा विषय असो, हरिभाऊ त्यावर विचार करून सभेच्या दिवशीं आपलें मत पुढें मांडीत. तथापि कॉलेजचें ग्रंथसंग्रहालय हेंच हरिभाऊंचें कॉलेजांतील सर्वांत आवडतें स्थान होतें. तेथील उत्कृष्ट ग्रंथांच्या सहवासांत ते किती तरी वेळ आनंदांत घालवीत! खरोखर ग्रंथवाचनापासून लाभणाऱ्या रमणीय व सात्त्विक आनंदापेक्षां अधिक सुख या मानवी विश्वांत कोठें तरी असेल काय? मानवी मित्रांच्या सान्निध्यानें होणारें सुख क्षणिक, परंतु ग्रंथांसारख्या एकनिष्ठ, निःस्वार्थी मित्रांपासून खऱ्या शाश्वत सुखाचाच लाभ होतो. रात्रंदिवस ते आपल्या सेवेस हजर असतात. आनंदाच्या वेळीं आनंद द्विगुणित करणारे, निराश मनःस्थितींत हृदयास प्रफुल्लित करणारे, हजारों सत्पुरुषांची ओळख करून देऊन मनास शांति देणारे असे प्रेमळ मित्र सद्ग्रंथां-वांचून दुसरे कोणते आहेत? कॉलेजच्या आयुष्यक्रमांत हरिभाऊंनीं आपल्या अनेक सहाध्यायांचें प्रेम संपादन केलें व कित्येकांचा व त्यांचा स्नेह तर आमरण टिकला! परंतु त्यांची खरी खरी एकतानता कोणाबरोबर होऊं शकली नाहीं! जर कोणाच्या सान्निध्यांत देहाचा विसर पडून त्यांची वृत्ति तन्मय होत असेल तर ती ग्रंथांच्या सहवासांतच होय! कॉलेजच्या वर्षांत याच मित्रांची ओळख करून घेऊन त्यांचा स्नेह जोडण्यांत त्यांनीं आपला वेळ खर्च केला! त्यांनीं आपला कॉलेजांतील अभ्यासाचा अमूल्य वेळ अवांतर ग्रंथांच्या अध्ययनांत घालविला याबद्दल कित्येक असमंजस लोक त्यांस कदाचित् दोष देतील! परीक्षेच्या अभ्यासावर मेहनत करून कित्येकांनीं पहिला वर्ग मिळविला असेल! परंतु महाराष्ट्रवाङ्मयमंदिराचें सौंदर्य वाढविणाऱ्या कुशल कारागिराचें—हरिभाऊंचेंच—नांव आतां सर्वतोमुखीं झालें आहे ना? त्यांच्या बरोबर शिकणाऱ्या त्या अभ्यासी विद्यार्थ्यांचें आज कोणास स्मरण आहे बरें?

इंग्रजी व संस्कृत वाङ्मय त्यांस फार प्रिय असे. परंतु मराठी वाङ्मयावरची त्यांची भक्ति अनुपम होती. इंग्रजी वाङ्मयावर भाळून जाऊन मराठीची चेष्टा करणारे किंवा संस्कृत वाङ्मयाचा अभिमान बाळगून मराठीचा तिरस्कार करणारेच त्यांजबरोबरच बहुतेक विद्यार्थी असत. मायभाषेची चालू असलेली हेळसांड पाहून

हरिभाऊंना वाईट वाटे. प्रि. ऑक्सन्हॅम साहेबांच्या जागीं प्रो. सेल्बी तात्पुरते प्रिन्सिपॉल असतांना त्यांनीं उदार देणगी देऊन मुलांचें वाचनालय स्थापन केलें. या वाचनालयाचे हरिभाऊ सेक्रेटरी होते. वाचनालयांत इंग्रजी पुस्तकांचाच केवळ भरणा होता. हें वाचनालय स्थापन झाल्यावर कांहीं महिन्यांनीं सेल्बीसाहेब रजा घेऊन विलायतेस गेले. एक वर्ष झाल्यावर सेक्रेटरी या नात्यानें हरिभाऊंनीं अहवाल वाचला व सुचविलें कीं, येणाऱ्या वर्गणीपैकीं कांहीं रक्कम मराठी ग्रंथ विकत घेण्यांत खर्च करावी. या सूचनेला त्या वेळचे डेक्कन कॉलेजांतील फेलो श्री. वैजनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं विरोध करून सांगितलें कीं, "विद्यार्थ्यांनीं इंग्रजी पुस्तकें वाचावीं असा सेल्बी साहेबांचा उद्देश होता. इंग्रजी दर्जाचें मराठी वाङ्मय नाहीं." डॉ. भाण्डारकरांनींही तेंच म्हटलें व श्री. राजवाडे यांच्या भाषणास दुजोरा दिला. तें हरिभाऊंना न रुचून त्यांनीं संतापानें श्री. राजवाडे यांचें मत खोडून काढलें. हरिभाऊंचा या वादांत जय होऊन अखेर मराठी ग्रंथ विकत घेण्याचा ठराव मंजूर झाला! हरिभाऊ जोंपर्यंत वाचनालयाचे सेक्रेटरी होते तोंपर्यंत दर वर्षी ते उत्तमोत्तम इंग्रजी व मराठी ग्रंथ वाचनालयासाठीं विकत घेत. मराठीबद्दलचा त्यांचा हा अभिमान कोरडा नसून मराठी वाङ्मयांत स्वतः भर घालण्याची सुरुवात त्यांनीं यापूर्वीच केली होती !

हरिभाऊ फार मनमिळाऊ, गमती व थट्टेखोर होते. त्यामुळें त्यांचे भोंवतीं मित्र-मंडळींचा घोळका असे. कॉलेजांत जोडलेले बरेच मित्र आमरण राहिले. या सर्वांत कै. माधवराव जोशी यांच्याशी त्यांचें फार सख्य असे. नाना प्रकारचे ग्रंथ ते दोघे एकदम वाचीत व त्यांवर वादविवाद करीत. त्यांचा सतत एकसारखा विचार-विनिमय होत असे. सारख्या आवडीनिवडी व सारखे विचार यांमुळें त्या दोघांची अकृत्रिम मैत्री होती.

त्यांच्या मित्रमंडळींत, ना. म. समर्थ, प्रो. पानसे, प्रो. भानू, श्री. नीळकंठराव चौबळ, श्री. बाबूराव काळे, अण्णासाहेब वांगीकर ही मंडळी असत. श्री. नारायण महादेव समर्थ हे हरिभाऊंच्याप्रमाणेंच इंग्रजी वाङ्मयाचे शौकी असल्यानें त्या दोघांच्या वाङ्मयासंबंधीं नेहमीं गप्पा होत. श्री. समर्थांचें इंग्रजी भाषेवर अप्रतिम प्रभुत्व असून, ते इंग्रजीमध्यें उत्कृष्ट काव्यरचना करीत. त्यांचे अंगीं वक्तृत्वगुण विशेष होता व त्याचप्रमाणें अभिनय करण्यांतही ते अत्यंत कुशल असत. कॉलेजच्या एका

वार्षिक संमेलनाच्या प्रसंगी त्यांनीं गोल्ड्स्मिथच्या ' *She Stoops To Conquer* ' मधील **Tony Lumpkin** चें सोंग घेतलें होतें. त्यांच्या उत्कृष्ट अभिनयाचें सर्वांना कौतुक वाटलें. अशा तऱ्हेनें समर्थ व हरिभाऊ दोघेही ललित वाङ्मयाचे भोक्ते असल्यामुळें दोघांचें किती जमत असेल हें सांगावयास नकोच. ' *She Stoops To Conquer* ' या नाटकामध्यें हरिभाऊ व त्यांचे स्नेही प्रो. पानसे या दोघांनींही सोंगें घेतलीं होतीं. हरिभाऊंचें काम चांगलें झालें. परंतु प्रो. पानसे यांचा अभिनय त्यांच्यापेक्षांही सरस ठरला. हरिभाऊंचे दुसरे स्नेही श्री. चौबळ हेही मोठे रसिक असून त्यांचा आवाज अत्यंत मधुर होता. याच संमेलनप्रसंगीं मराठी नाट्यप्रवेश करून दाखवीत असतां पडद्याआडून शाकुंतलांतील ' अभिनव मधु-लोलुप० ' हें पद त्यांनीं म्हटलें असतां सुप्रसिद्ध गायक नाटेकर गात आहेत असें सर्व प्रेक्षकांस वाटलें !

त्या वेळीं कॉलेजांत विशेष अभ्यास न करणाऱ्या व गप्पाष्टकें झोडणाऱ्या विद्यार्थ्यांस **Popular** म्हणण्याची टूम कोणीं काढली. हरिभाऊ, समर्थ व पानसे तिघेही नाट्याभिनयाचे शौकी व अतिशय विनोदी असल्याकारणानें त्यांची गणना **Popular** मध्यें होई. आपल्या समयसूचक व समर्पक विनोदानें हे सर्वांना हंसवून सोडीत. जेथें हे तिघे असत तेथें हंशा पिकला नाही असें क्वचितच घडे. हरिभाऊंच्या गोड,विनोदी व प्रेमळ स्वभावामुळें ते सर्वांस फार हवेसे वाटत.

शाळेंत शिकत असल्यापासून आट्यापाट्या, खोखो, विटीदांडू या शारीरिक खेळांकडे त्यांचें बिलकूल लक्ष नसे. त्यांची इतर मित्रमंडळी पुष्कळ खेळत. परंतु हरिभाऊंना सहल करावयास जाणें, गप्पा मारणें अधिक पसंत असे. कॉलेजमध्यें ते फक्त टेनिस खेळत. टेनिसशिवाय कोणताच खेळ त्यांस मनापासून आवडत नसे. बोटिंगला जाण्याचा त्यांना शौक होता. परंतु स्वतः बोट वल्हविण्यास ते शिकले नाहींत. ते व्यायाम करीत नसले तरी त्यांची शरीरप्रकृति मूळचीच उत्तम होती.

अशा रीतीनें अवांतर वाचनांत, मित्रांच्या बरोबर वादविवाद करण्यांत, नदीकांठीं सहल करण्यांत हरिभाऊंचे दिवस मजेंत चालले होते. क्लबांत भोजनाच्या वेळीं त्यांच्या गप्पाष्टकांस ऊत येई. मिल, स्पेन्सर यांच्या ग्रंथांच्या परिशीलनानें जरी ते सुधारणावादी झाले असले तरी क्लबांत सुद्धां ते सोंवळयानेंच जेवीत. याबद्दल त्यांच्या सुधारक मित्रांकडून त्यांची चेष्टा होई.

## डेक्कनमधून फर्ग्युसन कॉलेजांत

कॉलेजांत येऊन तेथील स्वातंत्र्यप्रिय वातावरणाचा उपभोग थोडा फार घेतला नाहीं तोंच वर्ष संपलें व परीक्षा ' दत्त ' म्हणून पुढें उभी राहिली ! प्रिलिमिनरी परीक्षेंत पास झाल्यावांचून विश्वविद्यालयाच्या परीक्षेस त्या काळीं विद्यार्थ्यांस पाठवीत नसत. प्रिलिमिनरीचे हरिभाऊंचे सर्व पेपर उत्तम गेले. मात्र नेहमींप्रमाणें गणितानें दगा दिला ! अर्थात् त्यांना परीक्षेला पाठविण्यांत आलें नाहीं ! बरोबरीचे सारे मित्र पुढें गेले ! त्यामुळें त्यांच्या कॉलेजच्या आयुष्यक्रमाची घडी विसकटली. हरिभाऊंना फार वाईट वाटलें, परंतु दोष त्यांचाच ! तेव्हां बोल लावणार कोणाला ? वाङ्मयाकडील त्यांचा ओढा जसजसा वाढूं लागला तसतसें त्यांचें गणिताकडील लक्ष कमीकमी होत गेलें. गणितविषयाचा अभ्यास दृष्टीपुढें सुद्धां नको, असेंच त्यांना वाटूं लागलें. गणित करावयास पुढें घेतलें कीं, थोड्याच वेळांत कंटाळा येऊन एकादें इंग्रजी अथवा संस्कृत पुस्तक हातांत येई. याचा परिणाम शेवटीं जो व्हावयाचा तोच झाला ! एक वर्ष फुकट गेल्याबद्दल व विशेषतः बरोबरीचे मित्र पुढें गेल्याबद्दल हरिभाऊंस इतकें वाईट वाटलें कीं, त्यांनीं दुसऱ्या वर्षी डेक्कन कॉलेज सोडून दुसऱ्याच कॉलेजांत जाण्याचें मनांत योजिलें. मुंबईस अण्णासाहेबांकडे राहून त्यांना एल्फिन्स्टन अथवा विल्सन कॉलेजमध्यें जातां आलें असतें ! परंतु अण्णासाहेबांकडे राहणें बदललेल्या गृहस्थितीमुळें व त्यांच्या व्यसनाधीनतेमुळें तितकेंसें स्पृहणीय नव्हतें ! परंतु कर्मधर्मसंयोगानें न्यू इंग्लिश स्कूलच्या चालकांनीं याच सुमारास नवीन कॉलेज स्थापन करून हरिभाऊंची गैरसोय दूर केली !

ता. १३ फेब्रुआरी, १८८४, रोजीं सर जेम्स फर्ग्युसनसाहेब न्यू इंग्लिश स्कूलला भेट देण्यास गेले असतां, तेथील एकंदर व्यवस्था पाहून खूष झाले. तेव्हांपासूनच नवीन कॉलेज स्थापण्याची कल्पना चालकांच्या डोक्यांत घोळूं लागली. तरी पण एकंदर सर्व जमवाजमव होईपर्यंत वेळ लागला व ता. २ जानेवारी, १८८५, रोजीं गद्रे वाड्यांत फर्ग्युसन कॉलेज उघडण्यांत आलें. कॉलेजच्या पहिल्या दिवशीं हजर असलेल्या थोड्या विद्यार्थ्यांत हरिभाऊ होते. जसे न्यू इंग्लिश स्कूलचे तसे फर्ग्युसनचे सुद्धां ते पहिले विद्यार्थी होते. कॉलेजची इमारत सुंदर नसली तरी अध्यापकवर्ग उत्कृष्ट होता. अर्थात् आरंभापासूनच कॉलेजचा जम उत्तम बसला. प्रो. आगरकर, प्रि. वामन शिवराम आपटे, प्रो. वासुदेवराव केळकर, प्रो. टिळक इत्यादि अध्यापक हरिभाऊंच्या पूर्वपरिचयाचे असल्यानें हरिभाऊंना आनंद झाला.

# हरि नारायण आपटे

प्रि. वामन शिवराम आपटे यांची विषय समजावून देण्याची पद्धति मार्मिक असे. त्यांचें शिकविणें गंभीर स्वरूपाचें असल्यानें विद्यार्थ्यांची व त्यांची सलगी होत नसे. विद्यार्थ्यांना त्यांच्या बद्दल भीतियुक्त आदर वाटे. हरिभाऊंच्या संस्कृत भाषेंतील प्रावीण्यासंबंधीं शाळेपासूनच त्यांचें उत्तम मत होतें. संस्कृत वाङ्मया-संबंधीं हरिभाऊ अनेकदां त्यांच्याशीं चर्चा करीत.

प्रो. टिळक फळ्याचा उपयोग न करतां गणित शिकवीत. त्यामुळें हरिभाऊं-सारख्या विद्यार्थ्यांची त्रेधा उडे. त्यांच्या तासाच्या वेळीं हरिभाऊ आपले नूतन मित्र कृष्णाजी केशव गोखले यांसह अगदीं वर्गाच्या मागल्या बांकावर बसून इंग्रजी कादंबऱ्या वाचीत. या दोघांनाहि गणिताचा तिटकारा व वाङ्मयाची आवड असल्यानें फर्ग्युसनमध्यें येतांच त्यांची चांगलीच मैत्री जमली.

इंग्रजी वाङ्मयाचे प्रोफेसर वासुदेवराव केळकर यांचा तास हरिभाऊंना फार प्रिय असे. प्रो. केळकर यांचा शेक्स्पिअरचा व्यासंग उत्कृष्ट असून शेक्स्पिअरचीं नाटकें ते स्वतः अभिनय करून वर्गांत शिकवीत. ग्रंथकाराचें हृद्गत ते इतक्या सुंदर व नाजुक रीतीनें विद्यार्थ्यांस समजावून सांगत की त्यांच्या मार्मिक विवे-चनानें विद्यार्थी तन्मय होत. ग्रंथांतील अवघड भागांवर तासचे तास घालवावयाचे, सोपा भाग वर्गांत भराभर वाचून टाकावयाचा, अशी त्यांची पद्धति होती. त्यांच्या-सारखा इंग्रजी शिकविणारा प्रोफेसर इंग्रजांतही क्वचितच आढळेल ! हरिभाऊ इंग्रजी वाङ्मयाचे व्यासंगी आहेत हें कळल्यापासून प्रो. केळकर त्यांस आपल्या घरीं बोलावीत. दोघांची वाङ्मयचर्चा तासचे तास चाले. हरिभाऊंची मार्मिकता व रसिकता यांनीं प्रोफेसरसाहेब खूष होऊन जात. प्रो. केळकर व हरिभाऊ यांचा स्नेह दिवसेंदिवस वृद्धिंगत होत चालला. वर्गांत विद्यार्थी परंतु वर्गाबाहेर पाऊल टाकल्यांबरोबर प्रो. केळकर त्यांच्याशीं मित्रभावानें वागत. स्वतः लिहिलेले लेख व नाटकें हरिभाऊंना वाचून दाखवून त्यांचा अभिप्राय घेतल्याशिवाय त्यांस चैन पडत नसे. 'त्राटिका' नाटक लिहीत असतांना त्यांनीं कित्येक प्रवेश हरिभाऊंना वाचून दाखविले होते. डेक्कनमधून फर्ग्युसनमध्यें आल्यामुळें हरिभाऊंना जर कोणता विशेष फायदा झाला असेल तर तो प्रो. केळकर यांच्याशीं जडलेला त्यांचा स्नेह होय. इतर विद्यार्थी मात्र प्रो. केळकर यांच्या भेदक दृष्टीला भिऊन आपल्या शंकासुद्धां त्यांना विचारण्यास कचरत.

## ‘ ओल्ड लंडन ’ व ‘ मधली स्थिति ’

प्रो. आगरकरांच्या वर्गात मुलांना मोकळेपणा वाटे. त्यांचें शांत व हंसत मुख पाहतांच विद्यार्थ्यांस समाधान होई. एकच विषय पुनः पुनः घोळून घोळून ते शिकवीत. त्यामुळें सामान्य विद्यार्थ्यास विषय चांगला समजत असे. त्यांचीं सामाजिक विषयांवरील सर्वच मतें हरिभाऊंना पसंत नव्हती.

डेक्कन कॉलेजांत शिकत असतां रेनॉल्ड्स्च्या ‘ *Mysteries Of Old London* ’ या कादंबरीचें आपण भाषांतर करावें अशी कल्पना हरिभाऊंच्या डोक्यांत आली. इंग्रजी सुधारण्यास रेनॉल्ड्स्चें वाचन करावें असें त्या वेळच्या सुशिक्षितांचें मत असे. विष्णुशास्त्री, प्रो. वासुदेवराव केळकर, विष्णुपंत मोडक वगैरे मंडळी भक्तीनें रेनॉल्ड्सचीं पारायणें करीत. त्यामुळें हरिभाऊंनींही रेनॉल्डस्च्या कादंबऱ्या वाचल्या होत्या. त्याची *Mysteries Of Old London* ही कादंबरी वाचल्यावर त्यांनीं तिच्या एक दोन प्रकरणांचें भाषांतरसुद्धां केलें. तीं प्रकरणें त्यांनीं आपल्या मित्रांना वाचून दाखवितांच सर्वजण आश्चर्यानें थक्क होऊन गेले ! हरिभाऊंचा अस्थिर व लहरी स्वभाव त्यांस टाऊक असल्यानें चिकाटी धरून हें भाषांतर ते शेवटपर्यंत लिहून पुरें करणार नाहींत असाच त्यांचा अदमास होता ! भाषांतर तर इतकें सुंदर व सरस उतरलें होतें कीं, तें पूर्ण करण्याचा हरिभाऊंच्या मित्रांनीं आग्रह धरला ! परंतु हें भाषांतर कोण छापील ? असा प्रश्न निघाला. या प्रश्नाची चर्चा करीत असतां श्री. वैद्य नांवाच्या हरिभाऊंच्या मित्रानें त्याच्या ओळखीचे ‘ पुणें-वैभवा ’चे संपादक रा. शंकरराव केळकर यांच्या मार्फत भाषांतर छापविण्याचा प्रयत्न करण्याचें कबूल केलें. भाषांतर पूर्ण करण्याचें हरिभाऊंच्याकडून आश्वासन घेऊन, रा. वैद्य व काका गोखले असे दोघे शंकरराव केळकरांस जाऊन भेटले. भाषांतर वाचून पाहतांच शंकरराव खूष झाले; व लागलींच त्यांनीं ‘ पुणें-वैभवा ’ ला पुरवणी म्हणून नमुन्याकरितां आलेलें भाषांतर छापूनहि टाकलें. अशा रीतीनें ‘ पुणें-वैभवा ’च्या प्रत्येक अंकांत छापायला देण्यासाठीं म्हणून नियमितपणें भाषांतर करणें हरिभाऊंना भागच पडलें.

‘ पुणें-वैभवा ’स जोडलेल्या पुरवणींत एक दोन प्रकरणें ‘ मधली स्थिति ’ या नांवाखालीं प्रसिद्ध होतांच तत्कालीन समाजांत फार खळबळ उडाली ! रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी, रा. ब. काशिनाथ नारायण साने, यांनीं ‘ पुणें-वैभवा ’च्या संपादकांस पत्र लिहून ‘ मधली स्थिति ’ या कादंबरीच्या अज्ञात लेखकाचें मनः-

पूर्वक अभिनंदन केलें ! ज्या विद्वान् गृहस्थांच्या ‘ नाट्य-कथार्णवा ’नें स्फूर्ति होऊन बालवयांतच हरिभाऊंनीं कांहीं इंग्रजी कादंबऱ्यांचें भाषांतर केलें, त्यांनीं, म्हणजे कै. शंकर मोरो रानडे यांनीं, शंकरराव केळकरांस कळविलें कीं, “ आपल्या ‘ पुणें-वैभवां ’त येणाऱ्या कादंबरीचें प्रकाशित प्रकरण वाचल्यावर पुढचें प्रकरण केव्हां वाचूं अशी उत्कंठा लागून राहते. ”

हे सर्व अभिप्राय वाचून हरिभाऊंना आपलें लेखन उत्साहानें चालूं ठेवण्यास प्रोत्साहन मिळालें व पहिल्यापेक्षां दुप्पट जोरानें त्यांचें लेखन सुरू झालें. ‘ पुणें-वैभवा ’च्या ज्या अंकांत ‘ मधल्या स्थिती ’चें पहिलें प्रकरण प्रसिद्ध झालें त्याच अंकांत हरिभाऊंनीं ‘ कादंबऱ्यांचें उद्दिष्ट ’ या विषयावर एक निनांवी लेख प्रसिद्ध केला होता. कादंबऱ्यांचा आद्य उद्देश मनोरंजन करणें हा असला तरी, त्याखेरीज गोड बोलून समाजाचे दोष दाखविणें व त्यास उन्नतीच्या मार्गावर नेणें हाही कादंबऱ्यांचा एक अत्यंत महत्त्वाचा उद्देश आहे असें मत त्यांनी स्पष्टपणें वाचकांच्या पुढें मांडलें. यापूर्वी ‘ गुलबकावली, ’ ‘ मंजुघोषा, ’ ‘ मुक्तामाला, ’ ‘ विचित्रपुरी, ’ यांच्या सारख्या कादंबऱ्या आपल्या अद्‌भुत कथानकांनीं वाचकांस केवळ रंजवीत होत्या ! परंतु हरिभाऊंनीं कादंबरीस हवेंतील निराधार पोकळींतून उचलून ‘ मधल्या स्थिती ’च्या सत्य सृष्टींत आणून सोडलें व समाजाचें मनोरंजन करून त्यास कटु परंतु अत्यंत हितकर असा नीतिबोधही केला.

‘ पुणें-वैभवां ’त हप्त्याहप्त्यानें पुरवणीरूपानें कादंबरी प्रसिद्ध होऊं लागली.. शंकरराव केळकर अगदीं पुराणमताभिमानी व सुधारणेचे द्वेष्टे ! ‘ पुणें-वैभव ’ तर स्त्रीशिक्षणाच्या व सुधारणेच्या अगदीं विरुद्ध ! अर्थात् ‘ पुणें—वैभवा ’चें ध्येय व ‘ मधली स्थिति ’ ह्यांत प्रतिपादन केलेलीं सुधारक मतें यांचा मेळ बसविणें केवळ अशक्य होतें ! परंतु कादंबरी तर इतकी लोकप्रिय झाली होती कीं, त्यामुळें ‘ पुणें-वैभवा ’चे वर्गणीदार वाढून प्रत्येक अंक वाचावयास लोक अगदीं आतुर असत ! अशा स्थितींत कादंबरीचें प्रकाशन बंद कसें करणार ? कथानकांतील पात्रांची परि-स्थिति व स्त्रीदाक्षिण्य हीं दोन्ही सूत्रें हरिभाऊंनीं इतक्या नाजुक रीतीनें व कुशलतेनें विणलीं होतीं कीं, शंकरराव केळकर मनांतल्या मनांत जिरून गेले ! दुसऱ्यांचीं छिद्रें शोधून काढून कुटाळक्या करण्याची शंकररावांना मोठी हौस ! ‘ मधल्या स्थिती ’नें ही त्यांची हौस पुरविली. हरिभाऊंच्या कादंबरींत त्यांच्या भोंवतीं वावरणाऱ्या कित्येक

व्यक्तींची ओळख पटेल अशा रीतीनें रेखाटलेलीं चित्रें शंकररावांस आढळलीं ! तीं पाहूनच त्यांना मनांतल्या मनांत गुदगुदल्या होत. ते गोविंदराव वगळे वकील, ते डॉ. मुंगळे, आणि गरीब, साळसूद वृत्तीचे जनार्दनपंत, मोडके जहागिरदार, त्यांचे चिरंजीव बाळासाहेब, कंजूष तिमाजी नाईक, त्यांचे उधळे चिरंजीव विनायकराव हीं पात्रें म्हणजे तत्कालीन पुण्यांत पदोपदीं भेटणाऱ्या व्यक्ति होत. गंध्यांच्या दुकानांत मांडा ठोकून गप्पाष्टकें झोडणारे भिक्षुक, नाटककंपन्यांबद्दलचा तो लोकांचा उत्साह वगैरे पुण्याचें वर्णन वाचून समाजविषयक विचार करणारा प्रत्येक वाचक त्या चित्रांतील प्रत्यक्ष परिस्थितींतील चमत्कृतिपूर्ण सादृश्य पाहतांच क्षणमात्र स्तंभित होत असेल यांत काय नवल ?

कादंबरी लिहितां लिहितां भाषांतराचें बंधन असह्य होऊन हरिभाऊंची तेजस्वी प्रतिभा भाषांतराचा भक्कम कोट फोडून स्वतंत्रपणें वाङ्मय-प्रदेशांत वाहूं लागली. *Old Londan* च्या मूळ गोष्टींतील 'एकाक्ष व्हिलन' गोविंदराव चकण्याच्या मूर्तींत, तर दुष्ट कॅथेराइन् काकूबाईच्या रूपांत अवतरली. परंतु 'गोविंदराव चकणे' या पात्राची भूमिका रंगवितांना हरिभाऊंच्या तीक्ष्ण नजरेसमोर नेहमींच्या परिचयाची एक ठेंगू, काळी, चकणी व देवीच्या खोल वणांनीं विद्रूप झालेली मूर्ति दिसूं लागून आपल्या जादूच्या रंगीत कुंचल्यांनीं त्यांनीं या गृहस्थाचें असें बहारीचें चित्र रंगविलें कीं वा ! या रंगेल गृहस्थाचें नाटक कधीं टळावयाचें नाहीं ! केव्हांही हरिभाऊ नाटकाला जावोत ही स्वारी तेथें ठेवलेली ! कधीं कधीं जमखंडीकरांच्या वाड्यावरून हरिभाऊ आपल्या श्वशुरगृहीं जात असले तरी ही स्वारी त्यांना कोठें ना कोठें तरी भेटावयाचीच ! 'चकणे' वकील व अण्णासाहेब यांची ओळख होती. या व्यसनी मनुष्याच्या दुष्टपणाची पुण्यांत फार ख्याति असे.

अण्णासाहेब मुंबईहून कधीं पुण्यास घरीं आले कीं, 'चकणे' वकील त्यांस भेटावयास जरूर येत. त्यांनीं अण्णासाहेबांच्या देखत मुद्दाम हरिभाऊंस विचारावें, "कां तात्यासाहेब, तुम्ही रात्रींबेरात्रीं कुणीकडे हिंडत असतां ?" किंवा "गेल्या शनिवारचें नाटक कसें काय झालें ?" त्या दुष्टाच्या या उद्गारांचा अण्णासाहेब काय अर्थ करतील, त्यांचा आपल्यासंबंधीं विनाकारण गैरसमज होईल काय, अशी धास्ती हरिभाऊंना पडे. "आपल्या गैरहजेरींत तात्या मिळालेल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग करतो कीं काय ?" अशी शंका एकादे वेळीं अण्णासाहेबांच्या डोक्यांत यावयाची !

परंतु तात्याची मजल इतक्या गोष्टीपर्यंत जावयाची नाहींच अशी अण्णासाहेबांची पक्की खात्री असल्यामुळें ठीक झालें ! ! त्या दुष्टाचे हे उद्गार ऐकून हरिभाऊ मनांतल्या मनांत संतापून जात. पण अशा प्रसंगीं स्वस्थ बसणें हेंच ते श्रेयस्कर समजत. चिखलांत दगड टाकून आपल्याच अंगावर चिखल उडवून घेणें केव्हांहि शहाणपणाचें नव्हतें.

हरिभाऊंचा या मनुष्यावरील राग कायम होताच ! आणि संधि सांपडल्याबरोबर या ' चकण्या ' गृहस्थांनी ' मधल्या स्थितीं 'तील ' अधमाचें ' स्थान सुशोभित केलें. ' चकण्या 'चें हुबेहूब वर्णन वाचतांच हरिभाऊंच्या मित्रमंडळीत हंशा पिके व " बरी दुष्टाची खोडकी जिरली " असें सर्वांस वाटून गंमत होई.

' मधल्या स्थितीं 'तील दुर्व्यसनी लोकांचीं वर्णनें वाचून कित्येकांस अचंबा वाटतो व हरिभाऊंनीं या व्यसनी मंडळीचा चरित्रक्रम पाहिला तरी कोठें असा प्रश्न मनांत उभा राहतो. हरिभाऊंच्या जवळच्या नातलगांच्या घरीं जमणाऱ्या विद्वान्, सुशिक्षित मंडळींत कोणी मदिरेचे, तर कोणी मदिराक्षीचे भक्त असत ! ही व्यसनासक्त मंडळी सोंगट्यांच्या किंवा पत्त्यांच्या डावासाठीं नेहमी एकत्र जमावयाची ! त्याचप्रमाणें शेवडयांच्या बोळाजवळील शनीच्या पारानजीक असलेल्या एका वाड्यांत ' नारायणराव ' नामक एक अशिक्षित श्रीमंत तरुण रहात असत ! त्यांच्या घरीं व्यसनी लोकांचा अड्डा असे ! गांजा ओढणें, भांग पिणें, तमाशा पाहणें व वेश्यांचीं गाणीं ऐकणें हा यांचा स्तुत्य ( ! ) उद्योग रात्रंदिवस चाले. हेच ' मधल्या स्थिती 'तले ' विनायकराव ' होत. सरस्वतीप्रमाणें यांची पत्नीही बिचारी सुशील, सात्त्विक व सहनशील होती ! या नारायणरावांचा व हरिभाऊंचा, एकाच आळींत रहात असल्यामुळें परिचय होता. या लोकांची गंमत पाहण्यास जिज्ञासेनें हरिभाऊ त्यांचेकडे कधीं कधी जात असत ! या व्यसनाधीन श्रीमंतांनीं व त्यांच्या एक दोन साथीदारांनीं हरिभाऊंस आपल्या जाळ्यांत ओढण्याचा विफळ प्रयत्न केला ! श्रीमंत तरुण मुलांना व्यसनाधीन बनवून त्यांची संपत्ति हरण करण्याचा धंदा करणाऱ्या या लोकांच्या जाळ्यांत न सांपडतां हरिभाऊंनीं या लोकांच्या जीवितक्रमाचें तीक्ष्ण दृष्टीनें निरीक्षण मात्र करून घेतलें ! इतक्या लहान वयांत अशा मंडळींत जाऊनही हरिभाऊ शुद्धचे शुद्धच राहिले, याबद्दल कोणास साभिमान कौतुक वाटणार नाहीं ?

त्यांच्या नातलगांच्या येथें जमणाऱ्या व्यसनाधीन प्रतिष्ठित मंडळींची सर्वप्रसिद्ध गुप्त बैठक व शनीच्या पाराजवळील अड्डा या दोन्ही ठिकाणीं प्रत्यक्ष पाहिलेल्या

दृश्यांचा योग्य मिलाफ त्यांनीं ' मधल्या स्थितीं 'त केला आहे. धर्माचें ढोंग माजवून आपली तुंबडी भरणारे गुरुजी व त्यांचे भ्रष्ट अनुयायी यांचीं चित्रेंही हरिभाऊंनीं सत्य सृष्टींत प्रत्यक्ष पाहिलेलीं होतीं !

पुण्यांत इ. स. १८७९ सालीं स्थापन झालेल्या ' आर्योद्धारक ' नाटक मंडळीनें ' अथेल्लो, ' ' हॅम्लेट ' हीं नाटकें बसविलीं होतीं. प्रसिद्ध नट देवल व शंकरराव पाटकर हे त्यांत काम करीत. न्यू. इं. स्कूलमधील श्री. नामजोशी हे या मंडळीचे फार चहाते होते. या कंपनीच्या नाटकांना हरिभाऊ नेहमीं जात असत. त्यांतील नटांचो व त्यांची ओळख झाली होती. प्रो. भानू हेही नाट्याभिनयाचे शौकी होते. त्यांचा व हरिभाऊंचा येथेंच परिचय झाला. नाटक कंपनींत गेल्यामुळें बिघडलेल्या मुलांचा जीवनक्रम, नाटक मंडळींत त्यांचें जाणें येणें असल्यानें त्यांस माहीत झाला होता. त्यांनीं एका कंपनीस प्रारंभीचें ' ईशस्तवन ' तयार करून दिलें होतें असें म्हणतात. यावरून 'नान्या व गण्या' हीं 'मधल्या स्थितीं 'तील पात्रें सुद्धां त्यांनीं प्रत्यक्ष पाहूनच निर्माण केलीं आहेत हें निर्विवाद होय.

याच कादंबरींत हरिभाऊंनीं एका वेश्येच्या घराचें वर्णन केलें आहे ( प्रकरण १८, 'बाजारचें प्रेम' ). तें अगदीं हुबेहूब वर्णन वाचून त्या वेळची एक प्रमुख विश्वयोषिता चाकित होऊन गेली व हा लेखक वेश्येच्या घरीच काळ घालवीत असला पाहिजे, असे तिच्या तोंडून उद्गार निघाले असें म्हणतात. परंतु गायनाच्या बैठकींतील डग्गा व बाह्या एकच असून हरिभाऊंनीं ' डग्गा आणि बाह्या ' असें लिहिलेलें पाहून मात्र लेखकानें आपल्या कल्पनाशक्तीच्या जोरावरच हें वर्णन केलें आहे असें तिच्या ध्यानीं आलें.

आसनीकर जोशी यांच्या वाड्यांत हरिभाऊ रहात असतां शेजारीं एका सुनेचा होत असलेला अनन्वित छळ नित्य पाहूनच हरिभाऊंच्या अंतःकरणांत स्त्रियांच्याबद्दल कळवळा उत्पन्न झाला व यामुळेंच त्यांना पुढें सामाजिक कादंबऱ्या लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी असें वाटतें. ' मधली स्थिति ' या कादंबरींतील ' दुर्गी ' म्हणजेच वर सांगितलेली ती विचारी सून होय ! ( ' मधली स्थिति ' प्रसिद्ध झाल्यावर हरिभाऊंचे स्नेही श्री. वामनराव लेले, वकील, यांनीं ' म्यां दुरून दुर्गा पाहिली ' या नांवाखालीं एक पत्र देखील ' पुणें-वैभवां 'त प्रसिद्ध केलें होतें. ) दागिन्यांचीं, मुलें होण्याचीं वगैरे आमिषें दाखवून दुष्ट लोक भोळ्याभाबड्या स्त्रियांना कसें

फसवितात त्याचें उदाहरण म्हणजे दुर्गी होय. या गरीब मुलीस दुष्टांनीं फसविलें व तिच्या हातून जबरीनें पापकर्में करविलीं व पुढें तिला पश्चात्ताप झाला असें दाखविण्याचें प्रथम हरिभाऊंनीं ठरविलें होतें. परंतु त्यांच्या कॉलेजमधील मित्रांना हरिभाऊंनीं या मुलीच्या शुद्ध व निष्कपट स्वभावाचें केलेलें सुंदर वर्णन वाचून तिच्याबद्दल इतकें प्रेम व सहानुभूति वाटूं लागली होती कीं, त्यांनीं, या मुलीस जबरदस्तीनें भ्रष्ट होऊं देऊं नका असा हरिभाऊंस आग्रह केला ! मित्रांच्या आग्रहास मान देऊन हरिभाऊंनीं या मुलीची दुष्टांचे ताब्यांतून शेवटीं अचानक सुटका करविली. या दुर्गीबद्दल हरिभाऊंनीं इ. स. १८८६ सालच्या ऑक्टोबर महिन्यांत श्री. काशीताईस पाठविलेल्या पत्रांत लिहिलें आहे कीं, " मला पहिल्या प्रथम असें वाटत होतें कीं, दुर्गीच्या हातून पाप करवून नंतर तिला पश्चात्ताप झालेला दाखविला असता म्हणजे जास्त स्वाभाविक झालें असतें; आणि त्याचप्रमाणें करण्याचा माझा निश्चयही होता. परंतु माझ्या सर्व मित्रांनीं तिला निष्पाप अशी ठेवण्याविषयीं अत्यंत आग्रह केला. बाबानें (काशीताईंचा भाऊ) तर येथून जातांना ' दुर्गीला आपण पापकर्मांत घालाल तर आपलें व आमचें भांडण होईल ! ' असें स्पष्टपणें व गंभीरपणें बजाविलें होतें. या कारणास्तव मी तिला तशी सोडविली. परंतु, या आनंददायक पर्यवसानानें रसहानि झाल्यावांचून राहिली नाहीं." ' मधली स्थिति ' हें नांव कादंबरीस देण्याचें कारण असें कीं, निकृष्ट वर्गाची स्थिति ( Lower Classes ) व उच्च वर्गाची स्थिति ( Higher Middle Class ) यांबद्दल दोन कादंबऱ्या लिहिण्याचा हरिभाऊंचा बेत होता व तो त्यांनीं आपल्या मित्रांजवळ बोलूनही दाखविला होता. या धोरणानेंच पुढें त्यांनीं सुशिक्षित व सुसंस्कृत अशा ' गणपतरावा 'चें चरित्र वर्णन केलें. ' मधल्या स्थितीं 'तील गण्यानान्यांचें उत्तर चरित्र लिहून कनिष्ठ दर्जाची स्थिति वर्णन करावी अशी त्यांची इच्छा होती. परंतु गण्यानान्यासारख्यांना कथानायक बनवून समाजांतील घाण उपसणें अनुचित वाटून त्यांनीं तो बेत रद्द केला. वेश्यागमनामुळें मनुष्याच्या मनाची किती अधोगति होते हें दाखविण्याचा या कादंबरीचा उद्देश होता; परंतु असल्या कादंबऱ्या लिहिण्यानें व वाचण्यानें मनुष्याला आपला कांहीं काळ तरी अमंगळ, किळसवाण्या वातावरणांत काढावा लागतो. त्यामुळें व त्यांच्या मित्रांनाही ही कल्पना बिलकुल न रुचल्यानें ही कादंबरी शेवटीं बाहेर पडली नाहीं.

यावरून ‘मधली स्थिति’ या नांवाचा संबंध गरिबीश्रीमंतीशीं असणें असंभवनीय वाटतें. सुशिक्षितपणाच्या व सुसंस्कृतपणाच्या दृष्टीनें ‘मधली स्थिति’ हें नांव स्थितिवाचकच असलें पाहिजे असें दिसतें. एवढेंच नव्हे तर, हरिभाऊंचे मित्रही ‘मधली स्थिति’ हें कादंबरीचें नांव ‘स्थितिवाचक’ असल्याचें स्पष्ट सांगतात. श्री. वाग्भट नारायण देशपांडे यांच्या मतें इंग्लिश संस्कृतीच्या संनिकर्षापूर्वी आणि नंतर अशा दोन कालांतील ‘मधल्या स्थिती’चें वर्णन हरिभाऊंनीं केलें. पण हें म्हणणें तितकेंसें पटत नाही. तें कसेंही असो, परंतु हरिभाऊंनीं ‘आजकालची गोष्ट’ म्हणून ती कादंबरी लिहिली ही गोष्ट मात्र खरी !

‘मधल्या स्थितीं’त विष्णु व यमुना यांचा परिचय करून देऊन त्यांची कथा गाण्याचा संकल्प हरिभाऊंनीं केला व वाचकांस कादंबरीच्या शेवटीं दिलेलें हें आश्वासन पुढें खरें करून दाखविलें. ‘मधली स्थिति’ ही कादंबरी लिहीत असतांनाच हरिभाऊंनीं आपल्या बऱ्याच कादंबऱ्यांचें एक सुसंगत कथासूत्र मनाशीं कल्पून तें या कादंबरींत गोविलें होतें असें ध्यानांत येतें. ही कल्पना त्यांनीं फ्रेंच कादंबरीकारांच्या कादंबऱ्यांवरून घेतली असावी.

हरिभाऊंच्या या पहिल्या वाङ्मयकृतीचा बोलबाला महाराष्ट्रभर झाला ! परंतु ‘मधली स्थिति’ ही कादंबरी हरिभाऊंनींच लिहिली असें घरांतील वडील मंडळींना बिलकुल माहीत नव्हतें ! फॅनी बर्नें हिची *Evelina* ही पहिली कादंबरी तिच्या बापानें वाचली, परंतु आपल्या फॅनीनें ती लिहिली हें त्यास कोठें माहीत होतें ? शार्लट ब्रॉंटची *Jane Eyre* ही कादंबरी सुद्धां मि. ब्रॉंटला त्याच्या एका मुलीनें वाचून दाखविली व तो जेव्हां तिची स्तुति करूं लागला, तेव्हां ती मुलगी त्याला हळूंच म्हणाली, “बाबा, ही कादंबरी आपल्या शार्लटनेंच लिहिली आहे !” हें ऐकतांच म्हाताऱ्यास किती तरी आनंद व कौतुक वाटलें ! हरिभाऊंच्या या पहिल्या कादंबरीचें गुपित नानासाहेबांस आगगाडींत बरेच दिवसांनीं समजलें ! त्यांच्याबरोबर एक त्यांच्या ओळखीचा गृहस्थ प्रवास करीत होता. त्यानें ‘मधल्या स्थिती’ची व कादंबरी-काराची अतोनात प्रशंसा केली ! तेव्हां कुठें नानासाहेबांस समजलें कीं, “आपला तात्या फार उत्कृष्ट लेखक आहे म्हणून !” परक्याच्या तोंडून अनपेक्षित रीतीनें आपल्या पुत्राची वाखाणणी ऐकून कोणत्या प्रेमळ पित्यास समाधान व कौतुक वाटणार नाहीं ? आपला मुलगा हुषार निघाला हें पाहून नानासाहेबांस अतिशय समाधान झालें.

ही कादंबरी ज्या वर्षी प्रसिद्ध होऊं लागली त्याच वर्षी हरिभाऊंस प्रीव्हिअसच्या परीक्षेंत दुसऱ्यांदां अपयश आलें. परीक्षेंतील अपयशाचीं कारणें म्हणजे गणित विषयाची हेळसांड व वाङ्मयाकडील विलक्षण ओढा हीं होत. अभ्यासाव्यतिरिक्त वाचनलेखनाचें त्यांस वेडच होतें. अर्थात् परीक्षेंत अपयश येऊन घरच्या वडील मंडळींची त्यांजवर इतराजी झाली.

अण्णासाहेब इतके वाङ्मयाचे शौकी ! परंतु 'मधल्या स्थितीं'तील दुर्वर्तनी पात्रांचें चरित्रवर्णन वाचून' "तात्या असल्या व्यसनी दोस्तांच्या नादीं तर लागला नाहीं ना?" अशी शंका त्यांस येऊन ती त्यांनीं रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्याजवळ बोलून सुद्धां दाखविली ! या शंकेचें निराकरण करून रावबहादूर म्हणाले, "अण्णासाहेब, या मुलाचा अधिकार मोठा आहे. त्याजबद्दल आपण असा भलता संशय घेऊं नका. दुर्वृत्त लोकांना सन्मार्गावर आणण्याकरितांच ज्यांचा जन्म ते स्वतः दुर्मार्गगामी कधींच होत नसतात." हरिभाऊ परीक्षेंत नापास होत त्यामुळेंही हा संशय बळावला होता. परंतु रा. ब. महाजनींच्या हरिभाऊंसंबंधींच्या वरील उद्गारांनीं अण्णासाहेबांचा त्यांजबद्दल झालेला विपरीत ग्रह नष्ट झाला.

ज्यानें एक सुंदर कादंबरी लिहून उत्तम कादंबरीकार म्हणून कीर्ति संपादन केली त्यास प्रीव्हिअसच्या परीक्षेंत अपयश यावें याबद्दल अण्णासाहेबांस फार आश्चर्य वाटलें व बराच रागही आला. त्यांनीं हरिभाऊंस बजावून सांगितलें कीं, "पुनः डेक्कनमध्यें जाऊन अभ्यास कर. गांवांतील मित्रांबरोबर उनाडक्या करूं नकोस." या अपयशानें हरिभाऊंचाही फार विरस झाला होता. अर्थात् अण्णासाहेबांच्या आज्ञेनुसार ते पुनः डेक्कन कॉलेजमध्यें जाऊं लागले.

परीक्षेंत अपयश आलें तरी हरिभाऊंचें वाचन अखंडपणें चालूच होतें. नामांकित ग्रंथकारांचीं नांवें विद्वानांच्या लेखांत अगर भाषणांत ऐकून त्यांचे ग्रंथ वाचण्याची व त्यांच्याबद्दल माहिती मिळविण्याची त्यांस अनावर जिज्ञासा वाटे. कॉलेजच्या पहिल्या वर्षातच त्यांनीं सेज्विकचें *Method of Ethics* हें पुस्तक वाचून काढलें. परंतु त्यांतील विषयाचें आकलन होईना, तेव्हां त्यांनीं त्याचीं अनेक पारायणें करून तो विषय आत्मसात् केला व नंतर आपल्या एका स्नेह्यापाशीं त्या पुस्तकाची खूप प्रशंसा करून त्यास तें पुस्तक त्यांनीं वाचावयास दिलें व म्हटलें, "विषय आहे उत्तम. पण भाषा मात्र समजतां समजतां मारामार पडते."

## सामाजिक विचारांत स्थित्यंतर

याच वर्षी मे महिन्यांत गोविंदराव कानिटकर पुण्यास रहावयास आले. परंतु तत्पूर्वीच इ. स. १८८३ त त्यांची व हरिभाऊंची मुंबईस ओळख झाली होती. सुट्टीत हरिभाऊ वारंवार मुंबईस अण्णासाहेबांकडे जात. अण्णासाहेब व गोविंदराव यांचीं घरें जवळजवळ होतीं. अण्णासाहेबांच्या घरी भरत असलेल्या 'गायनसमाजा'चे सेक्रेटरी गोविंदराव असल्यानें ते रोज सायंकाळीं अण्णासाहेबांकडे जात. अण्णासाहेब प्रख्यात कसलेले वकील म्हणूनही गोविंदरावांनीं मुद्दाम त्यांचा परिचय करून घेतला होता. या गायनसमाजाचे बैठकीस नाणावलेले हायकोर्ट वकील, बॅरिस्टर येत असत. कै. न्यायमूर्ति तेलंग, कै. ग. रा. किर्लोस्कर, कै. घनश्याम नीलकंठ नाडकर्णी, कै. शांताराम नारायण वगैरे मुंबईकर मंडळी अण्णासाहेबांकडे जमत. येथेंच गोविंदराव व हरिभाऊ यांची विशेष ओळख झाली.

कानिटकर मंडळींच्या सहवासानें हरिभाऊंच्या विचारांत केवढें तरी स्थित्यंतर झालें ! गोविंदराव मिल् व स्पेन्सर यांचे कट्टे भक्त. ज्याला त्याला ते मिलचे ग्रंथ वाचण्याची शिफारस करीत. त्यांच्या सहवासानेंच हरिभाऊही मिल्-स्पेन्सरांच्या तत्त्वज्ञानाचे अभ्यासक बनले आणि या ग्रंथांच्या वाचनानेंच हरिभाऊंच्या विचारांना भिन्न वळण लागलें.

गोविंदरावांचा परिचय होण्यापूर्वी कै. आगरकरांच्या नवीन सुधारणावादी सामाजिक संप्रदायास हरिभाऊ तितकेसे अनुकूल नव्हते. आगरकरांच्या मतांवर टीका करितांना हरिभाऊंनीं एकदां लिहिलें, "आठदहा वर्षांच्या पोरांना लग्नशृंखला घालणें, तरुण गतभर्तृका ऋतुमती झाल्याबरोबर त्यांना विकेशा करून चतुर्थाश्रम देणें, कोंकीदार किंवा कंगणीदार पागोटें घालणें हेच आमचे रीतिरिवाज आहेत काय ? गेल्या शेंदोनशें वर्षांमागें आमचे रीतिरिवाज काय होते, ते आमच्या विद्वान् ग्रंथकर्त्यांच्या लक्षांत अगदींच नाहींत काय ? अभिज्ञानशाकुंतल, उत्तररामचरित, मृच्छकटिक, मालतीमाधव, विक्रमोर्वशीय इत्यादि नाटकांत वर्णिलेले रीतिरिवाज आमचे नव्हतेच काय ? आम्ही आमचे रीतिरिवाज सोडून चाललों आहों हें दाखविणें चांगलें कीं, दुसऱ्यांचे चांगले आहेत हें दाखविणें चांगलें ? " वरील उताऱ्यावरून कै. आगरकरांच्या सुधारकी मतांबद्दल हरिभाऊंचा अभिप्राय कसा होता हें चांगलें समजतें.

परंतु रावसाहेब गोविंदराव कानिटकर व त्यांच्याकडे जमणारी स्नेही मंडळी यांच्या समाजविषयक मतांचा परिणाम होऊन हरिभाऊंच्या विचारांत क्रान्ति झाली व

ते आगरकरांच्या संप्रदायास जाऊन मिळाले. या त्यांच्या मतपरिवर्तनाचें उत्कृष्ट प्रतिबिंब त्यांच्या ‘ गणपतराव ’ या कादंबरींत चित्रित झालें आहे.

न्यायमूर्ति रानडे व विष्णुशास्त्री यांच्या संप्रदायांत जी एक प्रकारची तेढ होती तीच गोविंदराव व हरिभाऊ यांच्या मतांत प्रारंभीं असे. परंतु गोविंदरावांच्या संगतींत विविध प्रकारचें वाचन व चर्चा होऊन हरिभाऊंचे विचार प्रगतिपर झाले व मिल, स्पेन्सर इत्यादि पाश्चात्य तत्त्ववेत्यांच्या तत्त्वज्ञानानें त्यांच्या कोत्या समजुती नष्ट झाल्या, दृष्टि फांकली, स्वदेश, स्वाभिमान इत्यादि संकुचित भावनांच्या बंधनांतून मुक्त होऊन सर्व मानव जातीच्या सुखदुःखांचा विचार करण्यास जरूर असणारी सहानुभूति व समाजविषयक प्रश्नांचा सांगोपांग विचार होण्यास आवश्यक अशी व्यापक दृष्टि त्यांच्या अंगीं आली. स्पेन्सरादिकांच्या उपयुक्ततावादानें कांहीं काळ हरिभाऊंच्या मनावर बराच पगडा बसविला होता एवढें खास !

अशा तऱ्हेनें सुट्टीच्या दिवशीं डेक्कन कॉलेजांतून गांवांत येऊन कानिटकर मंडळी-बरोबर वाङ्मयविषयक चर्चा करावी व आठवड्यांतील इतर दिवशीं अभ्यास करावा असा हरिभाऊंचा क्रम सुरू झाला. नवीनच उघडलेल्या टेनिसकोर्टावरही त्यांनीं खेळावयास आरंभ केला. या टेनिसच्या खेळामुळें त्यांची पुष्कळशा विद्यार्थ्यांशीं ओळख झाली. विशेषतः मिस् मेरी भोर यांच्या भावाशीं त्या वेळीं झालेली मैत्री पुढें अधिकाधिक दृढ होऊन भोर कुटुंबाशीं त्यांचा चांगला घरोबा झाला.

या वर्षी त्यांचा अभ्यास कसा चालला होता व परीक्षेसंबंधीं आणि एकंदर भावी आयुष्यासंबंधीं त्यांचे जे विचार होते ते त्यांनीं काशीताईंना प्रिलिमिनरीनंतर लिहिलेल्या एका पत्रावरून कळतात. “आमची प्रिलिमिनरी परीक्षा गेल्या महिन्यांतच झाली व त्यायोगानें अभ्यासाकडे जरा जास्त जोर द्यावा लागला. आणि दुःखांत सुख एवढेंच कीं, तसा जोर दिल्यानें सर्व विषयांत चांगल्या तऱ्हेनें पसार होऊन पुढील परीक्षेस जाण्याची परवानगी मिळाली. या परीक्षांनीं तर मोठाच त्रास दिला आहे. कांहींही इतर वाचावयास जा, त्या वेळीं आपण हें वाचण्यापेक्षां आपल्या अभ्या-साचेंच पुस्तक वाचल्यास बरें, असें वाटून तें हातीं घेतलेलें पुस्तक निमूटपणें एकीकडे ठेवावें लागतें. हा एक आत्मसंयमन शिकविणारा धडाच आहे. आणखी आतां असेंही वाटूं लागलें आहे कीं, बी. ए. झाल्यावांचून कांहीं उपयोग नाहीं व त्या-प्रमाणें तीन वर्षांत बी. ए. होण्याचा मी आपल्याकडून निश्चय केला आहे ! या

परीक्षेसंबंधानें खरोखर मला माझ्या इष्टमित्रांकडून, सोयऱ्याधायऱ्यांकडून, ओळखी-पाळखींच्या लोकांकडून, प्रत्येकाकडून बोध होत असतो व त्यायोगानें माझें मन नेहमीं उद्विग्न असतें."

याच पत्रांत त्यांचे चुलते अण्णासाहेब यांना हरिभाऊंच्या परीक्षा नापास होण्यानें काय वाटत होतें याचें दिग्दर्शन केलें आहे. काशीताईचे चुलतसासरे नारायणराव यांच्या जवळ अण्णासाहेब म्हणाले, "नारायणराव, तुम्हीच पहा आमच्या कुटुंबाची स्थिति कशी आहे ती ! आम्ही एकूण चौघे बंधू, त्यांपैकीं आम्ही तिघे कुटुंबाच्या उपयोगाला कांहींच पडत नाहीं. मी तो हा असा ! व माझ्या पाठचे तर कोणत्याही कामाचे नाहींत. येऊनजाऊन आमचे वडील भाऊ नानाच काय ते कुटुंब चालवीत आहेत. थोड्याच दिवसांत ते पेन्शन घेतील व तें कुटुंबास पुरण्याइतकें जबर असणार नाही. हा हऱ्या अजून बी. ए. झाला नाहीं. याउपर तो बी. ए. होऊन, एल्‌एल्. बी. होऊन, वकिलीचा धंदा करायला लागणार! कसचें काय आणि कसचें काय ! यानें जर घाई केली नाहीं तर कुटुंबाचें होणार कसें ? यानें या वेळीं एल्‌एल्. बी. होऊन माझ्या धंद्यांत शिरावयाचें, निदान माझ्याजवळ तरी बी. ए. होऊन यावयाचें ! तें कांहींच नाहीं. तो तुमचा मित्र आहे. अजून तुम्ही त्याला सांगा व त्याला लवकर बी. ए. होऊं द्या ! तो कांहीं लहान नाहीं. त्याचें त्याला समजूं लागलें आहे. त्यानें ग्रंथ वगैरे लिहूं नयेत असें माझें म्हणणें नाहीं. परंतु आधीं आपला धंदा पहावा व मग काय तें करावें. माझ्याही मनांतून फार आहे कीं, त्यानें मला मागें लिहिल्याप्रमाणें माझ्या 'मौजेच्या चार घटकां'चे पुढील भाग लिहावे. माझ्या मतें तो अगदीं बिघडून गेला आहे. तुम्हांला काय वाटेल तें वाटो. मी परवां पुण्यास गेलों होतों, त्या वेळीं पाहिलें तर आपल्या माडींत दहापांच मंडळी जमा करून तो खुशाल गप्पा मारीत बसला होता ! आपल्या डोळ्यांपुढें कुटुंबाची पुढील स्थिति असतांना हें आमच्यानें कसें पहावेल बरें ?"

नारायणरावांकडून हरिभाऊंस हें चुलत्यांचें बोलणें कळतांच त्यांस अत्यंत वाईट वाटलें. कॉलेजांत एकदम मिळून जाण्याच्या विचारानें त्यांची मित्रमंडळी त्यांच्याकडे आली होती. याबद्दल अण्णासाहेबांनीं विपरीत ग्रह करून घेतला ! नानासाहेबांची हरिभाऊंशीं वागणूक अगदीं भिन्न प्रकारची होती. त्यांनीं मात्र हरिभाऊंस कोणत्याही गोष्टीविषयीं लिहून कधीं दुखविलें नाहीं. असो.

## हरि नारायण आपटे

बी. ए. होऊन " युरोपांत जाण्याची जी अत्यंत उत्कट – इतकी कीं, ती पूर्ण झाल्यावांचून माझा प्राण जाणार नाहीं असें सदोदित वाटतें–इच्छा तीही सफल कोणत्या तऱ्हेनें होणार ? " या विषयाची त्यांस काळजी लागली. अर्थात् या सर्व गोष्टी प्रीव्हिअसच्या परीक्षेमध्यें पास होण्यावर अवलंबून होत्या !

कॉलेजमधून त्यांस परीक्षेस पाठविण्यांत आलें. त्यांनीं आपल्याकडून अभ्यासाची पराकाष्ठा केली. संस्कृतचा त्यांचा पेपर इतका उत्कृष्ट होता कीं, संस्कृतचे परीक्षक बाबासाहेब पेंडसे यांनीं " सर्व विद्यार्थ्यांत हरिभाऊंचाच पेपर मला उत्तम वाटला, " असे उद्गार काढले. इंग्रजी पेपरही त्यांनीं सुंदर लिहिला होता. परंतु गणितांतील अगणित अनर्थांनीं त्यांस भंडावून सोडिलें. गणित विषयानें त्यांचीं अनेक मनोराज्यें ढांसळून टाकलीं. हरिभाऊंस तिसऱ्यांदां अपयश आलें ! भावी आयुष्याबद्दल त्यांस अत्यंत निराशा वाटली ! अखेरीस कॉलेज सोडून देऊन त्यांनीं आपला शिक्षणक्रम संपविला. पुढें एक दोन वर्षें बाहेरचा विद्यार्थी म्हणून ते घरीं अभ्यास करून परीक्षेस बसले. परंतु त्याचा कांहीएक उपयोग झाला नाहीं ! हरिभाऊंस " तुम्ही गणित कां करीत नाहीं ? " असें विचारल्यास ते विनोदानें उत्तर देत, " गणित विषयांत अगणित अडचणी आहेत म्हणून. " हरिभाऊंनीं इ. स. १८८६ च्या अखेरीस कॉलेजास रामराम ठोकला. त्यांच्या कांहीं स्नेह्यांनींही त्याच वेळीं कॉलेज सोडलें. हरिभाऊंच्यामुळें आपल्या मुलांनीं शिक्षण सोडलें, अशी समजूत होऊन त्यांच्या घरांतील वडील मंडळी हरिभाऊंस 'कॉलेज सोडणारांचे गुरुजी' असें गंमतीनें म्हणत ! असो.

कॉलेज सोडलें खरें, परंतु पुढें काय करावें असा प्रश्न हरिभाऊंस येऊन पडला !

---

## प्रकरण सहावें

# बहीण-भाऊ व वाङ्मयीन सहकार

नीलकंठरावांकडून काशीताईच्या गोष्टी ऐकून आपल्या मित्राच्या या सुशिक्षणानें अलंकृत झालेल्या भगिनींचा परिचय करून घ्यावा असें हरिभाऊंस वाटलें असल्यास त्यांत कोणतें आश्चर्य ? घरांतील सासवांच्या मर्जीप्रमाणें वागूनही पतीच्या इच्छेप्रमाणें शिक्षण संपादन करण्यासाठीं रात्रंदिवस धडपड करणारी ही स्त्री असेल तरी कशी असें कुतूहल त्यांच्या मनांत उत्पन्न झालें होतें. इ. स. १८८३ मध्यें हरिभाऊ मुंबईस अण्णासाहेबाकडे गेले असतां काशीताईचे पति गोविन्दराव यांच्याशीं परिचय होऊन त्यांच्या वाङ्मयविषयक किती तरी गप्पा झाल्या ! गोविन्दराव त्या वेळीं मुंबईस वकिली करीत होते. हरिभाऊ म्हणजे कॉलेजमध्यें शिकणारा विद्यार्थी. त्यांच्या वयांतही दहा बारा वर्षांचें अन्तर ! परंतु काव्यवाङ्मयासंबंधी दोघांच्या आवडी एकच असल्यानें त्यांचा चांगलाच स्नेह जमला ! गोविन्दराव वकील असले तरी त्यांस वाङ्मयाचीच खरीखुरी गोडी होती. ते हरिभाऊंशीं तासचे तास वाङ्मयविषयक चर्चा करीत. असा विद्वान्, रसिक व व्यासंगी मित्र लाभल्याबद्दल हरिभाऊंस फार आनंद झाला ! पुढें गोविन्दरावांनी सबजज्जाची जागा पत्करल्यामुळें त्यांस नोकरी-निमित्त मुंबई सोडावी लागली तरी त्यांचा स्नेह अबाधित राहिला. पुढें कांहीं दिवसांनीं ते एकदां सुट्टीत पुण्यास आले असतां आगरकरांच्या हॅम्लेटसंबंधीं जो प्रकार झाला तो मागें सांगितलाच आहे. गोविंदरावांनीं हॅम्लेटचें नवीन भाषांतर करून ज्या दिवशीं आगरकरांचें भाषांतर बाहेर पडेल त्याच दिवशीं आपलेंही पुस्तक प्रसिद्ध करावें असा सर्वानुमतें बेत ठरला होता. एक महिन्यांत पुस्तक तयार करावयाचें असल्यानें गोविंदरावांनी भाषांतर करण्यास जोरांत सुरुवात केली ! दोन्हीही भाषांतरें

एका टाइपाचीं, एका आकाराचीं व एकाच जातीच्या कागदावर छापावींत असा करार छापखान्यांत ठरला होता. भाषांतर वाचून त्यावर योग्य चर्चा व्हावी एवढ्यासाठीं रोज मंडळींनीं कानिटकरांचे घरीं जमण्याचें ठरविलें.

रोजच्या रोज कानिटकरांच्या घरीं माडीवर खोलीचें दार बंद करून सर्व मंडळी बसूं लागली. गोविंदराव लिहिलेलें भाषांतर वाचून दाखवीत व इतर मंडळी त्यांतील शब्दांच्या योग्यायोग्यतेबद्दल चिकित्सा करीत. या वाङ्मयचर्चेंत भाग घेण्यास कधीं कधीं गोविंदराव आपल्या पत्नीला बोलावीत. नाटकांतील नायकांच्या तोंडीं घातलेली भाषणें बरोबर साधलीं आहेत किंवा नाहीं हें पाहण्याचें व त्यांच्यावर आपलें मत देण्याचें काम काशीताईच्याकडे असे.

पतीच्या बरोबरीनें ग्रंथादि विषयांवर स्त्रिया चर्चा करीत आहेत, पुरुष त्यांच्या मतांस मान देऊन त्यांचा आनंदानें स्वीकार करून त्यांजबद्दलचा आदर व्यक्त करीत आहेत, सुशिक्षित स्त्रिया आपल्या पतींच्या मित्रांबरोबर संवाद करीत आहेत, अशा तऱ्हेचें गृहसौख्याचें चित्र त्या वेळीं पुण्यांत तरी इतर कोठल्याही घरीं आढळून येत नव्हतें. जेथें सासुरवासिनीनें दुसऱ्याच्या देखत पतीशीं बोलण्याची देखील चोरी, तेथें कसले वादविवाद नी कसलें काय ! सुनेच्या हातांत पुस्तक दिसलें कीं, सासूच्या कपाळीं तिडीक उठावयाची, असली जेथें गृहस्थिति तेथें स्त्रियांच्या शिक्षणाचें नांवसुद्धां काढावयाला नको !

हरिभाऊंच्या घरीं स्त्रियांना कितपत अक्षरओळख होती व स्त्रीशिक्षणाबद्दल त्यांचीं काय मतें होतीं याचा मासला वाचकांनीं मागें एकदां पाहिलाच आहे ! तेव्हां विद्वत्तेचें तेज ज्यांच्या मुखावर चमकत आहे, सुशीलता व गांभीर्य यांनीं ज्यांस शोभा आली आहे, अशा काशीताईसारख्या आदरणीय स्त्रीस पाहतांच हरिभाऊंना धन्यता वाटली व काशीताईचा आदर्श पुढें ठेवून सर्व स्त्रिया जर शिक्षण संपादन करतील तर आपल्या समाजांत केवढी तरी क्रांति होईल असें त्यांच्या मनांत आलें ! यानंतर लौकरच त्यांनीं लिहिलेल्या 'गणपतराव' या नांवाच्या अपूर्ण कादंबरींत विष्णुपंत व लक्ष्मीबाई यांचीं चित्रें रेखाटतांना हरिभाऊंच्या पुढें गोविंदराव व काशीताई या सुशिक्षित पतिपत्नींचा आदर्श असावा असें निःसंशय दिसतें. काशी-ताईचा साधेपणा, शांत स्वभाव, शालीनता, वडील मंडळींच्या बद्दलचा आदर इत्यादि गुणांनीं हरिभाऊंचा त्यांच्या विषयींचा आदर अधिक वाढला. सुशिक्षित असूनही

जुन्या माणसांशीं जुन्याप्रमाणें व नव्या मतांच्या माणसांशीं नव्याप्रमाणें वागण्याची त्यांची कुशलता पाहून आणि श्रीमंती व विद्वत्ता या दोहोंचा संगम काशीताईच्या ठिकाणीं झाला असतांनाही गर्व त्यांना माहीतसुद्धां नाहीं हें पाहून हरिभाऊंना आश्चर्य वाटे व ' विद्या विनयेन शोभते ' या वचनाची त्यांस आठवण होई.

हॅम्लेटच्या भाषांतराच्या चर्चेमुळें हरिभाऊंचा काशीताईशीं विशेष परिचय झाला. ही ओळख होण्यापूर्वीच गोविंदरावांच्या उत्तेजनानें काशीताईनीं लेखन-व्यवसाय सुरू केला होता. त्यांच्या ' रंगराव ' या कादंबरीचीं पांच चार प्रकरणें लिहून झालीं होतीं. परंतु त्याच वेळीं ' पुणें-वैभवां 'त प्रसिद्ध होणाऱ्या ' मधली स्थिति ' या कादंबरीचीं कांहीं प्रकरणें काशीताईच्या वाचनांत आलीं व तीं त्यांस फार आवडलीं. कादंबरी लिहावी तर अशीच असें त्यांना वाटलें. त्यांतील सुंदर वर्णनें, पात्रांच्या तोंडचीं स्वाभाविक भाषणें, पुण्यांतील समाजाचीं हुबेहूब चित्रें व विषयानुरूप भाषापद्धति हीं पाहून हा " तरुण लेखक असावा तरी कोण ? " अशी जिज्ञासा उत्पन्न होऊन त्याविषयीं त्यांनीं गोविंदरावांस विचारलें व " असें लिहितां येईल तरच लिहावें, नाहीं तर मुळींच लिहूं नये, " असें म्हणून ' रंगराव ' कादंबरी लिहिण्याचें सोडूनच दिलें. काशीताईचा हा विचार पसंत न पडून त्यांनीं निराश न होतां आपलें लेखनाचें काम उत्साहानें चालू द्यावें असें गोविंदरावांनीं त्यांस पुष्कळ सांगून पाहिलें. परंतु 'मधल्या स्थिती 'शीं तुलना करून पाहतां 'रंगराव' कादंबरी अगदींच फिकी पडणार या विचारानें काशीताईस कांहींच लिहावेंसें वाटेना. एक दिवस सहज बोलतां बोलतां गोविंदरावांनीं ही गोष्ट हरिभाऊंच्या कानांवर घातली. तेव्हां हरिभाऊंनीं ' रंगरावा 'चीं लिहिलेलीं प्रकरणें गोविंदरावांपासून घेऊन वाचून काढलीं. तीं वाचून त्यांस इतका आनंद झाला व इतकें कौतुक वाटलें कीं, सांगायची सोय नाहीं. ती कृति वाचून त्यांच्या मनांत काशीताईबद्दल जो पूज्यभाव उत्पन्न झाला तो त्यांना कळविल्यावांचून हरिभाऊंस अगदीं राहवेना. म्हणून त्यांनी काशीताईस ' अंबूताई ' (' रंगरावां 'तील एक सुशील स्त्री ) या नांवानें संबोधून एक पत्र लिहून कळविलें कीं, " आपली कादंबरी वाचून मला आपल्याला प्रख्यात इंग्रजी कादंबरी लिहिणाऱ्या ज्या मिस् ऑस्टेनबाई किंवा फ्रेंच कादंबऱ्या लिहि-णाऱ्या जॉर्ज सॅंबाई यांच्या जोडीला बसवाव्या असें वाटतें. मि. रा. गोविंदराव यांचा हेतु आपण जॉर्ज ईलिअट व्हावें असा दिसतो; परंतु माझ्या पामर बुद्धीला

असें वाटतें कीं, आपण जेन ऑस्टेनचेंच अनुकरण करावें. जॉर्ज ईलिअटचें अनुकरण करणें इष्ट नाहीं. खरोखर साधेपणांत जी काय मौज आहे ती कशांत नाहीं. अव्याज मनोहरत्व हें कांहीं निराळेंच आहे. त्याची बरोबरी कशासही यावयाची नाहीं. मी आपणांस जेन ऑस्टेनची उपमा देतों याचें कारण तरी आपल्या भाषेचें अव्याज मनोहरत्व हेंच होय. आपली कादंबरी वाचून जो कांहीं मला आनंद झाला आहे तो खरोखर अवर्णनीय आहे. तो मला येथें सांगतां येत नाहीं आणि तो सांगण्याचा विफल यत्नही मी करीत नाहीं. जो यत्न खात्रीनें फसणार, तो विनाकारण करून तरी कशाला पहावा ? तो न करणें हेंच विहित. आपण कादंबरीकार आहां, आपल्यालाच माझ्या स्थितींत आणून त्याची कल्पना करावी म्हणजे झालें. हें पत्र लिहिण्याचा अविनय मी खरोखर केलाही नसता, परंतु त्याला दुसरें असें कारण झालें : मि. रा. गोविंदरावांनीं बोलतां बोलतां असे उद्गार काढले कीं, माझी ' पुणें-वैभवां 'त दर महिन्यास प्रसिद्ध होणारी कादंबरी वाचून आपली स्वतःची ही कादंबरी लिहिण्याविषयीं आपण हुरूप सोडून दिला. असें करण्याचें कारण काय असेल तें, मी आपल्या कल्पनेला हव्या तशा चमक्या मारून भरधांव काढिलें, तरी देखील लक्षांत येत नाहीं.

" वास्तविक पाहतां असें करण्याला कांहीं एक कारण नाहीं. जर माझ्या कादंबरींत कांहीं गुण असेल, तर तसा किंवा त्याच्याही पेक्षां कांकणभर वरचढ असा आपल्या कादंबरींत आहे. शिवाय ही आपली पहिलीच कृति आहे हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे. माझी तर आजमितीला अशी खात्री आहे कीं, ' गृहसौख्य ' व ' सुखकर दरी ' हे दोन भाग जसे तुम्हांला साधले आहेत, तसे मला कधींही साधले नसते. राधाबाईच्या पात्रासारखें पात्र ज्यांनीं निर्माण केलें, त्यांनीं माझी कादंबरी वाचून हातपाय गाळणें हें अगदींच विलक्षण आहे. अहाहा, काय ह्या राधाबाईचीं बोलणीं ! जर जुन्या काळच्या प्रेमळ, सुशील अशा पोक्त स्त्रीचें चित्र मला दाखवा, असें कोणी म्हणेल, तर मी त्यास चटकन् आपली कादंबरी वाच म्हणून सांगेन. खरेंच राधाबाईच्या पात्रासारखें पात्र व सुखकर दरीचें वर्णन ज्या स्त्रीनें केलें आहे, ती जर आपल्या रंगरावाच्या अंबूताई नांवाच्या बहिणीच्या वर्णनमिषानें आपणांस आळशी व भित्री म्हणवून घेत असेल तर माझें ईश्वरापाशीं एवढेंच मागणें आहे कीं, " हे ईश्वरा, हिंदुस्थानचें बरें व्हावें असें तुला वाटत असल्यास येथील सर्व पुरुषांस व स्त्रियांस त्या अंबूताई-प्रमाणेंच आळशी व भित्र्या कर. ' ज्या आम्हांस अहोरात्र वाचनलेखनावांचून

कांहीं एक करावयाचें नसतें; कोणाची भीति किंवा लाज नसते; अमक्याच्या देखत वाचलें तर ते काय म्हणतील असें मनांत तर काय, परंतु स्वप्नांत देखील आणावयास नको; त्या आमच्या हातून दिवसांतून लागोपाठ दोन तास अभ्यास होण्याची मारामार पडते. आणि ज्या तुमचा उष्टयाखरकट्याखालीं सदा खट्टा मोकळा होतो व केरपोतेऱ्यांखालीं मानेचा कांटा मोडून जातो आणि त्यांतही इकडेतिकडे करून कोठें वाचावयास बसलें तर तें किती चोरून ! न जाणों, बाई, सासूबाई काय म्हणतील ? व वन्सं काय म्हणतील ? हरएकाची भीति. जो येईल त्याचा उपरजवरा आहेच. आपणांस क्षणभर तरी उसंत आहे काय ? अशा स्थितींत असून आपल्या सारख्यांनीं ‘ शिपाई रंगराव ’सारखी कादंबरी इंग्रजीचा बिलकूल गंधही नसतां लिहून जर आपल्यालाच आळशी व भित्र्या म्हणवून घेऊं लागलां, तर मग आम्हांला कोणची याच्या पलीकडची पदवी येणार कोणास कळे ! आपल्या कादंबरींतील पहिल्या भागांतील वर्णन फार उत्कृष्ट आहे. दुसऱ्या भागाचा दोष एवढाच कीं, त्यांतील वर्णनें फाजील विस्तीर्ण झाली आहेत. तिसऱ्या भागापासून पुढें कोणाच्याही भागांत माझ्या मतें कोणचेंही न्यून नाहीं. आपलें पुस्तक मी आजपर्यंत तीन वेळां वाचलें. आपल्या कादंबरीनें मला झालेला आनंद ऋणवत् भासत आहे व तें ऋण मी केव्हां तरी फेडून ऋणमुक्त होईन अशी इच्छा आहे. ”

कित्येकांस हरिभाऊंनीं ‘ रंगराव ’ कादंबरीची केलेली ही स्तुति अतिशयोक्तीनें भरलेली वाटण्याचा संभव आहे. परंतु त्या काळीं स्त्रीशिक्षण बिलकुल नव्हतें व कादंबरी लिहिणारी स्त्री तर विरळाच असे ! अशा सामाजिक परिस्थितींत काशीताईंनीं परिश्रमपूर्वक लिहिलेल्या प्रथम वाङ्मयकृतीचें हरिभाऊंस स्वाभाविकपणेंच अत्यंत कौतुक वाटलें.

हें पत्र मिळाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं मे महिन्याच्या सुट्टीनिमित्त गोविंदराव व काशीताई हीं दोघें पुण्यास आलीं. हरिभाऊंच्या पत्रानें काशीताईंना उत्साह वाटून त्यांनीं ‘ रंगराव ’ कादंबरीचें लेखन पुनः सुरू केलें होतें.

एके दिवशीं गोविंदरावांच्या घरीं हरिभाऊ, रा. गंगाधर अनंत ठाकूर, नारायण बापूजी इत्यादि मंडळी चर्चा करीत असतां नवीन मासिक काढण्याची कल्पना निघाली. ती सर्वांस पसंत पडून ‘ मनोरंजन ’ या नांवाचें मासिक सुरू करण्याचा बेत नक्की ठरला. त्या निमित्तानें हरिभाऊंचें कानिटकरांच्या घरीं वारंवार जाणेंयेणें होऊं

लागलें. यानंतर दोन महिन्यांनींच, म्हणजे इ. स. १८८६ सालच्या जुलै महिन्यांतच 'मनोरंजन' मासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध झाला. या अंकाचे मुखपृष्ठावर

'कानिटकर आणि मंडळी यांचें मासिक पुस्तक'

श्री

पुस्तक पहिलें **मनोरंजन** अंक १ ला

**आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् !**

—श्री. कालिदास :

**विरम तिमिर साहसादमुष्माद्यदि रविरस्तमितः स्वतस्ततःकिम् ।**
**कलयसि न पुरो महामहोभिर्द्युतिनिधिरभ्युदयत्ययं शशाङ्कः ।।**

असें ब्रीदवाक्य होतें. मासिकाचा अंक प्रत्येक महिन्याच्या अखेरीस नियमानें प्रसिद्ध होई. टाईप मोठा असून मुखपृष्ठ पिंगट रंगाच्या ब्राऊन पेपरचें होतें. या मासिकाचें संपादकत्व बहुतेक हरिभाऊंच्याकडे होतें. नियमित वेळी शिवाजी छापखान्यांत छापविलें जाऊन 'कानिटकर आणि मंडळी' यांच्या तर्फे हें मासिक प्रकाशित करण्यांत येत असे. पहिल्या अंकांत काशीताईची 'रंगराव', हरिभाऊंची 'गणपतराव' ह्या कादंबऱ्या सुरू झाल्या. गोविंदरावांनीं जॉन स्टुअर्ट मिलच्या *Subjection Of Women* या आपल्या आवडत्या ग्रंथाचें भाषांतर लिहिण्याचें ठरवून 'स्त्रियांची परवशता' या नांवाखाली तें पहिल्या अंकांत छापविलें. रा. गंगाधर अनंत ठाकूर यांस आरंभीं मासिकाच्या व्यवस्थापकाचें काम दिलें होतें. त्यांनींही या अंकांत लेख लिहिले होते. गोविंदरावांचे चुलते नारायण बापूजी यांनीं "लेख लिहिण्याचें कबूल करून आयत्या वेळीं मात्र एकसुद्धां लेख दिला नाहीं." परंतु पुढें मात्र त्यांचीं कांहीं नाटकें या मासिकांत प्रसिद्ध झालीं आहेत. या मासिकामुळें काशीताई व हरिभाऊ यांचा पत्रव्यवहार सुरू होऊन "पत्रोपत्रींच कां होईना पण परिचय वाढत चालला." काशीताईच्या पत्रांवरून त्यांच्या अंगच्या गुणांची अधिकाधिक कल्पना येऊन त्यांजविषयींची हरिभाऊंची पूज्यबुद्धि वाढत चालली. या मासिकासंबंधीं १८८६ सालच्या ऑगस्टमध्यें हरिभाऊ काशीताईंना लिहितातः "परंतु, या चोरीविषयींचा मजकूर सोडून देऊन लोकांचीं मनें चोरण्याचा आपण सर्वांनीं जो यत्न सुरू केला आहे त्याविषयीं व त्याचें साधन जें 'मनोरंजन' त्याविषयीं बोलूं. मनोरंजनाचा पहिला अंक माझ्याकडे २६लाच आला. त्याचें

बाह्य स्वरूप माझ्या मतानें चांगुलपणापेक्षांही चांगलें आहे; त्यांत कोणत्याही गोष्टीची उणीव नाहीं. ज्याप्रमाणें हें बाह्य स्वरूपानें चांगलें वाटत आहे, त्याचप्रमाणें अंतः-स्वरूपानेंही चांगलें वाटलें म्हणजे, या आपल्या 'मनोरंजना'नें लोकांचें मनोहरण झालेंच म्हणून समजावें. परंतु लोकांचे उद्गार जे मी ऐकले, त्यांवरून पुष्कळ उमेद बाळगण्यास हरकत नाहीं. एका गोष्टीविषयीं लोक खूष नाहींत, आणि ती गोष्ट पुस्तकाचा लहानपणा!"

'मनोरंजना'वर श्री. आगरकर यांनीं केसरीत उत्तम अभिप्राय लिहिला होता. परंतु, तो अभिप्राय वाचून हरिभाऊंना रागच आला! कारण 'मनोरंजनां'त लिहिणाऱ्या कांहीं लेखकांना आपलीं नांवें कळूं नयेत अशी इच्छा होती. परंतु खाजगी स्नेहाचा फायदा घेऊन कौतुकबुद्धीनें आगरकरांनीं, काशीताई, हरिभाऊ यांचीं नांवें प्रसिद्ध केली! आगरकरांच्या 'विकारविलसिता'स तोडीस तोड म्हणून रावसाहेबांनीं (गोविंदराव पुढें मुनसफ झाले व त्यांस 'रावसाहेब' पदवी मिळाली) 'वीरसेन' नांवाचें नाटक लिहिलें, त्यामध्यें त्यांस मदत केल्यावरून आगरकरांचा आपणांविषयीं गैरसमज झाला असावा असें हरिभाऊंना वाटलें. याबद्दल त्यांनीं काशीताईच्या पत्रांत सुद्धां लिहिलें व त्यांत आगरकर व रावसाहेब यांची तुलना केली. त्यावरून त्या वेळीं आगर-करांबद्दल विशेष अभिमान त्यांस नव्हता असें मात्र स्पष्ट दिसतें! रावसाहेबांसारख्या मोठ्या हुद्यावरच्या व दोन अडीचशें रुपये मिळविणाऱ्या गृहस्थानें आपणांशीं इतक्या मित्रभावानें वागावें याबद्दल आश्चर्य वाटून, "खरोखर, रावसाहेब गोविंद-रावांसारखे गर्वहीन गृहस्थ अतिशय विरळा." असें त्यांचें मत झालें. परंतु आगर-करांसंबंधीं त्या वेळचे हरिभाऊंचे उद्गार ऐकून कांहींसें चमत्कारिक वाटतें. "आगर-करांचा असा कृष्ण हेतु असेल की नाहीं याचा मला तरी निदान संशय नाहीं; आणि या वेळी जरी कदाचित् नसला तरी त्यांच्या त्या मानी व गर्विष्ठ स्वभावास असले हेतु मुळीच विसंगत नाहीत." या उद्गारांवरून त्या वयांत तरी आगरकरांच्या थोरपणाची खरी परीक्षा हरिभाऊंना झालीच नव्हती असें वाटल्यावांचून रहात नाही. परंतु पुढें मात्र जेव्हां त्यांच्या विचारास प्रौढत्व येऊन ते सामाजिक प्रश्नांसंबंधीं चिकित्सक बुद्धीनें व कळकळीनें विचार करूं लागले तेव्हां त्यांस आगरकरांच्या समाजविषयक धोरणाचें व तत्त्वज्ञानाचें रहस्य पूर्णपणें समजलें व ते त्यांचे अनुयायी झाले. एवढेंच नव्हे तर जे प्रश्न सोडविण्यासाठीं आगरकरांनीं आपल्या आयुष्यभर सतत

खटपट केली, तेच प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करण्यांत हरिभाऊंनींही आपलें जीवन खर्च केलें. कठोरपणें वाक्ताडण करून 'सुधारका'नें जी कामगिरी बजाविली तीच कामगिरी गोड बोलून हरिभाऊंच्या कादंबऱ्यांनीं केली!

'मनोरंजन' लोकप्रिय होत चाललें व त्यामुळें मासिकाच्या उत्साही चालक मंडळींस आनंद झाला. रावसाहेबांच्या काव्यांत प्रसाद हा गुण विशेष असल्यानें तीं लोकांस आवडत. 'रंगराव' शिपाई सुद्धां आपल्या शिपाई बाण्यानें वाचकांस प्रिय झाला. मासिकांतील 'मनोरंजन' या सदरांत येणारे चुटके मनोरंजक असून वाचकांचें चांगल्या रीतीनें रंजन करीत. अशा रीतीनें मासिकाचें काम सुरू होऊन वर्ष झालें. दुसऱ्या वर्षाचे आरंभीं २५०–३०० वर्गणीदार होते. याच सुमारास कै. विष्णुशास्त्री यांचें स्मारक म्हणून कांहीं मंडळींनीं 'निबंधमाले'च्या धर्तीवर इ. स. १८८३ सालापासून सुरू केलेल्या 'निबंधचंद्रिका' या मासिकाची स्थिति अत्यंत खालावल्याची वार्ता हरिभाऊंना समजली! ते स्वतःही त्या मासिकाच्या पुरस्कर्त्यांपैकीं होते. हें मासिक उच्च दर्जाचें असून त्यांत टीका व परीक्षणें येत. यांमध्यें कै. ना. म. समर्थ, हायकोर्ट वकील, यांच्या कविता, हरिभाऊंचें 'विकारविलसित' व 'वीरसेन' या हॅम्लेट नाटकाच्या भाषांतरांवर व नारायण बापूजीकृत 'शशिकला व रत्नपाल' या 'रोमिओ अँड ज्यूलिएट'च्या रूपांतरावर विस्तृत टीकालेख प्रसिद्ध झाले होते व हे लेख वाचूनच "आपटे प्रतिभावान् मराठी लेखक होणार" असे उद्गार कै. आगरकरांच्या तोंडून बाहेर पडले. राजकीय व सामाजिक विषयांवर स्वतंत्र लेख लिहिण्याचा उपक्रम जर प्रथम कोणीं केला असेल तर तो 'निबंधचंद्रिके'नेंच होय. समाजसुधारणेच्या नाजुक प्रश्नांत सरकारचा हात किती असावा याबद्दलही 'निबंध-चंद्रिकें'त पुष्कळच चर्चालेख येत असत. अशा रीतीनें वाङ्मय, समाज, राजकारण इत्यादि महत्त्वाच्या विषयांना वाहिलेल्या या मासिकाची पुरेसे वर्गणीदार न मिळाल्यामुळें दैना व्हावी हें पाहून हरिभाऊंना फार वाईट वाटलें. 'मनोरंजन' व 'निबंधचंद्रिका' हीं दोन्ही मासिकें एकत्र केल्यास दोन्ही मासिकांची स्थिति सुधारेल असा विचार मनांत येऊन त्यांनीं आपल्या सहकारी मंडळींस ही कल्पना सांगितली. त्यांना ती पसंत पडून हरिभाऊंच्या संपादकत्वाखालीं 'मनोरंजन' व 'निबंधचंद्रिका' या दोन्ही मासिकांचें इ. स. १८८७ मध्यें एकीकरण झालें. हरिभाऊंना 'निबंधचंद्रिके'बद्दल अत्यंत अभिमान होता व त्यामुळें 'मनोरंजन'

हीं अक्षरें जाडी टाइपांत व ' निबंधचंद्रिका ' हीं अक्षरें बारीक टाइपांत लिहिण्याची रावसाहेबांची कल्पना त्यांस मुळींच रुचली नाहीं. विष्णुशास्त्री यांच्याबद्दल त्यांस अतिशय आदर असल्यानें त्यांचें स्मारक म्हणून सुरू केलेल्या मासिकाचें महत्त्व कमी करण्यास त्यांनीं अनुमोदन दिलें नाहीं. असो.

' मनोरंजन व निबंधचंद्रिका ' हें जोड मासिक इ. स. १८९२ मध्यें बंद पडलें. प्रकाशक मंडळीची अव्यवस्था हेंच तें बंद पडण्याचें कारण असावें. या मासिकांत हरिभाऊंनीं 'गणपतराव' व 'चाणाक्षपणाचा कळस' या दोन ( अपूर्ण ) कादंबऱ्या, 'जयध्वज व श्रुतकीर्ति-चरित', ' सुमतिविजय ' हीं नाटकें, ' मारून मुटकून वैद्यबोवा ', ' पळपुट्या वैद्य ' इत्यादि प्रहसनें व 'खरी कीं खोटी', 'पाडव्याला भेट' इत्यादि सुंदर गोष्टी, निबंध व कविता प्रसिद्ध केल्या. काशीताईची 'रंगराव' ही कादंबरी व त्यांच्या ' भाऊबीज ', ' शेवट तर गोड झाला ' इत्यादि गोष्टी व लहानसहान लेख यांत आले होते. रावसाहेबांची ' परवशता ' व ' स्फुट कविता ', नारायण बापूजींचें 'बाजीराव व मस्तानी ' हें नाटक, हीं प्रसिद्ध करण्याचा मान याच मासिकाला मिळाला. असो.

या मासिकासंबंधीं काशीताई व हरिभाऊ यांचा पत्रव्यवहार होऊन त्यांचें बहीणभावांचें नातें दृढ झालें ! हें नातें केवळ शाब्दिक नसून अंतःकरणापासून होतें. याची साक्ष हरिभाऊंनीं काशीताईना लिहिलेलीं पत्रें पटवितात. बहीणभावांइतकें शुद्ध, सात्त्विक, अकृत्रिम प्रेम जगांत दुसरें कोणतें असेल ? काशीताईच्या बद्दलचा भाव हरिभाऊंनीं तरुणालेच्या शब्दांनीं सुंदर रीतीनें व्यक्त केला आहे. ते लिहितात :

" ' सरोवराचें पाणी सदाच शांत आणि स्वच्छ असतें असें नाहीं. केव्हां एकादा वाटसरू सहज जातां जातां, अगर एकादें टारगें पोर, एकादा धोंडा घेऊन त्यांत झोकून देतें. हा धोंडा आंत पडला म्हणजे पाण्याची शांतता मोडून जाते. तळचा गाळ वर येऊन त्यानें स्वच्छता बिघडते. अशी कांहीं त्या सरोवराची वाईट स्थिति होते. आणि पूर्वी जी आकाशाची सुंदर नीलकांति त्या सरोवरांत प्रतिबिंबित होत होती ती दिसेनाशी होते. पण ही स्थिति फार वेळ टिकते काय ? छे ! छे ! क्षणैक टिकत असेल. क्षण गेला कीं लागलींच तें पाणी प्रशांत गंभीर होऊन त्यांत पुनः पहिल्याप्रमाणें नभोमंडळाची शोभा प्रतिबिंबित होते. याचप्रमाणें मी हल्लीं ज्या स्थितींत आहें, त्या स्थितींतील न आवडणाऱ्या गोष्टी, जगांतील अतितापद दुःखें, काळज्या व अशाश्वत वगैरे गोष्टींनीं आपल्या प्रभावानें क्षणैक माझ्या उदात्त विचारांची, प्रशांत मनाची

स्वच्छता बिघडविली म्हणजे तेवढ्यापुरती तुझी मूर्ति दृष्टिआड होते. परंतु तेवढा तो क्षण गेला कीं मनाचें स्वास्थ्य आणि त्याबरोबर तुझी उदार-रमणीय मूर्ति पुनरपि आपल्या स्थानीं येते.' हा उतारा मिस् तोरु दत्त हिनें आपल्या मातेस उद्देशून लिहिला. आणि तो मी अर्थात् मातेसमान अशा वडील बहिणीस उद्देशून लिहीत आहें. अंतर काडीचेंही नाहीं."

सख्खीं भांवडें जशीं एकमेकांशीं वागतात तसेंच ते परस्परांशीं वागत. प्रतिवर्षी भाऊबिजेची ओवाळणी म्हणून हरिभाऊ काशीताईंना पुस्तकांची वगैरे भेट न चुकतां पाठवीत. प्रेमळ भावाप्रमाणें हरिभाऊ प्रत्येक बाबतींत काशीताईंना मदत करीत. 'डॉ. आनंदीबाई जोशी' यांचें चरित्र लिहीत असतां त्यांनीं काशीताईस परोपरीनं साह्य केलें. नवीन नवीन इंग्रजी पुस्तकें पाठवून ते त्यांस इंग्रजी वाङ्मयाची गोडी लावीत. सुट्टींत त्यांच्याकडे रहावयास गेले असतां त्यांजबरोबर 'शाकुंतला'सारखीं संस्कृत नाटकें वाचीत, वाङ्मयासंबंधीं व सामाजिक सुधारणांसंबंधीं त्यांच्याशीं चर्चा करीत व अशा रीतीनें ज्ञान संपादन करण्याचे कामीं त्यांस नाना प्रकारें मदत करीत!

रावसाहेब नेवाश्यास मुनसफ असतां हरिभाऊ त्यांच्याकडे महिना दीड महिना रहावयास गेले होते! रात्रीं भोजन झाल्यावर, काशीताई, रावसाहेब व हरिभाऊ गप्पागोष्टी करीत बसले कीं, रात्र केव्हां गेली व पहांट केव्हां उजाडली हें त्यांस कळत नसे. रात्र संपली तरी त्यांच्या गोष्टी संपत नसत. नाना प्रकारच्या विषयांवर त्यांचे वाद होत. त्या वादांत, शेक्स्पिअरादि कवि व नाटककार, मिल, स्पेन्सर, हक्स्ले आदिकरून तत्त्ववेत्ते यांचीं नांवें निघत! तुकारामादि थोर संतांचीं चरित्रें व ग्रंथ यांसंबंधीं अनेक वेळां चर्चा होई. या वाङ्मयिक गोष्टींशिवाय समाज, राजकारण इत्यादि विषयांवर बोलण्याचाही त्यांस कंटाळा नसे! सायंकाळच्या वेळीं फिरावयास जाऊन एकाद्या रम्य ठिकाणीं विश्रांतीसाठीं तिघेही जाऊन बसत! त्या वेळींही वादविवाद चालूच असत!

हा परस्परांचा बंधुभगिनीभाव अखेरपर्यंत कायम राहिला. आरंभींच्या आयुष्यांत वाङ्मयसहकार्य होऊं शकलें. परंतु उत्तर आयुष्यांत, रावसाहेब पेन्शन घेऊन पुण्यास आल्यावर काशीताई संसारव्यापांत गुंतल्यामुळें वाङ्मयविषयक बाबतींत एकत्र असें कोणतेंच काम त्यांच्या हातून झालें नाहीं ही गोष्ट वेगळी! परंतु सकाळच्या वेळीं रावसाहेब व काशीताई यांची भेट घेण्यास हरिभाऊ चुकत नसत! काशी-

ताईही मधून मधून आनंदाश्रमांत येऊन त्यांस भेटत. हरएक महत्त्वाच्या बाबतींत ते एकमेकांची सल्ला घेत. परस्परांच्या ठायीं त्यांचा दृढ विश्वास होता ! अशा तऱ्हेचें निःस्वार्थी, अकृत्रिम बंधुभगिनीप्रेमाचें सुंदर दृश्य या जगांत क्वचितच दिसतें. अशा अप्रतिम स्नेहभावाचा ज्यांनीं अनुभव घेतला त्यांच्याबद्दल कोणास हेवा वाटणार नाहीं ? स्वतःच्या कुटुंबांतील माणसांवर सारेच प्रेम करतात ! परंतु त्याच्या पलीकडे जाऊन परक्यांस स्वकीय समजून त्यांवर एकनिष्ठ प्रेम करणें हें उदार हृदयावांचून इतरांस शक्य नाहीं ! हरिभाऊ व काशीताई यांच्यामधील अप्रतिम, प्रवित्र स्नेह-दर्शनानें त्यांच्याबद्दल आदर वाटून हृदय उचंबळून येतें !

आंग्ल वाङ्मयांत चार्लस् व मेरी लँब, वुइल्यम वर्ड्स्वर्थ व डॉरथी यांच्या बंधु-भगिनीप्रेमानें रसिकाचें हृदय मोहित होतें ! आपल्या समाजांतील जुन्या नव्या मतांच्या कात्रींत सांपडून सुद्धां ज्यांनीं आपला स्नेह आमरण टिकविला त्या हरिभाऊ व काशीताई या थोर व्यक्तींचे आदर्श समाजास उन्नतीच्या मार्गावर खात्रीनें नेतील ! उच्च हेतूनें प्रेरित होऊन ज्यांनीं आपलें आयुष्य उदात्त कार्यांत खर्च केलें त्या बहीणभावांविषयीं कोणास कौतुक वाटणार नाहीं ? दिव्य स्नेहप्रभेनें ज्यांचीं हृदयें प्रकाशित झालीं आहेत अशा हरिभाऊ–काशीताईसारख्या बंधुभगिनींच्या जोड्या आपल्या समाजांत अनेक निर्माण होवोत अशी आशा प्रदर्शित करून हा भाग संपवितों.

---

## प्रकरण सातवें

# करमणूक

अखेरीस डिग्री न मिळवितांच कॉलेज सोडण्याचा प्रसंग हरिभाऊंवर आला! यामुळें ते स्वतः तर निराश झालेच, परंतु घरच्या मंडळीच्या त्यांजवरील नाराजीमुळें त्यांची निराशा द्विगुणित झाली. त्यांच्या लेखनशैलीबद्दल, विस्तृत विद्याव्यासंगाबद्दल व अप्रतिम बुद्धिमत्तेबद्दल सर्वांस कौतुक वाटत असून प्रत्यक्ष अण्णासाहेबांनीं सुद्धां हरिभाऊंच्या कादंबऱ्या आपणांस आवडल्याचें गजाननरावांपाशीं एकदां बोलून दाखविलें होतें! परंतु परीक्षा न उतरल्यानें या साऱ्या कर्तृत्वावर पाणीच पडल्या-सारखें झालें! ग्रंथकर्तृत्व हेंच ध्येय हरिभाऊंनीं सतत आपल्या समोर ठेविलें होतें खरें, परंतु जीवनक्रमाचें तें मुख्य अंग होणें अशक्य आहे ही जाणीव त्यांस होती. 'मधली स्थिति' या त्यांच्या वस्तुस्थितिनिदर्शक कादंबरीचा परिणाम होऊन समाजांत जी खळबळ उडाली त्यावरून त्यांस आत्मविश्वास उत्पन्न झाला व ग्रंथद्वारें समाजाचें मनोरंजन करून त्यास शिक्षण द्यावें व अशा रीतीनें समाजसेवेचें पुण्य संपादन करावें अशी त्यांना साहजिकच इच्छा झाली. पण ग्रंथकर्तृत्वाच्या जोडीला जीवनास आवश्यक असा व्यवसाय करणें भागच होतें! कारण केवळ ग्रंथलेखन करून त्यावर उपजीविका करणें त्या काळीं तर काय, पण सध्यां सुद्धां अशक्यप्रायच आहे. शिक्षकाचा अथवा दुसरा कसला तरी व्यवसाय करून आपला आवडता लेखनाचा व्यासंग अव्याहत चालू ठेवावा असें त्यांनीं योजिलें. परंतु डिग्री नसल्यामुळें चांगलीशी नौकरी तरी कोण देणार व कुटुंबपोषणास पुरेसा पगार तरी कसा मिळणार? या विचारानें त्यांचें मन व्यग्र झालें. सारांश, परीक्षेतील या अपयशानें त्यांचे सारेच मनोरथ ढांसळून पडले!

## 'पुढें काय करणार ?'

अण्णासाहेबांच्या मनांत हरिभाऊंनीं एल्‌एल्. बी. होऊन उत्कृष्ट वकील व्हावें व येथील शिक्षण संपल्यावर बॅरिस्टर होण्यासाठीं विलायतेस जावें असें होतें. ते स्वतः वाङ्मयप्रेमी व रसिक असल्यानें त्यांस हरिभाऊंची बुद्धिमत्ता व कर्तृत्वशक्ति यांबद्दल कौतुक व अभिमान होताच. अशा स्थितींत हरिभाऊंस प्रीव्हिअसच्या परीक्षेंत लागोपाठ एकसारखें अपयश आलेलें पाहून त्यांचा किती विरस झाला असेल !

याच सुमारास नानासाहेबांची बदली मुंबई येथें होऊन त्यांनीं हरिभाऊंना पत्र लिहून मुद्दाम मुंबईस बोलावून घेतलें. त्यांचें व हरिभाऊंचें समक्ष बोलणें होऊन विचारविनिमय क्वचितच होई. अर्थात्, हरिभाऊंचें ध्येय व विचार त्यांस कळणें अशक्य होतें. आपण वाटेल तितके पैसे खर्च करण्यास तयार असतां मुलानें व्यवस्थित अभ्यास करून पास सुद्धां होऊं नये, याबद्दल त्यांस आश्चर्य वाटे. या विषयासंबंधीं हरिभाऊंशीं एकदां समक्ष बोलावें असा विचार करून त्यांनीं आपल्या एक दोन जिवलग मित्रांस जेवावयास बोलाविलें. जेवण झाल्यावर, नानासाहेब, अण्णासाहेब व ते दोघे गृहस्थ बैठकीच्या जागीं गेले. सर्वानुमतें बेत करून त्यांनीं हरिभाऊंस बोलावून आणलें ! हा सर्व प्रकार हरिभाऊंस कांहींसा चमत्कारिक वाटला. वडील मंडळींशीं अत्यंत विनयानें वागण्याची त्यांची पद्धति होती. आपणांस कशासाठीं पाचारण करण्यांत आलें आहे, याची त्यांना अंधुक कल्पना होतीच ! त्यामुळें वडिलांसमोर त्यांस न रुचणारे विचार आपण कसे बोलून दाखवावेत असा पेंच हरिभाऊंस पडला. नौकरीच्या बंधनांत बिलकूल न पडतां वाङ्मयसेवेंतच आयुष्य खर्चावें असा त्यांचा निश्चय अलीकडे झाला होता. कसलीच गुलामगिरी न पतकरतां लिहावें, वाचावें व स्वतंत्र लेखनव्यवसाय करावा असा त्यांनीं विचार केला होता. परंतु वाङ्मयाचें महत्त्व कळणें ज्यांना शक्य नाहीं, व्यावहारिक गोष्टींत ज्यांनीं आपलें सर्व जीवित घालविलें, त्यांस हा हरिभाऊंचा ध्येयप्रधान अव्यावहारिक विचार कसा रुचणार ?

हरिभाऊ वडिलांपुढें अदबीनें उभे राहिले. "पुढें काय करणार ?" असा नानासाहेबांनीं प्रश्न करतांच हरिभाऊ म्हणाले, "मला नौकरी करावयाची नाहीं. परंतु, आम्ही आपलें पोट भरूं." "सर्वांचींच भरलीं पाहिजेत, आपलेंच भरून कसें चालेल ?" नानासाहेब किंचित् रागांत म्हणाले. स्नेही मंडळींच्या देखत उगीच वादविवाद करण्यापेक्षां हरिभाऊंस एकीकडे नेऊन त्यांचे विचार समजून

घेऊन काय तें ठरवावें असें अण्णासाहेबांस वाटलें. हरिभाऊंचे विचार व रोख उत्तरें ऐकून नानासाहेब कदाचित् फार रागावतील अशी भीति वाटून अण्णासाहेब म्हणाले, "हा प्रश्न आतां राहूं द्या. मी सर्व व्यवस्था करतों." यावर सर्व शांत बसले व त्यांनीं हरिभाऊंस जाण्यास सांगितलें.

नंतर अण्णासाहेबांनीं हरिभाऊंची मनःस्थिति समजून घेण्याचा प्रयत्न केला. "बी. ए. झाल्यावांचून मोठी नोकरी मिळणें शक्य नाहीं. तुझ्यासारख्यानें लहानशी नौकरी पतकरण्याइतकी आपली सांपत्तिक स्थिति वाईट नाहीं, किंबहुना हलकी नौकरी धरणें तुला शोभणारही नाहीं. नौकरीची गुलामगिरी स्वीकारून तूं पराधीन व्हावेंस हें मलाही आवडणार नाहीं. वकिलीचा धंदा तुला पसंत नसेल तर तूं छापखान्याच्या कामाची माहिती करून घे. आपण दोघे मिळून एखादी स्वतंत्र प्रकाशनाची कंपनी काढूं व एखादें मासिक अथवा पत्र चालवूं." वगैरे नाना तऱ्हांनीं बोलून अण्णासाहेबांनीं हरिभाऊंस समजाविलें व हरिभाऊंनाही अण्णासाहेबांची विचारसरणी पटली. जगदीश्वर प्रेसच्या मालकांस अण्णासाहेब स्वतः जाऊन भेटले व छापखान्याचें काम शिकण्यासाठी त्या प्रेसमध्यें त्यांनीं हरिभाऊंस प्रवेश मिळवून दिला.

अण्णासाहेबांनीं व्यवस्था केल्याप्रमाणें हरिभाऊंनीं प्रेसमधील काम शिकण्यास सुरुवात केली. परंतु त्यांचें मन त्या कामांत रमेना. खिळे जुळविण्याचा, कागदांचे आकार, वजनें, छपाईचा खर्च यांचा हिशेब करण्याचा त्यांस कंटाळा येऊं लागला ! सुंदर सुंदर ग्रंथ वाचावयाचें सोडून असल्या निर्बुद्धपणाच्या कामांत त्यांचें लक्ष लागेनासें झालें ! दोनतीन महिने प्रेसमधील शिक्षण घेतल्यावर त्यांची परीक्षा झाली ! त्यांतही त्यांस उत्तीर्ण होण्यापुरते गुण मिळाले नाहींत ! यानंतर त्यांनीं श्री. काशीताईस व प्रिय मित्र कृ. के. गोखले यांस जीं पत्रें लिहिलीं त्यांत "हरि नारायण आपटे व परीक्षा यांचें अत्यंत वांकडें आहे." असें लिहिलें होतें. जें कांहीं काम हातीं घ्यावें त्यांत अपयश हें ठेवलेलेंच, अशी मनाची भावना होऊन त्यांची वृत्ति फारच खिन्न झाली. जगदीश्वर प्रेसमधील शिक्षण संपल्यावर, एक ग्रंथप्रकाशनाची कंपनी काढण्याचा अण्णासाहेबांनीं त्यांस फार आग्रह केला. कंपनीस जरूर लागणारें भांडवल पुरविण्यास ते तयार होते. परंतु "हें जबाबदारीचें काम माझ्याच्यानें होणार नाहीं, कदाचित् ह्या धंद्यांत बूड येईल," असें आपलें मत स्पष्टपणें सांगून त्यांनीं ही

अण्णासाहेबांची सूचना मान्य केली नाहीं. पण यानंतर थोड्याच दिवसांनीं अण्णासाहेबांनीं ‘ आनंदाश्रम ’ या नवीन संस्थेची स्थापना केली व त्यावर देखरेख करण्याचें काम हरिभाऊंवर सोंपविलें, आणि अशा रीतीनें व्यवसायशोधनाच्या त्रासांतून त्यांस कायमचें मुक्त केलें !

‘ मनोरंजन व निबंधचंद्रिका ’ हें मासिक काढून पुढें स्वतःचा छापखाना स्थापन करून प्रकाशकाचें काम करावें, असा प्रथम ‘कानिटकर आणि मंडळी ’ यांचा बेत होता. “मासिकाचा खर्च सतत चार वर्षें रावसाहेब कानिटकर यांनींच सोसला. नारायण बापूजींनीं पहिल्या वर्षाचा खर्च करण्याचें वचन देऊन एक पैही दिली नाहीं. ” रा. गंगाधर अनंत ठाकूर यांनींही मासिकासाठीं बराच पैसा खर्च केला. मासिकाचें उत्पन्न असें कांहीच झालें नाहीं. पुढें कांही लेखक मंडळी पुण्यांतून कामाप्रीत्यर्थ परगांवीं गेल्यामुळें व वर्गणीदारांची संख्या पुरेशी नसल्यामुळें हें मासिक शेवटीं बंद करणें भाग पडलें. हरिभाऊंना त्याबद्दल फार वाईट वाटलें. कॉलेज सोडल्यानंतर कांहीं तरी स्वतंत्र उद्योग करण्याची हरिभाऊंची इच्छा होती. त्याप्रमाणें इ. स. १८८८ च्या सुमारास त्यांनीं एक प्रकाशकमंडळी काढण्याचें ठरविलें व तत्संबंधीं श्री. काशीताईस पत्र लिहून कळविलें कीं, “ आम्ही कांही मंडळी मिळून आतां एक पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी स्थापन केली आहे. मंडळी सध्यां फार नाही व पुढेंही पुष्कळ करावयाचा विचार नाही. ... या मंडळीनीच ‘ आजकालच्या गोष्टी, गोष्ट पहिली ’ हें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. नफ्यातोट्यासंबंधानें ती मंडळी जबाबदार आहे....... सध्यां मंडळीत पांच असामी आहेत, त्यांत मी एक आहें.................आम्ही ‘ थोर लोक ’ या नांवाची चरित्रग्रंथांची मालिका काढणार आहोंत.” हरिभाऊंच्या या कंपनीचें नांव ‘कुलकर्णी आणि मंडळी’ असें होतें. या कंपनीच्या द्वारें ‘ करमणूक’ नांवाचें एक साप्ताहिक काढण्याचा विचार हरिभाऊंनी योजिला व त्याबद्दलची सविस्तर हकीगत कळवून श्री. काशीताईना लिहिलें, “ आपल्या ‘ करमणूक ’सारखा म्हणजे आबालवृद्ध घेतील असा, (‘केसरी’ कितीही उत्कृष्ट असला तरी कुणबी माळी घेतील असा नाहीं हें कोणीही कबूल करील ) पेपर असल्यावर कंपनीच्या कामास प्रसिद्धि हां हां म्हणतां मिळेल. ”

‘ करमणूक ’ पत्र सुरू करण्याचा हरिभाऊंचा विचार अण्णासाहेब यांस कळतांच त्यांनीं हरिभाऊंस एक पत्र पाठवून स्पष्ट कळविलें कीं, “ तूं जर माझी कोणतीच

गोष्ट ऐकत नाहींस तर, तुला मजकडून एक कपर्दिक सुद्धां मिळणार नाहीं." मागें एकदां अण्णासाहेबांनीं प्रकाशनाची कंपनी काढून देतों म्हणून म्हटलें असतां ती कल्पना हरिभाऊंनीं झिडकारून दिली होती. त्यामुळें अण्णासाहेबांना साहजिक राग आला व त्या रागाच्या भरांतच त्यांनीं वरील आशयाचें पत्र हरिभाऊंना लिहिलें. परंतु, या पत्रास हरिभाऊंनींही खरमरीत उत्तर लिहून कळविलें कीं, "मी तुमच्या पैशाची केव्हांच आशा केली नाहीं. तुमचा स्वकष्टार्जित पैसा आहे. तुम्ही त्याचे मालक आहांत. त्यावर माझा डोळा स्वप्नांत सुद्धां नव्हता व आतांही नाहीं." या बाणेदार उत्तरानें अण्णासाहेब निरुत्तर झाले ! !

हरिभाऊंनीं डेक्कन कॉलेज सोडल्यापासून 'करमणूक' पत्र सुरू करीपर्यंतच्या मध्यंतरींच्या काळांत केसरीचें संपादकत्व सोडून श्री. गोपाळराव आगरकर यांनीं सामाजिक प्रश्नांचीच केवळ चर्चा करण्यासाठीं 'सुधारक' पत्र काढलें. 'केसरी' राजकारणाचें तर 'सुधारक' सामाजिक सुधारणेचें केंद्र ठरलें. 'सुधारकां'तील इंग्रजी भागाचे संपादक श्री. गोपाळ कृष्ण गोखले यांचा व हरिभाऊंचा याच सुमारास दाट परिचय झाला. एकदां श्री. आगरकरांचे येथें कांहीं कारणानिमित्त गोविंदराव, काशिताई, रमाबाईसाहेब रानडे, गोखले, हरिभाऊ वगैरे मंडळी संध्याकाळीं जेवा-वयास जमली असतां श्री. आगरकर यांनीं या मंडळींची परस्परांशीं ओळख करून दिली. या भोजनास हरिभाऊंचे परम मित्र महादेव दिनकर जोशीही हजर होते. या मंडळींत 'सुधारका'संबंधीं बरीच चर्चा झाली. या प्रसंगानें हरिभाऊंचा 'सुधारक' पक्षांतील मंडळींशीं स्नेह जडला व तो उत्तरोत्तर हळू हळू वृद्धिंगत होत गेला. सामाजिक सुधारणेच्या कार्यास कायद्याची मदत घ्यावी किंवा नाहीं या मुद्याबद्दल मतभेद होऊन श्री. आगरकरांचा 'केसरी'शीं असलेला संबंध तुटला. संमतिवयाच्या प्रश्नासंबंधीं चर्चा होऊन त्यांतून आगरकरांच्या नेतृत्वाखालीं एक नवीन सामाजिक पंथच निर्माण झाला. २६ ऑक्टोबर १८९० रोजीं वे. शा. सं. महामहोपाध्याय रामशास्त्री आपटे यांच्या अध्यक्षतेखालीं सामाजिक चालीरीतींत सरकारनें हात घालूं नये असा अर्ज करण्याकरितां पुण्यांतील पुराणमताभिमानी नागरिकांची सभा झाली. त्यांस प्रतिसूचना म्हणून तुळशीबागेंतील सभासदांस उद्देशून जें नवीन सुधारकांचें विनंतिपत्र निघालें त्याखालीं ज्या कित्येक गृहस्थांच्या सह्या आहेत, त्यांत हरिभाऊंचेंही नांव आहे. पुण्यांत या विषयासंबंधीं जो खडाजंगी वादविवाद झाला,

त्यांत लहान वय असूनही गोविंदरावांचे मित्र म्हणून मुख्य चळवळींतही हरिभाऊंनीं प्रामुख्यानें भाग घेतला. कित्येक सुधारक आग्रही असल्यामुळें सुधारणेच्या कार्यास कायद्याचें साहाय्य घ्यावें असें त्यांचें ठाम मत बनलें होतें. परंतु "कांहीं अटींवर असा आग्रह सोडण्यास तयार आहोंत," अशी तडजोड करण्याचा ज्या मंडळींनीं निश्चय केला त्यांतही हरिभाऊ होते.

' करमणुकी 'च्या पूर्वी दोन वर्षे आगरकरांच्या ' सुधारका 'चा जन्म होऊन त्यांनीं लोकांच्या धर्मसमजुती व धर्मकृत्यें, वेडगळ चालीरीती, समारंभ, पोषाख, दागदागिने, बालविवाह, स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, स्त्रियांची दुर्दशा इत्यादि विषयांवरील आपलीं प्रखर मतें बेगुमानपणानें लिहून सामाजिक कोटावर जोराचे हल्ले एका पाठीमागून एक असे चढविले. त्यांनीं डोळ्यांत घातलेलें हें झणझणीत अंजन अत्यंत झोंबलें म्हणूनच कीं काय, लोकांनीं त्यांचा नाना प्रकारें छळ आरंभिला व लोक काय वाटेल तें म्हणाले तरी आपले विचार निर्भीडपणें जगापुढें मांडण्याचा आगरकरांचा बाणा साहजिकच अप्रिय झाला. परंतु त्यांच्या अंतःकरणापासून निघालेल्या या कळकळीच्या विचारांचा तत्कालीन तरुण पिढीवर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. आगरकरांचे लेख इतके जोरदार भाषेंत लिहिले गेले आहेत कीं, " त्यांचा तिखटपणा आतांच्या आपल्या मंडळीस देखील पचणार नाहीं, " असे उद्गार एकदां टिळकांनीं काढले होते. अशा रीतीनें बॉंबचे गोळ्यावर गोळे एकसारखे फेंकून निद्रिस्त अशा हिंदु समाजास त्यांनी खडबडून जागें केलें व त्यांच्या तीक्ष्ण उद्गारांनीं नव्याजुन्या मतांचे सारेच लोक गडबडून गेले. अप्रिय परंतु पथ्यकर भाषण करणारा व ऐकणारा दोघेही या जगांत दुर्लभच असतात ! नवीन पिढींतले तरुण आगरकरांच्या संप्रदायास जाऊन मिळाले, पण बहुसंख्याकांना त्यांचीं मतें न पटून उलट त्यांनीं आपल्या प्रतिकूल वाग्बाणांचा वर्षाव आगरकरांवर सुरू केला.

हरिभाऊ सुधारणेस पूर्णपणें अनुकूल होते. परंतु 'सुधारका'च्या तिखट वाक्प्रहारांनीं लोकसमुदाय चिडून मात्र जातो, हें त्यांच्या ध्यानीं आलें. समाजास अशा कडक रीतीनें न शिकवितां गोड गोड शब्दांनीं आंजारून गोंजारून शिकविलें तर, त्या शिक्षणाचा सुपरिणाम चिरकाल टिकेल या विचारानें त्यांनीं ' करमणूक ' पत्र सुरू करण्याचा निश्चय केला. यापूर्वीच त्यांनीं वरील धोरणानें ' मधली स्थिति ' व ' गणपतराव ' या दोन सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या होत्या. पाश्चात्य वाङ्मयाच्या

अखंड वाचनानें दृष्टि व्यापक होऊन स्वतःच्या लेखनशक्तीबद्दल त्यांना आत्मविश्वास उत्पन्न झाला होता. मनाचा पूर्ण विकास झालेला असून, त्यांच्या विचारास प्रगल्भ व स्थिर स्वरूप प्राप्त होऊं लागलें होतें. त्यांचें वय या वेळीं ऐन पंचविशीचें असल्यानें 'म्हणेन तें करीन,' असा उत्साहपूर्ण आवेश त्यांच्या अंगीं होता. सामाजिक प्रश्नांसंबंधीं त्यांच्या अंतःकरणांत वसत असलेली कळकळ त्यांस यापुढें स्वस्थ बसूं देईना! आपण वयानें प्रौढ नसलों तरी समाजास चार गोडीगुलाबीच्या गोष्टी सांगून त्यास रूढीच्या कृष्णकर्दमापासून मुक्त करणें हें आपलें पवित्र कर्तव्य होय, असें त्यांना वाटलें. समाजाची गतानुगतिक रूढ मार्गानेंच जाण्याची एककली प्रवृत्ति, अंधश्रद्धेमुळें डोळ्यांवर आलेली झांपड व नवीन विचार ग्रहण करण्याची असमर्थता इत्यादि दोषांची पूर्ण कल्पना होऊन ते दोष समूळ नष्ट करण्याचा प्रयत्न करण्याचें त्यांनीं मनाशीं ठरवून टाकलें. नवीन सुधारकांच्या पंथाचें तत्त्वज्ञान सामान्य जनांस समजावून देऊन त्यांस उन्नतीच्या मार्गाप्रत नेण्याचें कार्य त्यांनीं आरंभिलें.

त्या काळीं राजकारणास कोठें नुकतीच सुरुवात झाली होती. धर्माविरुद्ध ब्र काढण्याची सोय नव्हती. तेव्हां धर्माविरुद्ध लेख लिहिणें व व्यक्तिसुखाचा पुरस्कार करणें धाडसाचेंच काम होतें. समाजास आपली राजकारणांतील व समाजकारणांतील जबाबदारी कळत नसून आगरकर, टिळकांसारखे पुढारी आपल्या 'सुधारक-केसरी'त काय लिहितात याचें महत्त्व त्यांस समजत नव्हतें. 'सुधारक' पंथांतील मंडळींनीं तर निर्भीडपणें समाजाचे दोष उघड करून लोकांचा रोष आपणांवर ओढून घेतला. तेव्हां लोकांचें अज्ञानपटल दूर करून समाजहिताविषयीं त्यांच्यांत उत्सुकता निर्माण करण्याचें दुष्कर कार्य हरिभाऊंनीं 'करमणुकी'च्या द्वारें करण्याचा विचार निश्चित केला. सुधारकांतील प्रत्यक्ष युद्धापेक्षां 'करमणुकी'च्या अप्रत्यक्ष युद्धपद्धतीनेंच शेवटीं सुधारणापक्षाचा जय झाला. शिवाजीच्या युद्धनीतीचें रहस्य गनिमी काव्यांतच नव्हतें काय? हें गनिमी काव्याचें सुंदर धोरण वाङ्मय-प्रदेशांत हरिभाऊंनीं अमलांत आणिलें व लोकशिक्षणाच्या इष्ट कार्याची सिद्धता केली. समाजसेवा व वाङ्मयसेवा या दोन्ही अत्यंत श्रेष्ठ प्रतीच्या ध्येयांचें एकीकरण करण्याचें अलौकिक भाग्य हरिभाऊंच्या वाट्यास आलें!

इ. स. १८९० सालच्या ऑक्टोबर महिन्यांत 'करमणूक' पत्राचा नमुना अंक निघाला. "लहानांपासून थोरांपर्यंत सर्व स्त्रीपुरुषांचें मनोरंजन करून ज्ञानदान

देणारें हें पत्र दर शनिवारीं निघतें, " असें ' करमणुकी 'च्या मुखपृष्ठावर जाड्या टाइपांत लिहिलें असून शीर्षस्थलीं खालील श्लोक होता :

" वदन्तु कतिचिद्धठात्खफछटेति वर्णच्छटान्
घटः पट इतीतरे पटु रटन्तु वाक्पाटवात्
वयं बकुलमंजरीगलदलीनमाध्वी झरी–
धुरीणपदरीतिभिर्भणितिभिः प्रमोदामहे ॥ १ ॥

याच अंकांत ' करमणूक ' पत्र काढण्याचा उद्देश हरिभाऊंनीं स्पष्ट शब्दांत वर्णन केला आहे :

" करमणूक पत्र काढण्याचा उद्देश एवढाच कीं, मराठी भाषा जाणणाऱ्या साधारण जनसमूहाचें मनोरंजन करून त्यास व्यावहारिक, शास्त्रीय इत्यादि अनेक गोष्टींचें ज्ञान करून द्यावयाचें. केसरीसुधारकादि पत्रें आपल्या कुशल लेखणीनें जें काम निबंधांच्या द्वारें करितात तेंच काम हें पत्र मनाची करमणूक करून करणार ! इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, युनायटेड स्टेटस्, इत्यादि देशांतील अर्वाचीन ग्रांथिक इतिहासाकडे पाहिलें असतां दोन प्रवृत्ति विशेष लक्षांत येतात. एक, प्रचंड ग्रंथांचें सार काढून देणें व दुसरी, अनेकविध शास्त्रमीमांसांचीं तत्त्वें मनाचें रंजन होऊन कळतील अशा तऱ्हेनें सांगणें. देशांत सुधारणा व्हावी याकरितां केसरीसुधारकादि पत्रें पहिल्या प्रवृत्तीचें अवलंबन करून चालली आहेत; हें पत्र दुसऱ्या प्रवृत्तीच्या अवलंबनानें चालणार. जी गोष्ट जनसमूहानें अवश्य करावी म्हणून केसरी, सुधारक एखाद्या कठोर पित्याप्रमाणें कठोर शब्दांनीं सांगणार व समाजाचें अप्रशस्त वर्तन झाल्यास वेळीं वाक्प्रतोदाचे तडाखे लगावणार, तीच गोष्ट हें पत्र प्रेमळ मातेप्रमाणें गोड गोड शब्दांनीं व चांगल्या चांगल्या गोष्टींनीं अप्रशस्त वर्तनाबद्दल मायेचें शासन करणार ! एवढें मात्र ध्यानांत ठेवावें कीं हें पत्र आचरट आईप्रमाणें फाजील लाड करणार नाहीं. या पत्रांत आतां आपणांस हवा तसा आचरट व पाचकळ मजकूर वाचावयास सांपडेल अशी आशा धरून जे याचे वर्गणीदार होतील त्यांची अत्यंत निराशा होईल. नाटिकाफाटिका अशीं मोठमोठीं नांवें घेऊन पाचकळ व फाजील मजकूर खरडण्यासाठीं हें पत्र नव्हे. ज्यांस तशा मजकुराखेरीज कांहीं आवडत नसेल, त्यांनीं आमचेकडे आपली वर्गणी पाठवून आमचे हात विटाळूं नयेत. परंतु ज्यांस पुढल्या माडीपासून चुलीपर्यंत व दिवाणखान्यांतील टेबलापासून फणी-

करंड्याच्या पेटीपर्यंत कोणाच्या हातीं पडलें तरी हवें त्यानें हवें त्याच्या देखत निःशंकपणानें वाचण्यास हरकत नाहीं असें पत्र पाहिजे असेल त्यांनीं अवश्य करमणुकीचे वर्गणीदार व्हावें. ज्यांस पाश्चिमात्य व पौर्वात्य नाटककादंबऱ्यादि ग्रंथांतील अत्यंत निर्मल, सरस व उत्कृष्ट अशा ग्रंथांचा भाषांतरद्वारां रसास्वाद घेण्याची इच्छा असेल त्यांनीं अवश्य आम्हांस आश्रय द्यावा. सध्यांच्या आपल्या बऱ्यावाईट स्थितीचें, कोणींही वाचलें असतां बिलकुल नाक मुरडण्याचें कारण नाहीं, असें चित्र पाहिजे असेल त्या त्या गृहस्थांस आम्ही आदरपूर्वक निमंत्रण करतों. शनिवारीं संध्याकाळीं थकून भागून आल्यावर आपल्या कुटुंबांतील लहानमोठ्या माणसांस जमवून खुशाल हंसतखेळत करमणूक करून ज्ञान मिळविण्याची ज्यांस इच्छा असेल त्यांचे आम्ही नम्र सेवक आहोंत. शुद्ध तऱ्हेनें सहकुटुंब सहपरिवार करमणूक करून घेऊं इच्छिणारे सज्जन हो, विजयादशमीचे आंत 'कुलकर्णी आणि मंडळी' कडे आपली नांवें व पत्ता लिहून पाठवा. एक हजार वर्गणीदार झाल्यास हें पत्र विजयादशमीचे पुढले शनिवारपासून सुरू होईल. तोंपर्यंत फक्त सह्या पाठवा.

या पत्रांत काय काय मजकूर येत जाईल त्याची यादी—

१ आळीपाळीनें दोन मोठाल्या गोष्टी.
२ दोनचारच अंकांत संपणाऱ्या अशा लहान चटकदार गोष्टी.
३ पदार्थविज्ञान, रसायन, अर्थ, शरीर इत्यादि शास्त्रांचें ज्ञान करून देणाऱ्या गोष्टी.
४ नाटकें, इत्यादि.
५ वर्तमानसार ( हें बहुतकरून नेहमीं येईल ).
६ चटकदार चुटके व नकला या नेहमीं असावयाच्याच !
७ थोर पुरुषांचीं चरित्रें.
८ रम्य स्थलांचीं प्रवासासंबंधीं वर्णनें.
९ निरनिराळ्या खेळांविषयीं माहिती.
१० उपयुक्त माहिती.
११ कविता ( दर अंकांत बहुतकरून येतील ).
१२ चुलीपासल्या गोष्टी ( या सदराखालीं स्त्रियांस उपयुक्त माहिती येईल ). एका वर्षांत प्रारंभ केलेलीं प्रकरणें त्या वर्षांतल्या त्या वर्षांत संपविण्याची सक्त खबरदारी ठेविली जाईल. या पत्राचा सांचा हुबेहुब या आजच्या अंकाप्रमाणें असणार."

## ‘ करमणूक ’ पत्राचें अंतरंग

विजयादशमीच्या सुमुहूर्तावर इ. स. १८९० सालीं ऑक्टोबरच्या शेवटच्या शनिवारीं ‘करमणूक’ पत्राचा पहिला अंक निघून त्यांत ‘पण लक्षांत कोण घेतो ?’ ही कादंबरी, प्रेसिडेंट गार्फील्डचें चरित्र, आठवड्यांतील गप्पागोष्टी, विनोदपूर्ण चुटके, कविता, उपयुक्त माहिती व वर्तमानसार इत्यादि विषय आले.

पहिल्या वर्षांत, आरंभींच प्रतिज्ञा केल्याप्रमाणें ‘करमणूक’ पत्रानें आपली कामगिरी उत्कृष्ट रीतीनें बजावली. त्यांत दर आठवड्यास येणाऱ्या ‘पण लक्षांत कोण घेतो ?’ या करुणरसपूर्ण हृदयद्रावक कादंबरीनें लहानथोर जुन्या-नव्या मतांच्या सर्व वाचकांचें हृदय थरारून सोडलें. ही कादंबरी वाचतांना वाचकांच्या नेत्रांत अश्रु उभे राहतात तर नाना प्रकारचे गमतीदार चुटके त्यांस हंसविल्यावांचून रहात नसत; लहान गोष्टी त्यांचें मनोरंजन करीत तर, शास्त्रीय मौजेच्या गोष्टी वाचून त्यांना चमत्कार वाटे. प्रत्येक अंकांत कांहींतरी नव्या ज्ञानाचे घोट वाचकांस मिळत, ही गोष्ट मात्र खरी. त्यांत प्रसिद्ध होणाऱ्या कवितांनीं मुद्धां नवीन विचारांचा स्वीकार करून नव्या युगास आरंभ केला होता. पहिल्या वर्षाच्या बहुतेक अंकांतील कविता कै. केशवसुतांच्या आहेत. अर्वाचीन मराठी काव्याच्या या आद्यजनकानें आपल्या बहुतेक कविता ‘करमणूक’ पत्रांत प्रसिद्ध कराव्यात हाही एक या पत्राचा विशेषच म्हटला पाहिजे. असो.

या वर्षअखेरीस ‘करमणूक’ पत्रावर ज्या विद्वान स्त्रीपुरुषांचे अभिप्राय आले त्यांवरून ‘करमणुकी’च्या खऱ्या कार्याचा अदमास वाचकांस होईल. पाहिलें वर्ष संपतांच ‘आमच्या विषयीं लोक काय म्हणतात ?’ असें नांव देऊन ‘करमणूक’ पत्रावरील अभिप्राय प्रसिद्ध करण्यांत आले त्यांपैकीं कांही महत्त्वाचे अभिप्राय खालीं दिले आहेतः

ऑनरेबल् जस्टिस् काशिनाथ त्रिंबक तेलंगः—“करमणूक पत्रांतील विनोदपर चुटके व उपयुक्त माहिती देणारे छोटे निबंध अनेक वेळां पाहण्यांत आले आहेत व ते बहुतकरून चांगल्या प्रकारचे असतात, असा माझा अभिप्राय आहे. एकंदरीनें आपलें पत्र विशेषेंकरून स्त्रियांस व मुलांस उपयोगी पडण्यासारखें आहे.”

—ता. ८ जून, १८९२.

प्रो. वासुदेव बाळकृष्ण केळकर, बी. ए., लिहितातः—‘करमणूक’ पत्रासारखें वर्तमानपत्र पाहिजे होतें व ती उणीव आपण भरून काढली याबद्दल आपलें अभिनंदन करणें रास्त आहे. नुसती कशी तरी भरून काढली असें नाहीं तर, सहृदय

वाचकांच्या अंतःकरणाला आल्हाद होईल अशा तऱ्हेनें भरून काढली हें तुम्हांला विशेषतः श्रेयस्कर आहे......... नांवाप्रमाणें करमणुकीचा भाग तर आपलें पत्र चांगल्या प्रकारें बजावीत आहेच; तत्रापि बोध करून घेणाराला व ज्ञानेप्सूला आपापल्या इच्छा मधुर व मनोहारि, नेहमींच्या शाळेंतील नीरस व कटु मार्गाहून अत्यंत भिन्न, अशा मार्गानें तृप्त करून घेण्यास आपलें पत्र नामी साधन आहे."

ता. २० ऑगस्ट, १८९२.

रा. रा. दिनकर हरि वाकनीस, बी. ए., एल्‌एल्‌. बी., वकील, डिस्ट्रिक्ट कोर्ट, पुणें—"ज्या मला जात्याच नाटककादंबऱ्यादि ग्रंथवाचन कंटाळवाणें वाटे, त्यासच 'करमणुकी'नें इतकें मोहित केलें हें एक आपल्या लेखनपटुत्वाचें बरेंच निदर्शक आहे असें मला वाटतें. आपली भाषा साधी व अति गोड आहे. गोष्ट लिहिण्याची शैली अवर्णनीय आहे."

ता. २८ जुलै, १८९२.

रा. ब. आत्माराम कृष्ण नूलकर—"करमणूक, उपयुक्त माहिती व गोष्टी यांचें योग्य मिश्रण आपल्या पत्रांत असल्यानें लहानमोठ्या स्त्रीपुरुषांची रिकामपणाची वेळ आनंदांत व मानसिक उन्नति करण्याच्या उद्योगांत सहज घालवितां येते. प्रत्यक्ष अनुभवावरून मी खात्रीनें सांगूं शकतों कीं शनिवारीं करमणूक पत्र हातांत केव्हां पडेल असें होतें. आबालवृद्धांचीही हीच उत्कंठा अनेक वेळां माझ्या दृष्टीस आली आहे."

श्री. सौ. काशीबाई कानिटकर—"त्यांतील गोष्टी तर फारच सुंदर, बोधपर व करमणूक करणाऱ्या असतात. 'हरवलेली किल्ली' तर फारच उत्तम गोष्ट आहे. सगुणाबाईचीं पत्रें प्रत्येक नवविवाहितानें तर अक्षरशः ध्यानांत धरावीं......... एकंदरींत या पत्रासारखें दुसरें पत्र महाराष्ट्रांत तरी नाहीं.........आपल्या पत्रांत स्त्रियांनी अवश्य वाचण्यासारखे विषय मोठ्या सभ्यतेनें व भारदस्तपणानें लिहिलेले असतात."

ता. २५ जुलै, १८९२.

सौ. रमाबाई रानडे, पुणें—"यांतील लेख सुबोध व मर्यादशील असून विस्तृत असतात. मला असें वाटतें कीं, सबंध आठवड्यामध्यें ही एक दिवसाची विश्रांतीच आहे व त्यासंबंधानें दुसरा शनिवार केव्हां येईल व पुढचा मजकूर केव्हां वाचावयास मिळेल याबद्दल सात दिवसपर्यंत या पत्राकडे डोळे लागलेले असतात. ............या पत्रांतील विषय इतके गोड लिहिलेले असतात कीं, ते पूर्वी

चारदोन वेळां जरी वाचलेले असले तरी पुनः पुनः वाचावेसे वाटतात. या पत्रांतील ‘ आगबोट बुडाली, ’ ‘ हरवलेली किल्ली ’ वगैरे गोष्टी इतक्या खऱ्या वाटतात कीं, आपण अशा गोष्टी मुलांच्या व मुलींच्या खेळांत नेहमीं पाहतों. अशाच त्यांच्या अनुभवाच्या गोष्टी लिहिल्यानें त्या गोष्टींचा ठसा मुलांच्या व मुलींच्या मनांवर उठून त्यांपासून त्यांना चांगला उपदेश मिळेल............या सर्वांहून या पत्रांतील माझा आवडता विषय म्हटला म्हणजे ‘ सगुणाबाईचीं मुलीला पत्रें. ’ अशा साध्वी जर १०।२० होतील तर किती तरी मोठी उन्नतावस्था येईल.”

ता. १३ सप्टेंबर, १८९२.

पंडिता रमाबाई सरस्वती यांनीं ‘ करमणूक ’ पत्राची प्रशंसा करून संपादकांस कळविलें कीं, “ करमणूक पत्र.........सर्व महाराष्ट्र-कुटुंबांनी संग्राह्य आहे. ”

ता. ६ जून, १८९२.

वरील सर्व उताऱ्यांवरून ‘ करमणूक ’ पत्रानें अगदीं अल्प अवकाशात विलक्षण लोकप्रियता कशी संपादन केली व विद्वान्‌अविद्वान्, लहानथोर इत्यादि वाचकांच्या आदरास तें कसें पात्र झालें तें तात्काल समजतें.

‘ पण लक्षांत कोण घेतो ? ’ यासारखी सुंदर कादंबरी, ‘ हरवलेली किल्ली, ’ ‘ आगबोट बुडाली, ’ इत्यादिसारख्या मधुर गोष्टी, ‘ त्वत्प्रीतीस अपात्र हा जन, ’ ‘ जायाचें जग कां असेंच ?’ ‘प्रीतीची भाषा,’ ‘विकसन,’ ‘कविता आणि प्रीति’ यांसारख्या केशवसुतांसारख्या प्रतिभाशाली कवीच्या मनोहर कविता, पोट धरधरून हंसवून सोडणारे विनोदी चुटके, व ‘ भूक लागणाचें कारण, ’ ‘ जिऊबाईचीं अगदीं लहान लेंकरें,’ ‘फुलांचे रंग,’ यांसारखे उपयुक्त माहितीनें भरलेले छोटे निबंध, ‘सुबोध कथामाला’ या सदराखालीं येणारी ‘ सूर्य, ’ ‘ सात करवंदें, ’ ‘ परोपकारासारखें दुसरें पुण्य नाही, ’ ‘ अंजिर—अव्यवस्थितपणा दुःखाचें मूळ, ’ ‘नारळीचें झाड, ’ ‘ जोंधळ्याचीं कणसें,’ ‘ उथळ पाण्याला खळाळी फार’ इत्यादि चमत्कृतिपूर्ण नांवाखाली दिलेली मनोरंजक व बोधपर अशी माहिती, ‘जेम्स गारफील्ड,’ ‘डॉ. वर्ड्स्वर्थ,’ ‘मॅडम ब्लॅव्हॅट्स्की’ इत्यादि चरित्रें, ‘साऱ्यांनाच मौज’ या सदराखालीं दिलेली वैचित्र्यपूर्ण हकीकत, ज्योतिषशास्त्रविषयक गोष्टी इत्यादि विविध प्रकारच्या विषयांनीं भरलेलें व दर आठवड्यास वेळच्या वेळीं निघणारें ‘करमणूक’ पत्र लोकादरास पात्र झालें याबद्दल कोणास आश्चर्य वाटावयास नको.

पुढील बारा वर्षांत 'करमणुकी'चें स्वरूप अधिकाधिक मनोहर होत गेलें. तिच्या बोबड्या बोलांनीं, लडिवाळ गुजगोष्टींनीं, गोड गाण्यांनीं व मनोहर चेष्टांनीं सारा वाचकवर्ग मोहित होऊन गेला. तिनें त्या वेळपर्यंत, आपल्या लाडक्या वाचकांस 'पण लक्षांत कोण घेतो?' 'मी,' 'भयंकर दिव्य,' 'जग हें असें आहे,' 'म्हैसूरचा वाघ,' 'तेवीसशें वर्षांपूर्वी,' 'रूपनगरची राजकन्या,' 'केवळ स्वराज्यासाठीं,' इत्यादि सामाजिक व ऐतिहासिक मिळून एकंदर आठ लांबलचक गोष्टी सांगितल्या, कमींत कमी साडेतीनशें चारशें लहान लहान चटकदार गोष्टी कथन केल्या व सुमारें चारशें मनोहर कवितांचे चुटके गाऊन रमविलें. पदार्थविज्ञान, रसायन, ज्योतिष, शरीर व अर्थ इत्यादि शास्त्रीय विषयांची तो तर केवळ खाणच होतो. 'करमणुकी'च्या बाह्य स्वरूपांतही फरक होऊन उंची प्रतीचें वस्त्र परिधान करून चित्रालंकारांनीं ती भूषित झाली. तिच्या बाह्य सौंदर्याचें सर्व श्रेय 'बाबाजी सखाराम आणि मंडळी' यांसच देणें अधिक श्रेयस्कर होईल. परंतु तिचें अंतरंग शुद्ध, मधुर व सोज्ज्वळ ठेवणें हें तिच्या जनकाचें कर्तव्य असून तें त्यांनी फारच उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें यांत शंका नाहीं.

'करमणुकी'स सर्वांगसुंदर बनविण्याच्या कामीं हरिभाऊनीं प्रयत्नांची बिलकुल कसूर केली नाहीं. 'मधुर वचनें,' 'ज्ञानाचे कण,' 'मुलांची करमणूक,' 'स्त्रियांस करमणूक,' 'आमच्या देशाच्या गोष्टी,' 'शास्त्रीय करमणूक,' 'विश्वकुटुंबांतील मंडळीची ओळख,' 'मोठी माणसें काय सांगतात?' 'मुलांसाठीं कूट प्रश्न' 'थोरांचे बोल,' 'सुवर्णकण,' 'विचार-मधुकरी,' 'साहित्यचर्चा,' इत्यादि नवीन सदरें निर्माण करून वाचकांस उत्तम प्रतीचें ज्ञान दिलें व त्याच बरोबर मनोरंजनही केलें. 'साहित्यचर्चा' या भागांत अनंततनयकृत 'हृदयतरंग,' 'महाराष्ट्र कविचरित्र,' व कर्वेकृत 'आत्मवृत्त' इत्यादि ग्रंथांवर चर्चात्मक टीकालेख आले आहेत. जॉर्ज ईलिअट, मेरी लँब, स्कॉट, एडिसन्, सर मोझेस मॉंटिफिअर इत्यादि पाश्चात्य स्त्रीपुरुषांचीं, त्याचप्रमाणें श्रीरामकृष्णपरमहंस, न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे, प्रि. वामन शिवराम आपटे, तोरु दत्त, महाराणी सुवर्णमयी, इत्यादि हिंदी स्त्रीपुरुषांचीं सुंदर चरित्रें 'करमणुकी'नें गोड भाषेत कथन केलीं. 'चमत्कारिक व मौजेची माहिती' या भागांत प्रसिद्ध झालेले सर्वच चुटके एकत्र करून वाचकांस दिल्यास ते सांप्रतही वाचकांची घटकाभर करमणूक करून

त्यांस भरपूर ज्ञान देतील अशी खात्री वाटते. ' फुलांच्या संबयी, ' ' माशांस पाण्यांत तरतां, बुडतां कसें येतं, ' ' जनावरांस स्वप्नें पडतात काय ? ' ' हंसणारे पक्षी, ' ' सर्वांत मोठें फूल, ' ' गाढव व ठेवा, ' ' बोलणारे डोम कावळे, ' ' बर्फांत उगवणाऱ्या वनस्पति, ' ' झाडांचे बुंधे वाटोळें कां ? ' 'गाई मत्सरी आहेत काय ? ' ' माकडांची भाषा, ' ' अजब घड्याळ ' इत्यादि चुटके पुनः पुनः शेंकडों वेळां वाचले तरी बिलकुल कंटाळा येत नाहीं, असें करमणुकीचे कित्येक वाचक सांगतात. हरिभाऊंच्या मायेचा बाजार, कर्मयोगादि सर्व सामाजिक कादंबऱ्या, उषःकाल, सूर्योदय, माध्यान्ह, सूर्यग्रहणादि ऐतिहासिक कादंबऱ्या व भास कवीच्या नाटककथा, संत सखूबाई, पिंगला इत्यादि नाटकेंही 'करमणूक' पत्रांत प्रसिद्ध झाली. अशा रीतीनें सतत सत्तावीस वर्षें त्यांनीं वाचकांची इमानें इतबारें सेवा केली. सत्तावीस वर्षांच्या आपल्या आयुष्यांत ' करमणुकी 'नें विविध प्रकारच्या निदान हजार तरी सुंदर गोष्टी सांगितल्या असतील. या एकाच गोष्टीवरून ' करमणुकी 'नें केलेल्या वाङ्मयीन कार्याची साधारण कल्पना वाचकांस येईल.

' करमणुकीं 'त प्रारंभीं जाहीर केलेल्या उद्देशपत्रिकेप्रमाणें सत्तावीस वर्षें 'करमणूक' पत्र सतत चाललें होतें. त्यांत केलेल्या प्रतिज्ञांचें पालन हरिभाऊंनीं अगदीं अक्षरशः केलें. दिवाणखान्यापासून तों माजघरांतील फणीकरंड्याच्या पेटीपर्यंत जाण्यास त्यास कधींच मज्जाव झाला नाहीं. लोकांच्या देखत वाचण्यास लाज वाटेल असा मजकूर ' करमणुकीं 'त कधींच आला नाही. लहान मुलांच्या मनांत भलत्या भावना अकालीं उद्भूत होतील अशी एकही ओळ 'करमणुकीं'त आढळणार नाहीं. शुद्ध, सात्त्विक, सोज्ज्वळ विचारांनीं भरलेलें अशा तऱ्हेचें पत्र ' करमणुकी 'शिवाय मराठींत दुसरें झालें नाहीं असेंच म्हटलें पाहिजे !

' करमणुकी 'नें शेंकडों लहान मुलांमुलींना अगदी बालवयांतच वाचनाची गोडी लाविली. शनिवारीं संध्याकाळीं ' करमणूक ' आली कीं ती प्रथम वाचण्यासाठीं लहान बहीणभावंडांत लढाई होई. " तुम्ही भांडूं नका. तुमच्या पैकीं प्रत्येकास ' करमणुकी ' चे वर्गणीदार करून टाकूं " असें बोलून घरांतील वडील मंडळींना मुलांचे हे तंटे मिटवावे लागत. आणि मग वडिलांनीं अशी समजूत केल्यावर आपल्यापैकीं वडील भावास अथवा बहिणीस ' करमणूक ' वाचावयास सांगून बाकीचीं लहान मुलें त्याच्या भोंवतीं जमत व त्यांतील मौजेच्या गोष्टी अत्यंत

उत्सुकतेनें व आनंदानें ऐकत रहात. अशा तऱ्हेनें मुलांचें मन आकर्षण करून घेऊन त्यांना तन्मय करून सोडणारें हल्लीं कोणतें पत्र आहे बरें ? 'करमणुकी 'चें वेड असलेल्या एका लहान मुलीची गोष्ट सांगतात: ही मुलगी करमणूक नियमितपणें वाची; एवढेंच नव्हे तर सुट्टीच्या दिवशीं 'करमणुकी'च्या फायलींचीं पारायणें करी. एकदां ती गांवाला गेली असतां एका अडाणी नोकरानें रद्दी समजून तिनें हौसेनें जमविलेले सारे अंक विकून टाकले. आपल्या ' करमणुकी ' नाहींशा झालेल्या पाहून त्या मुलीस अत्यंत दुःख झालें व ती मोठी झाली तरी सुद्धां आपल्या हरवलेल्या फायली सांपडल्या आहेत व आपण त्या वाचतों आहोंत, अशीं स्वप्नें तिला वरचेवर पडत !

प्रौढ स्त्रियांत वाङ्मयाची अभिरुचि उत्पन्न करण्याचा बुद्धिपुरःसर व मनःपूर्वक प्रयत्न जर कोणीं प्रथम केला असेल तर तो सुद्धां ' करमणुकी 'नेंच होय. कित्येक वाचकभगिनींस तर 'करमणूक' स्फूर्तिदेवताच भासली. 'करमणुकी 'नें स्त्रियांच्या बुद्धीचा विकास केला व सुप्तावस्थेंत बीजस्वरूपांत असलेल्या त्यांच्या वाङ्मयशक्तीस चैतन्य दिलें. या स्फूर्तिदेवतेच्या प्रसादानें प्रतिभा जागृत होऊन कित्येक स्त्रीलेखिका वाङ्मयक्षेत्रांत चमकूं लागल्या. स्त्रियांच्या प्रदर्शनांच्या हकीकती व पाश्चात्य स्त्रियांच्या गोष्टी 'करमणूक' देई व स्त्रियांस उत्तेजन मिळावें म्हणून त्यांना नाना प्रकारच्या विषयांवर निबंध लिहिण्यास सांगून त्यांबद्दल पारितोषिक देण्यांत येत. शाळाकॉलेजांतील मुलांमुलींच्या साठीं कांहीं वर्षें हरिभाऊंनीं ' करमणूक-मराठी-स्कॉलरशिप ' ठेविली होती.

' करमणुकी 'बद्दल जर कधीं कोणी तक्रार केली असेल तर ती एकाच गोष्टीसंबंधानें: हरिभाऊ एकाच वर्षांत दोन कादंबऱ्या 'करमणूक' पत्रामध्यें लिहीत. त्यामुळें त्या अपुऱ्या राहून वाचकांची निराशा होते, अशा प्रकारचीं पत्रें संपादकांस नेहमीं येत. याशिवाय ' करमणुकी 'वर कोणीं केलेली विरोधी टीका ऐकिवांत तरी नाहीं.

अशा रीतीनें लहान-थोरांच्या प्रीतीस पात्र झालेलें हें सुंदर पत्र सत्तावीस वर्षें चालून जेव्हां १९१७ सालीं बंद पडलें तेव्हां आपलें एक जिवलग मनुष्य गेल्यासारखेंच दुःख कित्येकांस झालें. सतत सत्तावीस वर्षें विश्रान्तिस्थान म्हणून ज्यानें शेंकडों स्त्रीपुरुषांस व मुलांमुलींस आनंद दिला तें पत्र पुनः वाचावयास मिळणार नाहीं या विचारानें प्रत्येक वाचक खिन्न झाला यांत कांहींच आश्चर्य नाहीं !

---

## प्रकरण आठवें

# पहिल्या पत्नीचा मृत्यु व दुसरें लग्न

मथूताईचा शिक्षणक्रम सुरू झाल्यापासून तिला घरांतील वडील स्त्रियांपासून फार त्रास होऊं लागला हें मागें सांगितलेंच आहे. हरिभाऊंची इच्छा म्हणून तिला शिकावें लागेच. आपण आपल्या मित्रांनीं व मित्रपत्न्यांनीं एकत्र जमून गप्पागोष्टी कराव्या या गोष्टीची हरिभाऊंना मोठी हौस! परंतु ते पडले परतंत्र! तेव्हां ही गोष्ट साधणें अशक्यच होतें. तरीही घरांतील मंडळींस न कळवितां ते मथूताईस सभेस घेऊन जात. तेथें त्यांचे मित्र आपल्या पत्न्यांसमवेत आलेले असत. एकदां किबेवाड्यांतील आरसेमहालांत पंडिता रमाबाईचें व्याख्यान झालें. मथूताईस बरोबर घेऊन हरिभाऊ या व्याख्यानास गेले होते. तेथेंच मथूताई व हरिभाऊंचे परम मित्र रा. महादेव दिनकर जोशी यांच्या पत्नी पार्वतीबाई यांची ओळख झाली. मिस भोर यांच्याकडेही ती दोघें मिळून जात. घरांत या गोष्टी कळूं नयेत म्हणून कितीही खबरदारी घेतली तरी मथूताई जाऊन परत येत्ये तों कोठून तरी ही हकीगत चिमामावशींच्या कानांवर गेलेली असावयाचीच. त्या जुन्या काळांत सर्वच स्त्रियांच्या सोंवळ्याच्या कल्पना अत्यंत तीव्र असल्यानें कपडे बदलून टाकले तरी सुद्धां मथूताईस कोठें शिवूं देत नसत. यामुळें साहजिकच घाबरून जाऊन काय करावें तें तिला सुचत नसे. घरांत चिमामावशी आदिकरून वडील स्त्रियांच्या हाताखालीं वागावयाचें असल्यानें त्यांना खूष ठेवणें भाग होतें. उलट पक्षीं "आपण लिहावयास, वाचावयास शिकून सुशिक्षित व्हावें," ही हरिभाऊंची इच्छा पूर्ण माहीत असल्यानें त्यांच्या मर्जीविरुद्ध ती कशी जाणार? तिचा थोडासा अभ्यास करावयाचा राहिला कीं, हरिभाऊ निराश होऊन जात. एका सुट्टीच्या दिवशीं काका

गोखले सहज हरिभाऊंना भेटावयास गेले होते. त्याच दिवशीं त्यांनीं मथूताईस एक छानदार गोष्टींचें पुस्तक वाचावयास दिलें. तें कोठपर्यंत वाचून झालें हें पाहण्यास हरिभाऊ पलीकडच्या खोलींत डोकावून बघतात तों मथूताईस झोंप लागलेली असून वाचावयास घेतलेलें पुस्तक तसेंच उघडें पडलें आहे ! त्यांस झोंपेंतून न उठवितां हरिभाऊ काका गोखल्यांच्यापाशीं आले व दीर्घनिश्वास सोडून म्हणाले, " अशानें कसें शिक्षण होणार ? आणि वाचनही कसचें होणार ? " शिक्षणास उशिरां सुरुवात झालेली, त्यांत विकट अडचणींनीं व्यत्यय येऊन अभ्यासास, वाचनास वेळ मिळण्याची मारामार ! अशा स्थितींत जी थोडी फुरसत सांपडेल तिचा प्रत्येक क्षण ज्ञानसंपादनांत घालवावा अशी हरिभाऊंची इच्छा ! मथूताईनें वाचण्याच्या बाबतींत थोडासा जरी आळस केला तरी त्यांचा उत्साहभंग तेव्हांच होई. असो. विरोधी मतांच्या अडकित्त्यांत सांपडल्यानें मथूताईस माहेरीं जाऊन आजीपाशीं मन मोकळें कधीं करीन असें होऊन जात असे. आजीही जुन्या चालीची असल्यानें व त्यांतही आपल्या लाडक्या नातीस शिकण्यापायींच सासरीं त्रास होतो म्हणून ती शिक्षणाविरुद्ध बोले. आजीनें ही गोष्ट दामोदरपंतांच्या कानावर घातली. दामोदर-पंतांनीं अण्णासाहेबांपाशीं ही गोष्ट काढून " मुलीचें शिकणें बंद करा; आमच्या मुलीस जाच होतो, " असें सांगितलें. अण्णासाहेबांनीं उत्तर दिलें, " या साऱ्या गोष्टी मावशींच्या स्वाधीन ! मला त्यांत कांहीच करतां येत नाहीं. पाहिजे असल्यास स्वतःच मावशींच्या कानावर ही गोष्ट घाला. " दोघेही वकील चिमामावशींच्याकडे गेले ! दामोदरपंतांचें थोडेंसें भाषण ऐकतांच मावशी अतिशय संतापल्या व " मला असल्या गोष्टी सांगूं नका, " असें सांगून त्यांनीं दामोदरपंतांस निरुत्तर केलें. मावशींच्या पुढें दोघांही वकिलांचें वक्तृत्व एकंदरींत रद्द ठरलें म्हणावयाचें ! !

घरांत बिलकुल स्वातंत्र्य नसल्यानें मथूताईस लिहिणेंवाचणें जमत नसे. " आनंदाश्रम आपल्यासाठींच आहे, तर आपण तिकडे जाऊन राहूं. मग मी पुस्तकें वाचीन, सभेस जाईन, तुम्ही म्हणाल तें करीन, " असें मथूताईनें हरिभाऊंस वारंवार सांगावें. हरिभाऊंना तिचें म्हणणें पटत नसे असें नाहीं. परंतु या अडचणी दूर करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नव्हतें. घरांतील परिस्थिति ते पूर्ण जाणून होते. घरच्या तक्रारी तिनें गायिल्या तर हरिभाऊ केव्हां केव्हां तिचें सांत्वन करून समजूत घालीत. परंतु बहुधा तें तिचें सांगणें थट्टेवारी नेऊन तिची विनोदानें चेष्टा करीत. तिचा स्वभाव

अत्यंत भित्रा व भोळा असल्यानें त्यांची सारी थट्टा खरी वाटून तिचे डोळे पाण्यानें भरून येत. जरी आतां थोडे कष्ट पडले तरी मथूताई सुशिक्षित झाल्यास आपणांस उच्च प्रकारचें गृहसौख्य लाभेल व आपण दोघेही धन्य होऊं असें हरिभाऊंना वाटे व तिच्या शिक्षणांत अगदीं थोडीशी प्रगति झाली तरी त्यांस मोठा आल्हाद होई.

मथूताईचा पहिला मुलगा तीन आठवड्यांनीं गेला. दुसऱ्या मुलाच्या वेळींही ती माहेरीच होती. तिसरे दिवशीं तिला थोडा ताप आला व त्यांतच संग्रहणी झाल्यानें अशक्तता वाढली. हरिभाऊंना प्रकृति बरी नसल्याचें बिलकुल माहीत नव्हतें. नवव्या दिवशीं प्रकृति विशेष बिघडली. डॉक्टर वगैरे शेवटीं आणले, परंतु त्याचा कांहीं एक उपयोग न होतां आपल्या नऊ दिवसांच्या चिमुकल्या बाळास सोडून व हरिभाऊंच्या सर्व आशांचा भंग करून अगदीं अल्प वयांतच मथूताई स्वर्गवासी झाली !

या बाळंतपणांत आपली पत्नी आपणांस दुःखसागरांत लोटून निघून जाईल, अशी स्वप्नांत सुद्धां कल्पना नसल्यानें या दुःखास तोंड देण्याची हरिभाऊंची अगदींच तयारी नव्हती. गोखल्यांच्या कडील मनुष्यानें, “ हरिभाऊ, चला, चला, तुमची बायको गेली ! ” असें जेव्हां त्यांस एकदम घाबऱ्या घाबऱ्या येऊन सांगितलें, तेव्हां ते नुकतेच जेवावयास बसले होते. ती अनपेक्षित दुःखद वार्ता ऐकतांच त्यांना मोठा धक्का बसला व त्यांचें चित्त बावरून गेलें. घाबरलेल्या मनःस्थितींत ते लगबगीनें गोखल्यांच्या घरीं गेले. ही बातमी जिकडे तिकडे पसरतांच हरिभाऊंचे जिवलग स्नेहीही धांवून आले.

त्यांना कळूं लागल्यापासून आवडत्या मनुष्याचा चिर वियोग सहन करण्याचा दुःखद प्रसंग त्यांजवर आजपर्यंत आला नव्हता ! चैतन्यरहित असा मथूताईचा मृत देह दृष्टीस पडला, तरी त्या देहांत प्राण नाहीं अशी कल्पना करून घेण्यास त्यांचें प्रेमळ मन तयार होईना ! विचारांचा गोंधळ होऊन डोकें भ्रमण करूं लागलें ! मथूताईच्या आजीच्या तोंडून निघणारे शोकाचे आर्तोद्गार त्यांच्या हृदयाशीं जाऊन भिडले. दामोदरपंतही दीनवाणें तोंड करून खालीं मान घालून मथूताई-जवळ बसलेले होते. हा सारा करुण देखावा पाहून आपणांस हें चमत्कारिक स्वप्न तर पडत नाहींना असेंच क्षणभर हरिभाऊंना वाटलें ! अरेरे ! ती गोष्ट स्वप्नच ठरली असती तर ? पण असें कोठलें व्हायला ? मथूताईचा मृत देह उचलला तेव्हां हरि-भाऊंना क्षणभर मूर्च्छाच आली. त्यांच्या एका मित्रानें त्यांस सांवरलें व “ हरिभाऊ

स्मशानांत न आला तर चालेल का ?" असें श्री. शिवराम हरि साठे यांस विचारलें. त्यामुळें दामोदरपंत व शिवरामपंत या दोघांचा, सुधारकी मतांमुळें हरिभाऊ स्मशानांत जाण्यास तयार नाहींत, असा गैरसमज झाला. परंतु मित्राचें न ऐकतां आपला शोक हृदयांत दाबून धरून हरिभाऊ मथूताईस पोहोंचवावयास गेले व तेथें जे कांहीं शास्त्रोक्त विधि करणें जरूर होते ते सर्व त्यांनीं केले ! मथूताईचा शेवटला निरोप घेतांना त्यांच्या नेत्रांतून ज्या अश्रुधारा वहात होत्या व त्यांच्या हृदयास ज्या वेदना होत होत्या त्यांचें वर्णन करणें अशक्यच आहे.

दुसऱ्याच दिवशीं जाऊन काशीताईनी मुलाला घरी आणलें. त्या मुलाचें राधाकाकूंनीं काळजीपूर्वक दीड महिना संगोपन केलें. परंतु तोही अतिशयच अशक्त असल्यानें आईच्या मागोमाग थोड्याच दिवसांत गेला ! मथूताईच्या व मुलाच्या मृत्यूमुळें धक्का बसून हरिभाऊ एकसारखे आजारी पडूं लागले. त्यांचा घसा भरून येऊन एकदम श्वास कोंडल्यासारखें होई. या वेळेपासूनच हृदयाचे ठोके जास्त पडून त्यांस श्वासोच्छ्वास करण्यास अडचण भासूं लागली. असा प्रकार बहुधा रात्री, पहांटे व तिन्हीसांजां होई. तेव्हांपासून त्यांचा आवाजही बारीक झाला व हृदयविकार जो जडला तो कायमचाच !

अशा तऱ्हेचें शारीरिक व त्याच्या जोडीला पत्निवियोगासारखें अपरिमित व अनिवार्य असें मानसिक दुःख, यांमुळें हरिभाऊंची प्रकृति दिवसेंदिवस अधिकाधिक क्षीण होत चालली. स्वातंत्र्याचा एक पळभरही उपभोग न घेतां आपली पत्नी गेली; सासुरवासाच्या पारतंत्र्यांत तिला सर्व आयुष्य घालवावें लागलें; नव्या जुन्या मतांच्या चमत्कारिक झगड्यांत सांपडल्यानें तिची केंविलवाणी स्थिति झाली असतां तिला सहन कराव्या लागलेल्या त्रासाबद्दल आपण सहानुभूति दाखवून तिचें समाधान कधीं फारसें केलें नाहीं, उलट तिचें सारें बोलणें उडवून लावून आपण थट्टा करून तिला बेजार करीत असूं; भोळेपणानें ही थट्टा खरी समजून ती कशी दुःखित होई; सभेस जाण्याच्या गोष्टी सासरीं कळल्यानें घाबरलेल्या हरिणीप्रमाणें बावरून जाऊन ती घरांत कशी वागे; तिचें कोरडें सांत्वन करूनही आपण तिला अल्पही सुख दिलें नाहीं; इत्यादि गोष्टींचें स्मरण झालें म्हणजे हरिभाऊंच्या हृदयाची तळमळ होई. आपल्या मर्जीप्रमाणें वागण्यास व कितीही त्रास झाला तरी आपणांस प्रिय ती गोष्ट करण्यास ती कशी झटत असे; आपली भोळी, सालस पत्नी स्वातंत्र्यसुखाचे दिवस

दिसण्यापूर्वीच निघून गेली; तिच्या बद्दलचें पतीचें कर्तव्य बजावण्यास आपणांस संधि मिळाली नाहीं, या विचारांनीं त्यांचें हृदय व्याकुळ होऊन जाई. त्यांच्या कोमल हृदयाला हा दुःखावेग केवळ असह्य झाला. आपण तिला यत्किंचितही सुख दिलें नाहीं हें आपल्या हातून महत्पाप घडलें असें त्यांच्या मनानें घेतलें. या पापाचें परिमार्जन करण्यासाठींच म्हणून कीं काय त्यांनीं कित्येक दिवस साखर, विडा व बिछान्यांत गादी हीं वर्ज्य केलीं.

मथूताईच्या मृत्यूनें त्यांची वृत्ति अत्यंत निराश झाली. आपल्या सुखदुःखांची भागीदारीण, जीवितांतील जिवलग मैत्रीण गेली; आतां उभ्या आयुष्यांत आपणांस सुखाचा, आनंदाचा लाभ होणार नाहीं; आपण दुर्दैवी म्हणून आपणांस प्रिय असणारीं माणसें आपणांस शोकांत लोटून जातात, अशीच त्यांनीं आपल्या मनाची भावना करून घेतली. पश्चात्तापासारखें चमत्कारिक दुःख या विश्वांत दुसरें कोणतें असेल काय ? अजाणतां एकाद्यानें दुसऱ्या मनुष्यास दुःख दिलें व त्याची पूर्ण भरपाई करण्यास तो एका पायावर सिद्ध असतां, त्याची बिलकुल पर्वा न करतां त्या माणसानें मात्र स्वर्गाची वाट धरण्याचा निष्ठुरपणा करावा यासारखी अत्यंत शोचनीय गोष्ट या जगांत दुसरी कोणतीही नसेल ! मथूताईच्या मृत्यूनें हरिभाऊंचें जीवनाकाश निराशेच्या काळ्याकुट्ट ढगांनीं व्यापून टाकलें. त्या काळ्या मेघांच्या आडून आशासूर्य उगवून त्याच्या तेजस्वी किरणांनीं हरिभाऊंचें जीवन उज्ज्वल होण्यास अनेक वर्षे लागलीं एवढी गोष्ट मात्र खरी.

मथूताई १८९१ सालच्या माघ वद्य एकादशीस वारली. त्याच सालीं मे महिन्याच्या सुट्टींत रावसाहेब गोविंदराव व काशीताई महाबळेश्वरास बंगला घेऊन राहिलीं होतीं. हरिभाऊंची भोंवतालची परिस्थिति बदलली तर त्यांना थोडा आराम वाटेल, म्हणून त्या दोघांनीही हरिभाऊंना महाबळेश्वरास महिनाभर येऊन राहण्याचा आग्रह केला. त्यांच्या विनंतीस मान देऊन हरिभाऊ महाबळेश्वरास गेले. तेथील हवेनें त्यांच्या प्रकृतींत सुधारणा झाली. रावसाहेब व काशीताई यांच्या सहवासांत त्यांच्या वृत्तींतील खिन्नता कांहींशी कमी झाली. तीं तिघेंजण केव्हां लॉड्विक पॉइंट तर केव्हां कॉनॉट पीक, केव्हां बॅाँबे पॉइंट तर केव्हां एल्फिन्स्टन् पॉइंट इत्यादि सह्याद्रीच्या या टोंकावरून त्या टोंकावर सहल करीत असतां मनोरंजक वादविवादांत त्यांचा वेळ भराभर जाई. हिरव्यागार वृक्षांनीं परिवेष्टित असा तो नगराज हरिभाऊंचें

मन आकर्षण करून त्यांस त्यांच्या दुःखाचा क्षणमात्र विसर पाडी. सूर्याच्या एका किरणाचा सुद्धां जेथें प्रवेश होऊं शकत नाहीं अशीं तीं घनदाट अरण्यें, हिरव्या गार विशाल समुद्राचा भास उत्पन्न करणाऱ्या वृक्षलतांनीं भरलेल्या दऱ्या, लिंगमळ्याच्या बाजूस असणारे 'इष्टापुरी'चे मळे व रानगुलाबांचीं व रानकुसरीचीं सुंदर नाजुक फुलें, वेण्यातलावाची प्रातःकाळीं व सायंकाळी दिसणारी मजा व निरनिराळ्या टोंकांवरून दृष्टीस पडणारें सृष्टीचें अति मनोहर रमणीय स्वरूप त्यांच्या अंतःकरणांत आनंदाच्या लहरी उत्पन्न करी. हरिभाऊंशीं नाना प्रकारें बोलून त्यांचें दुःख हलकें करण्याचा काशीताईचा एकसारखा प्रयत्न चाले. एके दिवशीं फिरावयास जाऊन तीं तिघेंही आर्थर सीटवरून दिसणाऱ्या भव्य व रौद्र देखाव्याकडे पहात उभीं राहिलीं. त्या खोल खोल दऱ्या व एकामागून एक उभे राहिलेले सुळक्याचे उंच डोंगर पाहून त्यांची वृत्ति अत्यंत गंभीर झाली. त्या खोल दरीत वांकून पहात हरिभाऊंनीं काशीताईस विचारलें, " ताई, तुम्हांस येथें काय दिसतें ? " त्या भव्य देखाव्यानें ईश्वराच्या भक्तीनें अंतःकरण उचंबळून येऊन काशीताईनीं शांतपणें उत्तर दिलें, " स्वर्ग ! " परंतु त्यांनी तोच प्रश्न हरिभाऊंस करतांच त्यांनीं म्हटलें, " तुमच्या दृष्टीला येथें स्वर्ग दिसतो खरा, परंतु मला येथें ' मृत्यू 'वांचून कांहींच दिसत नाही!" एका दृष्टिला जेथें स्वर्ग दिसावा तेथेंच दुसऱ्याला मृत्यूचें दर्शन घडावें हें केवढें आश्चर्य ? परंतु हा फरक त्यांच्या भिन्न वृत्तींचाच निदर्शक नव्हे काय ? आकाश, तारका, फुलें, पर्वत, समुद्र यांना कोठें भावना असतात काय ? परंतु मनुष्यच आपल्या अंतःकरणांतील नाना भावना त्यांच्यावर आरोपित करून त्यांच्या दर्शनानें उल्हसित अथवा खिन्न होतो आणि म्हणूनच दुःखानें निराश झालेल्या हरिभाऊंच्या दृष्टीस जेथें मृत्यु दिसला तेथें काशीताईच्या धीरगंभीर व शांत दृष्टीस स्वर्गाचा भास झाला ! असो.

काशीताई त्यांस परोपरीनें उपदेश करीत. "आपल्या दुःखाचें जगांत प्रदर्शन न करतां निग्रह करून तें दुसऱ्यापासून लपविणें हाच शहाणपणा आहे. दुःख आंतल्या आंत गिळून दुसऱ्यांना आनंद देणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. दुर्बल रडतात, परंतु खरा वीर आत्मसंयमन करून हिमाचलाप्रमाणें धीरगंभीर राहतो. दुसऱ्यास सुख देण्यासारखें दुसरें कोणतेंच पुण्य नाहीं. स्वर्गस्थ मनुष्याबद्दल शोक करीत राहणें हें पापच आहे. " अशा नाना प्रकारच्या समजुतीच्या गोष्टी सांगून

काशीताईनीं आपल्या धाकट्या भावाचें सांत्वन करावें. वडील ताईची आज्ञा म्हणून हरिभाऊंनींही साखर खाण्यास पुनः आरंभ केला.

याच वेळीं रावसाहेब महादेव गोविंद रानडे यांचाही मुक्काम महाबळेश्वरासच होता. महाबळेश्वरास सकाळ संध्याकाळ हिंडतांना रानड्यांची व कानिटकर मंडळींची बहुधा रोज कोठें ना कोठें तरी गांठ पडावयाचीच. हरिभाऊंचें नांव आतां प्रसिद्ध लेखक म्हणून सर्वतोमुखीं झालें होतें. हरिभाऊ विधुर आहेत हें कळतांच आपल्या एका जिवलग स्नेह्याच्या उपवर कन्येस हें स्थळ चांगलें आहे असें वाटून यासंबंधी शब्द टाकण्यास रावसाहेब रानडे काशीताईच्याकडे स्वतः आले व त्यांनीं सर्व मंडळींस भोजनाचें निमंत्रण केलें. त्याप्रमाणें गोविंदराव, काशीताई व हरिभाऊ इत्यादि मंडळी रानड्यांच्या बंगल्यावर गेली. जेवणें झाल्यावर रावसाहेब रानड्यांनीं ही गोष्ट हळूंच काशीताईच्या जवळ काढली. त्यावर काशीताईनीं उत्तर दिलें, " ही मुलगी पडली सुधारकाची ! ह्याबद्दल जर कां चिमामावशींच्याकडे मी बोलणें सुरू केलें तर त्या माझी चांगलीच हजिरी घेतील. एवढेंच नव्हे तर हरिभाऊंचीही खरडपट्टी निघून त्यांना आमचें घर वर्ज्य करावें लागेल ! तेव्हां अशा प्रकारची बिकट परिस्थिति निर्माण करण्यापेक्षां हा प्रश्न येथेंच राहूं द्यावा हें बरें. " रावसाहेब रानड्यांनाही काशीताईचें हें सयुक्तिक भाषण पटलें व ती गोष्ट तितकीच राहिली. असो.

अशा रीतीनें कानिटकर मंडळींच्या सहवासांत, महिना दीड महिना घालविल्या-नंतर हरिभाऊ महाबळेश्वराहून पुण्यास आले. तेथील हवेनें त्यांच्या प्रकृतींत सुधारणा होऊन, वृत्तीची खिन्नता कांहींशी कमी झाली होती. परंतु घरीं येतांच त्यांच्या मनाची स्थिरता नाहींशी होण्याजोग्या गोष्टी त्यांच्या कानावर येऊं लागल्या. त्या काळीं मृत पत्नीच्या सुतकांतही नवीन वधू पाहण्यास कोणास दिक्कत वाटत नसे. कसेबसे बाराव्यातेराव्याचे दिवस लोटायचे आणि शुभ मुहूर्त शोधून विधुरास पुनः चतुर्भुज करून टाकावयाचें, ही तेव्हांची प्रचलित पद्धति ! फारसा धीर न धरविल्यानें कित्येक विधुरांनीं पत्नीच्या मृत्यूनंतर पंधराव्या अथवा सोळाव्या दिवशीं लग्नें लाविलेलीं कित्येकांच्या ऐकिवांत असतील. पत्नि-वियोगानें दुःखित झालेला विधुर पन्नाशी उलटलेला असला तरी त्याला लग्नावांचून राहूं देणें आमच्या समाजाच्या दृष्टीला कसेंसेंच वाटे. ही झाली वयोवृद्ध नवरदेव

होऊं इच्छिणाऱ्या विधुरांची स्थिति ! मग ज्याचें वय केवळ सत्तावीसअठ्ठावीस वर्षांचें, त्यानें बायको वारल्यानंतर तीन महिने लोटले तरी लग्न करूं नये, लग्नाचे मुहूर्त खुशाल वांया जाऊं द्यावे व घरांतल्या वडील मंडळींनीं त्याच्या देखत दुसऱ्या लग्नाची गोष्ट काढतांच पाण्यानें डोळे भरून आणावे हा प्रकार सर्वांस किती तरी चमत्कारिक वाटला असेल ! हरिभाऊ बाहेरून घरांत येतांच चिमामावशींनीं व बगूताईनीं लग्नाच्या गोष्टी काढाव्या. केव्हां केव्हां फार झालें म्हणजे हरिभाऊ त्यांस, "मला लग्न करावयाचें नाहीं," असें स्पष्ट सांगत. परंतु त्याकडे लक्ष न देतां चिमामावशींनीं नव्या सुनेस घालण्याकरितां निरनिराळे अलंकार घडवून हरिभाऊंना दाखवावे. एकदां असाच नवा चंद्रहार मावशींनीं हरिभाऊंस दाखविला. तेव्हां हरिभाऊ म्हणाले, " मावशी, मला लग्न करावयाचें नाहीं, हें पक्कें माहीत असतां विनाकारण हे दागिने कशाला घडवितेस ? " " तुला काय त्यांत समजतं ! नव्या सूनबाईला दागिने हवेतच, " असें मावशींनीं उत्तर दिलें. परंतु हरिभाऊंच्या निश्चयी स्वभावाची पूर्ण कल्पना असल्यानें मावशींना अधिक उणें न बोलतां गप्प बसणें भाग पडे. अण्णासाहेबांचें उदाहरण प्रत्यक्ष समोर असतां हरिभाऊंनीं अविवाहित राहणें घरांत कोणास पसंत पडणार ? खुद्द अण्णासाहेबांनी सुद्धां हरिभाऊंच्या हातून आपल्या सारख्या चुका होऊं नयेत म्हणून त्यांस लग्न करण्याचा आग्रह चालविला ! स्वतःप्रमाणें हरिभाऊंचें तरी जन्माचें नुकसान न व्हावें हीच त्यांची इच्छा होती. हरिभाऊंच्या दुसऱ्या लग्नांत नव्या नवरीच्या अंगावर सारे दागिने घालण्याचें त्यांनीं कबूल केलें; एवढेंच नव्हे तर हरिभाऊंना सांगून आलेल्या मुलीही ते पाहूं लागले. अण्णासाहेबांच्या प्रमाणेंच नानासाहेबांचीही हरिभाऊंनीं लवकर लग्न करावें अशी इच्छा होती. त्याप्रमाणें त्यांनीं हरिभाऊंस सांगून टाकलें. आपलें खरें मत एकदां स्पष्ट सांगून मोकळें व्हावयाचें, अशी नानासाहेबांची रीत असे. बगूताईनीं तर हरिभाऊंच्या लग्नाचा जसा कांहीं ध्यासच घेतला. याच सुमारास त्या फार आजारी झाल्या. एके दिवशीं संध्याकाळीं हरिभाऊ घरीं आल्यावर आजीनें त्यांना जवळ बोलाविलें. हरिभाऊ जवळ जातांच त्यांच्या पाठीवरून हात फिरवून आजी म्हणाली, " तात्या, तुझं लग्न झाल्यावांचून माझा जीव जायचा नाहीं ! ' दुसरं लग्न करीन, ' असं मला वचन दे, नाहीं तर माझा प्राण इथंच अडकून राहील ! " आजीच्या या प्रेमळ

बोलानें हरिभाऊंचें मन द्रवलें व जिनें लहानपणापासून आपले सर्व लाड पुरविले व आपल्यावर ममता करून आपणांस मातेची उणीव भासूं दिली नाहीं, जी आपल्या-विषयीं रात्रंदिवस काळजी करीत असते, त्या आपल्या आजीची एकच एक इच्छा अमान्य करणें हरिभाऊंना अशक्य झालें ! प्रेमळ हृदयाची जगांत नेहमीं अशीच ओढाताण होत असते. दुसऱ्याच्या दुःखाच्या धगीनें निःस्वार्थी व नवनीतापेक्षांही मृदु असें हृदय वितळून जाऊन आपल्या स्वतःच्या सर्व इच्छा तात्काल दूर सारून तें दुःखनिवारणार्थ सिद्ध होतें. किंचित् सद्गदित झालेल्या अशा हरिभाऊंच्या कंठांतून, "आई, तूं म्हणशील तें मी करीन," असा कबुली जबाब येतांच बगूताईस फार समाधान झालें.

आजीचें समाधान हरिभाऊंनीं केलें खरें; परंतु त्यांच्या स्वतःच्या हृदयाचें समाधान कसें होणार ? दुसरें लग्न न करतां आपल्या मृत पत्नीचें चिंतन करीत लोकसेवेंत आपलें आयुष्य वेचावें ही त्यांची खरी मनापासूनची इच्छा ! बालविवाहाविरुद्ध आपण अनेकदां टीका केली असतां पुनः एका लहान दहा वर्षांच्या मुलीबरोबर विवाहबद्ध होण्याची कल्पना त्यांना कशीशीच वाटली. दुसरें लग्न करावयाचेंच झाल्यास एकाद्या गतधवेशीं करावें असा त्यांचा निश्चय होत चालला. प्रौढविवाह, पुनर्विवाह इत्यादि सुधारणांच्या पुरस्कर्त्यानें स्वतः प्रतिपादन केलेलीं मतें आचरणांत आणून दाखविल्याशिवाय त्यांचा समाजावर काय परिणाम होणार ? याच सुमारास त्यांचे दोघे परम मित्रही विधुर झाले होते. सुखदुःखांच्या गोष्टी करण्यास ते तिघेही आनंदाश्रमांत जमत. परिस्थिति सारखी, विचार सारखे, यामुळें त्यांना एकमेकांच्या सुखदुःखांचे सहभागी सहज होतां येई. दुसरें लग्न करावयाचेंच नाहीं असा तिघांचाही निश्चय ठरला व जर कदाचित् लग्न करण्याचा प्रसंग आलाच तर पुनर्विवाह करावयाचा असा त्यांनीं बेत केला. या त्यांच्या विचारास पोषक अशीच परिस्थिति त्या वेळीं पुण्यांत निर्माण झाली होती.

इ. स. १८९१ हें साल महाराष्ट्रांतील सामाजिक सुधारणेच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचें व संस्मरणीय आहे. नवीन सुधारकांच्या मनःस्थितीचें व सुधारणा-विरोधी जुन्या धर्माभिमान्यांच्या क्षुब्ध अंतःकरणाचें गंमतीदार स्वरूप त्यांत प्रति-बिंबित झालें आहे. डॉ. सौ. आनंदीबाई जोशी यांचे पति गोपाळराव यांच्या मनांत कांहीं बोलक्या परंतु भित्र्या तरुण सुधारकांची चेष्टा करण्याचें आलें व

त्यांनीं पंचहौद-मिशनमधील रेव्हरंड रिव्हिंग्टन्‌साहेबांस भेटून तेथें एक व्याख्यान आणि नंतर चहा व अल्पोपहार करण्यासाठीं पुण्यांतील सुधारकांस निमंत्रणकार्डें पाठविलीं. पंचहौदमिशनमध्यें पार्टीस आलेल्या सुशिक्षितांत रावबहादूर रानडे, श्री. टिळक, गोविंदराव कानिटकर, प्रो. गोखले, प्रो. वासुदेवराव केळकर, श्री. वासुदेवराव जोशी, प्रो. पानसे इत्यादि बेचाळीस गृहस्थ हजर होते. हरिभाऊंचा चुलतभाऊ त्याच दिवशीं वारल्यामुळें हरिभाऊंना आमंत्रण असूनही पंचहौदमिशन-मध्यें ते जाऊं शकले नाहींत.

व्याख्यात्यांचें व्याख्यान नीरसच झालें. परंतु व्याख्यानानें झालेली निराशा दूर करण्याकरतां म्हणूनच कीं काय दुसऱ्या एका हॉलमध्यें चहाची व्यवस्था करण्यांत आली होती. व्याख्यान झाल्यावर अर्थात् सर्व पाहुण्यांना तिकडे नेण्यांत आलें. शुभ्र अशा रुमालांनीं आच्छादिलेल्या मेजावर चहा, बिस्किटें वगैरे व्यवस्थित मांडून ठेविलीं होतीं. व्यवस्थापकांत गोपाळराव विशेष चमकत होते, हें सांगाव-यास नकोच. चहाबिस्किटांचा उघड अवमान करण्याची कोणाचीच छाती झाली नाहीं. कांहींनीं चहाचा सबंध कप खलास केला तर कांहींनीं घोटभर चहा घेऊन कप दूर सारला. कांहीं धूर्तांनीं मात्र चहास स्पर्श न करतां चहा पिण्याचा उत्तम बहाणा केला. आपला बेत सिद्धीस गेला हें पाहून गोपाळरावांस मनांतून अत्यंत आनंद झाला. चहाचा समारंभ आटोपतांच ‘ पुणें-वैभव ’ कचेरीकडे निमंत्रित गृहस्थांची यादी घेऊन गोपाळराव घाईघाईनें निघून सुद्धां गेले ! दुसऱ्याच दिवशीं हजर राहिलेल्य व त्याप्रमाणेंच हजर न राहिलेल्या सद्‌गृहस्थांचीं नांवें ‘ पुणें-वैभवां ’त प्रसिद्ध होऊन सारें पुणें क्षुब्ध झालें !

या चहाच्या पेल्यांतील वादळांत सांपडलेल्या कुटुंबांची अनुकंपनीय स्थिति झाली. चहा प्यालेल्या गृहस्थांचीं कुटुंबें वाळीत पडलीं. भटाभिक्षुकांनीं त्यांच्या घरचीं धर्मकृत्यें करण्याचें साफ नाकारलें. खुद्द चहापानास हजर राहणाऱ्या गृह-स्थांना त्यांच्या घरांतील मंडळी जवळ जवळ अस्पृश्यच समजूं लागली. या सुधारकांच्या मुलींना माहेर अंतरलें. हें चहाप्रकरण विशेषतः घरांतील स्त्रियांस अत्यंत जाचक झालें. जेवणाचें तर नांवच नको; परंतु हळदीकुंकवासारख्या समारंभास त्यांना कोणी बोलावीना व त्यांच्याकडेही कोणी येईना. रावसाहेब रानड्यांनीं आपल्या घरींच दोन भिक्षुक ठेविले व त्यांनीं या लोकांची बरीच गैरसोय दूर

केली. परंतु असें किती दिवस चालणार ? " सासरीं येऊन फार दिवस झाले, आम्हांला माहेरीं घेऊन जा," अशीं आईबापांस भेटण्यास उत्सुक असलेल्या मुलींचीं पत्रें येऊं लागलीं. मुली फारां दिवसांत भेटल्या नाहींत म्हणून त्यांच्या माताही टिपें गाळूं लागल्या ! यामुळें कुठून त्या मिशनमध्यें जाऊन चहा प्यायलों असें कित्येकांस वाटलें असल्यास फारसें नवल नाहीं !

पुण्यांतील ग्रामण्याचा निकाल लावण्यासाठीं खुद्द शंकराचार्यांना या वादांत पडावें लागलें. सांगलीकरांच्या वाड्यांत श्रींची स्वारी न्यायासनावर बसली व चहावाल्या आरोपींना त्यांच्याकडून हजर राहण्याचीं आज्ञापत्रें आलीं. बिचारे करतात काय ? घरांतल्या व बाहेरच्या त्रासास कंटाळून श्रीनीं दिलेल्या हुकमा-प्रमाणें कांहीजण प्रायश्चित्तास कबूल झाले. तरीही कांही सुधारक प्रायश्चित्तास तयार होईनात. शेवटीं या लोकांची समजूत पाडण्यासाठी रावबहादूर रानडे लोणावळ्याहून स्वतः पुण्यास आले व त्यांनीं भिक्षुकांस बोलावून स्वतः प्रायश्चित्त घेतलें. तेव्हां मात्र गोखले, वासुदेवराव केळकर, वासुकाका जोशी इत्यादि मंडळीं-खेरीज सर्वांनीं प्रायश्चित्त घेतलें व अशा रीतीनें आकस्मिक उद्भूत झालेलें हें चहाच्या पेल्यांतील वादळ इ. स. १८९२ सालच्या डिसेंबरांत शांत झालें.

चहाच्या एका थेंबाचा सुद्धां स्पर्श झाला नसतांही हरिभाऊंना या चहा-प्रकरणानें छळण्यास बिलकुल कमी केलें नाही ! ' पुणें-वैभवां 'त त्यांचें नांव वाचतांच नानासाहेब फार रागावले. घरीं धर्मकृत्यें करण्यास ब्राह्मण मिळेनासे झाले. याच सुमारास बगूताई अतिशय आजारी पडल्या. त्यांचें म्हातारपण बरेंच झालें होतें. त्यांस पुष्कळ दिवस दिसतही नसे. एके दिवशीं आजीला रात्रीं भेटून हरिभाऊ आनंदाश्रमांत परत आले. मथूताई गेल्यापासून ते फक्त जेवायला घरीं जात व बाकीचा सर्व वेळ आनंदाश्रमांतच घालवीत. त्या रात्रीं स्वप्नांत येऊन आजी त्यांस म्हणाली, " हरी, जातें रे मी ! " त्या स्वप्नामुळें छातींत धस्स होऊन ते एकदम जागे झाले व जिना उतरून खाली आले. भय्यास किती वाजले म्हणून विचारतांच भय्यानें उत्तर दिलें, " दोन ! " इतक्यांत घरून एका मनुष्यानें येऊन त्यांस बगूताई गेल्याची बातमी सांगितली. तें चमत्कारिक स्वप्न व त्याचें तें आश्चर्य-कारक प्रत्यंतर पाहून हरिभाऊ चकित झाले. आजीच्या मृत्यूची दुःखदवार्ता ऐकून त्यांना अत्यंत वाईट वाटलें व ते तसेच तावडतोब घरीं गेले.

दुसरे दिवशीं तारा जातांच अण्णासाहेब व नानासाहेब पुण्यास आले. चहा-प्रकरणामुळें घर वाळीत असल्यानें बाराव्यातेराव्यांस भिक्षुक येईनात. अण्णासाहेबांनीं १० रु. दक्षिणा देण्याचें जेव्हां कबूल केलें तेव्हां कुठें भिक्षुक सर्व धर्मविधि करण्यास तयार झाले! बगूताई जिवंत होत्या तोंपर्यंत अण्णासाहेब त्यांस दरमहा पन्नास रुपये देवधर्मासाठीं देत. त्यांच्या उत्तरक्रियेकरितां त्यांनीं हजार दीड हजार रुपये खर्च केला.

ग्रामण्यामुळें जेव्हां घरांतील मंडळींना त्रास होऊं लागला, तेव्हां अण्णासाहेबांनीं हरिभाऊंना "पंचहौदमिशनच्या चहापार्टीस मी हजर नव्हतों," असें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्यास सांगितलें. तेव्हां "माझा तेथें जाण्याचा इरादा होता; तेथें जाण्याचें मी कबूल केलें होतें. कांही कारणानें मी तेथें हजर राहूं शकलों नाहीं, ही गोष्ट वेगळी. तेव्हां आपण सांगतां त्याप्रमाणें मला ही गोष्ट वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करतां येत नाहीं," असें हरिभाऊंनीं सडेतोड उत्तर दिलें. पण अण्णासाहेबांनीं "श्री. हरि नारायण आपटे हे पंचहौदमिशनमधील चहापार्टीस हजर नव्हते," असें आपण होऊन प्रसिद्ध केल्यामुळें त्यांचा नाइलाज झाला. त्याचा परिणाम असा झाला कीं, हरिभाऊंना ग्रामण्यांतील पंचांनीं निर्दोषी म्हणून सोडून दिलें व त्यांजवरील बहिष्कार उठला. याच सालीं संमतिवयाच्या बिलानें सनातन धर्माच्या अभिमान्यांचीं माथीं अगदी खवळून गेलीं होतीं. तुळशीबागेत या कायद्याचा विरोध करण्याकरितां वे. शा. सं. रामशास्त्री आपटे यांच्या अध्यक्षतेखालीं शास्त्रीलोकांची व शहरांतील प्रतिष्ठित मंडळींची सभा झाली. या तुळशीबागेंतील सभासदांस उद्देशून जें विनंतिपत्रक निघालें, त्याखालीं हरि नारायण आपटे, गोविंदराव कानिटकर, वैजनाथ काशिनाथ राजवाडे, वासूकाका जोशी, नारायण सखाराम पानसे, महादेव दिनकर जोशी, इत्यादि गृहस्थांच्या सह्या होत्या. अण्णासाहेब संमतिवयाच्या कायद्याच्या अगदीं विरुद्ध व हरिभाऊ त्यास अनुकूल, अशी स्थिति असल्यानें आनंदाश्रमाच्या दुसऱ्या मजल्यावर हरिभाऊ व त्यांचे मित्र यांची बिलास अनुकूल चर्चा चाले, तर तिसऱ्या मजल्यावर अण्णासाहेब व त्यांचे सनातन धर्मानुयायी स्नेही यांचा या बिलाविरुद्ध जोराचा वादविवाद होई. परंतु अशा या सामाजिक मतभेदानें अण्णासाहेबांचा हरिभाऊंच्या विषयीं गैरसमज झाला नाहीं हें विशेषच होय.

## पंडिता रमाबाई व शारदासदन

हरिभाऊंना स्त्रीशिक्षणाबद्दल अत्यंत कळकळ होती, हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां पंडिता रमाबाईसारख्या विदुषी स्त्रीबद्दल त्यांना अत्यंत आदर वाटावा हें साहजिकच आहे. पंडिता रमाबाई पुण्यास आल्या तेव्हां त्यांची जागोजाग पुराणें व व्याख्यानें करविण्याच्या कामीं हरिभाऊंनीं बराच पुढाकार घेतला होता. ते स्वतः त्यांच्या व्याख्यानाला जात, एवढेंच नव्हे तर मथूताईसही नेत. पंडिता रमाबाईच्या हातून मोठेंच शिक्षणकार्य होईल अशी न्या. रानडे, डॉ. भाण्डारकर इत्यादि पुढाऱ्यांस आशा वाटूं लागली होती. पंडिता रमाबाईचा ठिकठिकाणीं सन्मान होऊं लागला. त्यांच्या व्याख्यानांस व पुराणांस सुशिक्षित सुधारकांच्या घरांतील पुष्कळ स्त्रिया जमत.

एकदां हरिभाऊ व त्यांचे उत्साही स्नेही यांनीं मिळून मेहेंदळ्यांच्या बागेंत पंडिता रमाबाई व मिस् हॅमलिन् या दोघींना मोठी मेजवानी दिली. हरिभाऊ आदिकरून त्यांचे स्नेही व त्यांच्या पत्न्या यांनाही मुद्दाम बोलावलें होतें. यालाच कोणीं सहभोजन असें नांव दिलें. हरिभाऊंच्या घरीं हें समजतांच त्यांना या बाडगे-पणाबद्दल बरींच बोलणीं ऐकून घ्यावीं लागलीं.

परंतु विलायतेला जाऊन जेव्हां पंडिता रमाबाईनीं स्वधर्माचा त्याग केला व ख्रिश्चन धर्म स्वीकारला तेव्हां महाराष्ट्रांतील स्त्रीशिक्षणाच्या कैवाऱ्यांना फार वाईट वाटलें. तेथून परत येऊन अमेरिकन मिशनऱ्यांच्या साहाय्यानें रमाबाईनीं प्रथम कांहीं वर्षे मुंबईस व नंतर पुण्यास ' शारदासदन ' या नांवाचें खास स्त्रियांसाठीं एक विद्यालय सुरू केलें. सदनाच्या साहाय्यक मंडळींत न्या. रानडे, डॉ. भाण्डार-कर, न्या. तेलंग, मोडक, पंडित इत्यादि गृहस्थ होते. हळूहळू पंडिताबाईचें खरें स्वरूप प्रगट होऊन शारदासदनाचा हेतु केवळ स्त्रीशिक्षण हा नसून शुभवर्तमान-प्रसाराचा आहे, असें स्पष्ट दिसूं लागलें. तेव्हां आमच्या पुढाऱ्यांनीं साहाय्यक मंडळांतील आपलीं नांवें काढून घेतलीं. अशी कर्तृत्ववान, विद्वान् स्त्री हिंदु समाजांतून गेल्यामुळें हरिभाऊंना अत्यंत वाईट वाटलें. पंडिता रमाबाई महा-राष्ट्रीय स्त्रियांत शिक्षणाचा प्रसार करून स्त्रियांच्या उन्नतीप्रीत्यर्थ झटतील अशी हरिभाऊंना खात्री वाटत होती. पण काय ? पंडिताबाईनीं स्वधर्मत्याग केल्यामुळें सुधारणाविरोधकांना अद्वातद्वा टीका करण्यास आयतेंच छिद्र सांपडलें. असो. अशा रीतीनें घरांतील व बाहेरील परिस्थिति हरिभाऊंस विशेष अनुकूल नव्हतीच.

घरांतून दुसऱ्या लग्नाचा आग्रह एकसारखा सुरूच होता. हरिभाऊंचें नांव त्या काळच्या प्रसिद्ध सुधारकांत गणलें गेल्यानें त्यांच्याबद्दल सुधारकांस साहजिकच अनेक अपेक्षा होत्या. " सुधारणेच्या ज्या गोष्टी आपण समाजांत बोलतों त्या प्रत्यक्ष करून दाखविल्या पाहिजेत, नाहींतर आपल्या मतांवर कोण विश्वास ठेवील ? खरें पाहिलें असतां प्रथम पत्नीच्या मृत्यूनंतर आपण संन्यस्त वृत्तीनेंच राहिलें पाहिजे. आपल्या समाजांतील बालविधवा जर आजन्म ब्रह्मचर्य-वृत्तीनें राहूं शकतात तर पुरुषांनीं तरी संन्यस्त वृत्तीनें कां राहूं नये? दुसरा विवाह करणें हा खरोखरी गौणच पक्ष होय. " असे विचार त्यांच्या मनांत घोळत व ते वारंवार मावशींस सांगत, " मावशी, मी चांगला संन्यस्त वृत्तीनें राहीन. घरांतील माणसांना सोडणार नाहीं. तुम्हां सर्वांची जबाबदारी घेईन. पण दुसरें लग्न करण्याचा आग्रह धरूं नकोस. " " दुसरें लग्न केलेंस तर आम्ही तुझे आहोंत. नाहीं तर आम्हांला तुझ्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. " असें चिमामावशी त्यावर उत्तर देत. अण्णासाहेबांनीं तर फळांच्या करंड्या घेऊन मुली पाहण्याचा सपाटा चालविला. नाताळच्या सुट्टींत अण्णासाहेब व नानासाहेब दोघेही पुण्यास आले होते. त्याच वेळीं हरिभाऊंचें लग्न करून टाकावें असा त्यांनी बेत योजिला. परंतु हरिभाऊंनीं कोणाच्या तरी करवीं " मला लग्न करावयाचें नाहीं," असें त्यांच्या कानावर घातल्यानें त्यांचा नाइलाज झाला ! हरिभाऊ ऐकत नाहींत म्हणून अण्णासाहेबांस व नानासाहेबांस अत्यंत राग आला. परंतु त्यांना बोलणार काय ? " त्याच्या मनांत नाहीं तर विनाकारण या भानगडी करूं नयेत " असें ठरवून सुट्टी संपतांच ते दोघेही निघून गेले.

आनंदाश्रमासारख्या संस्थेची जबाबदारी त्यांजवर असल्यानें त्या संस्थेच्या नियमांप्रमाणें बागावयाचें झाल्यास हरिभाऊंस पुनर्विवाह करणें अशक्यच होतें. त्यांनीं पुनर्विवाह केला असता तर नानासाहेबांनीं व अण्णासाहेबांना त्यांचें मुखावलोकनही केलें नसतें. पुनर्विवाह करणें म्हणजे कुटुंबांतील आप्तजनांस मुकणें असाच त्याचा तेव्हां अर्थ होत असे. हरिभाऊ अजूनही परावलंबी असून स्वतंत्र रीतीनें संसार चालविण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आलें नव्हतें. " मी सर्वांना संभाळीन." या नानासाहेबांस दिलेल्या वचनानें ते बांधले गेले असून, त्यांच्या वरच घरांतील मंडळींचा सारा भरंवसा होता. त्यांचें अंतःकरण अत्यंत प्रेमळ असल्यानें आपल्या आप्तजनांचीं मनें दुखविण्याचें धैर्य त्यांस होईना.

## कुटुंबांतील मंडळींचा अबोला

परंतु पुण्यांत मात्र हरिभाऊ व त्यांचे मित्र पुनर्विवाह करणार अशा एकसारख्या वातम्या उठत होत्या. चिमामाबशींच्या कानांवर त्या गोष्टी जातांच कांहीं तरी करून हरिभाऊंचें लग्न करावेंच असें त्यांना वाटे. हरिभाऊंच्या आजोळच्या परांजपे मंडळींपर्यंत ही बातमी जाऊन पोहोंचतांच त्यांच्या आजीस फार दुःख झालें. १८९१ सालच्या कॉंग्रेससाठीं हरिभाऊ नागपूरला गेले होते. परांजपे मंडळी त्या वेळीं तेथेंच असल्यानें हरिभाऊ त्यांच्याकडेच उतरले होते. नातवास पाहून आजीस आनंद वाटला. परंतु पुनर्विवाहाच्या व त्यांच्या सुधारकी मतांच्या गोष्टी तिच्या कानांवर गेल्यामुळें ती मनांत फार कष्टी झाली. पुण्यास परत जाण्याच्या आदले दिवशीं हरिभाऊंस बोलावून आजीनें जवळ बसवून घेतलें व डोळ्यांत पाणी आणून ती म्हणाली, "हरी, माझी एक गोष्ट ऐकशील का?" हरिभाऊंनीं विचारलें, "आई, कोणती गोष्ट?" त्यावर आजीनें म्हटलें "हरी, तूं कुणाही मुलीशीं लग्न कर, तिला शिकव, वाटेल तें कर, पण पुनर्विवाह करूं नकोस. नाहीं तर आम्हां सर्वांना तूं मुकशील! तुला जें काय करायचें असेल तें मला आतांच खरं सांग." कांहीं एक न बोलतां हरिभाऊ उठूं लागले, तेव्हां त्यांस जाऊं न देतां आजी म्हणाली, "मला उत्तर दिल्यावांचून मी तुला जाऊं देणार नाहीं." आजी कांहीं केल्या सोडीना म्हणून हरिभाऊंना उत्तर दिल्यावांचून गत्यंतर राहिलें नाहीं. "मी बहुधा पुनर्विवाह करणार नाहीं." असें बोलून हरिभाऊ तेथून निघून गेले.

हरिभाऊ दुसरें लग्न करीनात तेव्हां कुटुंबांतील सर्व मंडळींनीं त्यांच्याशीं अबोला धरला. घरीं जेवायला गेले तरी त्यांच्याशीं कोणीं एक शब्दही बोलूं नये. हरिभाऊंचा स्वभाव जात्याच बोलका व विनोदी असल्यानें त्यांना हा अबोला साहजिकच असह्य झाला. घरांतील माणसांची परकेपणाची वागणूक त्यांस फार जाचक झाली.

अण्णासाहेब व नानासाहेब या दोघांनींही हरिभाऊंच्या लग्नाच्या बाबतींत बिलकुल लक्ष घालावयाचें नाहीं असें ठरविलेलें पाहतांच चिमामाबशींना वाईट वाटलें व त्यांनीं आपल्याकडून होईल तितकी लग्नाची खटपट करण्यास सुरुवात केली. हरिभाऊंचे स्नेही प्रो. नानासाहेब पानसे यांनीं आपल्या मित्रासाठीं सुशिक्षित वधू शोधण्याचा क्रम चालू केला. त्याच सुमारास बारामतीचे श्री. बळवंतराव चोळकर वकील व नानासाहेब पानसे यांची गांठ पडली. चोळकर वकील व नानासाहेबांचे वडील यांचा चांगला स्नेह असल्यानें नानासाहेबांच्या बद्दल त्यांना माहिती होती.

चोळकरांची दुसरी कन्या वेणूताई अकरा वर्षांची असून तिच्यासाठीं ते स्थळ शोधीतच होते. तेव्हां हरिभाऊंच्या बद्दल त्यांनीं पानसे यांच्या जवळ चौकशी केली. वेणूताई त्या काळच्या मानानें बरेंच म्हणजे मराठी पांच इयत्ता शिकलेल्या होत्या. त्यामुळें नानासाहेबांनाही हरिभाऊंस ही मुलगी योग्य आहे असें वाटलें व "याबद्दल हरिभाऊंना मी विचारतों," असें त्यांनीं श्री. चोळकर यांना सांगितलें. हरिभाऊ मुलगी पाहण्यास कसेबसे कबूल झाले. प्रो. पानसे यांस बरोबर घेऊन हरिभाऊ मुलीस पाहण्यास गेले. मुलगी सुदृढ असल्यानें अकरा वर्षांची असूनही तेराचौदा वर्षांची वाटे. मुलीच्या कडून वाचून घेतलें व त्यावरून ती हुषार आहे अशी त्यांची खात्री झाली. सुधारणेच्या कोणत्याच गोष्टी साधत नाहींत तर निदान शिकलेली तरी मुलगी करावी असा हरिभाऊंचा निश्चय झाला होता. चोळकरांची मुलगी चांगल्या घराण्यांतील व विशेषतः शिकलेली असल्यानें हरिभाऊंस व त्यांच्या मित्रास पसंत पडली.

चहाप्रकरणामुळें हरिभाऊंची पुण्यांत सुधारक म्हणून विशेषच प्रसिद्धि झाली होती. परंतु श्री. चोळकर व त्यांचे सासरे तात्यासाहेब जोग ( हुंडीवाले ) यांच्या कानांवर हरिभाऊंच्या सुधारकी विचारांच्या गैरसमज उत्पन्न करणाऱ्या गोष्टी जातांच या ठिकाणीं मुलगी द्यावी कां न द्यावी असा पेंच त्यांस येऊन पडला. ते दोघेही जुन्या विचारांचे व स्नानसंध्याशील असल्यानें त्यांना असा प्रश्न येऊन पडणें स्वाभाविक होतें. परंतु प्रो. पानसे हे चोळकर वकिलांच्याकडे गेले व त्यांनीं हरिभाऊंच्याबद्दलची खरी वस्तुस्थिति सांगून त्यांचा गैरसमज दूर केला. दोन महिने हें प्रकरण घोळून घोळून शेवटीं श्री. चोळकर मुलगी देण्यास तयार झाले. "दिवसेंदिवस सुधारणेच्या नव्या गोष्टी होतच जाणार; हरिभाऊ विद्वान् असून आचरणानें व स्वभावानें फार चांगले आहेत. त्यांना शिक्षणाची आवड असल्यानें, आपल्या मुलीच्या शिक्षणाचें ते चीजच करतील," असा विचार करून त्यांनीं हें स्थळ निश्चित केलें. बोलण्यावरून बोलणें निघतां ते प्रो. पानसे यांना म्हणाले, " नारायणराव, आगगाडींत सुद्धां माणसें फराळाचें खाऊं लागलीं ! वर्ण-संकर व्हावयाचा आतां कुठें राहिला आहे ! "

या दुसऱ्या विवाहाच्या बाबतींत हरिभाऊंच्या हातून सुधारकास साजेसें बाणे-दारपणाचें वर्तन झालें नाहीं, ही गोष्ट खरी असली तरी, त्यांच्या भोंवतालची

## अखेर लग्नास कबूल झाले !

परिस्थिति अत्यंत बिकट होती हें लक्षांत घेतलें असतां त्याबद्दल कोणास विशेष आश्चर्य वाटणार नाहीं. तरुणांनीं वडील माणसांचें कोणत्या बाबतींत ऐकावें, त्यांच्या आज्ञापालनाची मर्यादा कोठपर्यंत असावी, याचाही जरूर विचार झाला पाहिजे. आपल्या मताप्रमाणें वागण्याचा आटोकाट प्रयत्न हरिभाऊंनी केला. परंतु परिस्थिति त्यांस सर्वस्वीं प्रतिकूल होती. म्हणूनच त्यांचा नाइलाज झाला. या दुसऱ्या लग्नाच्या बाबतींत कोणीं विरोधी टीका केली तर ती हरिभाऊंस पटे. इतकेंच नव्हे तर स्वतःची बाजू ते केव्हांही पुढें मांडीत नसत. परंतु ज्यांस परिस्थिति अनुकूल आहे, वडील मंडळींस किंचित् विरोध करतांच ते आपल्या म्हणण्याप्रमाणें करतील अशी ज्यांची खात्री आहे असे, वडिलांच्या विचारास विरोध न दर्शवितां हृदयांतील उदात्त भावनांचा खून पाडणारे व आपणांस पूर्ण पटलेल्या अशा सुंदर विचार-सुमनांना चुरगाळून दूर फेंकून देणारे सुशिक्षित तरुण हल्लींच्या सुधारलेल्या समाजांतही शेंकडोंनीं सांपडतील. मग त्या वेळची गोष्ट तर बोलावयासच नको. तो काळ सामान्यत्वें-करून मतप्रदर्शनाचा होता. सामाजिक सुधारणेची ती प्रथमावस्था होती. प्रथमतः विचारांत क्रान्ति व मग आचरण हा क्रमच आहे. तत्कालीन परिस्थितींत स्वतःच्या मतांप्रमाणें आचरण करणें अत्यंत दुर्घट होतें व सुधारणेच्या आद्य आचार्यांची व प्रणेत्यांची सुद्धां आचरणाच्या दृष्टीनें लटपटच उडाली होती. या दृष्टीनें पाहतां हरिभाऊंना कोणी फारसा दोष देईल असें वाटत नाहीं.

हरिभाऊंच्या सारख्या भावनाप्रधान मनुष्याच्या हृदयाचे या कठोर व्यावहारिक जगांत अतिशय हालच होत असतात. अशा मनुष्याची सर्व जगाबद्दल सहानुभूतीची वृत्ति असल्यानें दुसऱ्याला दुःख देण्यापेक्षां स्वतः अत्यंत तीव्र मानसिक वेदना सोसण्यास तो तयार होतो. परंतु त्याची जरी सर्व जगाबद्दल सहानुभूतीची दृष्टि असली तरी त्याच्याबद्दल तशी कोणाचीच दृष्टि नसल्यानें त्यानें निराश व्हावें यांत काय नवल ? आनंदाश्रमांतील धर्मकृत्यें पार पाडण्यासाठीं त्यांस सहधर्मचारिणीची जरूरच होती. कुटुंबासंबंधीं व आश्रमासंबंधीं कर्तव्य या जाणीवेनेंच ते दुसऱ्या लग्नास तयार झाले. कर्तव्यावांचून दुसऱ्या कोणत्याही भावनेचा त्यांत लेशही नव्हता.

हरिभाऊ लग्नास तयार आहेत हें कळतांच चिमामावशींना अत्यानंद झाला व लग्न होईपर्यंत हरिभाऊ जें म्हणतील त्याप्रमाणें करावयाचें त्यांनीं ठरविलें. चोळकर वकील पांचशें रुपये हुंडा देण्यास तयार होते; परंतु हरिभाऊंनीं "हुंडा घ्यायचा

नाहीं," असें सांगितल्यावर मावशी गप्प राहिल्या. लग्न होईपर्यंत हरिभाऊंच्या मर्जीप्रमाणें प्रत्येक गोष्ट करावयाची असें त्यांचें मुत्सद्दी धोरण होतें. माघ शुद्ध पंचमी गोरज मुहूर्त हा लग्नाचा दिवस ठरला. मिरवणुकी वगैरे कांहींच समारंभ करावयाचे नसल्यानें भाऊमहाराजांच्या बागेंत लग्नसमारंभासाठीं दोन्ही बाजूंच्या मंडळींनीं जावयाचें ठरलें. जोगेश्वरीच्या बोळांतील आपट्यांच्या घरून सामानसुमानाच्या गाड्या भरून घरची सर्व मंडळी भाऊमहाराजांच्या बागेंत रहावयास आदल्या दिवशीं संध्याकाळींच गेली. जातांना राधाकाकूंनीं विचारलें, "तात्या, तूं कधीं येणार ?" हरिभाऊंनीं उत्तर दिलें, "येईन रात्रीं." परंतु रात्रीं आनंदाश्रमांतच राहून दुसरे दिवशीं सकाळीं भाऊमहाराजांच्या बागेंत ते गेले, तेव्हां चिमामावशींचा जीव खालीं पडला. एका नातेवाइकाच्या घरीं राधाकाकू लग्नाचें बोलावणें करावयास गेल्या असतां त्या बाईनें विचारलें, "का राधाकाकू, मुलगा पुनर्विवाह लावतो आहे कां लगीन ?" तेव्हां राधाबाईनींही खासें उत्तर दिलें कीं, "संध्याकाळीं लग्नाच्या हळदीकुंकवाला या, म्हणजे दिसेलच !"

वेणूताईही मथुताईप्रमाणेंच मातृविहीन असून त्यांचें पालनपोषण त्यांच्या मावशी येसूताई यांनींच केलें होतें. चोळकरांच्याकडे सर्व पुढाकार वेणूताईची बहीण मनूताई ऊर्फ बाई (या श्री. गोपाळ त्रिंबक मोडक यांस दिल्या होत्या.) यांजकडेच होता. त्यांनीं चिमामावशींस भेटून "तुम्हांला काय हवें असेल तें लग्नांतच मागा. मग पुढें कांहीं मिळणार नाहीं," असें स्पष्ट बजाविलें होतें. परंतु या लग्नाच्या बाबतीत "मी मुलगी पाहीन, हुंडा घ्यावयाचा नाहीं, लग्न शहरांत करावयाचें नाहीं, मिरवणुकी काढावयाच्या नाहींत, लग्न झाल्यावर मी मुलीला शिकवीन," इत्यादि अटी हरिभाऊंनीं घातल्यामुळें चिमामावशींस कांहींच बोलतां येईना. आपण घातलेल्या अटी मावशी कबूल करणार नाहींत व मग लग्नाचा नाद सोडतील असें हरिभाऊंना वाटलें होतें. परंतु मावशी कसल्या मुत्सद्दी ? त्यांनीं सर्व अटी कबूल केल्या. "लग्न होऊं दे. मग सारं सांगत्यें," असें चिमामावशी मनांत म्हणत. अशा रीतीनें माघ शुद्ध पंचमीस ( इ. स. १८९२ ) गोरज मुहूर्तावर लग्न लागलें. फक्त हरिभाऊंचे एक स्नेही व घरांतील इतर नातेवाईक लग्नास हजर होते. लग्न झाल्यानंतर मग नानासाहेबांना व अण्णासाहेबांना पत्रें घालावयाचीं ही मावशींची मोठी महत्त्वाकांक्षा ! ते दोघेही या लग्नास आले नव्हते. विशेष थाटमाट न करतां

फक्त शास्त्रोक्त विधि मात्र झाले. नाइलाजास्तव केवळ कर्तव्य म्हणून हें लग्न केलें असल्यानें हरिभाऊंची मनःस्थिति अत्यंत खिन्न झाली होती! त्यांची ती खिन्नता अकरा वर्षांच्या चाणाक्ष वेणूताईच्या सुद्धां ध्यानांत आल्यावांचून राहिली नाहीं. " इतर मुलींच्या लग्नांत मिरवणुकी होतात, मग आपल्याच लग्नांत कां नाहींत? सर्वांच्या तोंडून ' सुधारक,' 'सुधारणा' हे शब्द ऐकूं येतात त्याचा अर्थ काय? ' असे विचार त्या लहान वयांतही वेणूताईच्या डोक्यांत आले.

हरिभाऊंना त्या वेळीं कांहींही वाटलें असो; परंतु "आपण अखेर जिंकली," असें समाधान चिमामावशींना मात्र वाटलें यांत शंका नाहीं. "आतां लग्न लागलें! आपण मिळविली! आतां तात्या आपल्या ताब्यांत आहे," असे विचार मनांत येऊन त्यांस आनंद झाला. नव्या नवरीचें नांव ठेवण्याच्या वेळीं थोडी मौज झाली. हरिभाऊंचे स्नेही मावशींना म्हणाले, " मावशी, नांवांत कांहीं तरी बदल करा ना? " हरिभाऊंच्यावर आपण विजय मिळविला, आतां त्यांचें कांहीं एक चालूं द्यावयाचें नाहीं, असा मावशींचा विचार असल्यामें त्या म्हणाल्या, " आम्ही पडलों जुनीं माणसं, तेव्हां नव्या सुनेचं जुनंच नांव ठेवणार!" त्या मित्रानें निदान ' मनोरमा ' तरी नांव ठेवावें म्हणून पुष्कळ आग्रह धरला. परंतु चिमामावशी त्या! त्या कुणाचें कधीं ऐकणार? " छे! ' मनोरमा ' नाहीं नी कांहीं नाहीं! आम्ही नुसतं ' रमा 'च नांव ठेवणार. " असें म्हणून मावशींनीं आपलेंच म्हणणें शेवटीं खरें केलें व वेणूताईचें नांव ' रमा ' ठेवण्यांत आलें.

लग्न झालें खरें; परंतु निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून या लग्नावर जी विरोधी टीका आली ती वाचून हरिभाऊ अधिकच उदास झाले यांत शंका नाहीं. ' केसरी'नें लिहिलें, " मिल्ल, स्पेन्सरचीं बुकें वाचून पोपटपंची करणें सोपें आहे. पण त्यांच्यासारखें दीर्घ काळ किंवा यावज्जीव ब्रह्मचर्य पाळून अहोरात्र शास्त्रव्यासंग करण्याला मात्र कोणाचेंही धैर्य होत नाहीं. " पुनः एकदां ' केसरी 'नें लिहिल, " कोणास हंसावयाचें असल्यास तो तोंडास पदर लावून हंसतो व त्यास अतिशय वाईट गोष्ट करावयाची असल्यास ती तो प्रायः आपल्या घरांत करीत नाहीं. जणूं काय त्याचें मनच त्यास खात असतें. आमचेकडील घोडनवरे द्वितीय विवाह गांवाजवळच्या एखाद्या बागेंत उरकून घेतात, ह्याचेंही बीज हेंच होय. " दुसऱ्या एका वर्तमानपत्रांत पुढील मजकूर आला. " एका बोलक्या सुधारकानें बागेंत

हळूच जाऊन लग्न केलें. आश्चर्य हें कीं, एका धर्मभोळया व चार घटका नाक धरून बसणाऱ्या गृहस्थानें आपली अकरा वर्षांची मुलगी त्यास दिली!" 'पुणें-वैभवा 'नें तर हरिभाऊंच्यावर बरेच दिवसपर्यंत तिखट टीका करण्याचें जणूं व्रतच घेतलें होतें!

अशा रीतीनें लग्न एकदांचें पार पडलें तेव्हां चिमामावशींचा जीवही खालीं पडला व त्यांनीं या लग्नाची मंगलवार्ता अतिशय आनंदानें व अभिमानानें पत्रद्वारें नाना-साहेबांस व अण्णासाहेबांस कळविली. बेळगांवी नानासाहेबांस दुपारीं पत्र पोहोंचलें; तेव्हां लक्ष्मीबाई निजल्या होत्या. नानासाहेब घरांत जाऊन आनंदानें त्यांस म्हणाले, "उठा, उठा! तुम्हांला सून आली." या बातमीनें लक्ष्मीबाईसही फार समाधान झालें. "नवी सून व तात्या या दोघांसही घेऊन या," असें त्यांनीं चिमामावशीस कळविलें. त्याप्रमाणें हरिभाऊ, वेणूताई व राधाकाकू तिघेंही नानासाहेबांच्याकडे बेळगांवास गेलीं. कांहीं दिवस राहून चिमामावशीच्या आग्रहावरून ती सर्व कोल्हापुरास गेली व अंबाबाईच्या पायां पडून नंतर पुण्यास परतली. "जोड्यानें तात्याला पायां पडायाला आणीन," असा चिमामावशींनीं अंबाबाईस नवस केला होता असें म्हणतात! अशा रीतीनें हरिभाऊंनीं लग्न केल्यामुळें त्यांच्यावरचा वडील मंडळीचा रोष कमी होऊन त्यांचीं मनें स्थिर झालीं. मौजेची गोष्ट ही की, हरिभाऊंच्या दोघां विधुर स्नेह्यांनींही हरिभाऊंच्या पाउलांवर पाउलें टाकून आपलीं लग्नें लवकरच उरकून घेतलीं!

---

# प्रकरण नववें

## आनंदाश्रम

अण्णासाहेबांचें हरिभाऊंच्यावर अत्यंत प्रेम होतें. " हरीची मी उत्तम व्यवस्था करीन, " असें त्यांनीं लक्ष्मीवहिनीच्या मृत्युसमयीं दिलेलें वचन वाचकांस स्मरत असेलच. हरिभाऊंनी बी. ए. न होतांच कॉलेज सोडलें त्या वेळी नानासाहेब त्यांच्यावर रागावले. परंतु, "नाना, तुम्ही हरीची काळजी करूं नका. मी त्याचें सर्व पाहतों, " असें आश्वासन देऊन अण्णासाहेबांनी त्यांचें समाधान केलें होतें. हरिभाऊंच्या भावी आयुष्याची जबाबदारी आपल्यावर आहे या गोष्टीची पूर्ण जाणीव त्यांस होती; इतकेंच नव्हे तर सरकारी नौकरी न करितां स्वतंत्र व्यवसायांत आयुष्य वेंचण्याचा हरिभाऊंचा संकल्प त्यांस मान्य होता. हरिभाऊंची बुद्धिमत्ता व लेखनकौशल्य या अमोलिक गुणांचा ज्या योगें उत्तम विकास होईल व ज्या योगानें हरिभाऊंच्या संस्कृत भाषेंतील प्रावीण्याचें सार्थक होईल, अशा तऱ्हेची कांही तरी योजना आपणांस केली पाहिजे असे विचार अण्णासाहेबांच्या मनांत येऊं लागले. त्यांच्या उत्तर वयांत त्यांचे हातून घडलेल्या अनेक चुकांबद्दल त्यांस अनुताप झाला. " लाखों रुपये आपण मिळविले खरे, परंतु कुटुंबीयांचा परामर्श आपण शक्त्यनुसार घेतला नाहीं. आपल्याजवळ एका पैचीसुद्धां मागणी न करितां नानासाहेबांनीं मात्र सर्व कुटुंबाची जबाबदारी घेतली. केवळ आपटेमंडळींचाच नव्हे तर आपल्या दोघी बहिणींच्या कुटुंबांचा त्यांनीं थोर मनानें समाचार घेतला. आपण मात्र ऐपत असूनही सर्वांशीं तुटकपणें वागलों, " इत्यादि विचार डोक्यांत येऊन आपटेकुलांतील सर्व मुलांच्या शिक्षणाची उत्कृष्ट सोय कायमची करून आपलें कुटुंबासंबंधींचें कर्तव्य बजवावें असा त्यांचा निश्चय झाला. आपल्या विपुल

संपत्तीचा सद्व्यय करण्याची ईश्वरी प्रेरणा त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली! त्यांचा कांहीं काल जरी चमत्कारिक रीतीनें गेला होता तरी त्यांच्या हृदयांत उदात्त भावना वास करीत असून त्या केव्हां केव्हां त्यांस त्रास दिल्यावांचून रहात नसत. संपत्तीच्या धुरानें कांहीं काल त्यांची दृष्टि अंध झाली असली तरी मनानें ते प्रेमळ व थोर होते. प्रतिष्ठित परंतु व्यसनासक्त मित्रांच्या नादीं लागून त्यांनीं आपलें जीवित अनुचित रीतीनें घालविलें. परंतु त्याची प्रतिक्रिया झाल्यावांचून मात्र राहिली नाहीं. मनाच्या कमकुवतपणाबद्दल त्यांची त्यांसच खंती वाटूं लागली. ते प्रारंभीं सुधारणावादी होते, परंतु त्यांच्या आयुष्यास विकृत स्वरूप प्राप्त झाल्यामुळें सदसद्विवेकबुद्धीचा कांहीं कालपर्यंत लोप झाला. पुढें जेव्हां पश्चात्ताप त्यांच्या हृदयास वेदना देऊं लागला तेव्हां कांहीं तरी करून केल्या गोष्टीबद्दल आपण प्रायश्चित्त घ्यावें असेंच त्यांना वाटूं लागलें. पश्चात्तापदग्ध असें त्यांचें अंतःकरण मनःशुद्धीसाठीं व शरीरशुद्धीसाठीं अहोरात्र तळमळूं लागलें व त्यांची ही तळमळ 'आनंदाश्रमा'च्या रूपांत प्रकट झाली. संन्यास घेऊन घडलेल्या चुकांचें परिमार्जन करावें, सर्वसंगपरित्याग करणाऱ्या स्वामीसंन्याश्यांची उत्तम व्यवस्था करावी, सच्चिदानंदाची सुंदरशा देवालयांत स्थापना करून त्याच्या चरणीं लीन व्हावें व या रीतीनें स्वधर्मासंबंधींचें आपलें कर्तव्य करावें असें त्यांस वाटूं लागलें. त्यांच्या धर्ममतांतील क्रान्तीचें बीज त्यांस झालेल्या पश्चात्तापांतच आहे. आपल्या प्राचीन संस्कृत वाङ्मयासंबंधीं त्यांस अभिमान होताच. प्राचीन विद्येच्या पुनरुज्जीवनार्थ प्रयत्न करून प्राचीन ग्रंथसंपत्तीचें काळजीपूर्वक रक्षण व प्रकाशन करण्यांत आपली संपत्ति खर्चावी व पूर्वजांच्या ऋणांतूनही मुक्त व्हावें असा त्यांचा दृढ निश्चय झाला.

आपले परम स्नेही रावबहादूर वासुदेव बापूजी ऊर्फ दादासाहेब कानिटकर यांच्याशीं अण्णासाहेबांनीं अनेकदां केलेल्या चर्चेमधून 'आनंदाश्रमा'च्या कल्पनेचा जन्म झाला. त्या वेळचे मुंबईचे प्रसिद्ध पुढारी रावसाहेब मंडलिक यांना जेव्हां अण्णासाहेबांनीं ही कल्पना सांगितली, तेव्हां त्यांसही ती पसंत पडून त्यांनीं अण्णासाहेबांचें मनापासून अभिनंदन केलें. अण्णासाहेबांच्या या सर्व सुंदर कल्पना केवळ मनोराज्यांत न राहतां लवकरच मूर्त स्वरूपांत पुण्यनगरींत अवतरल्या.

तारीख १७ मे, १८८७, मध्यें अण्णासाहेबांनीं लोकांस उद्देशून जें विनंतिपत्र प्रसिद्ध केलें तें त्या दिवशींच्या 'केसरी'च्या अंकाबरोबर वाटण्यांत आलें होतें. त्यांत

अंकांत यासंबंधीं स्फुट लिहून केसरीनें त्याकडे लोकांचें लक्ष वेधलें. अशा रीतीनें प्राचीन संस्कृत ग्रंथांचें संरक्षण व प्रकाशन, विद्यार्थ्यांकरितां व स्वामीसंन्याश्यांकरितां बसतिगृह व भोजनाची सोय, श्रीशंकराचें देवालय, अशा स्वरूपाची 'आनंदाश्रमा'ची कल्पना निश्चित झाल्याबर संस्थेची इमारत बांधण्यासाठीं मोरोबादादा फडणवीस यांची बखळ पांच हजार रुपयांस विकत घेऊन तेथें एक सुंदर, भव्य इमारत उठविण्याचें जबाबदारीचें काम अण्णासाहेबांनीं रा. ब. दादासाहेब कानिटकर यांजवर सोंपविलें. त्या बखळींत एक पिंपळ होता. पिंपळ तोडला कीं तो तोडणाराचा वंशच्छेद होतो, अशी आपल्याकडे एक समजूत आहे. तेव्हां त्याचें काय करावें याबद्दल सल्ला विचारण्यास अण्णासाहेब स्वतः आळंदीस नृसिंहसरस्वती स्वामींच्या कडे गेले. "पिंपळ तोडून त्याचीं लांकडें अग्निहोत्र्यांस द्या व मग खुशाल इमारत बांधा," असें स्वामींनीं सांगितलें. दोन वर्षांत दादासाहेबांच्या परिश्रमानें सुंदर इमारत तयार झाली. इमारतीची वास्तुशांत हरिभाऊंच्या हस्तेंच करण्यांत आली व कार्तिक शुद्ध प्रतिपदा, शके १८१०, मध्यें संस्कृत-ग्रंथ-प्रकाशनासाठीं छापखाना उघडण्याचा मोठा समारंभ होऊन 'आनंदाश्रम' संस्थेची सुमुहूर्तावर स्थापना झाली.

आनंदाश्रमाची कल्पना लोकांस फार पसंत पडली व पुणेकरांनीं तरी या संस्थेचें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें. तारीख ३१ मे, १८८७, मध्यें आनंदाश्रमावर एक अग्रलेख लिहून केसरीनें या संस्थेचें कौतुक केलें. त्या लेखांतील महत्त्वाचा भाग उद्धृत केल्यावांचून राहवत नाहीं. "केचिद्वृष्टिभिरार्द्रयन्ति धरणीं गर्जन्ति केचिद्वृथा:" हें सुप्रसिद्ध वचन उद्धृत करून केसरीकार म्हणतात, "गेल्याचे मागील अंकाबरोबर रा. रा. महादेव चिमणाजी आपटे यांनीं लिहिलेलें एक प्रसिद्धिपत्र प्रसिद्ध झालें आहे व तें वाचकांनीं समग्रपणें वाचलेंच असेल. परंतु वाचलें नसल्यास तें वाचावें व त्याचें मनन करावें.

"ज्या कोणांस खऱ्या देशाभिमानाचें व देशभक्तीचें उदाहरण पाहिजे असेल त्यांस तें या प्रसिद्धिपत्रांत मिळेल. ज्या कोणांस आपल्या पूर्वजांच्या ऋणांतून मुक्त होण्याचा मार्ग पाहिजे असेल त्यांस तो या प्रसिद्धिपत्रांत सांपडेल. ज्या कोणांस धर्माभिमान बाळगावयाचा असेल व स्वधर्माच्या उत्कर्षास्तव झटावयाचें असेल त्यांस या प्रसिद्धिपत्रांत कर्तव्यतेचा बोध होईल......

# हरि नारायण आपटे

" रा. आपटे यांच्या स्तुत्य उद्योगाबद्दल प्रशंसा करावी तेवढी थोडीच होणार आहे. प्राचीन विद्येच्या उद्धारार्थ त्यांनीं आरंभिलेला यत्न पाहून आमच्या हिंदु समाजांतील धर्माभिमानी लोक त्यांची वाहवा करतील यांत शंका नाहीं. प्राचीन विद्या ही सांप्रत द्रव्यप्राप्तीचें किंवा केवळ उपजीविकेचेंहि साधन नसतां जे महात्मे तिचा अभ्यास करतात, त्यांस संन्यासी अथवा साधु, अथवा योगी बनून देशोदेशीं फिरून जीवितयात्रा करावी लागते. अशा महात्म्यांची आतां आनंदाश्रमांत व तदुपकंठ मठांत उत्तम सोय झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

" रा. म. चि. आपटे यांनीं प्राचीन ग्रंथ जमविण्याची जी सोय केली आहे ती फारच उत्तम आहे. परकीयांच्या हातीं जाण्याच्या भीतीनें जे ग्रंथ कसरीचें उदरपोषण करीत आहेत, त्यांनीं खुशाल बाहेर येऊन सुस्थळीं बसून आर्यजनांच्या हृदयांवर उजेड पाडण्याची आतां वेळ आली. सर्वसंग्रही लोकांनीं रा. आपटे यांस अवश्य मदत केली पाहिजे. त्यांवर विश्वास ठेवून त्यांनी इतक्या औदार्यानें व खर्चानें आरंभिलेल्या कृत्यास आश्रय देणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे. सर्व ग्रंथांच्या उत्तम संग्रहाची, त्यांच्या अध्ययनअध्यापनाची व प्रसिद्धीकरणाची इतकी उत्तम सोय झाली असतां व ती आनंदाश्रमासारख्या धर्मपरायण मठांत केलेली असतां इतःपर प्राचीन ग्रंथांचे हाल होऊं देणे हें अत्यंत अनुचित व कृतघ्नतेचें काम होय. रा. आपटे यांनीं आनंदाश्रम स्थापून आम्हां पुणेकरांवर अत्यंत उपकार केले आहेत.

" माधवरावजींनीं प्राचीन विद्येच्या उद्धारार्थ यत्न करून ते पूर्वजांच्या ऋणांतून मुक्त झाले. परंतु आपल्या सहजातांच्या ऋणांतून मुक्त होण्यास त्यांनीं आधुनिक शास्त्रकौशल्यरूप विद्येच्या उत्तेजनार्थही थोडा प्रयत्न केला पाहिजे. कदाचित् असें त्यांस याउपर म्हणणें म्हणजे त्यांच्या औदार्याची सीमाच पाहण्यासारखें आहे. तथापि त्यांच्यासारख्या भाग्यशाली पुरुषानें अनुपम यशाची अपेक्षा मनीं धरून हेंही कृत्य हातीं धरिल्यास त्यांत अवश्य सिद्धि येईल.

" मूर्ख पुत्र असण्यापेक्षां नसणें बरें, असे तोंडानें उद्गार काढणारे मूर्खांचे बाप या पुण्यांत व इतर ठिकाणीं पुष्कळ आहेत. त्यांपैकीं श्रीमंतही पुष्कळ आहेत. परंतु कुटुंबाची व मुलांची खाण्यापिण्याची हवी तशी उत्तम सोय लावून, बाकी द्रव्याचा वरच्याप्रमाणें किंवा इतर प्रकारें सद्व्यय करण्यास तयार असा एकहि गृहस्थ सांपडेल

काय ? मूर्ख मुलानें दारुबाजींत......अब्रूची चाड सोडून पैसा गमवावा, यांत कोणत्या प्रकारचें मातापितरांस सौख्य व समाधान वाटत असेल तें असो ! असल्या कृत्यांनीं पितर स्वर्गी असल्यास त्यांची नरकलोकीं रवानगी व्हावयाची ! आपण किंवा आपल्या पूर्वजांनीं कांहीं अब्रू संपादन केली असल्यास तीस पूर्ण काळिमा लागावयाची व हें सर्व होऊन पैशापरि पैसा जाऊन मूर्ख पुत्राचे पुत्रांस बहुधा भिक्षापात्र हातीं घेण्याचा प्रसंग येणार ! आशापाश गहन आहे, त्यापुढें शहाणपण चालत नाहीं, असें, वाचक हो, तुम्ही उत्तर द्याल. खरें आहे; परंतु ज्यांचे आशा-पाश याप्रमाणें गुंतले नाहींत, ज्यांस दायादांची समजूत काढून, नंतर कांहीं संपत्तीचा भाग परोपकारकृत्यांकडे लावतां येण्याजोगा आहे, अशाही निपुत्रिकानें कवडीचुंबकपणा करावा, स्त्रीच्या आधीन व्हावें, दत्तक घेऊन बहुधा कुलास कलंक आणण्याची तर्तूद करून ठेवावी व यांतच शहाणपण, यांतच पौरुष, यांतच धन्यता, यांतच मोक्ष मानणें हा केवढा अविचार, केवढें मूर्खपण बरें ! ”

या लेखावरून ‘आनंदाश्रम’ या संस्थेचें खरें स्वरूप व महत्त्व वाचकांच्या ध्यानीं येईल. आनंदाश्रम स्थापून अण्णासाहेबांनीं आपल्या ध्येयाची परिपूर्तता केली खरी, परंतु त्यासाठीं पैसा मिळविण्यास त्यांस मुंबईसच राहणें जरूर होतें. आनंदाश्रमासाठीं पुरेसा पैसा जमल्यावर चतुर्थाश्रम स्वीकारून ईशसेवेंत शेष आयुष्य वेंचण्याचा त्यांचा दृढ संकल्प होता. परंतु हा संकल्प त्या वेळीं पूर्ण होणें अशक्य असल्यामुळें संस्थेची सर्व जबाबदारी हरिभाऊंच्यावर सोंपविण्याचें त्यांनीं योजून त्यासंबंधीं त्यांस शिक्षण देण्यासही सुरुवात केली. संस्थेचें काम चालविण्याचें शिक्षण अण्णा-साहेब कधीं पुण्यास येऊन प्रत्यक्ष देत, तर कधीं मुंबईहून पत्रद्वारां त्यांस अनेक सूचना करीत. दुपारीं अकरांपासून पांचपर्यंत आनंदाश्रमांतील काम हरिभाऊंस पहावें लागे. त्यांची मित्रमंडळी तेथें नेहमीं जमत. एकदां अण्णासाहेब पुण्यास आले असतां हरिभाऊंच्याकडे फार मंडळी येतात हें त्यांनीं पाहिलें. त्यांना माणसांची वर्दळ बिलकुल खपत नसल्यामुळें ही गोष्ट त्यांस न आवडून ते हरि-भाऊंच्यावर थोडेसे रागावले. हरिभाऊंच्या मानी स्वभावास हें न रुचून तेव्हांपासून हरिभाऊंनीं आपणांसाठीं किबेवाड्यांत तिसऱ्या मजल्यावरील एक स्वतंत्र खोली भाड्यानें घेतली. त्यांचे मित्र दामुअण्णा कुलकर्णी तेथेंच किबेवाड्यांत रहात. आनंदाश्रमाचें काम पहावें, जेवावयास घरीं जावें व बाकीचा वेळ लेखन-वाचनांत

किंवा मित्रांशीं चर्चा करण्यांत किबेवाड्यांतील आपल्या खोलींत घालवावा असा त्यांचा क्रम सुरू झाला. ' करमणूक ' पत्राचा मजकूर ते येथेंच बसून लिहीत. पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर व दुसरें लग्न झाल्यानंतरही दोन वेळां फक्त जेवणासाठीं घरीं जाऊन बाकीचा सर्व काळ ते येथेंच घालवीत. ' पण लक्षांत कोण घेतो ? ' ' म्हैसूरचा वाघ, ' ' रूपनगरची राजकन्या ', ' चंद्रगुप्त ' इत्यादि कादंबऱ्या त्यांनीं तेथेंच लिहिल्या.

आपण बोललों म्हणून हरीचा गैरसमज झाला व त्यानें लिहिण्याबसण्यास दुसरी जागा भाड्यानें घेतली हें ऐकून अण्णासाहेबांस वाईट वाटलें व त्यांचा गैरसमज दूर करण्यासाठीं त्यांनीं मुंबईहून हरिभाऊंस जें पत्र पाठविलें तें अनेक दृष्टींनीं अत्यंत महत्त्वाचें आहे. त्या पत्राची लेखनशैली, कायदेशीर समर्पक भाषा वाखाणण्यासारखी असून त्या वेळच्या पत्रलेखनाचा उत्कृष्ट नमुना म्हणूनही हें पत्र वाचनीय आहे. या एका पत्रांत, आनंदाश्रम संस्था स्थापन करण्याचा उद्देश, त्यांतील निरनिराळ्या विभागांची माहिती व संस्थेच्या चालकांस दिलेलें शिक्षण एवढ्या गोष्टी आढळतात. अण्णासाहेबांची अप्रतिम बुद्धिमत्ता, सूक्ष्म निरीक्षणशक्ति, त्यांची कडक शिस्त व बारीकसारीक गोष्टीसुद्धां व्यवस्थितपणें करण्याची दक्षता पाहून फार कौतुक वाटतें. मित्रांच्याबद्दल सावध असण्यासंबंधीं त्यांनीं हरिभाऊंना केलेला बोध कित्येकांस अत्यंत कडक वाटण्याचा संभव आहे. परंतु कांही मित्रांच्या संगतीमुळेंच त्यांच्या स्वतःच्या आयुष्यास जें विपरीत वळण लागलें त्यामुळें स्वानुभवानें व्यावहारिक जगाचें आपणांस झालेलें कटु ज्ञान हरिभाऊंस सांगून त्यांस सावध करणें हें आपलें कर्तव्य आहे, या जाणिवेनें त्यांनीं तसें लिहिलें. ही अण्णासाहेबांच्या मनाची भूमिका लक्षांत घेतां त्यांना या प्रकारची अधिकारयुक्त भाषा लिहिण्याचा अधिकारच होता, याबद्दल शंका रहात नाहीं. हें महत्त्वाचें पत्र पुढीलप्रमाणें आहे :

यादी

चिरंजीव हरि नारायण आपटे यानें कसें वागावें व काय कामें करावीं यांबद्दल टिपण तूर्तापुरतें, अनुभवाप्रमाणें कमजास्त व्हावयाचें.

१. आमचे पिढीस दोन अति मूर्ख माणसें निघालीं, तशीं पुढल्या पिढींत निघूं नयेत याबद्दल प्रयत्न करणें हें पहिलें कर्तव्यकर्म समजून सर्व मुलांवर देखरेख

ठेवावी. आम्ही आपल्या बंधूंच्या विद्याभ्यासाकडे व वर्तणुकीकडे जितकें लक्ष पोंचविणें जरूर होतें तितकें पोंचविलें नाहीं व पोटाच्या उद्योगामुळें तसें पोंचविण्यास आम्हांस बनलें नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. चिरंजीव हरीच्या उपजीविकेची त्यास काळजी करण्याचें कारण परमेश्वरानें ठेविलें नाहीं. इतर मुलांसही निदान २५।२७ वर्षांचे वयापर्यंत विद्येच्या खर्चाची किंवा पोटाची काळजी नसून श्रीमंतांचे मुलांप्रमाणें राहण्यास हरकत नाहीं. असें असतांही जर तीं मूर्खंच निघालीं तर नशीब त्यांचें. परंतु इतक्या मुलांपैकीं एखादा दुसरा तरी उत्तम हुषार निघून आनंदाश्रमासारखी आणखी एखादी चांगली व्यवस्था करणारा निघेल अशी आशा आहे. आणि सगळीं मुलें निदान आपआपला निर्वाह करतील व दुर्गुणी व मूर्ख निपजणार नाहींत अशी आशा आहे. परंतु त्यांनीं तसें व्हावें याबद्दल चिरंजीव हरीनेंच जपलें पाहिजे आणि त्यांचा अभ्यास कसा चालतो हें पाहणें व जरूर ती स्वतः शिकविण्यानें मदत देणें हें पहिलें कर्तव्यकर्म आहे. आपल्या घरच्या मुलांच्या अभ्यासाची वगैरे तजवीज न पाहतां शाळेंत नौकरी धरून किंवा इतर रीतीनें दुसऱ्या मुलांस शिकविण्याची आणि त्यांचे वर्तनाची जबाबदारी व आईबापांचा दोष घेण्याचें कारण नाहीं ( हरिभाऊ त्या वेळीं नूतन मराठी विद्यालयांत शिकवीत होते, त्यास उद्देशून हे उद्गार आहेत ). आपले घरांतील मुलांचे अभ्यासाची व्यवस्था दररोज किंवा आठवड्यांतून एक दोन वेळां तरी पाहिली पाहिजे. त्यांचा शाळेंत अभ्यास कसा चालतो व वर्तन कसें असतें हें महिन्यांतून एकदां किंवा दोनदां शाळेचे मास्तरांस समक्ष भेटून पाहिलें पाहिजे. शास्त्रीबुवांपाशीं तीं शिकतात किंवा नाहीं, स्नानसंध्या येते किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे. त्यांस कोणत्याही सभेस किंवा नाटकांस किंवा शाळा व घराखेरीज इतर ठिकाणीं जाऊं देऊं नये. हल्लीं जशीं इतर लोकांचीं मुलें उद्धट व टारगीं होतात तशीं आपलीं होणार नाहींत, असा सर्व यत्न केला पाहिजे. त्यांचे विद्येसंबंधानें व कपड्यालत्त्यांसंबंधानें जो खर्च लागेल तो सर्व बिनदिक्कत करावा आणि त्यांच्या वर्तनाकरितां त्यांस कोणत्याही रीतीचें शासन करावें. त्याबद्दल घरांतील माणसांचें अगदीं ऐकूं नये. खर्चाची व शिक्षेची पूर्ण मालकी चिरंजीव हरीकडे आहे. मुलांस घरांतील कामकाज पडत असल्यास तें पडूं देऊं नये. आनंदाश्रमांतील माणसांकडून तें करवावें किंवा निराळीं माणसें ठेवावीं. मुलें वाईट निघाल्यास पुष्कळसा दोष चिरंजीव हरीकडे

राहील. कारण तो सर्वांत वडील मुलगा असून त्यास मुलांचे अभ्यासाकडे व वर्तनाकडे लक्ष ठेविण्यास हवा तितका वेळ आहे. पैशांचीही उणीव नाहीं. ती. रा. नानासाहेब यांस व मला या गोष्टीकडे लक्ष्य देण्यास सवड नाही. आम्हां दोघांस अद्याप ५।६ वर्षे पोटाचा उद्योग करून पुढील व्यवस्थेकरितां पैसा मिळवून ठेविला पाहिजे व बाहेरगांवीं राहिलें पाहिजे.

२. वरील काम जसें महत्त्वाचें आहे तसेंच आनंदाश्रमाची व्यवस्था पाहणें हेंही काम महत्त्वाचेंच आहे. आनंदाश्रमाची व्यवस्था सदोदित नीट चालण्याकरितां पैशाची जितकी तजवीज पाहिजे तितकी आज देखील आहे आणि यापेक्षां जास्त पैसा शिल्लक राहील अशी पूर्ण आशा आहे. आनंदाश्रमासंबंधानें दर वर्षास खर्च रुपये १२००० बारा हजार आणि शिल्लक ३००० तीन हजार, शिवाय छापखान्याचें उत्पन्न सहासात हजार व तितकाच खर्च इतकी व्यवस्था शेवटी होऊन हें संस्थान बनून निदान पंधराअठरा हजारांपर्यंत वर्षास खर्च राहील, वीसपंचवीस मनुष्यांचा अन्नखर्च आणि छापखान्यांतील माणसांसकट ३०।३५ नोकर लोक ( म्हणजे तितक्या कुटुंबांचें पोषण ) इतकें असून संस्कृत विद्येस उत्तेजन होईल आणि लोकांस एक उदाहरण घेण्यासारखें होऊन आपटेकुलाचा नांवलौकिकही राहील. ही संस्था अत्यंत स्वतंत्र असून सरकारावर किंवा इतर लोकांवरही हो अवलंबून नाहीं आणि असें असून व्यवस्थापकाचा पगारही कमी नाही. अशी व्यवस्था नुसती नीट संभाळून आपले कुळाचा नांवलौकिक राखणें हें काम पुढल्या पिढीत चिरंजीव हरीचेंच आहे. ह्यासंबंधी त्यानें कामें करावीं तीं—

( १ ) तीर्थस्वरूप रा. रा. दादासाहेब कानिटकर यांच्या अत्यंत निष्कपट व निरभिलाष परोपकार-बुद्धीनें व मजवरील पुत्रापेक्षां जास्त प्रेमानें अतिशय उत्तम इमारत झाली आहे, तेव्हां तिचें संरक्षण चांगलें करावें. पाहिजेल त्यास पाहिजेल त्या रीतीनें वापरूं देऊं नये. या इमारतीस दादासाहेब यांच्या उत्तम कौशल्याच्या योगानें जरी लागावा त्यापेक्षां पुष्कळच पैसा कमी लागला आहे तरी ती रक्कम बरीच मोठी आहे आणि प्रत्येक पैसा निथळेच्या घामाचा व मोठ्या कष्टानें मिळविलेला आहे. पैसे मिळवून खर्चणारास त्याची किंमत जास्त वाटते, तशी त्याचे मुलांस वाटत नाहीं हें साहजिक, म्हणून इमारतीचे जपणुकींत कमतरपणा होतो, तसा होऊं देऊं नये. चिरंजीव हरीनें इमारतीचा अमुक भाग वापरूच

नये असें नाहीं. परंतु सर्व व्यवस्थेनें वापरावी आणि सर्व नीटनेटकी व साफ राखण्याबद्दल खबरदारी घ्यावी.

( २ ) आनंदाश्रमांतील पुस्तकांसंबंधानें व छापखान्यासंबंधानें व शास्त्री-लोकांसंबंधानें व्यवस्था ठेवावी ती अशी :

नित्य ११ वाजतां आनंदाश्रमांत जाऊन प्रथम सर्व शास्त्री आले आहेत किंवा नाहींत तें पहावें. एक दोन वेळां उशिरां येतील त्यांस ताकीद द्यावी. जास्त हयगय झाल्यास एखादे दिवसाचा पगारही कापावा. हल्लींचे शास्त्री लोकांस सवड देण्यासारखे ते नाहींत, तेव्हां त्यांच्याशी कडकपणानें नव्हे परंतु सैलतीनेंही नव्हे असेंच वागावें. ११ वाजल्यानंतर छापखान्यांत जाऊन फर्मा सुरू झाला किंवा नाहीं हें पहावें आणि तो सुरू झाल्यावर देखील संपेपर्यंत निदान दोन तीन वेळां प्रेसांत जाऊन कमजास्तपणा होतो की काय हें पहावें. नित्य एक फर्मा निघावाच अशी तजवीज ठेवावी. कंपॉझिटर लोक थोडक्या वेळांत फर्मा पुरा करण्याकरितां मोकळें कंपोज करितात, तसें न होण्याबद्दल जपावें. प्रथम प्रेसांतून आल्यानंतर सकाळीं जी पत्रें आली असतील ती आपण स्वतः सारीं वाचावीं आणि सर्वांचीं उत्तरें आपण लिहावी. कारकुनांवर टाकूं नये. ज्या पत्राचें उत्तर देण्यास अडचण असेल किंवा ज्याबद्दल मला किंवा दुसरे कोणास विचारून उत्तर देण्याचें कारण असेल त्याचेंही उत्तर कार्डावर पत्राची पोंच लिहून मागाहून उत्तर येईल असें उत्तर लिहावें. पाहिजेल तर या नमुन्याचें कार्ड छापून ठेवून तें पाठवावें आणि तीं पत्रें उत्तरांकरितां म्हणून ठेवून त्यांचाही जबाब आठ दिवसांचे आंत किंवा होईल तितका जलद द्यावा. इतर पत्रें ते दिवशींच्या ते दिवशीं निकालास लावून त्यांवर ' उत्तर दिलें व तारीख ' असा शेरा मारावा व उत्तराचा आशय लिहावा, आणि तीं सर्व एके तारेस लावावीं.

फर्मा चालू झाल्यावर त्यांतील एखादा कागद आणून त्यापैकीं एक दोन पत्रें मधून मधून वाचून पाहून त्यांत टाइपाच्या वगैरे चुका आढळल्यास त्या दुरुस्त करून दर वेळेस प्रूफ तपासणारे शास्त्र्याच्या पदरांत घालाव्या. शारीरक भाष्याच्या पुस्तकांत आलेलीं अवतरणें मूळ ग्रंथाशीं ताडून न पाहिल्यानें अशा चुका होऊन अगदीं हलगरजीपणा दिसतो, तसें होऊं देऊं नये. शास्त्रीलोकांवर कधींही पूर्ण विश्वास ठेऊं नये. आनंदाश्रमांत जीं पुस्तकें येतात, त्यांचीं नोंद ते दिवशींचे ते दिवशीं किंवा

जितक्या लवकर होईल तितकी करून तीं तपासून नोंदावीं आणि मालकांस पावती द्यावी. हें काम स्वतःच केलें पाहिजे असें नाहीं. परंतु लायब्रेरियनकडून करवून घ्यावें व तें झालें किंवा नाहीं हें आपण स्वतः पाहावें. त्याचे बोलण्यावर भरंवसा ठेवूं नये आणि कारकुनांवर सोपवूं नये. शास्त्रीलोकांच्या उपयोगाकरितां किंवा इतर लोकांचे उपयोगाकरितां येथें किंवा बाहेरगावीं पाठविण्याकरितां लायब्ररींतून पुस्तकें काढणें झाल्यास तीं चिरंजीव हरीनें आपले हुकुमाखेरीज काढूं देऊं नयेत. त्यांचा उपयोग ताबडतोब होऊन तीं परत ठेवण्यासारखीं असलीं तर तीं सायंकाळीं जेथल्या तेथें ठेविलीं किंवा नाहीं हें समक्ष पाहावें. एका दिवसापेक्षां जास्त दिवस पुस्तकें लायब्रीबाहेर राहावयाचीं असल्यास तीं ज्याकडे द्यावयाचीं त्याचे नांवाची नोंद करून तो तेथें असल्यास त्याची सही घ्यावी. तो बाहेरगांवी असल्यास त्याचें पोंचल्याबद्दलचें पत्र असेल त्याची तारीख सहीचे जागीं मांडून तें पत्र नीट जतन करून ठेवावें आणि पुस्तक परत आल्यावर शेरा मारावा. हें काम स्वतःच करण्याचें कारण नाहीं. परंतु नित्य सायंकाळचे आंत हें काम झालें किंवा नाहीं हें स्वतः पाहिल्याखेरीज राहूं नये. आनंदाश्रमाचा मुख्य उद्देश पुस्तकें जपून ठेवण्याचा हा आहे. आणि पुस्तकें सर्व लोकांकडून ठेवीदाखल येतात, तेव्हां त्यांबद्दल विशेष जबाबदारी आहे, हें लक्ष्यांत ठेवावें. पुस्तकांची हयगय होते, असा दुर्लौकिक झाल्यास आनंदाश्रमाच्या मुख्य उद्देशाची सर्व प्रकारें हानि होऊन इतका निथळेल्या घामाचा पैका खर्च केलेला व्यर्थ जाईल.

गिऱ्हाइकांनीं पत्रद्वारां मागितलेलीं पुस्तकें ते दिवशीं किंवा दुसरे दिवशीं रवाना झालीं किंवा नाहींत हा शोध ठेवावा. कोणतेंही काम जें कारकुनाच्या हातून व्हावयाचें तें जेव्हांचे तेव्हां झालें किंवा नाहीं हें समक्ष पुनः पुनः पाहावें. कारकून अतिशय धांदल्या आहे. आजपर्यंत ठेविलेले लायब्रेरियन सर्व लुच्चे भेटले, फुकट पैसे खाऊन गेले. हा अनुभव लक्षांत आणून त्यांचें " काम केलें, " किंवा " हां, करितों, " या बोलण्यावर बिलकुल भरंवसा ठेवूं नये. त्यांचे हातून तें प्रत्यक्ष झालें किंवा नाहीं हें स्वतः पाहावें. त्यांचें बोलणें थापेचें आहे असें एक दोन वेळां आढळल्यास त्यास बोलून पाहावें. तेवढयावरून न ऐकिल्यास दंड करावा किंवा घालवून द्यावें. कोणाचाही मुलाजा करूं नये. आनंदाश्रमांत आजपर्यंत ठेविलेल्या मंडळींच्या अनुभवावरून ही गोष्ट पक्की लक्षांत ठेवावी कीं, जे लोक आपण ठेवितों

त्यांतील बहुतेक लोक, काम न करितां पगार मिळेल तितका पदरांत पाडावा, कामांत हलगरजी साधेल तितकी करावी, अशाच वर्तणुकीचे मिळाले. त्यांचेवर कोणी पाहणारा काळजीचा नसल्यानें आजपर्यंत शेंकडों रुपयांचें नव्हे पण ३।४ हजार रुपयांवर नुकसान झालें. आनंदाश्रमाचा जो उद्देश आहे तसल्या उद्देशाच्या व्यवस्थेसही असे लोक असावे ही दुर्दैवाची गोष्ट आहे. असो.

परंतु वर लिहिल्याप्रमाणें चिरंजीव हरीनें वर्तन केल्यास ५।६ महिन्यांत हल्लीं असलेले लोक किंवा त्यांस काढून त्यांचे जागीं जे राहतील ते लोक धाकांत राहून सुरळीत कामें करतील. साहेब लोक प्रत्येक काम झालें किंवा नाहीं हें स्वतः पाहतात यामुळें कामें सुरळीत होऊन त्यांचा धाक राहतो. ग्रंथ शुद्ध करणारे शास्त्री रोज किती काम करितात याचें नित्य टिपण ठेवावें. त्यांचे हाताखालीं प्रति धरणारे लोक नीट लक्ष्य लावून प्रत धरणारे आहेत किंवा नाहींत व त्यांस वाचतां येतें किंवा नाहीं हें मधून मधून आपण स्वतः जाऊन पाहावें. प्रुफ तपासणारांकडेही लक्ष्य असावें. या लोकांकडे गांवांतील किंवा बाहेरगांवचे लोक चकाट्या पिटण्याकरितां येऊन बसून वेळ घालवितात तसा घालवूं देऊं नये.

आनंदाश्रमांत जे ग्रंथ तयार होतात त्यांची किंमत, पंडित शिवप्रसाद यांजकडून ज्या किंमतीस ग्रंथ तयार होऊन येतो, त्यापेक्षां जास्त पडूं देऊं नये, असें झालें पाहिजे इकडे लक्ष द्यावें. छापखान्याचें उत्पन्न व खर्च यांचा हिशोब महिन्याचे महिन्यास पाहावा. शिलकी पुस्तकें मधून मधून मोजावीं. त्याची जबाबदारी कारकुनावर आहे. वर लिहिल्याप्रमाणें हुकमत कोणीं न चालूं दिल्यास मला कळवावें, म्हणजे मी त्याचा जबाब घेऊन त्यास काढून टाकीन.

आनंदाश्रम पाहण्यास जे गृहस्थ येतात त्यांणीं शास्त्रीमंडळींकडे न जातां चिरंजीव हरीकडे जाऊन त्याणें स्वतः अथवा कारकुनाकडून अथवा एखादे वेळीं शास्त्र्याकडून सर्व व्यवस्था दाखवावी. स्वतः दाखवावी हें चांगलें. कारण पाहणारे लोक जे प्रश्न कारितात त्यांचें उत्तर देऊन मालकास जसें समाधान करतां येतें तसें दुसऱ्यास करितां येत नाहीं आणि चाकर माणसास फुकट वेळ घालविण्यास जी संधि मिळते ती मिळणार नाहीं. आनंदाश्रमाचा सर्व उद्देश व त्याची पुढें व्यवस्था कशी राहील त्याबद्दलचा अजमास आतां बहुतेक कायम ठरला आहे. तेव्हां आतां मला विचारूनच कांहीं सांगावयाचें राहिलें आहे असें नाहीं. सर्व चिरंजीव

हरीस माहीत आहेच आणि त्याणें हेंही लक्षांत ठेवावें कीं, मी जी गोष्ट करीन म्हणून म्हणतों किंवा लिहून ठेवतों ती करण्यास एखादी विलक्षण अडचण न आली तर ती पुरी केल्यावांचून कधींही रहात नाहीं. आनंदाश्रमाची व्यवस्था ठेवण्याचें सामर्थ्य तर ईश्वरसत्तेनें आज देखील हातीं आहे. वर लिहिलेली कामें करण्याकरितां निदान ११ पासून ५ किंवा ५॥ वाजेपर्यंत आनंदाश्रमांत असावें. पैका मिळविण्याकरितां शाळेंत किंवा कोठेंही शिकविण्या धरण्याचें कारण नाहीं. वर लिहिलेला सारा वेळ आनंदाश्रमाचें वर लिहिलेलें काम करण्यास जरूर पाहिजे असें नाहीं. मध्यंतरीं दुसरें कोणतेंही काम स्वतःचें करण्यास फुरसत मिळण्यासारखी आहे व तें करावें. त्याणें हल्लीं जेथें उपासनीशास्त्री बसतात तेथें वरील मजल्यावरील टेबल, खुर्च्या वगैरे सामान घेऊन बसावें. त्याजकडे जरूरीचे कामापुरतें कोणीही लोक आल्यास हरकत नाहीं. परंतु सर्व गांवची उठाठेव करण्याकरितां किंवा जग सुधारण्याचा बाणा बाळगणारे लोक किंवा ज्यांस पोटाचा भरपूर उद्योग नाहीं व ज्यांस वेळ पुष्कळ आहे आणि काम थोडें आहे तेव्हां तो वेळ लोकांची निंदा किंवा स्तुति करण्यांत घालवितां येतो व तसा घालविण्यांत जे भूषण मानतात असे लोक येऊं देऊं नयेत व अशांची त्याणें संगति धरून त्यांच्याशीं मित्रत्वाचें किंवा सलगीचें वर्तन ठेवूं नये. रावबहादूर, सी. आय. ई.सारखे बडे लोक आहेत, हे महापाजी व मूर्ख आहेत. हे लोक प्रथमतः चिरंजीव हरीसारख्यास बरोबरीसारखें वागूं देऊन आपल्या मतलबाकरितां प्रेमानें व गोडीनें वागतात. परंतु तें सर्व कपट आहे हें पक्कें समजावें. आपल्यापेक्षां वयानें, पैशानें किंवा अधिकारानें जे फार मोठे आहेत त्यांच्याशीं सलगीनें किंवा बरोबरीच्या नात्यानें कधींही वागूं नये. कामापुरतें त्यांची अदबी राखून राहावें. आर्जव मात्र करूं नये. जे लोक सलगीनें वागतात ते अखेरीस पस्तावतात. तसेंच निरुपयोगी लोक किंवा पदरच्या पैशांस किंवा अंगास खार लागूं न देतां जगाची सुधारणा करण्याचा बाणा बाळगून इतर लोकांच्या पैशांवर निर्वाह करून जगास उपदेश करण्यास फिरणारे लोक यांच्याशीं तर कोणत्याही प्रकारची सलगी नसावी. हे लोक अगदीं नीच प्रवृत्तीचे व अति पाजी असें समजावें. दोन्ही प्रकारच्या लोकांची निर्भर्त्सना करावी किंवा बुद्ध्या अपमान करावा असें नाहीं. कुलीन मनुष्यानें होतां होईल तंवर कोणाचाच अपमान करूं नये. परंतु वर लिहिलेल्या लोकांशीं सलगीनें वागूं नये, त्यांचें उदाहरण घेऊं नये किंवा अनुकरण करूं नये,

आणि ते जें बोलतात त्या त्यांच्या बोलण्याशीं त्यांच्या स्वतःच्या वर्तनाचा मेळ कितपत असतो हें पाहून त्यांच्या उपदेशाचा विचार करावा. " मला अमुक गोष्ट करणें अगदीं जरूर वाटतें, पण अमुक अडचण आहे किंवा तितकें धैर्य नाहीं किंवा माझी अमुक सबब आहे, परंतु तुम्ही फार धैर्याचे आहां, स्वतंत्र आहां, तुम्हांला अडचण नाहीं किंवा असली तरी तुम्ही सहज काढून टाकाल आणि जगाला मोठें उदाहरण दाखवून उपकार कराल व तुम्हीच केला पाहिजे, आम्ही तर तुम्हांला मदत आहोंच, कांहीं भिऊं नका, " इत्यादि जे म्हणणारे आहेत आणि जे मोठ्या योग्यतेचे म्हणून आपल्यास म्हणवितात व ज्यांस अधिकार किंवा पैसा किंवा खोटी विद्या आहे, असले उपदेशक अतिशय पाजी असतात. त्यांच्याशीं सलगी करूं नये, त्यांचें अनुकरण करूं नये. आपल्यास खुद्द एखादी गोष्ट खचित उत्तम आहे असें वाटलें आणि ती करून आपल्या एकट्यास पार पाडून जाण्याचें किंवा आपल्या स्वतःच्या इभ्रतीनें दुसऱ्यास आपल्या वर्तनाप्रमाणें वर्तन करूं लागण्यास भाग पाडण्याचें किंवा त्यांचें मन वळविण्याचें सामर्थ्य असलें तर ती गोष्ट बेलाशक करावी. दुसऱ्याचे मदतीची आशा धरून कोणतीही गोष्ट करूं नये. दुसऱ्याची व्यर्थ निंदा करूं नये व निंदा करणाऱ्याशीं सलगी करूं नये.

चिरंजीव हरीनें मुख्य गोष्ट लक्ष्यांत ठेवावी कीं, आनंदाश्रम ही संस्था कांहीं एका प्रकारची आतां बनून राहिली आहे. ती वाईट असो किंवा बरी असो, इष्ट असो किंवा अनिष्ट असो ती आहे त्या उद्देशानें चालविली पाहिजे. तेव्हां ती चालविण्याकरितां जें वर्तन अवश्य आहे तेंच केलें पाहिजे.

आनंदाश्रमांत असणारी घोडी किंवा आनंदाश्रमासंबंधीं बाकीची सर्व व्यवस्था आपल्या मालकीची आहे किंवा पुढें होणार आहे असें समजून आस्थेनें वागावें. त्याचा किस्ता घालून देतां येत नाहीं. मुलांसंबंधीं जबाबदारी नीट लक्षांत ठेवावी. लोकांच्या मुलांशीं कांहीं एक संबंध ठेवूं नये आणि त्यांच्या वर्तनाचें जोखीम किंवा अपवाद आपले अंगावर घेऊं नये.

चिरंजीव हरीनें कपड्यालत्त्यांखेरीज आपले स्वतःचे खर्चाकरितां दरमहा २५ ते ३० रुपयेपर्यंत रक्कम घ्यावी. पैकीं १० रुपये छापखान्याकडे खर्च लिहून बाकी रक्कम मुलांचे खर्चाचे खात्यांतून घ्यावी. श्रीसच्चिदानंदाची स्थापना झाली म्हणजे दरमहा ५० रु. आणि पुढें १०० दुसऱ्या व्यवस्थेच्या खर्ड्यांत लिहिल्याप्रमाणें त्यास मिळेल."

या पत्रांत लिहिल्याप्रमाणें हरिभाऊंनीं आपटे कुटुंबांतील मुलांची ‘ श्रीमंतां ’च्या मुलांप्रमाणें व्यवस्था ठेविली. पुस्तकें, कपडालत्ता या बाबतींत कधींही कमी पडूं दिलें नाहीं. स्वतःचे मुलगे असते तर अण्णासाहेबांनीं त्यांची जशी व्यवस्था केली असती तशीच उत्कृष्ट व्यवस्था त्यांनीं आपटे कुटुंबांतील सर्व मुलांकरितां कायमची करून ठेविली. व्यवस्थापक घरांतलाच व मुलेंही घरचींच, तेव्हां सर्व मुलांना तेथें घराप्रमाणेंच वाटावें यांत आश्चर्य नाहीं. अण्णासाहेबांच्या इच्छेप्रमाणें सर्वच मुलें विद्वान् निघालीं नाहींत ही गोष्ट खरी; परंतु त्यांचें शिक्षण उत्तम प्रकारें व्हावें म्हणून हरिभाऊंनीं पुष्कळ प्रयत्न केला. मुलांना ते स्वतः शिकवीत व त्यांच्या अभ्यासाकडे चांगलें लक्ष पुरवीत. तथापि प्रयत्न करूनही अण्णासाहेबांची इच्छा सफल होऊं शकली नाहीं, ही खरोखर दैवयोगाची गोष्ट होय !

“ मुंबईची इस्टेट माझी व पुण्यांतील इस्टेट हरीची, ” असें अण्णासाहेब चिमामावशींस नेहमीं सांगत. या पत्रांतील “ हरीच्या उपजीविकेची काळजी करण्याचें कारण परमेश्वरानें ठेविलें नाहीं...खर्चाची व शिक्षेची पूर्ण मालकी चिरंजीव हरीकडे आहे...ही संस्था अत्यंत स्वतंत्र असून सरकारावर किंवा इतर लोकांवरही अवलंबून नाहीं आणि असें असून व्यवस्थापकाचा पगारही कमी नाहीं. अशी व्यवस्था नुसती नीट सांभाळून आपले कुळाचा नांवलौकिक राखणें हें काम पुढल्या पिढींत चिरंजीव हरीचेंच आहे...... पैसे मिळवून खर्चणारास त्यांची किंमत जास्त वाटते तशी त्याचे मुलांस वाटत नाहीं. ... आनंदाश्रम पाहण्यास जे गृहस्थ येतात त्यांणीं शास्त्रीमंडळींकडे न जातां चिरंजीव हरीकडे जाऊन त्याणें स्वतः ... सर्व व्यवस्था दाखवावी. स्वतः दाखवावी हें चांगलें. कारण पाहणारे लोक जे प्रश्न करितात त्यांचें उत्तर देऊन मालकास जसें समाधान करतां येतें, तसें दुसऱ्यास करतां येत नाहीं. आनंदाश्रमांत असणारी घोडी किंवा आनंदाश्रमासंबंधीं बाकीची सर्व व्यवस्था आपल्या मालकीची आहे किंवा पुढें होणार आहे असें समजून आस्थेनें वागावें ” इत्यादि वाक्यें आनंदाश्रम ही संस्था हरिभाऊंच्या वरील नितान्त पुत्रप्रेमामुळेंच अण्णासाहेबांनीं निर्माण केली असेंच दर्शवीत नाहीं काय ? “ हरिभाऊ आनंदाश्रमांत मालकाप्रमाणेंच वागत, ” असेंच त्यांचे अनेक जिवलग मित्र सांगतात. ‘ आनंदाश्रम ’ स्थापण्यांत अण्णासाहेबांचे इतर जरी कांहीं उद्देश असले तरी हरिभाऊंची उत्तम व्यवस्था करून देणें हा हेतु त्यांत

प्रधान होता. “ माझ्या मुलाकडे इतरांनीं यावें, त्याला कुणाकडे जायला नको, ” “ माझ्या मुलानें व सुनेनें जिन्याची पायरीसुद्धां उतरूं नये, इतकी सुंदर व्यवस्था मी करणार आहें. ” असे अण्णासाहेबांनीं चिमामावशींच्या जवळ अनेक वेळां काढलेले उद्गार हरिभाऊंच्यासाठींच आनंदाश्रम निघाला या विचारास पुष्टि देतात. असो.

अण्णासाहेब दिवाळींत व मे महिन्यांत पुण्यास येत. आनंदाश्रमाच्या व्यवस्थेसंबंधीं सूचना ते समक्ष अगर पत्रद्वारेंच करीत हें मागें सांगितलेंच आहे. त्या वेळीं शिकणारीं मुलें लहान असून त्यांस घरापासून दूर ठेवणें शक्य नव्हतें. तेव्हां आनंदाश्रमांत आरंभी फक्त संस्कृत ग्रंथ छापण्याचें काम चाले. आनंदाश्रमांत छापलेला पहिला ग्रंथ म्हणजे ‘ गणपत्यथर्वशीर्ष ’ हा होय. आनंदाश्रम स्थापन झाला त्या वेळीं प्रेस व ग्रंथालय या दोनच गोष्टी होत्या. अण्णासाहेबांच्या योजनेप्रमाणें त्यांचें उपास्य दैवत जो शंकर त्याचें मंदिर बांधण्याचें काम चालूच होतें.

इ. स. १८९० पासून अण्णासाहेबांची प्रकृति ढासळली. प्रथमतः लोणावळ्यास व नंतर सिंहगडावर बंगला विकत घेऊन ते मधून मधून तेथें राहूं लागले. त्यांच्या पाठीचा कणा वांकलेला असून या रोगावर उपाय फक्त पॅरिसलाच जाऊन होण्यासारखा होता व त्याप्रमाणें फ्रान्सला जाण्याचा त्यांना त्यांच्या मित्रांनीं आग्रहही केला. परंतु केवळ आनंदाश्रमाकरितां द्रव्यनिधि जमा करण्यासाठीं त्यांनीं आपल्या प्रकृतीकडे दुर्लक्ष केलें. कोणीं कांहीं म्हटलें तर “दोन चार वर्षें जगलों तर संस्थेसाठीं दोन लाख रुपये मिळवीन. आतां त्यासाठींच कांहीं वर्षें जगेन, ” असे उद्गार ते काढीत. “दोन चार वर्षें जगून पैसा मिळवावा व नंतर संस्थेची जबाबदारी हरीवर पूर्णत्वानें टाकावी, संस्था संभाळून आपले उद्देश सिद्धीस नेण्याची त्याची योग्यता आहे, ” असें अण्णासाहेबांना वाटे. परंतु प्रकृति दिवसेंदिवस खालावत चालली. हरिभाऊंचें वय लहान, तेव्हां संस्थेच्या व्यवस्थेसंबंधीं नक्की तजवीज केली पाहिजे, असें वाटून त्यांनीं तारीख १५ जुलै १८९१ रोजीं आपलें मृत्युपत्र व उद्देशपत्रिका हीं तयार करून ठेविलीं. आनंदाश्रमाच्या व्यवस्थेबद्दल तपशीलवार मजकूर पूर्वीच्या पत्रांत आलाच आहे. म्हणून उद्देशपत्रिकेंतील महत्त्वाचीं तेवढीं कांहीं कलमें पुढें उद्धृत केलीं आहेत. त्यावरून अण्णासाहेबांनीं आपल्या आपल्या अखेरच्या मृत्युपत्रांत केलेली व्यवस्था व घालून दिलेले नियम यांची वाचकांस पूर्ण कल्पना येईल.

" हल्लीं पुस्तकें ठेविण्याकारितां जी जागा तयार होत आहे, तिचे वरील मजल्यांत पूर्व बाजूस मालकाचे घरांतील मोठा बाण आणून त्याची स्थापना करावयाची आणि त्या देवाचें नांव ' सच्चिदानंद ' असें ठेवावयाचें. त्याचे पुढील अर्धखणापर्यंतची जागा सोंवळी मानून तींत परधर्मी लोक किंवा आपले धर्मांतील भ्रष्ट लोक यांस जाण्याची सक्त मनाई ठेवावयाची. वरील मजल्याची बाकीची जागा कथा, पुराण अथवा व्याख्यानें अथवा सभांच्या उपयोगाकरितां लावावयाची. परंतु हल्लीची आपली धर्मसंबंधी स्थिति किंवा हल्लीच्या जुन्या चाली या राहण्याच्या कामीं उपयोगी अशा प्रकारचींच व्याख्यानें किंवा सभा या ठिकाणीं व्हावयाच्या. इतर रीतीच्या सभा किंवा व्याख्यानें व्हावयाची नाहीत. " ( कलम ५ वें )

" आनंदाश्रमांत उत्तर बाजूस एक सबंध इमारत अगर दोन निरनिराळ्या इमारती बांधून त्यांपैकी एकीत अगर दोहोंत जितकीं कोंकणस्थ ब्राह्मणांची मुलें ठेवून त्यांचें पालनपोषण अकरा वर्षांचे वयापासून तों पंचवीस अगर सत्तावीस वर्षांचे वयापर्यंत होईल तितकी ठेवावयाची व त्यांचा खर्च पुढें लिहिलेल्या रकमां-तून करावयाचा. मुलें ठेवणें ती प्रथम मालकाचे वंशांतील जितकी असतील तितकी ठेवून बाकी इतर गृहस्थांची जितकीं ठेववतील तितकी ठेवावयाची. परंतु प्रत्येक मुलानें जुन्या चालीप्रमाणें आचरण ठेविलें पाहिजे. त्यांचे आचरणांत कमजास्तपणा झाल्यास तीं मालकाचे वंशांतील असलीं तरी त्यांस घालवून देण्याचा अधिकार व्यवस्थापकांकडे पूर्ण आहे. मुलांनीं पुढें संसारांत उपयोगी पडण्यासारखी कोणतीही विद्या किंवा कोणताही धंदा अथवा उद्योग सिकण्याची त्याला मनाई नाही. " ( कलम ६ वें )

" पुणें शहरांत वेळोवेळी जे पूज्य विद्वान् संन्याशी येतात, ते एके वेळीं एकपासून पांच संख्येपर्यंत आले असतां त्यांची आनंदाश्रमांत राहण्याची व खाण्यापिण्याची सोय नेहमीं ठेवावयाची. त्यांस पहिले आठ दिवस हक्कानें राहण्याची हरकत नाही. त्यापुढें त्यांस जास्त दिवस ठेवणें हें त्यांची विद्वत्ता, आचरण, आणि व्याख्यानें देण्यानें किंवा पढविण्यानें लोकांस उपयोग यांचा विचार पाहून व्यवस्थापकांनीं व्यवस्था करावी. परंतु ते मालकीचा अथवा वहिवाटीचा हक्क न सांगतील असी तजवीज ठेवावी. " ( कलम ७ वें )



आनंदाश्रम ( सच्चिदानंदाचे देवालय )

बालोद्यान प्रेस, पुणें.

## मृत्युपत्रांतील व्यवस्था

"आनंदाश्रमांतील मुलांची व्यवस्था, संन्याशी यांची व्यवस्था, पुस्तकसंग्रहाची व्यवस्था, छापखान्याची व्यवस्था व इतर सर्व प्रकारची व्यवस्था नेहमीं पहाण्याकरितां एक अधिकारी नेहमीं असावयाचाच. मालक जिवंत आहे तोंपर्यंत तो स्वतः किंवा दुसऱ्याकडून हें काम करील आणि मालकाचे मागें पहिला अधिकारीही तोच नेमून ठेवील. तसें त्यानें न केल्यास त्याचे वंशांतील जो कोणी पुरुष वरील कामें करण्यास त्याचे विद्वत्तेनें व आचरणानें योग्य असेल त्यास व्यवस्थापकांनीं बहुमतानें नेमावा. हल्लीं मालकानें आपले करितां राहण्यास जो इमारतीचा भाग राखून ठेविला आहे, त्यांत त्याणें सहकुटुंब राहिलें पाहिजे, आणि आनंदाश्रमाचा उद्देश सिद्धीस नेण्यास सदैव झटलें पाहिजे. त्याचें आचरण जुन्या चालीरीतीस व धर्मास प्रतिकूल असें असतां कामा नये. देखरेख पहाणारा किंवा अधिकारी होण्यालायक पुरुष मालकाचे वंशांत नसल्यास कोणीही कोंकणस्थ ब्राह्मण जो विद्वत्तेनें व आचरणानें लायक असून आनंदाश्रमाचे उद्देशांकरितां झटणारा मिळेल त्यास नेमावा. हा देखरेख पहाणारा अथवा अधिकारी हा कायमचा नोकर आहे. त्यास एकदां नेमिल्यावर त्यानें आपले कामांत विशेष हयगय, पैशाची अफरातफर, आचरणांत फेरबदल अथवा आनंदाश्रमाचे उद्देशाविरुद्ध असतां मात्र त्यास व्यवस्थापकांनीं बहुमतानें काढावा. तसा अधिकार त्यांस आहे. अधिकारी याचे हातून जोंपर्यंत काम वर लिहिल्याप्रमाणें होईल तोंपर्यंत त्यास काढावयाचें नाहीं. जेव्हां जेव्हां अधिकारी नवीन नेमण्याची वेळ येईल तेव्हां तेव्हां मालकाचे वंशांतील पुरुष जोंपर्यंत नेमिण्यासारखा मिळेल तोंपर्यंत त्यास नेमावा. अधिकारी ही नेमणूक कोणाचीही वंशपरंपरेची, हक्काची नाहीं. ती विद्वत्तेवर व आचरणावर आहे. एकापेक्षां जास्त पुरुष मालकाचे वंशांत अधिकारी नेमण्याजोगे असल्यास त्यांपैकी सर्वांत उत्तम असेल तो अथवा पिढ्यांनीं म्हणजे नात्यानें जो मालकास जवळ असेल त्यास नेमावा. कोणतेही वेळीं मुलांची संख्या बारांपेक्षां जास्त नसावी. बारा मुलांचा खर्च भागून जी रक्कम राहील ती सर्व पुस्तकसंग्रहाचे कामीं लावावी." ( कलम ९ वें )

अशा प्रकारची उद्देशपत्रिका व मृत्युपत्र केल्यावर अण्णासाहेबांस फार बरें वाटलें. प्रकृति बरी नसली तरी त्यांनीं काम म्हणून सोडलें नाहीं. इ. स. १८९४ च्या ऑक्टोबर महिन्यांत बापटकमिशनच्या बाबतींत त्यांनीं बडोद्यास बऱ्याच खेपा घातल्या. अगोदरच प्रकृति नादुरुस्त, त्यांत प्रवास, जाग्रणें व कामाची दगदग

यामुळें त्यांस बडोद्यासच ताप आला. अशाच आजारी स्थितींत ते मुंबईस आले. यापूर्वी ते असेच एकदां आजारी झाले होते. तेव्हां " प्रकृतीची अशी हेळसांड करूं नका, " असें त्यांच्या कित्येक मित्रांनीं त्यांस बजाविलें. परंतु अण्णासाहेब त्यांचें सांगणें थट्टेवारी नेत. आनंदाश्रमासाठीं पुरेसा पैसा जमल्यावर संन्यास घेण्याचा त्यांनीं मनाशीं निश्चय केला होता व " संन्यास स्वीकारल्यानंतर जर संस्थेस पैशाची तूट पडूं लागली तर भगव्या वेषांत कोर्टांत जाऊन मी खटले चालवीन, " असें ते मित्रमंडळींत नेहमीं म्हणत. काषायवस्त्रें परिधान करून सिंहासनावर अधिष्ठित झालेल्या राजर्षीचें दर्शन भारतवर्षीयांस एकदां घडलें आहे; परंतु संन्यासी वेषांत वकिली करणाऱ्या कायदेपंडिताचें चमत्कृतिपूर्ण जीवन पाहण्याचा विलक्षण योग मात्र अद्याप आला नाहीं खरा ! आनंदाश्रमांतील ' सच्चिदानंदा 'च्या मंदिराखालीं स्वतःच्या समाधीची जागा बांधून त्यासाठीं त्यांनीं सरकारांतून मुद्दाम अगोदरच परवानगी काढून ठेविली होती. सच्चिदानंदास स्नान घातलें कीं, तें तीर्थ आपल्या समाधीवर सतत पडावें अशी योजना त्यांनीं निश्चित केली होती ! देवाच्या पवित्र तीर्थाभिषेकानें आपल्या साऱ्या चुकांचें परिमार्जन करावें हाच त्यांचा प्रमुख उद्देश असावा यांत शंका नाहीं !

ताप जो आला तो एकसारखा वाढतच गेला. दुखणें भयंकर स्वरूपाचें आहे असें खुद्द अण्णासाहेबांनाही वाटलें नाहीं. कोणीं ज्योतिष्यानें " या वर्षी तुम्हांस गंडान्तर आहे; परंतु आयुष्य पुष्कळ आहे. " असें अण्णासाहेबांस सांगितलें होतें. या ज्योतिष्याचीं पूर्वीचीं एक दोन भविष्यें खरीं ठरल्यामुळें त्याच्या या भविष्यावरही अण्णासाहेबांचा पूर्ण विश्वास बसला व " आपण या आजारांतून खात्रीनें बरे होणार, " अशी त्यांच्या मनाची भावना झाली. अण्णासाहेबांची प्रकृति अधिकाधिक क्षीण होत चालली तरी ही बातमी कारकुनानें हरिभाऊंस पुण्यास कळविली नाहीं. एके दिवशीं सहज श्री. माधवराव भट वकील, केशवराव रानडे, गंगारामभाऊ रेळे इत्यादि मंडळी अण्णासाहेबांची भेट घ्यावयास जातात तों काय ? अण्णासाहेब अत्यवस्थ स्थितींत ! पुण्यास अण्णासाहेबांच्या आजाराची बातमी कळविली नाहीं, हें समजतांच प्रथम त्यांनीं हरिभाऊंना तावडतोब निघून येण्याविषयीं तार दिली, दोघे अण्णासाहेबांजवळ बसून राहिले व एकास डॉक्टराकडे पाठवून त्यांनीं औषधोपचार सुरू केले. दुखणें नवज्वराचें ठरलें ! भयंकर शक्तिपात होऊन अण्णा-

साहेबांची स्थिति केंविलवाणी झाली. तार पोहोंचतांच हरिभाऊ तावडतोब मुंबईस गेले. मागच्याच गाडीनें चिमामावशी व बाकीची मंडळी आली. अण्णासाहेबांची ती भयंकर अवस्था पहातांच हरिभाऊंच्या तोंडचें पाणी पळालें ! अहोरात्र एकनिष्ठपणें त्यांनीं अण्णासाहेबांची सेवा आरंभिली, परंतु ताप म्हणून निघेना व यशाचें चिन्ह दिसेना. सोमवारीं सकाळीं डॉ. बहादूरजी, डॉ. देशमुख व डॉ. डिसोजा या तीन नामांकित डॉक्टरांची कमिटी भरून परीक्षा करविली. तीवरून कोणासही त्यांचा अंत इतक्या लवकर होईल असें वाटलें नाहीं. डॉक्टर गेल्यानंतर अण्णासाहेबांची वाचा बंद झाली. हरिभाऊ व चिमामावशी त्यांच्याजवळ बसून होत्या. अण्णासाहेबांनीं आपली दृष्टि हरिभाऊंच्याकडे एकसारखी लाविलेली असून त्यांच्या नेत्रांतून अविरत अश्रुप्रवाह वहात होता. आपला अंतकाल समीप आला असें वाटून कीं काय त्यांनीं हरिभाऊंच्याकडे एकदां अर्थपूर्ण नजरेनें पाहिलें ! अण्णासाहेबांचा भावार्थ ध्यानीं येतांच हरिभाऊ एकदम दचकले ! अण्णासाहेबांस आतांच्या आतांच संन्यास दिला पाहिजे असें त्यांच्या एकदम ध्यानीं आलें. त्यांस संन्यास देण्याची हरिभाऊंनीं तयारी केली. त्या वेळीं दुपारचे दोन वाजले होते. कसाबसा संन्यास देण्याचा विधि संपला. अर्थात् अण्णासाहेबांची वाचा बंद झाली असल्यामुळें त्यांच्या करितां म्हणावयाचे मंत्र हरिभाऊंनीच म्हटले. पांचचे ठोके पडल्याबरोबरच अण्णासाहेबांच्या पवित्र झालेल्या आत्म्यानें आपल्या नश्वर देहाचा त्याग केला ! अशा रीतीनें तारीख २२ ऑक्टोबर, १८९४, रोजीं अण्णासाहेबांची इहलोकची यात्रा संपली. पितृवत् अशा आपल्या चुलत्याच्या अकालीं मृत्यूनें हरिभाऊ क्षणमात्र गांगरून गेले. त्यांजवर पडलेल्या भयंकर जबाबदारीच्या जाणिवेनें त्यांची छाती दडपून गेली. अण्णासाहेबांच्या इच्छेप्रमाणें शव पुण्यास न्यावयाचें असल्यानें कलेक्टरची परवानगी काढण्यास हरिभाऊ स्वतः गेले. परवानगी लागलीच मिळाली. चंदनाच्या पेटींत शव घालून स्पेशल डब्यांतून रात्रींच्या गाडीनें पुण्यास आणलें. पहांटे स्टेशनवरून पेटी गाडींत घालून आनंदाश्रमांत आल्याची वार्ता कळतांच आनंदाश्रमाकडे लोकांच्या झुंडींच्या झुंडी लोटल्या. हरिभाऊंची स्थिति अत्यंत चमत्कारिक झाली होती. नानासाहेब तेथें नसल्यानें सर्वच जबाबदारी त्यांच्या एकट्यावरच पडली. या प्रसंगीं त्यांस जर कोणाची विशेष मदत झाली असेल तर ती चिमामावशींची ! बाई मनुष्य असून त्यांचें कर्तृत्व पुरुषासारखें होतें ! दोन तीन दिवस धड अन्न नाहीं, पाणी नाहीं, झोंप

नाहीं, डोळे जागरणानें लाल झालेले व चेहरा उतरून गेलेला, अशा स्थितींत हरिभाऊ पुण्यास आले. अण्णासाहेबांची शेवटची इच्छा पार पाडण्याची जबाबदारी त्यांजवरच असल्यानें दुःख करण्यास सुद्धां त्यांस क्षणमात्र वेळ मिळाला नाहीं. सर्व शास्त्रोक्त विधि झाल्यावर अण्णासाहेबांचा शेवटचा फोटो काढला व नंतर सायंकाळच्या वेळीं निश्चित झालेल्या जागीं अण्णासाहेबांस समाधि देण्यांत आली. समाधि देण्याचा विधि आटोपल्यावर चुलत्याच्या ऋणांतून आपण अंशतः तरी मुक्त झालों असें हरिभाऊंना वाटलें. अण्णासाहेबांची उत्तर क्रिया हरिभाऊंनीच केली. संन्याश्याचें सुतक फक्त क्रिया करणारालाच असतें व त्याप्रमाणें हरिभाऊंना दहा दिवसपर्यंत सोंवळ्यांत रहावें लागलें. तेराव्या दिवशीं बडोद्याचे श्रीयुत शंकर मोरो रानडे यांनीं अण्णासाहेबांचें चरित्रात्मक आख्यान रचून स्वतः कीर्तन केलें. मंडळीची चिक्कार गर्दी लोटली होती. अण्णासाहेबांच्या उत्तर क्रियेस सुमारें तीन हजार रुपये खर्च झाला. अशा रीतीनें आश्विन वद्य नवमी, शके १८१६, मध्यें समाधिस्त होऊन अण्णासाहेबांनीं आपलें अवतारकार्य समाप्त केलें.

अण्णासाहेबांच्या मृत्यूनंतर केसरी वगैरे कित्येक वर्तमानपत्रांत मृत्युलेख प्रसिद्ध होऊन त्यांत त्यांच्या संबंधी काढलेले अनेक गौरवपूर्ण उद्गार आढळतात. केसरीनें लिहिलें, "जगांत लौकिक करण्याचे मार्ग पुष्कळ आहेत. ते ज्यास जसे साधतात, तसा त्याचा लौकिक होतो. पुष्कळ लोक लौकिक मार्ग पत्करतात, परंतु माधवरावजींची तऱ्हा कांहीं निराळी होती. त्यांचे अंगीं पांचचार गुण फारच अलौकिक होते. आज त्यांबद्दल लिहिण्यास सवड नाहीं. एक गोष्ट सांगितल्याशिवाय मात्र आमच्यानें राहवत नाहीं. पंधरा वर्षांपूर्वी म्हणजे सन १८७९ सालीं दक्षिणी ब्राह्मणांवर जो कहर उसळला होता त्या प्रसंगीं 'मी दाक्षिणी ब्राह्मण पुण्याचा आहें,' या अभिमानानें आपटे यांनी जें काम केलें तेंच काम हल्लींच्या प्रसंगीं त्यांनीं आनंदानें केलें असतें. परंतु दुर्दैवानें त्यांचा आमचा ऋणानुबंध तुटला यामुळें लोकांस विशेषच वाईट वाटत आहे."

अण्णासाहेबांच्या मृत्यूचें वर्तमान कळल्यावर मुंबई हायकोर्टांत चीफ जस्टिस् बेली हे त्यांजविषयी म्हणाले, " बुद्धीचें विशदत्व, न्यायाचे कामांत जे कायदे लागतात त्या सर्वांचें मार्मिक ज्ञान आणि न्यायाधिशांशीं अत्यंत सभ्यतेचें वर्तन ह्या गुणांत महादेवराव आपटे,वकील, यांना दुसऱ्या कोणत्याही वकिलाच्यानें मागें टाकिलें नाही."



श्री. महादेव चिमणाजी आपटे

बालोद्यान प्रेस, पुणें.

## औद्योगिक सुधारणेसाठीं तळमळ

विद्यार्थिदशेंत अण्णासाहेबांचा पहिला क्लास कधीं चुकला नाहीं. वकिलीच्या परीक्षेंत तर पाहिल्या वर्गांत पहिला नंबर पटकावून त्यांनी अपूर्व यश जोडलें. वकिलीच्या धंद्यांत त्यांस मागें सारणारा एकही वकील नव्हता. "महादेव चिमणाजी आपटे, वकील, यांनीं एखादा खटला घेतला कीं तो त्यांच्या बाजूचाच व्हावयाचा," अशी त्यांची चोहोंकडे ख्याति होती. एक कर्तृत्ववान्, विद्वान्, अप्रतिम बुद्धीचा पुरुष म्हणून समाजांत त्यांस मोठा मान होता. त्यांचें वक्तृत्व वाखाणण्यासारखें असून वकिलीच्या धंद्यांत त्यांनी नऊ लाखांवर संपत्ति मिळविली असें लोक सांगतात. त्यांच्या वाक्चातुर्याच्या व वकिलीतील अपूर्व कौशल्याच्या गोष्टी किती तरी आहेत ! पुण्यास खाजगीवाल्यांचा खटला आपल्या तर्कशुद्ध, मुद्देसूद व मार्मिक वक्तृत्वानें त्यांनीं जिंकला, तेव्हां त्यांचें अभिनंदन करण्यास लोकांचे थवेचे थवे लोटले व "असा हिरा ज्या माउलीच्या पोटीं निपजला ती धन्य होय," असे उद्गार ज्याच्या त्याच्या मुखांतून निघत होते.

त्यांची विद्वत्ता, चिकित्सक बुद्धि व मार्मिकता त्यांनी केलेल्या शाकुंतलाच्या भाषांतरावरून स्पष्ट दिसते. श्री व सरस्वती यांचा संगम अण्णासाहेबांच्या ठिकाणीं खचित होता. वाङ्मयाची नैसर्गिक गोडी त्यांना असल्यानें हरिभाऊंची मनोभूमिका समजून घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं होतें व त्यामुळेंच हरिभाऊंच्या वाङ्मयिक गुणांचें चीज करण्याची बुद्धि त्यांस झाली.

देशाची औद्योगिक अवनति पाहून ती सुधारण्याचा उपाय केल्यावांचून त्यांस राहवेना. आग्र्यास त्यांनीं एक कातडी कमाविण्याचा कारखाना काढला होता व पुण्यास सदाशिव पेठेंत नूलकरांच्या घराशेजारील वखळींत चाकूकाऱ्यांचा कारखाना स्थापला होता. आतां या दोन्ही कारखान्यांत त्यांस बूड लागली व त्यांचें हजारों रुपयांचें नुकसान झालें ही गोष्ट वेगळी. परंतु देशांत उद्योगधंद्यांचा प्रसार होण्यासाठी त्यांनीं प्रयत्न केले व आपल्या संपत्तीचा बराचसा भाग त्याप्रीत्यर्थ खर्च केला ही ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट आहे. परदेशी जाऊन उद्योगधंदे शिकण्या-साठीं कांहीं विद्यार्थ्यांस त्यांनीं पैसा दिला होता असें म्हणतात. शास्त्रीय शिक्षण घेण्यासाठी म्हणून आनंदाश्रमातर्फे हुषार होतकरू विद्यार्थ्यांस परदेशीं पाठविण्याची योजना त्यांनी लिहून ठेविली होती. परंतु त्यांच्या शेवटल्या मृत्युपत्रांत ही गोष्ट नमूद न झाल्यामुळें ती कल्पना फलद्रूप होऊं शकली नाहीं.

त्यांचा देशाभिमान, प्राचीन ग्रंथसंपत्तीबद्दल आदर व त्यांचा धर्माभिमान आनंदाश्रमाच्या मूर्तीत आपल्या समोर उभा आहे. वाचक हो, आनंदाश्रमांत तुम्ही पाऊल टाकाल तर पश्चात्तापानें पावन झालेलें व कुटुंबाच्या कळकळीनें ओथंबलेलें हृदय तुमच्या दृष्टीस पडेल! समाधीवर होणारा तीर्थोदकाचा वर्षाव पाहून त्या थोर पुरुषाच्या चारित्र्याच्या स्मृतीनें तुमच्या नेत्रांतही अश्रुबिंदु उभे राहतील! एकावर एक रचलेल्या जीर्ण पोथ्या पाहून, त्यांच्या रक्षणार्थ आपली सारी संपत्ति वेंचणाऱ्या महात्म्याच्या थोरपणाचें रहस्य तुमच्या ध्यानीं येईल व त्या हृदयांत स्फुरलेली कल्पना मूर्त स्वरूपांत अवतरलेली पाहून तुम्हांस खचित धन्यता वाटेल! असो.

अण्णासाहेब असतांना फक्त छापखान्याचें काम सुरू झालें होतें ही गोष्ट मागें सांगितलीच आहे. त्यांच्या सर्व सुंदर कल्पना अजून कागदावरच लिहिलेल्या होत्या. कागदांतून बाहेर काढून त्यांस मनोहर रूप देण्याचें कुशल कारागिरीचें महत्त्वाचें कार्य हरिभाऊंच्यावर येऊन पडलें! चुलत्यानें विश्वासानें सोंपविलेली ही कामगिरी इमानेंइतबारें करण्याचें आपलें पवित्र कर्तव्य आहे असें समजून हरिभाऊंनी ती उत्कृष्ट रीतीनें पार पाडली. अण्णासाहेब वारल्यानंतर सुमारें दहा वर्षें तर आनंदाश्रमासाठीं त्यांस अतिशय काम करावें लागलें. पैशाच्या बाबतींत अण्णासाहेबांची अव्यवस्थाच होती. रोख काय ते आठ दहा हजार रुपयेच होते. ठिकठिकाणी मोठमोठ्या रकमा अडकल्या होत्या. रा. ब. दादासाहेब कानिटकर यांच्या मदतीनें कागदपत्रें पाहून रक्कम उभारण्यास हरिभाऊंना फारच मेहनत करावी लागली. बेळगांवचे नातू व करगुप्पीकर सावकार, माहीमचे दांडेकर, किवळेकर रानडे, बाबामहाराज वगैरे पुष्कळ लोकांजवळ मोठमोठ्या रकमा ठेवीदाखल दिल्या होत्या. परंतु त्यांकडील रकमा हातीं येण्यापूर्वींच अण्णासाहेबांचा अंत झाला होता. बाबामहाराजांच्या मृत्यूनंतर त्यांच्या इस्टेटीमधून कलेक्टरच्या वशिल्यानें ही रक्कम वसूल करून घेण्यास हरिभाऊंना १९१६ साल उजाडलें! सारांश, आनंदाश्रम ही संस्था संस्थेच्या कायम स्वरूपास येण्यास हरिभाऊंचेच प्रयत्न विशेष कारणीभूत झाले व हें सर्व यथास्थित करण्यास त्यांना बरींच वर्षें लागलीं.

अण्णासाहेबांनीं मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें मुंबईतील दोन्ही घरें, पुण्यामुंबईतील त्यांचा सर्व खाजगी पुस्तकसंग्रह व बरेंचसें फर्निचर व त्याचप्रमाणें सदाशिव पेठेंतील बखळ हरिभाऊंनीं विकून टाकली. त्यांच्या खाजगी नौकरांस अण्णासाहेबांच्या

इच्छेप्रमाणें त्यांनीं जितकीं वर्षे नौकरी केली तितक्या महिन्यांचा पगार बक्षिस देऊन टाकला. अशा रीतीनें १९०४ सालपर्यंतचीं दहा वर्षे लोकांच्याकडे असलेल्या रकमा वसूल करून आनंदाश्रमाच्या दरमहा उत्पन्नाची तजवीज करण्यांतच गेलीं.

अण्णासाहेबांचा मृत्यु म्हणजे हरिभाऊंच्या आयुष्यांतील मोठाच क्रान्तिकारक प्रसंग होय ! त्यांच्या कर्तृत्वशक्तीची ती एक परीक्षाच होती. एक महत्त्वाची संस्था संभाळण्याचें कार्य त्यांजवर येऊन पडलें व त्यामुळें त्यांच्या अंगीं वास करीत असलेल्या सर्व शक्तींना चालना मिळाली ! व्यवसायशोधनाची काळजी नष्ट होऊन घरच्या-घरींच मनाजोगा उद्योग मिळाला. संस्कृत भाषेवरील प्रभुत्वामुळें प्राचीन ग्रंथ-प्रकाशनाचें काम त्यांस प्रिय झालें. अण्णासाहेबांच्या हयातींत त्यांनीं हरिभाऊंच्या मदतीनें गणेशाथर्वशीर्षम्, रुद्राध्याय, श्रीशंकरद्विग्विजय इत्यादि सारे पंचवीस ग्रंथ छापले होते. परंतु हरिभाऊंनीं आपल्या कारकीर्दींत श्रीमद्भगवद्गीता, अग्निपुराण, याज्ञवल्क्यस्मृति, काव्यप्रकाश इत्यादि सुमारें साठ सत्तर ग्रंथ प्रकाशित केले. सांप्रत आनंदाश्रमसंस्कृतग्रंथावलीतील छापील संस्कृत ग्रंथांची संख्या शंभरांवर गेली आहे. प्राचीन हस्तलिखित पोथ्यांचा संग्रह करून त्यांचें यथायोग्य रक्षण करणें हा आनंदाश्रमाचा आद्य हेतु असल्यानें अशा पोथ्या जमविण्याच्या कामीं हरिभाऊंनीं फार परिश्रम केले व त्यांच्याच परिश्रमामुळें आनंदाश्रमांतील पोथ्यांची संख्या साडेआठ हजारांवर झाली. अलंकार, साहित्य, उपनिषदें, काव्य, कोश, धर्म, नीति, न्याय, पुराणें, वेदांत इत्यादि सव्वीस विषयांच्या पोथ्या आनंदाश्रमाच्या ग्रंथसंग्रहांत आहेत.

हरिभाऊंच्या निरलस उद्योगानें आनंदाश्रमाचा उत्कर्ष झाला व अण्णासाहेबांच्या हेतूंची सफलता झाली. अण्णासाहेबांच्या संबंधींची प्रत्येक गोष्ट मनःपूर्वक करावयाची असा त्यांचा निश्चय होता व त्याप्रमाणें ते नेहमी करीत. चिमामावशींचाही त्याबद्दल विशेष कटाक्ष असे. अण्णासाहेब वारल्यानंतर एक वर्षपर्यंत त्यांच्या मासिक पुण्य-तिथीचे उत्सव साजरे झाले. वार्षिक पुण्यतिथि तर अतिशय मोठ्या प्रमाणावर होऊन त्या दिवशीं ब्राह्मणांचे पाय धुणें, पूजा करणें, तीर्थ-पूजा इत्यादि गोष्टी हरिभाऊंना दर वर्षास कराव्या लागत. जमलेल्या दीडशें दोनशें मंडळींचें भोजन व रात्रौ कीर्तन इत्यादि कार्यक्रम आटोपेपर्यंत हरिभाऊ स्वतः सर्वांची विचारपूस करीत.

इ. स. १८९६ सालीं देवालयाची इमारत पूर्ण बांधून झाल्यावर तेथें अण्णा-साहेबांच्या इच्छेप्रमाणें हरिभाऊंनीं ' सच्चिदानंदा 'ची मोठ्या समारंभानें स्थापना

केली. देवाचा वाढदिवस, शिवरात्र, कार्तिकी पौर्णिमा, सरस्वतीपूजन इत्यादि उत्सव संस्थापकांच्या इच्छेप्रमाणें उत्कृष्ट रीतीनें पार पाडण्याची खबरदारी हरिभाऊ घेत असत. या उत्सवांच्या पूजा मालकानें करावयाच्या असल्यानें हरिभाऊ त्या सर्व पूजा यथासांग करीत.

हरिभाऊंच्या जीवनक्रमांत आनंदाश्रमास एक विशिष्ट स्थान आहे. आनंदाश्रमानें त्यांची व्यवसायशोधनाची अडचण नाहींशी करून सर्व कुटुंबीयांचा व मित्रमंडळींचा परामर्श घेण्याचें काम हरिभाऊंना सुकर करून दिलें. मनःस्वास्थ्य व मुबलक वेळ देऊन समाजसेवा व वाङ्मयसेवा करण्यास त्यांस प्रोत्साहन दिलें. हरिभाऊंचे गुण विशेष रीतीनें जगाच्या दृष्टोत्पत्तीस येण्यास आनंदाश्रमच कारणीभूत झाला व उलट पक्षीं हरिभाऊंच्या अस्तित्वानें आनंदाश्रमाचें नांव सार्थ ठरलें.

## प्रकरण दहावें

# सुखाचा संसार

द्वितीय विवाह नांवालाच झाला! चिमामावशींच्या व इतर वडील मंडळींच्या शब्दांतून हरिभाऊ मुक्त झाले खरे, परंतु अंतःकरणांतील भावनांच्या विरुद्ध निर्माण झालेल्या या विवाहबंधनानें त्यांस पराकाष्ठेचा उद्वेग आला. वृत्तींतील निराशा यत्किंचितही कमी न होतां उलट दिवसेंदिवस वाढत जाऊन तिनें हरिभाऊंचें हृदयाकाश पूर्णत्वानें व्यापून टाकलें. आपल्या उदात्त भावना व विचार यांविरुद्ध झालेली ही गोष्ट त्यांच्या हृदयास अपरिमित वेदना देऊं लागली. त्यांच्या हृदय-सागरांतील ही खळबळ बाह्य आचरणांत प्रकट होऊन जीवनांतील प्रत्येक गोष्टीत उदासीनता त्यांनीं धारण केली. आपण ध्येयच्युत झालों, तेव्हां निदान सरस्वतीची सेवा करण्यांत तरी आपल्या आयुष्याचा प्रत्येक क्षण खर्चावा असें मनाशीं निश्चित ठरवून ' कादंबरी 'चें सुंदर मंदिर निर्माण करून ते त्यांतच तन्मय होऊन गेले. बाह्य जगाचा त्यांस विसर पडला! किंबहुना, जगाची विस्मृति व्हावी एवढ्याचसाठीं वाङ्मयसमुद्रांत त्यांनीं आपली वृत्ति विरवून टाकिली.

घरीं फक्त भोजनासाठींच येण्याचा त्यांचा क्रम होता. घरीं आल्यावर मात्र आपला विवाह झाला असल्याची स्मृति त्यांस होई. परंतु भोजन आटोपून घरा-बाहेर पडल्यानंतर घरादाराचा विसर पडून तात्काल ते विचारांत गुंग होऊन जात. प्रथम त्यांची ही उदासीनता कोणाच्याच ध्यानांत आली नाहीं. वेणूताई अल्पवयी असल्यानें त्यांनाही कांहीं जाणीव नव्हती. परंतु वर्षामागून वर्षें लोटलीं. वेणूताईस सर्व गोष्टी समजूं लागल्या. नानाप्रकारचे विचार डोक्यांत येऊन त्यांस त्रास देऊं लागले. परंतु कांहीं केल्या हरिभाऊंच्या उदासीनतेचें गूढ त्यांस उकलेना. घरी आले

म्हणजे हरिभाऊ सर्वांशींच बोलत, थट्टा विनोद करीत, परंतु यापेक्षां आपल्या जीवनक्रमांत त्यांनी बिलकुल बदल केला नाही. वेणूताईच्या जागीं दुसरी कोणी मुलगी असती तर तिनें कोणत्याच प्रकारे वाईट वाटून घेतलें नसतें. परंतु लहानपणापासून त्यांचा स्वभाव विचारी व अत्यंत मानी असल्यानें त्यांचा मनस्ताप विशेषच वाढला. हरिभाऊ घरी आल्यावर मोकळेपणानें बोलत, प्रकृतीची विचारपूस करीत, आजारी असल्यास स्वतः औषधपाणी देत; त्यामुळें तर त्यांस अगदींच बुचकळ्यांत पडल्यासारखें होई. " आपले पति विद्वान् आहेत, सुस्वभावी आहेत, " याची त्यांना पूर्ण जाणीव होती व अशा थोर पुरुषाची सहधर्मचारिणी होण्याचा मान आपणांस मिळाला म्हणून त्यांस मनांतून फार आनंद वाटे. त्यांस लहानपणापासून गायनाचा व लिहिण्यावाचण्याचा फार नाद होता. हरिभाऊंनाहि शिक्षणाची हौस होती असें त्यांनीं ऐकलें होतें. आपण विशेष शिकलेल्या नसलों तरी, हरिभाऊंनीं मदत केल्यास आपण शिकून चांगल्या तयार होऊं असें त्यांस वाटे. त्यांची बुद्धीहि तीव्र असल्यानें वेणूताईस शिकवून सुशिक्षित करणें म्हणजे खरोखर सोपी गोष्ट होती. परंतु मथूताईस शिक्षणाबाबत घरांतल्या मंडळींनीं फार त्रास दिला म्हणून हरिभाऊंनीं वेणूताईना स्वतः शिकविण्याचा आरंभी बिलकुल प्रयत्न केला नाहीं.

वेणूताई गृहकृत्यें हुषारीनें व टापटिपीनें करीत. ' कामावें तें सामावें ' ही म्हण लक्षांत घेऊन घरांतल्या वडील स्त्रियांस खूप करण्याची युक्ति म्हणजे हौसेनें घरांतील सारी कामें करणें होय, हें ओळखून त्या प्रत्येक काम अत्यंत व्यवस्थितपणें करीत. नानासाहेब बेळगांवी असतां वेणूताई त्यांच्याकडे प्रथमच गेल्या होत्या, तेव्हां त्यांची गृहकृत्यें करण्याची दक्षता पाहून "सून हुषार आहे," अशी नानासाहेब व लक्ष्मीबाई यांची पूर्ण खात्री झाली.

चिमामावशी वेणूताईच्या कामासंबंधीं खूप असल्या तरी एका बाबतींत नेहमीं नाराज असत. वेणूताईच्या माहेरून हुंडा व इतर देणग्या विशेष न मिळाल्यानें त्या वेणूताईना नेहमीं टोंचून बोलत. मथूताईच्या वेळच्या त्यांस न आवडलेल्या हरिभाऊंच्या सुधारकीपणाच्या गोष्टी काढून त्यांवरूनहि बोलण्यास त्या मागेंपुढें पहात नसत. अर्थात् वेणूताईस या गोष्टी मुकाट्यानें ऐकून घेण्यावांचून गत्यंतर नसे.

लग्नापूर्वी त्यांची प्रकृति निरोगी व सुदृढ होती. परंतु लग्न झाल्यापासून प्रकृति नादुरुस्त होऊन त्या वारंवार आजारी पडूं लागल्या. औषधोपचार होत असले

तरी सासुरवाशीण म्हणून त्यांस काम न करतां स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. एकसारखें ओल्यांत काम करावें लागल्यानें अंगांत वात शिरला. त्यामुळें पाहणारास त्या आजारी आहेत असें वाटत नसे. हरिभाऊ घरीं येत, त्या वेळीं औषध घेतलें किंवा नाहीं याची चौकशी करीत व औषध घेतलें नसल्यास समक्ष घेण्यास लावीत. परंतु इतकेंसुद्धां घरांतील मंडळींस न खपून " कां, घरांत विचारपूस करणारीं माणसं नाहींत ? स्वतःच सारं करूं लागल्यावर आमची काय किंमत राहिली ? आतां आम्ही घरांतून नाहींशा झालों तर बरं ! मुळी तरी किती अगोचर ? आम्हांला दुखण्याचं सांगायला काय झालं ? पुरुषांना सांगायचं म्हणजे काय ! आम्ही कुणी आहों का नाहीं ?" अशा तऱ्हेचीं नाना प्रकारचीं चिमामावशीची बोलणी वेणूताईंना ऐकणें भाग पडे. त्यामुळें हरिभाऊंनीं आपल्या प्रकृतीचीसुद्धां चौकशी न केली तर बरें असें त्यांस वाटे.

याच सुमारास नानासाहेब सहा महिन्यांची रजा घेऊन पुण्यास रहावयास आले. " सूनबाईची प्रकृति इतकी खराब कशानं झाली ? " असें त्यांनीं चिमामावशींस विचारतांच " तीं नेहमींच आजारी असते. रोगी मुलगी आमच्या गळ्यांत बांधली आहे," असें त्यांनीं उत्तर दिलें. नानासाहेबांनीं त्यावर कांहीं एक न बोलतां आपले स्नेही डॉ. आठवले यांचें औषध वेणूताईस सुरू केलें. सासूसासऱ्यांचें दोघांचेंही वेणूताईच्या बद्दल चांगलें मत असे.

डॉक्टरनें वेणूताईस व्यायामासाठीं फिरावयास पाठवा म्हणून सांगतांच घरांतील बायकांनी गहजब केला. परंतु प्रकृति सुधारण्याठीं व्यायाम अवश्य असल्यानें नानासाहेबांनी त्यांस रोज बाहेर पाठविण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें वेणूताई एका विश्वासू शिपायास बरोबर घेऊन कधीं फर्ग्युसन कॉलेजकडे तर कधीं पद्मावतीच्या बाजूस फिरावयास जाऊं लागल्या. पण बाहेरून घरीं आल्यानंतर रोजचीं कामें त्यांना करावींच लागत. पुनः डॉक्टरनें " व्यायाम हवा " असें सांगितल्यानें घरांतील बायकांस सवडच सांपडल्यासारखें होऊन वेणूताईस कामाची विशेषच दगदग पडूं लागली. राहणें माडीवर, तिसऱ्या मजल्यावर ठेवरेव व खालच्या मजल्यावर पाणी, त्यामुळें त्यांस खालवर खेपा पडून पाय सुजल्यामुळें फिरावयास जाणें बंदच करावें लागलें. याच सुमारास वेणूताईची चुलतभावजय त्यांस भेटावयास आली. ती नर्स असल्यानें तिला औषधांची चांगली माहिती होती. वेणूताईस एक औषध लिहून देऊन

त्यावर दूध घेण्यास तिनें सांगितलें. तें औषध सुरू झाल्यापासून वेणूताईच्या प्रकृतींत सुधारणा झाली. परंतु त्यांना दूध आवडत नसल्यानें तें जितकें घ्यावयास पाहिजे होतें तितकें त्यांनीं घेतलें नाहीं. त्यामुळें त्या औषधाचा वाईट परिणाम होऊन त्यांस ' नागीण ' नांवाचें भयंकर दुखणें झालें. नागिणीचा वेढा पूर्ण झाल्यास मनुष्यास मृत्यु येतो असें म्हणतात. डॉ. सहस्रबुद्धे यांच्या औषधानें हें दुखणें बरें झालें. वेणूताई सतत दोन महिने निजून होत्या, परंतु लक्ष्मीबाईच्या प्रेमळ शुश्रूषेमुळें त्या बऱ्या झाल्या. दुखणें लांबलें असलें तरी सासूबाईच्या सहानुभूतीनें वेणूताईस फार आराम वाटे. डॉ. सहस्रबुद्धे हे वेणूताईच्या सासरची परिस्थिति जाणत होते. त्यामुळें ते त्यांची अतिशय कळकळीनें विचापूस करीत. त्यांच्या व नानासाहेबांच्या आग्रहास्तव वेणूताईनीं एकसारखें सहा महिने जेव्हां औषध घेतलें, तेव्हां कुठें त्यांची प्रकृति चांगली बरी झाली.

या वेळची त्यांची मनःस्थिति अत्यंत अनुकंपनीय होती यांत शंका नाही. लग्न झाल्यापासून त्यांच्या मागें नानातऱ्हेचे आजार लागले. आजारी मनुष्यास सहानुभूतीची, प्रेमळ बोलाची अत्यंत जरूरी असते. परंतु वेणूताईच्या जवळ मायेचें असें एकही मनुष्य नव्हतें. त्यांची मावशी व बहीण या पुण्यांतच होत्या. परंतु त्यांना माहेरीं पाठविण्यास चिमामावशी फार खळखळ करीत. घरांत चोवीस तास कांहीना कांहीं तरी काम करावें लागे, मोकळेपणा बिलकुल नाहीं, करमणुकीसाठी म्हणून कधीं लोंकरीचें किंवा सुताचें विणकाम हातीं घेतलें की, त्याच वेळीं हटकून कांहीं ना कांहीं तरी काम निघून हातांतील विणकाम दूर सारावें लागे. वाचनाची आवड असूनही वाचायला वेळ नाही, जागा नाहीं, अशी स्थिति! केव्हां बहिणीकडे जाण्याची परवानगी मिळालीच तर तिच्याशीं तेवढें मनमोकळें बोलतां येई.

हरिभाऊंची आत्यंतिक उदासीनता, घरांतील बायकांकडून होणारा चमत्कारिक कोंडमारा व नादुरुस्त प्रकृति अशा विलक्षण परिस्थितीनें घेरल्यावर वेणूताईना अगदीं वेड्यासारखें व्हावें यांत कसलें आश्चर्य? विचारांनीं डोकें बहकून जाऊन आपलें जीवित संपेल तर बरें असें त्यांना वाटे. स्वभाव अत्यंत मानी, त्यामुळें त्यांना कोणाचें उणें बोलणें सहन होत नसे, परंतु तें तर नेहमींच ऐकून घ्यावें लागे. या सर्व मानसिक त्रासांचा परिणाम शरिरावर होऊन त्यांस तेव्हांपासून डोकें दुखण्याचा विकार जडला. ' आपलें जीवित कसें जाणार!' अशी चिंता उत्पन्न होऊन

त्यांची वृत्ति पराकाष्ठेची निराश बनली. वडील बहीण मात्र त्यांस उपदेश करून परोपरीनें त्यांची समजूत घालीत असे. तिच्या बोधपर बोलांनीं वेणूताईचें मन किंचित् उल्हसित होई. पडेल व होईल तितकें काम करावें, विशेष कोणाशीं बोलूं नये, असा वेणूताईंचा निराशामय आयुष्यक्रम चालला होता.

नानासाहेब इ. स. १८९६ त पेन्शन घेऊन पुण्यास राहूं लागले. त्यामुळें घरांतील सर्व गोष्टींकडे त्यांचें साहजिक लक्ष जाई. घरांतील एकंदर परिस्थिति त्यांच्या लक्षांत येऊनच कीं काय त्यांनीं एके दिवशीं चिमामावशींना म्हटलें, " सूनबाई संसार संभाळण्याजोगी झाली आहे व आनंदाश्रमांत राहण्याची चांगली व्यवस्था आहे. तेव्हां तात्या व सूनबाई यांना तेथें राहण्यास सांगावें. " ही गुणगूण वेणूताईंच्या कानीं जातांच त्यांना किती तरी बरें वाटलें! त्याबद्दल त्यांनीं पुष्कळ सुंदर सुंदर मनोराज्यें केलीं. लग्न झाल्यापासूनच आपणांस आनंदाश्रमांत रहावयाचें अशी त्यांच्या मनाची भावना होती. परंतु आजपर्यंतच्या अनुभवावरून आपल्या इच्छेप्रमाणें घडणें सुलभ नाहीं असेंच त्यांना वाटे.

नानासाहेबांचें व हरिभाऊंचें समक्ष भाषण क्वचितच होत असल्यामुळें चिमा-मावशींनीं हरिभाऊंना त्यांचा निरोप सांगितला. त्यावर किंचित् रागावून हरिभाऊंनीं म्हटलें, " मावशी, मी तुम्हांस नकोसा झालों आहें काय? तुम्ही मला वेगळें राहण्यास कां सांगतां? मी तुम्हां मंडळींना सोडून वेगळा राहणार नाहीं. " हें ऐकून मावशी कांहींच न बोलतां स्तब्ध राहिल्या. हरिभाऊंनीं वेगळें रहावें हें मावशींनाही विशेष पसंत नव्हतें असें दिसतें. नाहीं तर त्या या बाबतींत खटपट केल्याशिवाय कधींही राहत्या ना. मावशींनीं एखादी गोष्ट करावयाची ठरवली तर ती सिद्धीस गेल्यावांचून रहात नसे. त्यांनीं पुढाकार घेऊन हट्टच धरला असता तर आनंदाश्रमांत बिऱ्हाड केव्हांच झालें असतें! मावशींच्या दुर्लक्षामुळेंच आनंदा-श्रमांत बिऱ्हाड न होऊन वेणूताईंच्या आशा जागच्या जागीं राहिल्या. त्यांनीं रचलेले मनोरथ ढांसळले व त्यांचा पूर्ववत् निराशापूर्ण खडतर आयुष्यक्रम आणखी कांहीं दिवस तसाच चालू राहिला. असो.

इ. स. १९०२ सालीं मिस्टर कीटिंग, त्या वेळचे कलेक्टर, यांच्या बोलावण्या-वरून हरिभाऊ जुन्नरला गेले असतां इकडे चिमामावशी एकाएकीं आजारी पडून त्यांचें दुखणें उदरावर गेलें. जातांना ते मावशींना विचारून गेले होते. तीनच दिवसांचें

उदर होऊन त्यांतच मावशींचा अंत झाला. योगायोग असा कीं, जुन्नरहून परत येतांना टांग्याचे घोडे सुटून पळून गेले व दुसरे घोडे मिळून पुण्यास पोहोंचण्यास हरिभाऊंना उशीर झाला व शेवटीं मावशींची भेट झाली नाहींच ! मावशींच्या मृत्यूनें एक कर्तृत्ववान, स्पष्टवक्ती, करारी, संसारांतील प्रत्येक प्रसंग चातुर्यानें पार पाडून कुटुंबाची एकी राखणारी बाणेदार स्त्री नाहींशी झाली. चिमामावशी म्हणजे आपटेकुटुंबाची मध्यवर्ति शक्ति होती. ती प्रबल शक्ति नष्ट होतांच कुटुंबांतील घटक क्षीण होऊन वेगळे झाले. निःपक्षपाताचें मावशींचें धोरण इतरांस न साधून घरांतील व्यवस्था बिघडली व फार गोंधळ झाला !

चिमामावशींच्या मृत्यूनें जर कोणाचें विशेष नुकसान झालें असेल तर तें वेणूताईचें ! मावशी तापट, कडक असल्या तरी अयोग्य गोष्टी त्यांस खपत नसत व ज्याच्या कडे सत्य आहे त्या बाजूनें स्पष्ट बोलण्यास त्या कधींही मागें पुढें पहात नसत. मावशींचा न्यायी कारभार संपल्यानें वेणूताईना फार त्रास होऊं लागला व ही गोष्ट हरिभाऊंच्याही ध्यानांत आली. हरिभाऊ संध्याकाळीं सहा वाजतां घरीं जेवावयास आले म्हणजे आपण अगदीं आनंदांत आहोंत असें दाखविण्याचा वेणूताई प्रयत्न करीत ! परंतु असा वरवर आणलेला आविर्भाव किती दिवस टिकणार ? या सर्व त्रासांचा त्यांच्या शरिरावर व मनावर परिणाम होऊन रोज ताप येऊं लागला. ताप थांबला की हिंडावें, काम करावें, ताप भरला की पडून रहावें असे कांहीं दिवस गेले. परंतु त्यामुळें अतिशय अशक्तपणा आला. नानासाहेबांनीं डॉक्टरला त्यांची प्रकृति दाखवितांच त्यांनीं सांगितलें कीं, "मुलीच्या डोक्यास फार त्रास झालेला दिसतो. डोक्यास पूर्ण विश्रांति दिली तर मुलगी हातीं लागेल, नाहीं तर दुखणें क्षयावर जाईल." हे डॉक्टरांचे उद्गार कानीं पडतांच हरिभाऊ घाबरून गेले. डॉ. अण्णासाहेब पटवर्धन यांचें औषध वेणूताईस सुरू करण्यांत आलें व त्यांच्या प्रकृतीसंबंधीं हवालदिल झालेल्या हरिभाऊंनीं त्यांस शेवटी आनंदाश्रमाच्या हवाशीर जागेंत आणून ठेविलें. आपल्या विरक्त आचरणानें वेणूताई जमीनदोस्त झालेल्या पाहून त्यांस फार खेद झाला. घरांतील वडील मंडळी कोणतीच गोष्ट आपल्या मनाप्रमाणें करून देत नाहींत तर आपण स्वतः कोणत्याही तऱ्हेच्या सुखाची अपेक्षा धरावयाची नाहीं व त्यासाठीं प्रयत्न करावयाचा नाहीं असें त्यांनीं वैतागानें ठरविलें होतें. मनोरम गृहसौख्याचीं एके काळीं उभारलेलीं सुंदर उद्यानें त्यांच्या अंतः-

करणांतील निराशेच्या धगीनें त्यांनीं स्वतःच शुष्क करून टाकलीं होतीं. काशीताई वेणूताईसंबंधीं कांहीं बोलूं लागल्या तर त्यांनीं डोळ्यांस पाणी आणून "या विषया-खेरीज दुसरें कांहीं बोला," असें त्यांस सांगावें. काशीताईच्या पत्रांत त्यांनीं एकदां लिहिलें, "मी तुमच्या घरीं येऊन महिना महिना राहणें, हें जेव्हां शक्य होतें तेव्हां घडलेंच. आणखी केव्हां घडलें तर घडेल ! अशक्य नाहीं. परंतु तुम्ही **माझ्या घरीं** ( हे दोन शब्द लिहितांनाच मला विषाद वाटून हसूं येतें आहे ) येणें या जन्मांत तर कांहीं शक्य नाहीं. पुनर्जन्म आहे म्हणणाऱ्यांचें म्हणणें जर खरें असलें, आणि त्यांच्या म्हणण्याप्रमाणेंच या जन्मीं ज्यांची कांहीं आशा राहिली असेल त्यांची ती आशा दुसऱ्या जन्मांत पुरी होते हेंही जर खरें असेल, तर त्यावर भिस्त ठेवून इथून लवकर जातों केव्हां एवढीच वाट पाहण्यांत समाधान मानून घ्यावें. कारण **माझें घर** या जन्मांत माझ्या हातून होईलसें दिसत नाहीं." अशा तऱ्हेची आपली विलक्षण निराश वृत्ति त्यांनीं बनविली होती. स्वतः बोलून दाख-विलेल्या सुधारणांच्या कल्पना आपण आचरणांत आणल्या नाहीत याबद्दल त्यांस उद्वेग झाला. त्याच सुमारास संमति वयाच्या बिलाच्या चर्चेनें समाज क्षुब्ध झाला होता. हरिभाऊ बिलास अनुकूल होते. या बाबतींत त्यांची मतें पक्कीं ठरलेलीं असून निदान शक्य त्या सुधारणा आचरणांत आणण्याचा त्यांनीं दृढ निश्चय केला. व त्याप्रमाणें कित्येक वर्षेपर्यंत त्यांनीं नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळलें. परंतु आपण स्वतःस करून घेतलेली ही शिक्षा, आपणांवर सर्वस्वी अवलंबून राहणाऱ्या एका निरपराधी जीवासही आपण करीत आहोंत हें त्यांच्या ध्यानीं आलें नाहीं. परंतु वेणूताईच्या या आजारामुळें व विशेषतः डॉक्टरांनीं घातलेल्या भीतीमुळें त्यांचे डोळे पुरे उघडले.

उभयतांचें हें असिधाराव्रत हरिभाऊंच्या दृष्टीनें पाहतां अत्यंत श्रेयस्कर ठरलें. याच कालांत त्यांनीं आपल्या 'पण लक्षांत कोण घेतो ?' 'मी,' 'उषःकाल' इत्यादि उत्तमोत्तम कादंबऱ्या लिहिल्या. या असिधाराव्रतामुळेंच भावानंदासारख्या वैराग्यशील, देशाभिमानी, स्वार्थत्यागी संन्याश्याचें उदात्त-गंभीर चित्र हरिभाऊंना रेखाटतां आलें ! भावानंदाचें चित्र अंतःकरणपूर्वक रंगवून त्यांनीं समाजापुढें एक उज्ज्वल आदर्श ठेविला. त्यांच्या बहुतेक कादंबऱ्या त्यांच्या या तपश्चर्येचेंच फळ होत. या कालांत दहा बारा कादंबऱ्या लिहून हरिभाऊंनीं सरस्वती देवीचें उद्यान स्वर्गीय सुमनांनीं फुलवून टाकलें.

वाङ्मयसृष्टींत त्यांनीं अलौकिक भव्य मंदिर निर्माण केलें खरें, परंतु या कृत्यामुळें त्यांच्या संसारमंदिराचा पायाच ढांसळून पडण्याची वेळ येऊन ठेपली. आपल्या पत्नीची दशा पाहतांच आजवर अजाणतां केलेल्या उपेक्षेबद्दल त्यांस पश्चात्ताप झाला व यापुढें झालेल्या चुकीचें परिमार्जन करून तिला सुखांत ठेवण्याचा त्यांनीं निश्चय केला. हरिभाऊंच्या काळजीपूर्वक कळकळीनें केलेल्या शुश्रूषेनें वेणूताईची प्रकृति सुधारली. त्या आनंदाश्रमांतच रहात असल्यानें सतत सहवासानें त्यांच्या अंगचे अनेक गुण हरिभाऊंच्या दृष्टोत्पत्तीस आले व अशा सद्गुणी स्त्रीस आपण आजवर सुख दिलें नाहीं असें वाटून त्यांचें मन त्यांस खाऊं लागलें.

वेणूताई बऱ्या झाल्यानंतर पुनः जोगेश्वरीच्या बोळांतील घरीं जाण्याचा प्रश्न उपस्थित झाला ! हरिभाऊंच्या कमालीच्या भिडस्त व संकोची स्वभावामुळें आनंदाश्रमांत स्वतंत्र बिऱ्हाड करून वडिलांपासून दूर राहण्याचें धारिष्ट त्यांस होईना. एका गांवांत राहून दोन बिऱ्हाडें करण्याची कल्पना त्यांस पसंत पडेना. परंतु तेथील कोंडमाऱ्याला वेणूताई इतक्या त्रासून गेल्या होत्या कीं, त्यांनीं धीर करून हरिभाऊंस निक्षून म्हटलें, " आपल्या राहण्याची आनंदाश्रमांत व्यवस्था करून ठेविली असतां आपण येथें कां रहावयाचें नाही ? " त्यावर " वडिलांपासून दूर राहणें जगांत वाईट दिसतें," असें हरिभाऊंनी उत्तर दिलें. या प्रश्नाचा कायमचा निकाल लावण्याचा वेणूताईंनी निश्चय केला असल्यामुळें त्या म्हणाल्या, " मी त्या घरांत आतां जाणार नाहीं. आपली नातेवाईक मंडळी आपणांस हवी असल्यास त्यांना येथें आणा पाहिजे तर. परंतु तेथल्या कोंडमाऱ्यानें जीव अर्धा मेला करून घ्यायची आतां माझ्यांत ताकद नाहीं. " पत्नीचें हें निर्वाणीचें भाषण ऐकतांच हरिभाऊ निरुत्तर झाले. वेणूताईच्या आग्रहामुळें शेवटी आनंदाश्रमांत त्या दोघांनीं रहावयाचें असें ठरविलें. हरिभाऊंनीं आनंदाश्रमांतच रहावें अशी नानासाहेबांची पूर्वीपासूनच इच्छा होती, त्यामुळें वेणूताईची इच्छा सफल होण्यास विशेष त्रास पडला नाहीं. अशा रीतीनें हरिभाऊंना आनंदाश्रमांत कायम रहावयास लावण्याचें दुष्कर कार्य पार पाडून अण्णासाहेबांचीही मनीषा पूर्ण करण्याचें भाग्य वेणूताईस लाभलें.

इ. स. १९०३ सालच्या चैत्राच्या महिन्यांत आनंदाश्रमांतील आनंदाच्या संसारास त्यांनीं प्रारंभ केला. वेणूताई अननुभवी असल्यानें त्या सर्व जबाबदारी कशी काय पार पाडतील अशी हरिभाऊंना भीति वाटत होती ! परंतु त्यांची ही भीति



सौ. रमाबाई ( उर्फ वेणूबाई ) व हरिभाऊ

बालोद्यान प्रेस, पुणें.

थोड्याच दिवसांत निरर्थक ठरून वेणूताईच्या कर्तबगारीची त्यांस साक्ष पटली. हरिभाऊंच्या आवडीनिवडी ध्यानांत धरून वेणूताई सर्व गोष्टी अत्यंत दक्षतेनें करीत. त्यांचा स्वभाव फार मानी असल्यानें आपण हट्टानें येथें राहिलों, तेव्हां अमुक एक गोष्ट चांगली झाली नाही असे उद्गार काढण्याचा प्रसंग हरिभाऊंना येऊं देऊं नये, याबद्दल त्या तत्पर असत. चिमामावशीच्या कडक तालमींत तयार झाल्यामुळें नोकरचाकरांवर दाब ठेवून त्यांच्या कडून कामें करवून घेण्याची कला त्यांस अवगत होती. नोकरचाकर असले तरी घरच्या मालकिणीनें स्वतः कामें करावीं अशी हरिभाऊंची इच्छा असल्यानें वेणूताईना नोकरांच्या कामांवर देखरेख करून शिवाय कांहीं कामें स्वतःच करावी लागत. हौसेनें व टापटिपीनें त्यांस संसार चालवितांना पाहून हरिभाऊंना कौतुक वाटे.

वडील मंडळीच्या धाकांत आजवर आयुष्य गेल्यानें हरिभाऊंच्या कित्येक नैसर्गिक आवडीनिवडी अपुऱ्या राहिल्या होत्या. दहा माणसांच्या खटल्यांत त्यांच्या इच्छेप्रमाणें वागतां येणें शक्य नव्हतें. आनंदाश्रमांतील स्वातंत्र्याचें वारें लागतांच त्यांचा मूळचा आनंदी, विनोदी, हौशी स्वभाव प्रकट झाला व आनंदाश्रम खऱ्या खऱ्या आनंदाचें स्थान झाला.

१९०३ नंतरचा हरिभाऊंचा जीवनक्रम सुखपूर्ण झाला. ती दोघेंजण सकाळीं साडेदहाच्या सुमारास बरोबरच जेवीत. ब्राह्मण वाढायला असल्यानें ही गोष्ट शक्य होती. दुपारच्या प्रहरी हरिभाऊ आनंदाश्रमाचें काम पहात. वेणूताईच्या शिक्षणाची हयगय झाली म्हणून त्यांनी त्यांस शिकविण्यास प्रारंभ केला. हरिभाऊस पहांटे उठण्याची संवय होती. म्हणून कांही दिवस पहांटे वेणूताईस तास दीडतास ते शिकवीत. परंतु पहांटे उठणें वेणूताईच्या प्रकृतीस सोसेना. त्यांचें डोकें दुखूं लागलें. तेव्हां पंधरावीस दिवसांतच पहांटेचें शिक्षण बंद झालें. कांहीं दिवस दुपारी चहाचे आधीं तास दीड तास हरिभाऊ त्यांस शिकवीत असत. परंतु तेव्हां सुद्धां कामानिमित्त कारकून वगैरे येऊन शिक्षणांत व्यत्यय येईच. स्वतः शिकविण्याचें जमेना, तेव्हां वेणूताईस इंग्लिश शिकविण्यास त्यांनीं शिक्षकिणी वगैरे ठेविल्या होत्या. परंतु गृहकृत्यांमुळें व सांसारिक अडचणीमुळें त्यांचें विशेष शिक्षण होऊं शकलें नाहीं. घरांतील सर्वच जबाबदारी वेणूताईच्यावर असल्यामुळें त्यांचा बहुतेक वेळ तिकडेच खर्च होई.

## हरि नारायण आपटे

आनंदाश्रमांत हरिभाऊंचें स्वतंत्र बिऱ्हाड झाल्यापासून त्यांचेकडे पाहुणे मंडळी पुष्कळ येत. घरचीं मुलेंही येथेंच जेवूं लागलीं. आपले मनोरथ एकदांचे सफल झालेले पाहून हरिभाऊ जें जें म्हणतील तें तें करावयाचें असें वेणूताईनीं ठरवून टाकलें होतें. मागच्या गोष्टींबद्दल भरपाई करण्याकरितांच कीं काय हरिभाऊंनीं त्यानंतर त्यांस क्षणमात्रही वियोग होऊं दिला नाहीं. सभेस अगर फिरावयास तीं दोघेंजण बरोबरच जात. एक दोन दिवसांकरितां जरी गांवाला जाण्याचा प्रसंग आला तरी ते नेहमीं वेणूताईना बरोबर नेत.

सन १९०५ च्या चैत्राच्या महिन्यांत वेणूताई पुनः आजारी पडल्या. तेव्हां त्यांस हवा पालटण्यास लोणावळ्यास नेण्याचें ठरलें. हरिभाऊंनीं राधाकाकूंना लोणावळ्यास चलण्याचा आग्रह केला व त्या येण्यास तयार झाल्या. त्याप्रमाणें हरिभाऊ, वेणूताई, राधाकाकू, यमूताई ( हरिभाऊंची बहीण ) व एक गडी इतकी मंडळी लोणावळ्यास मुंबईचे प्रसिद्ध सॉलिसिटर हरि सीताराम दीक्षित यांच्या बंगल्यांत जाऊन राहिली. हरिभाऊ रोज सकाळीं कामासाठीं पुण्यास येत व संध्याकाळीं लोणावळ्यास जात. तेथील मोकळ्या हवेनें वेणूताईस बरें वाटल्यानंतर एक महिन्यानें सर्व मंडळी पुण्यास आली.

सन १९०६ सालीं माघ महिन्यांत दासनवमीस ताईचा जन्म झाला. फार वर्षांनीं अपत्य झालेलें पाहून हरिभाऊंना अतिशय आनंद झाला. हरिभाऊंच्या सर्व मित्र-मंडळींस व काशीताईस, ही कन्या-जन्माच्या महोत्सवाची वार्ता ऐकून फार समाधान झालें. परंतु हा आनंद फारसा अनुभवला नाहीं तोंच वेणूताईस ताप आल्यानें आनंदाचा विरस झाला. तिसऱ्या दिवसापासून त्यांस ताप येऊन दुखणें विषमावर गेलें. सहाव्या दिवशीं १०५ डिग्रीवर ताप चढला, जीभ आंत ओढूं लागली, त्यांस जिकडे तिकडे अंधार दिसूं लागला व बेशुद्धावस्था आली. डॉक्टर, नर्सेस् येऊन इंग्रजी उपचार सुरू झाले. नानासाहेब व लक्ष्मीबाई चातुर्मासानिमित्त नाशकास गेलीं होतीं. त्यांस तार जातांच दोघेंहि पुण्यास आलीं. दुखण्याचें मान एकसारखें वाढत चाललें. हरिभाऊंची मनस्थिति करुणास्पद झाली. नुक्तेच कोठें आनंदाचे चार दिवस दिसले नाहींत तोंच आपली पत्नी आपणांस व आपल्या चिमुकल्या बालिकेस सोडून जाणार कीं काय अशी धास्ती त्यांस पडली. वेळच्या वेळीं औषधें देण्याचें काम स्वतः हरिभाऊच करीत. विषम वीस दिवसांचा होता. तो दिवस उजाडतांच तर घरांत विषण्णतेची छाया पसरली. हरिभाऊ सारखे वेणू-

ताईच्या जवळच असत. रात्रीं ९ वाजण्याच्या सुमारास जास्त झालें. वेणूताई आतां हातीं लागत नाहींत अशी हरिभाऊंच्या मनाची खात्री झाली व तशाच विषण्ण मनःस्थितींत ते बारा वाजण्याच्या सुमारास माडीवर गेले. पुढें घडणारा प्रसंग डोळ्यांनीं पहावयास नको असें वाटून ते क्षणभर बिछान्यावर पडले, तों मानासिक व शारीरिक श्रमांनीं दमून गेल्यामुळें त्यांस झोंप लागली. दहा मिनिटांनीं दचकून जागे होऊन पाहतात तों घरांत जिकडे तिकडे निःस्तब्ध शांतता ! आपण ज्यास भीत होतों तो प्रसंग घडलाच असावा असें मनांत येऊन त्यांस खालीं जाण्याचें धैर्य होईना. वेणूताईच्या या आजारांत हरिभाऊंचे मित्र रंगोपंत अत्रे रोज हरिभाऊंस मदत करण्यासाठीं येत होते. रंगोपंतांस जवळ बोलावून त्यांनीं म्हटलें, "रंगोपंत, एकदां खालीं जाऊन काय आहे तें पहा !" रंगोपंत खालीं खोलींत जाऊन पाहतात तों वेणूताई शांत पडलेल्या असून त्यांस झोंप लागलेली ! वर जाऊन त्यांनीं हरिभाऊंस, "वहिनींना झोंप लागलेली असून चर्या बरी दिसते," असें सांगितलें. हें ऐकतांच हरिभाऊ खालीं आले. वेणूताईस खरोखरच झोंप लागलेली होती. पाहिली कळा जाऊन त्यांच्या चर्येतही पुष्कळच फरक पडला होता. तें पाहतांच संकट टळलें या विचारानें हरिभाऊंना व घरांतील इतर मंडळींना फार फार समाधान झालें. आठ पंधरा दिवसांत शक्ति येऊन वेणूताईंना पुष्कळच बरें वाटूं लागलें.

या आजारांत वेणूताईची मावशी त्यांच्याजवळ एकसारखी बसून होती. 'माय मरो अन् मावशी उरो' ही म्हण त्यांच्या बाबतींत तरी पूर्ण लागू पडण्यासारखी होती. वेणूताईची आई त्या तीन वर्षांच्या असतील नसतील तेव्हांच त्यांस सोडून गेली होती. तेव्हां लहानपणापासून त्यांचें पालनपोषण त्यांनीं अत्यंत ममतेनं करून त्यांचें लग्नहि करून दिलें होतें. बळवंतराव—वेणूताईचे वडील—लग्नानंतर पांच सहा वर्षांनींच वारले आणि ते जरी होते तरी त्यांच्या घरांत बायकोमनुष्य कोणीच नसल्यानें सर्व सोपस्कार मावशीच करीत. त्यामुळें माहेरचें मायेचें असें मनुष्य त्यांच्याशिवाय दुसरें कोणीच नव्हतें; नाहीं म्हणावयास वेणुताईची भाची गोदूताई ही एक होती. त्यांची बहीण मनूताई तर यापूर्वीच निवर्तली होती. त्यामुळें त्यांच्याहि घरांत पोरवडाच झाला होता. गोदूताईच सर्वांत मोठी असल्यामुळें तिलाच आपल्या लहान भावंडांचें सर्व कांहीं करावें लागे. त्यामुळें रोज समाचाराला म्हणून तास दोन तास येण्यापलीकडे तिला दुसरें कांहीं करितां येण्यासारखें नव्हतें. समाचारासाठीं

मात्र ती रोज येत असे. गोदूताईवर वेणूताईचें अत्यंत प्रेम होतें. त्यांच्या वयांमध्यें फार तर तीन चार वर्षांचेंच अंतर असल्यामुळें नात्यानें भाची असली तरी वेणूताईना गोदूताई बहिणीप्रमाणेंच वाटे. सारांश, त्यांच्या माहेरीं बायकामाणसांपैकीं जिवाभावाच्या म्हणजे मावशी आणि गोदूताई ह्याच होत्या. त्यांचे सर्वांत वडील बंधु, नागपूरचे प्रसिद्ध डॉक्टर चोळकर यांचे वडील, हे मध्यप्रांतांत वरोड्यास कोळशाच्या खाणीवर नौकर होते. दुसरे येथेंच आपल्या आजोबांच्याजवळ ( हुंडीवाले जोग) रहात. वेणूताईच्यापेक्षां एक मोठा भाऊ होता, त्यालासुद्धां मावशींनींच वाढविलें होतें. पण तो प्लेगमुळें दोनच वर्षांपूर्वी वारला असल्यामुळें तर मावशींना वेणूताईच्या प्रकृतीबद्दल विशेषच काळजी वाटत होती. परंतु दैवानें हात दिला व वेणूताईच्या ह्या जिवावरील दुखण्यांतून त्या बऱ्या झाल्या म्हणून सर्वांस अत्यंत आनंद झाला.

वेणूताईच्या आजारामुळें लांबणीवर पडलेलें बारसें पहिल्या महिन्याच्या शेवटच्या दिवशीं थाटांत होऊन मुलीचें नांव 'शांता' ठेवण्यांत आलें. आई आजारी असतांना मुलगी बिलकुल रडत नसे म्हणूनच हें नांव पसंत करण्यांत आलें. असो.

शांताताई तीन चार महिन्यांची झाल्यावर वेणूताई घरून परत आनंदाश्रमांत रहावयास आल्या. हरिभाऊंना लहान मुलें अत्यंत प्रिय असत. वेणूताई आजारी होत्या तेव्हां त्यांना ताईकडे लक्ष देण्यास फुरसतच सांपडली नाहीं. परंतु आनंदाश्रमांत ताई व वेणूताई आल्यापासून मुलीचें कौतुक करण्यांत हरिभाऊंचा बराच वेळ जाऊं लागला. बाहेरून आले कीं, ताईच्या पाळण्याशी उभे राहून ती हातपाय कशी हलविते, पालथी कशी वळते, हंसते कशी इत्यादि गोष्टींचें हरिभाऊ निरीक्षण करीत. तिच्या त्या गोड बाललीला पाहून त्यांच्या हृदयांतील आनंदसागरास भरती येऊन त्याचें प्रतिबिंब त्यांच्या मुखावर उमटे. ताईचें कौतुक करण्यांत तन्मय झालेली ती हरिभाऊंची शांत, आनंदमूर्ति वेणूताईना किती सुख देत असेल बरें! ताईस थोडा ताप आला कीं, हरिभाऊंचा जीव खालींवर होई. लहानपणीं ताईस मोठीं दुखणीं झालीं, तरी एकंदरींत हरिभाऊंचें आयुष्य आनंदांत चाललें होतें.

हरिभाऊंचा दिनक्रम खरोखर सुंदर होता. पहांटे तीन वाजतां उठून ते आनंदाश्रमांतील तिसऱ्या मजल्यावरील आपल्या खोलींत लिहावयास बसत. खोलींत मध्यावर टेबल असून जवळच एक पुस्तकांचें फिरतें शेल्फ होतें. पाश्चात्य व पौर्वात्य नामांकित ग्रंथकारांच्या उत्कृष्ट ग्रंथांनीं भरलेलीं तीनचार कपाटें तेथें असत.

पलीकडच्या खोलींत त्यांचा बराच मोठा ग्रंथसंग्रह असे. लिहिण्याच्या जागेंत त्यांच्या अनेक जिवलग मित्रांचीं छायाचित्रें असून मथूताई व काशीताई यांच्या मोठ्या छायाचित्रांनीं तर खोलीस विशेषच शोभा आली होती. अजूनही तीं छायाचित्रें जशींच्या तशींच भिंतीवर टांगलेलीं आढळतात. प्रत्यूषाच्या प्रशान्त समयी प्रत्यक्ष शारदा जणूं अदृश्य रूपानें तेथें अवतरून हरिभाऊंच्या हातून स्फूर्तियुक्त लेखन करवी. 'करमणुकी'चा व कादंबऱ्यांचा मजकूर ते याच वेळांत लिहीत. अशा रीतीनें दोन अडीच तास शारदेच्या सुंदर उपासनेंत परमानंदांत घालवून साडेपांचला चहा घेण्यासाठीं ते खालीं येत. त्या वेळीं ताई उठली असल्यास तिच्याशीं खेळण्यांत व इकडच्या तिकडच्या गप्पा करण्यांत गंमतीनें चहापान होत असे. अण्णासाहेब वांगोकर, रंगोपंत अत्रे, वासूकाका जोशी वगैरे स्नेही मंडळी बहुधा पहांटे चहालाच येत. गार पाण्यानें स्नान केल्यावर या मित्रमंडळींसह हरिभाऊ पर्वतीच्या बाजूस सहल करावयास जात. वाटेंत निरनिराळ्या मित्रांच्या घरीं जाऊन तेथें चहापान करून व त्यांना बरोबर घेऊनच फिरणें होई. अशा तऱ्हेनें आठ दहा स्नेह्यांच्या बरोबर गप्पागोष्टी, विनोद, चर्चा करीत नेहमीं फिरणें चाले. हरिभाऊंच्या बरोबर फिरावयास जाणाऱ्या मंडळींत रा. दिनकर हरि वाकनीस, नानासाहेब पानसे, रंगोपंत अत्रे, विनायकराव आपटे, बापूराव आंबेकर इत्यादि मंडळी असत. कधीं कधी हिराबागेंत या मंडळीचा चहाचा कार्यक्रम होत असे. कित्येकदां हरिभाऊंच्या डोक्यांत एकाद्या कादंबरीचें कथानक घोळत असलें म्हणजे त्यांतच गुंग होऊन आपण काय करीत आहोंत याचें भान त्यांस रहात नसे. अशा रीतीनें सहल करून साडेसातच्या सुमारास हरिभाऊंची स्वारी आनंदाश्रमांत परत जाई.

घरी आल्यानंतर अगोदर टपालाची चौकशी करून टपाल व वर्तमानपत्रें आलीं असल्यास तीं वाचण्यांत त्यांचा तास दीडतास सहज जाई. टपालाचें काम उरकल्यानंतर रामसिंग भय्यानें कोणी स्वामी संन्यासी आल्याची वर्दी दिल्यास ते त्यांस जाऊन समक्ष भेटत व त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या राहण्याजेवण्याची व्यवस्था करीत. स्वामींस भेटून परत येतां येतां मुलांच्या वसतिगृहांत शिरून त्यांच्या अभ्यासाची विचारपूस करून नंतर कोणी कामासाठीं भेटावयास आले असल्यास हरिभाऊ त्यांची भेट घेत. दहा साडेदहा वाजतां जेवण होत असे. मुलांचीं जेवणें कित्येक वर्षे हरिभाऊंच्या बरोबरच होत. पंक्तीस कोणी स्वामी असल्यास त्यांच्या

नियमाप्रमाणें सर्व गोष्टी करणें भाग पडे. स्वामींची पूजा उपाध्यायाकडून करवून मग मंडळ करून त्यांचें पान मांडीत. तूप लावलेल्या त्यांच्या पानावर सर्व पदार्थ वाढल्यानंतर त्यांस आचमन घालून मग सर्व भोजनास सुरुवात करीत. हरिभाऊ आनंदाश्रमांत नेहमीं सोंवळ्यानें जेवत. स्वामींचें भोजन झाल्यावर वेणूताईस आचमन घालावें लागे. हा सर्व भोजनसमारंभ आटोपतो तों अकरासाडेअकरांचा सुमार होई. भोजनोत्तर कधीं मोठ्या दिवाणखान्यांत तर कधीं गॅलरींत बसून ते आनंदाश्रमाचें काम पहात. कारकून व शास्त्रीमंडळी त्यांना भेटण्यास येत. दुपारचा साराच वेळ आश्रमाच्या कामास न लागल्यामुळें या वेळांत ते बरेंच वाचन करीत. दुपारीं वेळ झाल्यास वेणूताईस ते शिकवीत. चहानंतर पुनः कांहीं काळ वाचनांत जाई. १८९८ पासून कित्येक वर्षें पुण्यास प्लेग चालू होता. प्लेग-व्हॉलंटिअर म्हणून आरंभीं स्वतः व पुढें म्युनिसिपॅलिटीतर्फे त्यांनीं मोठें कार्य केलें. या कामासाठीं वेळ पडेल तेव्हां दिवसा-रात्रीं त्यांस बाहेर जावें लागे. पांच वाजायच्या सुमारास ‘ आनंदाश्रम क्लब ’ची मंडळी जमत. हा क्लब पूर्वी वाडसाहेबांच्या येथें भरत असे. त्यानंतर कांहीं दिवस रा. ब. अंजनगांवकर यांच्या घरीं क्लबाची बैठक होई. पुढें आनंदाश्रमांत मंडळी जमूं लागल्यावर त्यास ‘ आनंदाश्रम क्लब ’ असें नांव पडलें. या क्लबांत रा. ब. अंजनगांवकर, रा. ब. कुमठेकर, श्री. रणसिंग, प्रो. पानसे, श्री. दिनकर हरि वाकनीस, तात्या सोहनी, वामनराव लेले, गोपाळराव मोडक, आबा दीक्षित, जगदे मामलेदार, बापूराव आंबेकर, रंगोपंत अत्रे, गोगटे मास्तर इत्यादि मंडळी येत. पत्ते खेळणें, चहा, फराळ वगैरे क्लबाचा कार्यक्रम असे. हरिभाऊ नियमानें क्लबांत बसतच असें नाहीं. जरुरीचें काम असल्यास ते या वेळीं बाहेर जात किंवा महत्त्वाचें लेखन करणें असल्यास वर लिहीत बसत. सायंकाळीं केव्हां केव्हां ताई व वेणूताई यांसह ते गाडींतून फिरावयास जात. क्लबांत हजर असल्यास गप्पा, विनोद, खेळ यांतच ते वेळ खर्च करीत. रामसिंगानें आठाचे ठोके दिले कीं खेळ बंद करून मंडळी जिना उतरावयास लागत. हरिभाऊंचें रात्रीचें भोजन कधीं आठ साडेआठाला तर कधीं संध्याकाळीं साडेसहा सातलाच होत असे. लहर येईल तेव्हां ते जेवीत. रात्रीं भोजन झाल्यावर कांहीं काळ वाचनांत घालवून केव्हां मनांत आल्यास एकतारीवर, चिपळ्या घेऊन ते भजन करीत. त्यांचा आवाज गोड असून त्यांस स्वरज्ञानहि चांगलें होतें. तुकारामाचे अभंग घोळून घोळून

म्हणत असतां ते तल्लीन होऊन जात. धार्मिक ग्रंथांचें त्यांचें वाचन अखंड चालू असे. पुढें पुढें तर ' दासबोधा 'चा त्यांस अतिशय नाद लागला. त्यांना रात्रीं लौकर निजण्याची संवय होती. नऊ वाजण्याच्यापुढें ते बहुधा जागत नसत. कादंबरीचें लेखन जोरांत चालू असलें म्हणजे मात्र रात्रीं लहर लागेल तेव्हां उठून ते लिहीत. आनंदाश्रमांत स्वतंत्र घर झाल्यापासून सामान्यतः याच तऱ्हेचा त्यांचा दिनक्रम चालू होता.

वेणूताईसह संसार थाटल्यानंतर हरिभाऊंच्या स्नेही मंडळींची आनंदाश्रमांत गर्दी उडूं लागली. सर्व वर्गांचे त्यांचे स्नेही होते. वेणूताई येण्यापूर्वी पाहुण्यांची सोय आनंदाश्रमांत होणें शक्य नव्हतें. परंतु आतां मात्र हक्कानें परगांवची मित्रमंडळी आनंदाश्रमांत उतरूं लागली. हरिभाऊंचे कित्येक गुजराथी व बंगाली स्नेही त्यांच्याकडे पाहुणे येत. या सर्व पाहुण्यांची बडदास्त राखतां राखतां वेणूताईची पुरेवाट होई. एक पाहुणा सकाळच्या गाडीनें जातो तों रात्रींच्या गाडीनें दुसरा हजर होई; कोणाची अमुक दिवशीं येतो म्हणून तार येई, तर कोणी स्टेशनवर घेण्यासाठीं बोलावी. मित्रमंडळींचा हरिभाऊंना विशेषच नाद होता व त्यांचें आदरातिथ्य करणें त्यांस फार आवडे. आपटे घराणें मोठें असल्यामुळें नेहमींची घरचीच पाहुणे मंडळी बरीच असत. शिवाय हरिभाऊंच्या आजोळची, वेणूताईच्या माहेरची, हरिभाऊंचे स्नेह्यांच्या ओळखीची मंडळी अशी कोणी ना कोणी तरी सदोदित येत. कोणी सरकारी कामासाठीं तर कोणी पुणें पाहण्यास येत. मे महिन्यांत व नाताळांत तर आनंदाश्रम लग्नघराप्रमाणें गजबजून जाई. लग्नसराईच्या आधीं परगांवचे स्नेही आपल्या मुलींना पाहण्यास स्थळांना सोईचें पडावें म्हणून हरिभाऊंच्याकडे आणून ठेवीत. त्या मुलींच्या लग्नांत खटपट करण्याचें काम हरिभाऊंस करावें लागे. लग्नें मित्रांच्या मुलींचीं व धांदल हरिभाऊंची व त्यांच्याबरोबर वेणूताईची, अशी गंमत होई. या मुलींचीं लग्नें झाल्यावर त्या माहेरीं अथवा सासरीं जातांना आनंदाश्रमांतच उतरत. जूनजुलै महिन्यांत कौन्सिलच्या बैठकी पुण्यांत होत, तेव्हां कौन्सिलांत काम करणारे परगांवचे स्नेही हरिभाऊंच्याकडेच उतरत. मुंबईचे प्रसिद्ध सॉलिसिटर हरि सिताराम दीक्षित व नगरचे कृष्णराव वाबळे नेहमीं आनंदाश्रमांत येत. ही पाहुणे मंडळी जाऊं लागली कीं, त्यांस आग्रह करकरून हरिभाऊ ठेवून घेत. बऱ्याचशा स्नेह्यांच्या बरोबर बायकामाणसेंहि असत. पाहुण्यांचें स्वागत व अगत्यपूर्वक आदरातिथ्य करणें घरांतल्या स्वामिनीवरच सर्वस्वीं अवलंबून

असतें. गृहिणी उत्कृष्ट असल्याशिवाय या गोष्टी साधणें अशक्यच असतें. हरिभाऊ अगत्यवंत होते ही गोष्ट तर खरीच, परंतु त्यांचा हा लौकिक वाढविणें वेणूताई-च्याच हाती होतें. पाहुण्यांची उत्कृष्ट व्यवस्था करणें, आनंदाश्रमांतील धर्मकृत्यें यथासांग पार पाडणें व ताईस संभाळून पुनः हरिभाऊंच्या बरोबर सभेस, फिरावयास, कौन्सिल हॉलमधील किंवा गव्हर्नरच्या बंगल्यावरील पार्ट्यांस जाणें इत्यादि सर्व गोष्टींस वेणू-ताई तयार असत. या घरांतल्या व बाहेरल्या गोष्टी वेणूताईस कशा साधत याचें आश्चर्य वाटतें व एकंदरींत वेणूताई खरोखरच उत्कृष्ट गृहिणी होत्या असें म्हटल्या-वांचून राहवत नाही.

आपल्या घरी स्नेह्यांना जेवावयास बोलावण्याचें हरिभाऊंना अतिशय वेड होतें. प्रथम दहा माणसें बोलाविली तर हे जेवायच्या वेळी पंधरा हजर होत! आयत्या वेळीं कोणी स्नेही आल्यास हरिभाऊ त्यांस आग्रहानें जेवावयास ठेवून घेत. ही एकापरी वेणूताईच्या गृहकृत्यांतील प्राविण्याची कसोटीच होती. कोणत्या वेळीं हरिभाऊ कोणती वस्तु मागतील याचा बिलकूल नेम नसल्यानें सर्व तऱ्हेचे पदार्थ नेहमीं घरांत तयार ठेवावे लागत.

हरिभाऊंना जेवण्याखाण्याच्या कांहीं खोडी नसल्या तरी त्यांस निरनिराळे पदार्थ आवडत व ते म्हणतील तो पदार्थ तयार करण्याची कुशलता वेणूताईच्या अंगीं होती. घरांत केलेला नवीन पदार्थ एकट्यानें खाणें त्यांस आवडत नसे. दोघांचौघां मित्रांस मुद्दाम बोलावून त्यांच्याशीं गप्पा गोष्टी करीत ते दुपारचा फराळ करीत. त्यांचा स्वभाव अतिशय बोलका, थट्टेखोर व मनमोकळा असल्यानें त्यांच्याकडे पाहुण्यांना संकोच वाटत नसे.

नोकराचाकरांशीं ते ममतेनें वागत. लहान मुलें चांगलीं कामें करतात अशी त्यांची समजूत होती, म्हणून ते नेहमीं लहान मुलें कामावर ठेवीत. रामसिंग भय्या १९०२ पासून पहाऱ्यावरच्या कामाला राहिला, तेव्हां त्याचें वय फक्त पंधरा वर्षांचें होतें. प्लेगांत हरिभाऊंनीं स्वयंसेवकाचें काम केलें त्या वेळीं ते रामसिंगासच बरोबर घेऊन ठिकठिकाणीं जात. रामसिंग कोणत्याही कामाला ' नाही ' म्हणत नसे; त्यामुळें हरिभाऊंची त्याजवर विशेषच मर्जी होती. त्याच्या हुषारीची खात्री झाल्या-वर तर विशेषच जबाबदारीचीं कामें हरिभाऊ त्यास सांगत. त्याचा प्रामाणिकपणा व हुषारी पाहून हरिभाऊंची मित्रमंडळी त्याची प्रशंसा करीत व " तुम्हांस असा

मनुष्य कसा मिळाला ? आम्हांला चांगला मनुष्य कां मिळत नाहीं ?" असें विचारीत. त्यावर एक दिवस सहज विनोदानें हरिभाऊंनीं उत्तर दिलें: "याच्यासारखीं चांगलीं माणसें पुष्कळ असतात; परंतु बऱ्याचशा रावसाहेब, बाबासाहेब, रावबहादुरांना त्यांना वागवून घेतां येत नाही म्हणून त्यांना तीं मिळत नाहींत !" कामावर ठेवलेलीं मुलें एकदोन वर्षांत चांगलीं तयार झालीं म्हणजे त्यांना ते छापखान्यांत अगर दुसरीकडे कोठें किंवा सरकारी कचेरींत नोकऱ्या पाहून देत व पुनः दुसरीं मुलें ठेवीत असा त्यांचा क्रम चाले.

नोकरांशीं ते अत्यंत कनवाळूपणानें वागत व घरच्या माणसांप्रमाणें त्यांची व्यवस्था ठेवीत. सदू नांवाच्या नोकराचे पायाचें ऑपरेशन् करावें लागलें, तेव्हां "तूं भिऊं नकोस, मी तुला बैठी नौकरी देईन," असें त्यांनीं त्यास आश्वासन दिलें होतें. ऑपरेशन केलें तेव्हां त्याला घरीं ठेवण्याची सोय नव्हती. त्याचा पाय बरा होईपर्यंत महिनाभर त्याचें जेवण दवाखान्यांत पोहोंचविण्याची हरिभाऊंनीं व्यवस्था केली व तो बरा झाल्यावर त्यास बैठी नोकरीही दिली.

प्लेगमध्यें आजारी पडलेल्या नोकरांना ते प्लेग-हॉस्पिटलमध्यें ठेवीत. एकदां अशाच एका वेळी नोकर आजारी पडले असतां त्यांस त्यांनीं ससून हॉस्पिटलमध्यें पाठविलें. त्या वेळीं हॉस्पिटलमध्यें रोग्यांची फार अव्यवस्था व आबाळ होई. तेव्हां हरिभाऊंनीं ती अव्यवस्था पाहून तेथील अधिकाऱ्यांना भेटून त्याविषयीं चार शब्द सांगितले. हरिभाऊंच्या शब्दाचें वजन पडून तेथें लवकरच चांगली व्यवस्था झाली.

त्यांच्याकडील नोकरांस आनंदाश्रम म्हणजे आपलें घरच वाटे. एकदां रत्नु नांवाच्या नोकरास कॉलरा झाला. त्याची दवाखान्यांत जाण्याची इच्छा नसल्यामुळें एकदोन दिवस घरीच त्याची व्यवस्था हरिभाऊंनी केली. पण पुढें मात्र तें जमेना, म्हणून बळेंच त्यास दवाखान्यांत पाठविला. तेथें दोन दिवस राहून तो परत आनंदाश्रमांत आला व म्हणाला, "माझें तेथें कोणीही नाहीं. जें काय माझें व्हायचें असेल तें येथेंच होऊं द्या." त्याची औषधपाण्याची व्यवस्था हरिभाऊंनीं घरींच केली व थोडे दिवसांनीं तो बरा झाला.

पंचम नांवाच्या भय्यानें तर आनंदाश्रमांत बारा वर्षें नौकरी केली. तो अतिशय प्रामाणिक होता. प्लेगच्या दिवसांत पुष्कळ लोक आपलें जडजोखड आनंदाश्रमांत ठेवीत. तेव्हां पंचम भय्यास खडा पहारा करावा लागे. हरिभाऊंची झोंप फार सावध

असे. ते मध्यास मधून मधून हांक मारीत. त्यानें अतिशय इमानानें काम केलें. परंतु पुढें त्याचा एक डोळा गेल्यामुळें त्यास आनंदाश्रमांतील पहाऱ्याचें काम होईनासें झालें. म्हणून त्यांनीं त्यास न्यू इंग्लिश स्कूलमध्यें नौकरी देवविली.

आनंदाश्रमांत येणाऱ्या स्वामीसंन्याश्यांची व्यवस्था ठेवण्यांत हरिभाऊ अत्यंत तत्पर असत. निरनिराळया स्वामींच्या मर्जीप्रमाणें त्यांची बडदास्त ठेवतांना हरिभाऊंना नानाप्रकारचे गमतीदार अनुभव आले. एका स्वामींचे नियम तर अतिशयच विचित्र होते. त्यानें हरिभाऊंना सांगितलें, " मी शूद्राचें मुखावलोकन करणार नाहीं; अंधारांत जेवण्याचा माझा नियम आहे. मालकानें माझी पूजा केली पाहिजे व मालकिणीनें माझ्या हातावर घांस टेविले पाहिजेत. " एक वेळ स्वामींचें हें तंत्र हरिभाऊंनीं संभाळलें व सध्याकाळच्या वेळी " या तऱ्हेची व्यवस्था आमच्या हातून होणार नाहीं, " असें त्यांस स्पष्ट कळविलें. तेव्हां स्वामींची स्वारी निघून गेली.

दुसरे असेच एक आत्मप्रौढी बाळगणारे स्वामी आश्रमांत आले व त्यांनीं स्वतःची अतोनात स्तुति करून ऐटीनें म्हटलें, " मी पांचशें रुपये पगार असणाऱ्या माणसाशीच भाषण करितों. " त्यावर हरिभाऊंनीं शांतपणें उत्तर दिलें: " अशीच आपली अट असल्यास मला आपल्याशीं भाषण करतां येणार नाहीं. " आनंदाश्रम हरिभाऊंच्या मालकीचा असावा या समजुतीनें स्वामी म्हणाले " छे, छे, मी आपल्या-बद्दल नाहीं म्हणत. एवढी मोठी संस्था आपल्या मालकीची असतां असें कसें म्हणतां येईल ? " परंतु " ही संस्था माझी नाहीं. मी इथला नोकर आहें, " असें हरिभाऊंनी उत्तर देतांच स्वामीजी वरमून गेले !

एकदां नानासाहेब एका स्वामीच्या फारच नादीं लागले होते. त्या मनुष्यानें आपल्या गोड भाषणानें त्यांच्यावर इतकी छाप बसविली कीं त्याचा प्रत्येक शब्द त्यांस खरा वाटे. त्याची सेवा ते स्वतः मनोभावें करीत. शेवटी स्वामींनीं घरांतच ठाणें दिलें. रुप्याचें ताट, रुप्याच्या पांच वाट्या, रोज तऱ्हतऱ्हेची पक्वानें असा स्वामींच्या भोजनाचा थाट होऊं लागला. माझी ' परमहंस ' दीक्षा आहे असें स्वामी सांगत. हा विडा खाणारा, पायांत जोडे घालणारा व प्रपंचांतील गोष्टी बोलणारा स्वामी पाहतांच तो भोंदू आहे अशी हरिभाऊंची व लक्ष्मीबाई, चिमा-मावशी इत्यादि मंडळींची खात्री झाली ! परंतु नानासाहेबांशीं या बाबतींत कांहीं

बोलण्याची कोणाची छाती होईना. "मला बंगाली, गुजराथी वगैरे चारपांच भाषा येतात," असें स्वामीनें सांगितल्यावर नानासाहेब म्हणाले, "आमच्या तात्याला बंगाली येतें. तो आल्यावर तुम्ही त्याच्याशीं वाद करा." त्याप्रमाणें हरिभाऊ व स्वामी यांचें बंगालींत तासभर भाषण होऊन शेवटीं स्वामी वादांत हटले व मग आपलें अज्ञान झांकण्याकरितां त्यांनीं हरिभाऊंच्या विद्वत्तेची तारीफ केली!

नानासाहेब या स्वामींच्या नादीं विशेषच लागून त्यांचें संसाराकडील लक्ष कमी होत चाललेलें पाहून लक्ष्मीबाईस फार वाईट वाटे. "मी स्वामींच्या बरोबर जाणार" असेंही नानासाहेब बोलूं लागले; तेव्हां त्यांस या स्वामींच्या पाशांतून कसें सोडवावें अशी चिंता सर्वांना उत्पन्न झाली! स्वामींनीं घरांत पुरतें ठाणें दिलें व आपली काळी कामधेनू आणून घरांत बांधली! ही कामधेनू मारकी होती! कामधेनूच्याबद्दल नाना गोष्टी सांगून ते सर्वांस फसवीत.

एक दिवस फार चमत्कारिक रीतीनें स्वामींचा भोंदूपणा उघडकीस आला. १२ वाजून गेले होते. मंडळी पानांवर स्वामींची वाट पहात खोळंबून बसली होती. तरी स्वामी आपल्या खोलींत जपजाप्य करीत राहिले. अर्धापाऊण तास झाला तरी स्वामीची स्वारी बाहेर येईना! अखेर हरिभाऊ स्वामींच्या खोलीशीं जाऊन दाराच्या फटींतून पाहतात तों स्वामी ऐटीत पेढेबर्फीवर यथास्थित ताव मारीत बसलेले! नानासाहेबांस हळूच बोलावून तें दृश्य दाखवितांच त्या माणसावरची त्यांची श्रद्धा उडाली. कर्मधर्मसंयोगानें त्याच दिवशीं नानासाहेबांचे जांवई जेवावयास आले होते, त्यांनीं या भोंदू गृहस्थास ओळखलें; तेव्हां आतां आपलें बिंग बाहेर फुटणार असें वाटून एक दिवस स्वामींनीं हळूच नकळत पोबारा केला.

हा स्वामी जरी असा ढोंगी असला तरी कित्येक विद्वान् संन्यासी आनंदाश्रमांत येत. सर्वच जरी निःस्वार्थी नसले तरी कांहीं खरोखर चांगले असत. हरिभाऊंच्या आयुष्यांत त्यांस एक खरा खरा संन्यासी भेटला. त्याची व हरिभाऊंची रस्त्यांत भेट झाली. आग्रह करून हरिभाऊंनीं त्यास आनंदाश्रमांत आणलें. जेवावयाच्या वेळीं एकदां वाढलेले पदार्थ खाऊन तो उठला. कारण एकदांच पानांत वाढलेले पदार्थ सेवन करण्याचें त्याचें व्रत होतें. हरिभाऊंना हा नियम माहीत नव्हता. त्यामुळें स्वामी अर्धपोटीं उठलेले पाहून त्यांस वाईट वाटलें. हरिभाऊंनीं भोजनोत्तर त्यास सर्व आनंदाश्रम दाखविला व तेथें कांहीं दिवस राहण्याचा

आग्रह केला. परंतु तो तसें करण्याचें नाकबूल करून जाण्यासच निघाला. तेव्हां " आपणांस पैसे, संस्कृत पुस्तकें, वस्त्रें, कमंडलू जें कांहीं पाहिजे असेल तें देतों, " असें हरिभाऊंनीं म्हटलें. परंतु " निद्रा घेण्यास भूमि, दिशांचें वस्त्र व हस्तांजलीचा कमंडलू सर्व कांहीं परमेश्वरानेंच मला दिलें आहे, " असें निस्पृहतेनें बोलून तो संन्याशी जो निघून गेला तो पुनः म्हणून दृष्टीस पडला नाहीं. या संन्याश्याची स्मृति हरिभाऊंच्या अंतःकरणांत कायम राहिली व " तो मात्र खरा संन्यासी होता " असें ते नेहमीं म्हणत. त्यांच्या कादंबऱ्यांतील भोंदू स्वामींची व त्याप्रमाणें ' मी '-मधील भावानंद, ' आजच ' व ' कर्मयोग ' यांतील अद्वैतानंद व शारदानंद या खऱ्या त्यागी संन्याश्यांचीं चित्रें हरिभाऊंनीं स्वानुभवावरूनच रेखाटलीं यांत शंका नाहीं. असो.

प्रवासाची त्यांस विशेषच हौस होती. कॉंग्रेस-कॉन्फरन्सेस्च्या निमित्तानें दरवर्षी प्रवास करावयाचा त्यांचा नेम असे. ज्या भागांत ते जात तेथील आसपासचीं प्रेक्षणीय स्थळें पाहिल्यावांचून बहुधा परत येत नसत. त्यांनीं उत्तर हिंदुस्थानांतच खूप प्रवास केला होता. काश्मीर, हरद्वार, हृषीकेश, दिल्ली, आग्रा, मथुरा, वृंदावन, लखनौ, कानपूर, काशी, कलकत्ता इत्यादि स्थानें त्यांनीं पाहिलीं होतीं. काशी व हरद्वार येथें त्यांच्या तीनचार फेऱ्या झाल्या होत्या. हरद्वारचें प्रवासवर्णन त्यांनीं करमणुकींत प्रसिद्ध केलें होतें. लक्ष्मण झोला, गंगेचा सखोल, स्फटिकशुभ्र प्रवाह व हिमालयांतील वनश्री पाहून तेथेंच चिरकाल वसति करावी असें त्यांस वाटे. ताईच्या मृत्यूनंतर बहुधा वेणूताई प्रवासास त्यांच्या बरोबर नेहमीं जात. दक्षिणेंतही त्यांनीं सिलोनपर्यंत प्रवास केला होता. कादंबरीकारास मनुष्यस्वभावाचें ज्ञान होण्यासाठीं व्यापक अनुभव असावा लागतो. हरिभाऊंना प्रवासामुळें विविध प्रकारचे अनुभव आले व बाह्य जगाशीं प्रत्यक्ष संबंध आल्यामुळें नानातऱ्हेचे मनुष्यस्वभावाचे मासले पहावयास सांपडले. त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या इतक्या चांगल्या उतरल्या याचें कारण त्यांनीं प्रत्यक्ष तेथें जाऊन तीं तीं ऐतिहासिक महत्त्वाचीं स्थळें प्रत्यक्ष पाहिलीं होतीं.

प्रवासांत यथास्थित सामान बरोबर घेण्याची त्यांस आवड होती. नेहमीचे कपड्यांशिवाय टूथपावडर, मेणबत्तीचा दिवा, काड्यांची पेटी, कांहीं औषधें, टॉवेल, सोंवळें, पाणी पिण्याचें भांडें इत्यादि वस्तु त्यांना प्रवासांत लागतच. लहर येईल

तेव्हां लिहिण्याचा नाद त्यांस असल्यानें ते एक लोखंडी लहान पेटी नेहमीं जवळ बाळगीत. ती उघडली कीं लहानशा डेस्कसारखा उपयोग करितां यावा अशी तिची रचना होती. या पेटींत दोनचार चाकू, नोटपेपरसं, तिकिटें, पाकिटें, दोन-चार रंगीत पेन्सिली, मेणबत्ती, दोनतीन फाउंटन् पेनें, इंग्रजी व मराठी पुस्तकें इत्यादि वस्तूंचा संग्रह असे. ताई वारल्यावर मात्र बरोबर गादी वगैरे न घेतां एक पांढरी घोंगडी व चादर एवढ्यांतच त्यांचा बिछाना साजरा होई. ताई लहान असतां वेणूताईसह त्यांनीं नागपूरच्या पुढें फारसा प्रवास केला नाहीं.

ताई थोडी मोठी झाल्यावर तिच्या बरोबरीच्या मुलांमुलींना बोलावून हरिभाऊ या बालचमूंत केव्हां केव्हां वेळ घालवीत. लहान मुलें त्यांना फार आवडत व त्यांच्याशीं गोष्टी करण्यांत ते रमून जात. हरिभाऊ मुलांशीं इतके समरस होऊन जात कीं, मुलांनासुद्धां ते आपले एक अत्यंत जिवलग स्नेही आहेत असेंच वाटे. यासंबंधीं एक आख्यायिका प्रसिद्ध आहे ती अशीः हरिभाऊ आपल्या स्नेह्यांच्या मुलांना मधल्या सुट्टींत आनंदाश्रमांत बोलावीत. तेथें त्यांना एक स्वतंत्र खोलीच देण्यांत आली होती. मधल्या सुट्टींत आपआपले फराळाचे डबे सोडून ते खात बसले कीं हरिभाऊ तेथें येऊन त्यांच्यापाशीं आपला वांटा मागत व मधून मधून आपणही त्यांना लाडू, वड्या, फराळाचे जिन्नस वगैरे देत. या वेळीं ते मुलांशीं खूप थट्टामस्करी करीत व त्यांच्या खोड्या काढीत. एकदां त्यांनीं आपलें एक पाळलेलें माकड मुलांच्या अंगावर सोडिलें. त्यानें त्यांच्या एका स्नेह्याच्या मुलाचे कपडे फाडले. तो मुलगा घरीं गेल्यावर त्याच्या वडिलांनीं त्याला विचारिलें, " तुझे कपडे कशानें फाटले ?" त्यावर " आमचा एक मित्र आहे त्याच्याकडे आम्हीं गेलों होतों तिथं फाटले ! " असें त्या मुलानें उत्तर केलें. त्यावर "कोण तो तुझा मित्र ?" असें खोदखोदून विचारतांच " आहे एक हरिभाऊ आपटे म्हणून ! " असें म्हणून त्यानें सर्व हकीकत सांगितली, तेव्हां घरांतल्या सर्व मंडळींना मोठी गंमत वाटून हसूं आलें !

हरिभाऊंना कुत्रीं फार आवडत. त्यांची रोझी नांवाची कुत्री फार लाडकी होती. ती नेहमीं त्यांच्याबरोबर फिरावयास जात असे. ही कुत्री अतिशय इमानी होती. तसेंच एकदां सरदार मुदलिआरांच्याकडून त्यांनीं एक दिवसाचें कुत्रीचें पिल्लू आणलें व त्यास आपल्या निजावयाच्या खोलींत ठेविलें. तें आणलें त्या दिवशीं तें एकसारखें रडूं लागलें. तेव्हां हरिभाऊंनीं जागरण करून स्वतः त्यास दूध पाजलें.

दुसऱ्या दिवशीं जाळीचा पिंजरा त्याच्यासाठीं मुद्दाम आणविला. हरिणसुद्धां त्यांनीं पाळलें होतें व दिवसांतून चारपांच वेळां ते स्वतः जाऊन त्याची व्यवस्था पहात.

निरनिराळे पोपट, मैना वगैरे पक्षी बाळगण्याचीही त्यांस हौस होती. एक ३५ रुपयांचा सुंदर काकाकुवा त्यांनी विकत घेतला होता. त्याचा रंग पांढरा असून गळ्याशीं लाल रंगाचा पट्टा होता. त्याला ते स्वतः बोलावयास शिकवीत. तो काकाकुवा अगदीं हरिभाऊंच्या आवाजासारखा आवाज काढून रामसिंगास हांक मारी व ती हांक ऐकून मालकानें हांक मारली असें वाटून तो बिचारा धांवत येई. काकाकुवा सकाळच्या वेळीं "ताई ऊठ, ताई आली," असें म्हणे व वेणूताई दृष्टीस पडल्याबरोबर "बाई आली, बाई आली," असें बोलूं लागे.

हरिभाऊंचा आनंदाश्रमांतील सुखाचा संभार पाहून काशीताईंनीं मागल्या गोष्टीची आठवण देऊन त्यांस एकदां म्हटलें, "माझं घर जन्मांत होणार नाहीं, असं म्हणालां होतां! मग झालं कीं नाहीं शेवटीं घर?" काशीताईंचें बोलणें ऐकून हरिभाऊ हंसूं लागले. या त्यांच्या हास्यांतच काशीताईंच्या प्रश्नाचें उत्तर होत!

अशा रीतीनें १९०३ पासून १९१३ पर्यंतचा दहा वर्षांचा काल हरिभाऊंच्या आयुष्यांतील अतिशय भरभराटीचा व सुखपूर्ण असा झाला. हा काल म्हणजे त्यांच्या जीवितप्रदेशांतील चित्रविचित्र सुगंधित फुलांनीं फुललेलें सुंदर उद्यानच होय. अकोल्याच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष, मुंबई विश्वविद्यालयाच्या एम्. ए.च्या परीक्षेचे परीक्षक, सार्वजनिक कामांतील एक प्रमुख पुढारी व उत्कृष्ट कादंबरीकार या नात्यानें जग या कालांत त्यांस ओळखूं लागलें होतें व शांताताईंच्या दुडदुड धांवण्यानें व मधुर बोलांनीं निनादित होऊन हरिभाऊंच्या अंतःकरणांतील आनंदलहरींनीं आनंदाश्रमही आनंदमय झाला होता.

MAY, 1918.

Whit Sunday. Sunday 19

(139-226)

त्यांच्या महाराष्ट्रकुलाचे सेक्रेटरी डे. मो. रामकर यांचें पत्र
आलें की बाबू पन्नालाल डे किडरपूर प्रेसचे मालक यांचे मना-
वरून आपल्या "गड आला पण सिंह गेला!" या पुस्तकाचें भाषांतर
करावयाचे आहे तरी त्यांस आपली परवानगी असावी. त्यांस
परवानगी दिली महाराष्ट्रकुलाचा पत्ता २ दुर्गादास लेन
किडरपूर Kidderpore Calcutta

ह. ना. आपटे

हरीभाऊंचें हस्ताक्षर

# प्रकरण अकरावें

## सामाजिक कादंबऱ्या

प्रतिभाशाली कवि, तसेच प्रतिभाशाली कादंबरीकार हे समाजाचे रक्षक व नेते होत. विश्वाच्या आध्यात्मिक उन्नतीकरितां परमेश्वर युगायुगांनीं अवतार घेतो, त्याच-प्रमाणें समाजाच्या उन्नतीसाठींच तो प्रतिभाशाली कवि व कादंबरीकार निर्माण करतो. प्रतिभा ही ईश्वरदत्त देणगी आहे व प्रतिभाशाली लेखक हे त्या ईश्वराचें देणें आहे यांत शंका नाहीं. सामान्यतः ग्रंथकाराच्या कार्याचें महत्त्व लक्षांत येण्यासाठीं तो ग्रंथकार व त्याची कृति यांमधील कार्यकारणभावाची मीमांसा करून त्याच्या आयुष्यांत अमुक गोष्टी घडल्या किंवा विशिष्ट तऱ्हेची परिस्थिति त्यास लाभली त्यामुळें त्याच्या मनावर व बुद्धीवर अमुक परिणाम झाले व म्हणून त्याच्या हातून एका विशिष्ट प्रकारचें ग्रंथलेखन झालें, किंवा तो मोठ्या योग्यतेस चढला, असें दाख-विण्याचा आपण प्रयत्न करतों. परंतु कित्येक वेळां हे प्रयत्न निष्फळ ठरविण्यासारखे दैवी प्रतिभेचे दिव्य चमत्कार आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात. हरिभाऊ हे अशाच प्रकारचे प्रतिभाशाली कादंबरीकार होते हें निर्विवाद होय. कारण 'मधल्या स्थिती'-सारखी उत्कृष्ट कादंबरी हरिभाऊंनी आपल्या वयाच्या अवघ्या एकविसाव्या वर्षी लिहिली, ही एरवीं असंभवनीय वाटणारी गोष्ट केवळ अलौकिक प्रतिभासामर्थ्यामुळेंच शक्य झाली हें सूक्ष्म विचाराअन्ती आपणांस पटल्याशिवाय रहाणार नाहीं.

हरिभाऊंनीं, मधली स्थिति, पण लक्षांत कोण घेतो, यशवंतराव खरे, मी, मायेचा बाजार, भयंकर दिव्य, जग हें असें आहे, इत्यादि सात पूर्ण व गण-पतराव, आजच व कर्मयोग या तीन अपूर्ण मिळून एकंदर दहा सामाजिक कादं-बऱ्या लिहिल्या. 'मधली स्थिति' ही त्यांची कादंबरी इ. स. १८८५ सालीं प्रसिद्ध

झाली. ह्याच हरिभाऊंच्या वाङ्मयीन जीवनाचा प्रारंभ होय. इ. स. १९१७ सालपर्यंत त्यांचें कादंबरीलेखन चालू होतें. त्यांच्या बत्तीस वर्षांच्या वाङ्मयीन जीवनाचे तीन विभाग पाडले असतां इ. स. १८८५ पासून इ. स. १९०० पर्यंतच्या पहिल्या विभागांत त्यांनीं मधली स्थिति (१८८५), गणपतराव (१८८७-१८८८), पण लक्षांत कोण घेतो (१८९०-१८९३), यशवंतराव खरे (१८९२-१८९५), मी (१८९३-१८९५), जग हें असें आहे (इ. स १८९७-१८९९) या सहा सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. इ. स. १९०० पासून १९१० च्या दुसऱ्या विभागांत, भयंकर दिव्य (१९०१-१९०३), आजच (अपूर्ण, १९०४-१९०६) या दोन व १९१० पासून १९१७ च्या तिसऱ्या विभागांत मायेचा बाजार (१९१०-१९१२) व कर्मयोग (अपूर्ण, १९१३-१९१७) या दोन अशा चारच कादंबऱ्या लिहिल्या. यांशिवाय त्यांनीं पुष्कळशा ऐतिहासिक कादंबऱ्या, लघुकथा व अवांतर लेख लिहिले आहेत. त्यांचा विचार यथाक्रम पुढल्या प्रकरणीं करण्यांत येईलच.

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्या म्हणजे वस्तुत: गेल्या पन्नास वर्षांचा आपल्या समाजाचा इतिहासच होय. त्यांच्या 'आजकालच्या गोष्टी 'चा हेतु केवळ मनोरंजन केव्हांहि नव्हता. वस्तुस्थितीचें यथार्थ चित्र रंगवून समाजांतील दोष बहुजनसमाजाच्या दृष्टोत्पत्तीस आणावे व समाजहिताचे महत्त्वाचे प्रश्न सोडविण्याचा मनःपूर्वक प्रयत्न करून समाजोन्नतीचे सत्यमार्ग सूचित करावे हाच हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांचा प्रमुख उद्देश होता. रूढीरूपी अनेक भयंकर रोगांनीं आमचा हिंदुसमाज ग्रस्त झाला होता. पाश्चात्य लोकांच्या दुर्गुणांच्या अनुकरणानें समाज पोखरला जाऊन कराल-देवता रूढी अनेक अजाण कुमारिकांचे व गतधवांचे बळी घेत होती. समाजाच्या दुःस्थितीनें अंतःकरण कळवळून जाऊन समाजास जडलेल्या रोगांचें बीज नष्ट करून त्यास शक्तिवर्धक औषध देण्याचें व त्यास गुटगुटीत, बाळसेदार करण्याचें दुष्कर कार्य हरिभाऊंनीं स्वेच्छेनें स्वीकारलें होतें.

पाश्चात्य ज्ञानमदिरेनें आमच्या पहिल्या पिढीच्या सुशिक्षितांस बेहोष केलें. त्यांनीं पाश्चात्यांच्या मद्यपानादि व्यसनांचा अंगिकार केला, तेव्हां त्यास आपण कृतकृत्य झालों, सुधारलों, असें वाटलें. हें समाजचित्र हरिभाऊंच्या प्रथम कृतींत—'मधली स्थिति' या कादंबरींत—रेखाटलेलें आहे. दुसऱ्या पिढींतील सुशिक्षितांची

पहिल्यांच्याप्रमाणें दिशाभूल झाली नाहीं. पाश्चात्य वाङ्मयांतील उदात्त विचारांचा त्यांच्यावर परिणाम झाला. वाघिणीचें दूध प्राशन केल्याबरोबर त्यांच्या अंगीं स्फूर्ति उत्पन्न होऊन समाजासाठीं, देशासाठीं झटावें अशी इच्छा त्यांच्या हृदयांत उत्पन्न झाली व ते स्वतंत्र रीतीनें विचार करूं लागले. जुने व नवे असे दोन पंथ निर्माण होऊन त्यांच्यांत चढाओढ लागली. समाजसुधारक विरोधास न भितां धैर्यानें पुढें आले व त्यांनीं जुन्या अज्ञ रूढींच्यावर प्रहार करण्यास सुरुवात केली. कांहीं तरुणांनीं राजकारणाचें ध्येय पुढें ठेवून देशसेवेस आयुष्य वाहिलें. ही हिंदुसमाजाची स्थिति हरिभाऊंनीं गणपतराव, पण लक्षांत कोण घेतो, मी, यशवंतराव खरे, या कादंबऱ्यांत वर्णिली आहे. दुसऱ्या पिढीच्या सुशिक्षितांच्या दीर्घ प्रयत्नांनीं समाजांत सुधारणा झाली. या पिढींतील समाजसेवकांच्या विमल चारित्र्याचा परिणाम होऊन अनेक सुशिक्षित पुरुष व स्त्रिया यांनीं आपलें आयुष्य सर्वस्वीं देशास अर्पण केलें व देशाची सर्वांगीण उन्नति घडवून आणण्याचा प्रयत्न केला. या सुधारलेल्या समाजस्थितीचें चित्र मायेचा बाजार, भयंकर दिव्य, आजच या कादंबऱ्यांत पहावयास सांपडतें. तिसऱ्या पिढीचें कार्य व विचार हीं कर्मयोग या कादंबरींत रेखाटलीं आहेत. अशा तऱ्हेनें हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करीत गेल्यास त्यांच्या कादंबऱ्या म्हणजे आमच्या समाजाचा तीन पिढ्यांचा इतिहासच होय ही गोष्ट तात्काल ध्यानीं येईल.

ऐन पंचविशीच्या आंतच उत्कृष्ट कादंबरीकार म्हणून हरिभाऊंनीं कीर्ति संपादन केली. लहानपणापासूनच भोंवतालच्या परिस्थितीचें केलेलें सूक्ष्म निरीक्षण व कॉलेजां-तील आयुष्यांत झालेलें विस्तृत वाचन यांमुळेंच ते यशस्वी कादंबरीकार झाले, यांत शंका नाहीं. त्यांच्या प्रत्येक कादंबरींत त्या त्या वेळची समाजाची परिस्थिति प्रति-बिंबित झाली आहे. हायस्कुलांत शिक्षण घेत असतां सभोंवार दिसलेली, वेश्या-गमन व मदिरापान या दोन भयंकर व्यसनांमुळें झालेली समाजाची दुःस्थिति त्यांनीं ‘ मधल्या स्थितींत ’ रेखाटली, तर कॉलेजांतील सुखपूर्ण जीवन, हर्बर्ट स्पेन्सर व मिल या तत्त्वज्ञान्यांच्या ग्रंथांमुळें उत्पन्न झालेली विचारजागृति त्यांनीं आपल्या दुसऱ्या कादंबरींत–‘ गणपतरावां ’त–दिग्दर्शित केली व स्वतः वैवाहिक आयुष्याचा अनुभव घेत असतांना एकत्र कुटुंबपद्धतीमुळें त्यांस आलेल्या अडचणी त्यांनीं ‘पण लक्षांत कोण घेतो’ या कादंबरींत चित्रित केल्या. हरिभाऊंचें लक्ष राजकारणा-

कडे वेधलें गेलें तेव्हां राजकारणांतील पक्षविपक्षांच्या–जहालमवाळांच्या–मतामतांचा विचार त्यांनीं 'यशवंतराव खरे' व 'आजच' या कादंबऱ्यांत केला. प्रथम-पत्नीच्या मृत्यूनंतर विधुरावस्थेंतील वैराग्यपर वृत्तींत जो ध्येयवाद आठवला तो 'मी' या कादंबरींत रेखाटून त्यांनीं देशसेवेचा उत्कृष्ट मार्ग दाखवून दिला. प्रगतिपर विचारांचा परिणाम झाल्यावर सुशिक्षितांच्या पुढें जे प्रश्न आले ते सोडविण्याचा प्रयत्न 'भयंकर दिव्य' व 'मायेचा बाजार' या कादंबऱ्यांत केलेला दिसतो. मुली सुशिक्षित असल्या व योग्य पतीची जोड त्यांना नसली तर त्यांच्या आयुष्याची विटंबना होते, ही प्रत्यक्ष आढळून आलेली वस्तुस्थितीच वरील दोन्ही कादंबऱ्यांत वर्णिलेली आहे. ताईबद्दलच्या व सुशिक्षित मुलींच्याबद्दलच्या आकांक्षा 'कर्मयोग' या कादंबरीमध्यें व्यक्त होणार होत्या, परंतु दुर्दैवानें ती कादंबरी अपूर्ण राहिली. सारांश, कल्पनेन एकादें नवीन स्वतंत्र जग निर्माण करण्यापेक्षां आपल्या आयुष्यांत आपणांस आलेले विविध अनुभव व त्यांवरून सुचलेले विचार यांचाच संग्रह हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्यांत केला आहे असें म्हणावयास बिलकूल हरकत नाहीं.

लेखनपद्धतीच्या दृष्टीनें कादंबऱ्यांचें वर्गीकरण करावयाचें झाल्यास आत्मचरित्रपर व कथनात्मक असे त्यांचे दोन विभाग करणें शक्य आहे. 'पण लक्षांत कोण घेतो' व 'मी' या दोनच कादंबऱ्या आत्मचरित्रपर असून बाकीच्या सर्व कथनात्मक आहेत. परंतु त्यांत प्रतिपादन केलेल्या विषयांनुसार व तत्त्वांनुसार कादंबऱ्यांचें वर्गीकरण केल्यास पांच भागांत सर्व कादंबऱ्या विभागतां येतील:

१. पाश्चात्य संस्कृतीशीं संबंध आल्यामुळें समाजांतील आचारविचारांची संक्रमणावस्था—(१) मधली स्थिति.

२. समाजसुधारकांचे प्रथम प्रयत्न—(१) गणपतराव (२) पण लक्षांत कोण घेतो.

३. राजकारणाचें ध्येय व देशोन्नति—(१) यशवंतराव (२) मी.

४. सुशिक्षित समाजापुढील सामाजिक प्रश्न—(१) भयंकर दिव्य (२) मायेचा बाजार.

५. सामाजिक विरुद्ध राजकीय सुधारणा—(१) आजच (अपूर्ण) (२) कर्मयोग (अपूर्ण).

६. मनोरंजक कथा—जग हें असें आहे.

## वस्तुस्थितिनिदर्शक कादंबऱ्यांचे जनक

हरिभाऊंची प्रत्येक कादंबरी ही कांहीं विशिष्ट तत्त्वावर उभारलेली आहे हें वरील वर्गीकरणावरून वाचकांच्या ध्यानीं येईलच. ‘ मधल्या स्थिती ’नें वाङ्मयांत मोठी क्रांति घडवून आणिली. तत्पूर्वींच्या विचित्रपुरी, मित्रचंद्र, मंजुघोषा, मुक्तामाला, इत्यादि अद्‌भुत कथा लहानांसच नव्हे तर थोरांसही रंजवीत होत्या. बालमनेंच अद्‌भुतांत तन्मय होतात. परंतु ‘ मधल्या स्थिती ’चा जन्म होण्यापूर्वी थोरही अद्‌भुतांत रमत. यावरून त्यांची वाङ्मयाभिरुचि खालच्या प्रतीची होती हें सिद्ध होतें. अन्तरालांतील निराधार सृष्टींतून हरिभाऊंनीं ‘ कादंबरी ’स प्रत्यक्ष सृष्टींत आणून सोडलें व अद्‌भुत सृष्टीतील चमत्कारांपेक्षां सत्यसृष्टींतील प्रसंग अधिक चमत्कृतिपूर्ण व रम्य असतात ही गोष्ट वाचकांस पटवून देऊन त्यांच्या अभिरुचीस उच्च प्रकारचें वळण लाविलें. मराठी वाङ्मयांत ‘ मधल्या स्थिती ’नें वस्तुस्थितिनिदर्शक कादंबऱ्यांचा पाया घातला व हरिभाऊंना ‘ वस्तुस्थितिनिदर्शक कादंबऱ्यांचे जनक ’ असें नामाभिधान प्राप्त करून दिलें.

हरिभाऊ ध्येयवादी होते. त्यामुळें त्यांची प्रतिभा केवळ वस्तुस्थितीच्या हुबेहूब वर्णनाच्या बंधनांत राहिली नाहीं. वस्तुस्थितीच्या भक्कम पायावर उभी राहून त्यांची प्रतिभा ध्येयाकाशांत संचार करी. शेलीच्या Skylark प्रमाणें भूमीचा आश्रय सोडून स्वर्गाच्या दारापर्यंत उड्डाण तिनें केव्हांहि केलें नाहीं. तुलना करावयाचीच म्हटल्यास हरिभाऊंची प्रतिभा वर्डस्वर्थच्या Skylark प्रमाणें असून नीलाकाशांत भराऱ्या मारीत असतांही तिचें लक्ष पृथ्वीवरील आपल्या चिमुकल्या घरट्याकडे असे. हरिभाऊ वाचकांस वस्तुस्थितीचें प्रथम दर्शन देऊन हळू हळू त्यांस न कळत ध्येयाच्या मनोरम सृष्टींत नेऊन सोडतात. त्यामुळें त्यांचा ध्येयवाद वाळूवर अथवा आकाशांत उभारलेल्या मनोऱ्याप्रमाणें ढांसळून पडण्याची भीति वाटत नाही. त्यांच्या कादंबऱ्या म्हणजे यथार्थवाद ( Realism ) व ध्येयवाद ( Idealism ) यांचा मनोहर संगमच होय.

एमिल् झोला, रेनॉल्डस् यांचा उघड यथार्थवाद त्यांना बिलकूल आवडत नसे. दुर्दैवानें असंख्य दुष्ट, दुर्गुणी मानव या पृथ्वीतलावर यथेच्छ संचार करीत आहेत. त्यांचींच कल्पित स्वभावचित्रें रेखाटून त्यांच्या संख्येंत भर घालणें त्यांना कधीं पसंत पडलें नाहीं. जगांत पाप पुष्कळ आहे, परंतु आपलें कल्पनासामर्थ्य त्याजवर खर्च करणें त्यांस कमीपणाचें वाटे. समाजाचे दोष प्रकट करण्यासाठीं

सदभिरुचीस त्याज्य अशीं किळसवाणीं चित्रें रेखाटण्याच्या कामीं त्यांनीं आपली बुद्धि शिणविली नाहीं. एका विशिष्ट प्रकारच्या वाचकांच्या साठींच त्यांनीं आपल्या कादंबऱ्या लिहिल्या आहेत. मध्यम वर्गांतील सुशिक्षित स्त्रीपुरुषांना ज्यामुळें स्फूर्ति उत्पन्न होईल, आनंद वाटेल, अशींच मानवी चित्रें त्यांनीं रंगविलीं. आणि खरोखरच ज्या प्रकारच्या लोकांना आपल्या सुंदर गृहांत आपण क्षणमात्रहि पाऊल घालूं देणार नाहीं अशा मनुष्यांच्या चरित्रांतील गोष्टी कादंबऱ्यांत वाचून त्यांचें मनन करणें सदभिरुचीस कितपत अनुसरून आहे याचा प्रत्येकानें आपल्या मनाशींच विचार करावा.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचीं कथानकें एकमेकांत गुंतलेलीं आहेत. प्रत्येक कादंबरीच्या कथानकाची सांखळी दुसऱ्या कथानकाच्या सांखळीच्या दुव्यांत अडकविलेली आहे. पुष्कळशा कादंबऱ्यांत पात्रें तींच, परंतु गोष्ट भिन्न, वर्णन केलेले प्रसंग भिन्न अशी स्थिति आहे. त्यामुळें त्यांच्या कादंबऱ्या वाचतांना एक प्रकारची विलक्षण गोडी वाटते. 'मधल्या स्थितीं'तील विष्णु-यमुनेची जोडी 'गणपतराव' व 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबऱ्यांत दृष्टीस पडते. त्याचप्रमाणें गणपतरावाचें चरित्र 'गणपतराव,' 'आजच,' 'कर्मयोग' व 'भयंकर दिव्य' या चारी कादंबऱ्यांत वर्णिलेलें आहे. गणपतरावाचे स्नेही नाना व त्याची पत्नी यशोदाबाई या व्यक्तीही आपणांस 'पण लक्षांत कोण घेतो,' 'कर्मयोग' या कादंबऱ्यांत पुनः पुनः भेटतात. 'गणपतरावां'तील गोदावरीचें 'सरस्वतीबाई'त रूपांतर होऊन गणपतरावाच्या व चंद्रशेखर-चंद्रीच्या सहवासांत चाललेलें तिचें सुखपूर्ण जीवन पाहून वाचकांस आनंद वाटल्याशिवाय रहात नाहीं. 'भयंकर दिव्यां'तून पार पडल्यानंतरचा पद्माकर-कमलेचा संयोग सर्वांस आनंदित करणारा आहे. 'आजच' मध्यें 'शामसुंदर'चें कौतुक करण्यांत तन्मय झालेली कमलेची मूर्ति पाहून वाचकही सौख्य-सागरांत पोहूं लागतात. त्याचप्रमाणें कमलेचा भाऊ गोपाळ व तिचा मानलेला बंधु व पद्माकराचा मित्र प्रभाकर हे दोघेही विलायतेस गेले असें 'आजच'मध्यें वर्णन आहे. नाना व यशोदाबाई यांची सुंदर व बुद्धिमती कन्या लिली हिचा गोपाळाशीं वाङ्निश्चय झालेला 'आजच' या कादंबरींत दाखविला आहे. हीच लिली पुनः 'कर्मयोगां'त दिसते. स्वामी अद्वैतानंद तिच्याबद्दल जें भविष्य वर्तवितात तें वाचून तिचें पुढील चरित्र ऐकण्यास मन उत्कंठित होतें. स्वामी अद्वैतानंदांची हकीकतही 'आजच' व 'कर्मयोग'

या दोन्ही कादंबऱ्यांत आली आहे. भावानंदाच्या मठाच्या स्थापनेचा इतिहास 'मी' कादंबरींत आहे. त्या संस्थेची भरभराट 'भयंकर दिव्य' व 'कर्मयोग' या दोन कादंबऱ्यांत दृष्टीस पडते तर तिच्यावर कोसळलेलें संकट 'आजच' मध्यें पहावयास सांपडतें. भावानंदाची तेजस्वी भगिनी ताई हिचें दर्शन 'भयंकर दिव्य' व 'कर्मयोग'मध्यें होतांच आदरातिशयानें वाचकाचें हृदय उचंबळून येतें. तिचा तो बाणेदार स्वभाव व तिचे ते उदात्त विचार अत्यंत स्फूर्तिदायक वाटतात यांत शंका नाहीं. करुणामूर्ति सुंदरी 'भयंकर दिव्यां'त आणली करुण कहाणी कमलेस कथन करितांना पाहून वाचकही तिच्या दुःखानें दुःखित होतात. ताई व सुंदरी यांची भेट म्हणजे आपल्या अतिशय जिवलग माणसांची भेट असेंच वाटतें.

यशवंतरावाचें उत्तर-चरित्र हरिभाऊंनीं पुनः 'आजच' या कादंबरींत वर्णन करून त्याच्या व गणपतरावाच्या मतांतील तेढ दिग्दर्शित केली आहे. अशा रीतीनें हरिभाऊंच्या कथानकांची रचना एकमेकांशीं अगदीं निगडित झाली आहे. तींच तींच पात्रें पुनः पुनः निरनिराळ्या कादंबऱ्यांत घालण्याची कल्पना त्यांनीं फ्रेंच कादंबरीकारांकडून घेऊन मराठी कादंबरी-वाङ्मयांत एक नवा प्रघात पाडला. असो.

हरिभाऊ स्वतः उच्च मध्यम-वर्गा( Highest middle-class )पैकीं असल्यानें त्याच वर्गातील लोकांच्या आयुष्याची, सुखदुःखांची व आकांक्षांची त्यांस पूर्ण कल्पना होती. या वर्गाबद्दल त्यांच्या अंतःकरणांत साहजिकच जिव्हाळ्याची सहानुभूति होती व याच समाजाच्या पुढील सामाजिक, राजकीय, औद्योगिक व आध्यात्मिक प्रश्न सोडवून त्याची उन्नति करण्याचें कार्य त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें केलें. 'मधल्या स्थिती'तील व्यसनासक्त अशिक्षित श्रीमंत विनायकराव व सुशिक्षित अनंतराव हीं पात्रें उच्च ब्राह्मणवर्गापैकींच आहेत. त्याचप्रमाणें विष्णुपंत, गणपतराव, नाना, रघुनाथराव, यशवंतराव खरे, श्रीधरपंत, भावानंद, शिवरामपंत, प्रभाकर, पद्माकर, वसंतराव, चंद्रशेखर, इत्यादि पात्रें संस्कृतीच्या व सुशिक्षितपणाच्या दृष्टीनें उच्च वर्गापैकीं असून सुसंस्कृत ( Cultured ) आहेत. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचें कार्यक्षेत्र मध्यम स्थितींतील ब्राह्मणवर्ग होय. याच वर्गाचे विचार व भावना त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांत चित्रित केल्या आहेत. पुरुष उच्च शिक्षणानें सुसंस्कृत झाले, परंतु स्त्रिया अशिक्षित राहिल्या, त्यामुळें कुटुंबांत विषमता उत्पन्न झाली. ती विषमता दूर करण्याचा प्रयत्न हरिभाऊंच्या कादंबऱ्यांनीं केला.

त्यांच्या कादंबऱ्यांचे विषय ( Problems ) विविध आहेत. कालानुक्रमाप्रमाणें त्यांचा विचार करून, हरिभाऊंनीं त्यांचें प्रतिपादन कसें केलें आहे हें पाहणें अगत्याचें आहे. 'मधल्या स्थिती'चा विषय मदिरापान व वेश्यागमन या दोन व्यसनांचा दुष्परिणाम हा आहे. श्रीमंत विनायकराव व्यसनासक्त होऊन व दुष्टांच्या नादीं लागून आपली सद्गुणी पत्नी सरस्वती हिचा अनन्वित छळ करतो. त्याचप्रमाणें सुशिक्षित अनंतराव वकील साध्वी अंबूताईची व्यसनापायीं जी विटंबना करतात ती वाचून व तिचा हृदयद्रावक अंत पाहून वाचकांच्या हृदयांसही पाझर फुटेल. व्यसनापायीं कुटुंबें धुळीस मिळतात, गृहदेवतांचा जेथें छळ होतो तेथें देव वास करीत नाहीं, हें तत्त्व वाचकांच्या मनावर या कादंबरीच्या द्वारें हरिभाऊंनीं उत्कृष्ट रीतीनें ठसविलें. स्त्रियांबद्दल अंतःकरणापासून आदर वाटल्याशिवाय कुटुंबाची व समाजाची स्थिति केव्हांही सुधारणार नाहीं असें त्यांचें मत होतें. त्यामुळें त्यांनीं सरस्वती, अंबूताई, विनायकरावाची आई जानकीबाई इत्यादि सुशील स्त्रियांचीं चित्रें रेखाटून समाजांत स्त्रीदाक्षिण्य उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. या स्त्रीरत्नांबद्दल कादंबरीकारानें जागोजागीं काढलेले उद्गार त्याच्या अंतःकरणांतील स्त्रियांबद्दलचा आदरातिशय व सहानुभूति दर्शवितात. या कादंबरींत काढलेलें वस्तुस्थितीचें यथार्थ चित्र पाहून समाजांत विलक्षण जागृति उत्पन्न झाली व वरून प्रतिष्ठितपणाचें आवरण घेऊन समाजांत डौलानें वावरणारे व्यसनी गृहस्थ मनांतल्यामनांत वरमून गेले एवढी गोष्ट खास!

पाश्चात्य वाङ्मयाच्या परिशीलनाचा ज्या कॉलेजांतील सुशिक्षित तरुणांच्या मनावर उत्कृष्ट परिणाम झाला, त्यांच्या आयुष्यासंबंधीं आकांक्षांचें वर्णन 'गणपतराव' या कादंबरींत आलें आहे. ज्याप्रमाणें हरिभाऊंवर त्याप्रमाणेंच या कादंबरींतील कथानायक गणपतराव याच्यावरही जॉन स्टुअर्ट मिलचें *Subjection of Women* ( स्त्रियांची परवशता ) व हर्बर्ट स्पेन्सरचा शिक्षणावरील निबंध या दोन ग्रंथांचा अत्यंत परिणाम होऊन त्यांच्यांत विचारजागृति उत्पन्न झाली असल्याचें दाखविलें आहे. गीतेप्रमाणें *Subjection* हा ग्रंथ वंद्य आहे असें त्यास वाटे. या ग्रंथाचीं तो नित्य पारायणें करी. या ग्रंथामुळें त्याच्या वैवाहिक आयुष्यासंबंधींच्या विचारांत क्रांति झाली. पतिपत्नी दोघेही सुशिक्षित, सुसंस्कृत असल्यावांचून संसार निःसार होय असें त्यास वाटूं लागलें. 'प्रौढविवाह,' 'स्त्री-शिक्षण,' इत्यादि

उपायांनीं समाजाची उन्नति करावी असे विचार त्याच्या मनांत रात्रंदिवस घोळूं लागले. गणपतराव, विष्णुपंत व नाना या मित्रत्रयांचे समाजोन्नतिसंबंधींचे विचार मोठे वाचनीय आहेत. स्त्रीशिक्षणाचा आरंभ व आपल्या पत्नीस सुशिक्षित करण्याचे तरुणांचे प्रयत्न या कादंबरींत दृष्टीस पडत असून स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, पुनर्विवाह इत्यादि सुधारणांसंबंधीं अनुकूल विचार या कादंबरींत आहेत.

'पण लक्षांत कोण घेतो' ही कादंबरी केशवपनाच्या भयंकर रूढीचे दुष्परिणाम जनतेच्या मनावर बिंबविण्यासाठींच लिहिलेली आहे. ही कादंबरी म्हणजे एका स्त्रीनें लिहिलेलें आत्मचरित्र असल्यानें तें वाचतांना अत्यंत गोडी वाटते. स्त्रियांच्या स्वभावांतील नैसर्गिक मोहकपणा भाषेंतही उतरल्यामुळें ती फार मनोहर झाली आहे. आपल्या स्वतःच्या सौख्यासाठीं पतिनिधनानें शोकदग्ध झालेल्या यमुनेच्या कोमल अंतःकरणावर तीव्र कठोर आघात करणाऱ्या शंकरमामंजीविषयीं अत्यंत तिरस्कार वाटतो. तत्कालीन समाजांत असे कितीतरी शंकरमामंजी होते व ते धर्माभिमानाच्या गोड नांवाखालीं आपल्या गतधवा सुना, लेकी, भावजयांचा जो छळ करीत त्याचें वर्णन करणें अशक्यच आहे. 'केशवपना'संबंधीं जुलूम त्या काळच्या समाजांत घरोघरीं दृष्टीस पडे. असेंच एका असहाय अबलेचें उदाहरण हरिभाऊंनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें आणि त्यामुळेंच 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरीचा जन्म झाला. या करुणपूर्ण कथेनें आबालवृद्धांचीं, नव्या जुन्या मताच्या शेंकडों स्त्रीपुरुषांचीं अंतःकरणें सहानुभूतीनें व दयेनें भरून टाकलीं. ज्याप्रमाणें मिसेस् हॅरिएट स्टोच्या *Uncle Tom's Cabin* या कादंबरीनें गुलामांच्या व्यापाराविरुद्ध अमेरिकेंतील लोकमत प्रक्षुब्ध केलें, त्याचप्रमाणें हरिभाऊंच्या 'पण लक्षांत कोण येतो' या कादंबरीनें केशवपनासारख्या हिंदुसमाजांतील दुष्ट चालीविरुद्ध लोकमत तयार केलें. ही त्यांची कामगिरी स्तुत्य नाहीं असें कोण म्हणेल? श्री. आगरकरांच्या 'सुधारकां'तील याच विषयावरील कडक निबंधानें जें काम केलें नाहीं तें या कादंबरीनें लोकमतास यत्किंचितही न दुखवितां केलें यांतच हरिभाऊंच्या थोरवीचें रहस्य आहे.

या कादंबरींत विधवाकेशवपनाप्रमाणेंच एकत्र कुटुंबपद्धतीचे दुष्परिणाम त्यांनीं यथायोग्य रीतीन दर्शविले आहेत. मोठ्या कुटुंबांत मानापमानाच्या क्षुद्र व संकुचित कल्पनांनीं ग्रासले गेल्यामुळें खऱ्या संसारसुखास स्त्रीपुरुष कसे पारखे होतात हें

सुशिक्षितांच्या आदर्शभूत राहणीचें चित्र रेखाटून दर्शविलें आहे. सुशिक्षितांचा संसार व तत्कालनि रूढ राहणी यांच्या विरोधदर्शनानें तें चित्र चांगलेंच परिणामकारक झालें आहे.

'यशवंतराव खरे' या कादंबरीचा विषय सामाजिक सुधारणेचा नसून राजकीय सुधारणेचा आहे. ज्या वेळीं गणपतराव समाजोन्नतीचे विचार करण्यांत तन्मय झाला होता त्याच सुमारास यशवंतराव देशाच्या राजकीय सुधारणेचा मार्ग शोधण्यांत गर्क झाला होता, सामाजिक सुधारणेपेक्षां राजकीय प्रश्न अधिक महत्त्वाचे आहेत, या मताचा पुरस्कार करणारा पक्ष कसा निर्माण झाला हें या कादंबरींत हरिभाऊंनीं यशवंतरावाचें पात्र रेखाटून दाखविलें आहे. गणपतरावाचें हृदय स्त्रियांबद्दलच्या आदरानें व कळकळीनें ओथंबलेलें आहे, तर यशवंतरावास सत्यभामाबाई, सोनूताई, रावबहादुर आडमुठ्यांच्या सखूताई या स्त्रियांच्या अनुदार वर्तनानें स्त्रियांच्याविषयीं बिलकूल आदर वाटत नाहीं. त्याच्या मनांत स्त्रीजातीविषयीं कुत्सित भावना उत्पन्न झाली आहे. समाजोन्नतीस विरोध करणाऱ्या राजकारणाच्या क्षेत्रांतील विरुद्ध पक्षाच्या उत्पत्तीचें सोपपत्तिक विवेचन हरिभाऊंनीं या कादंबरीत अतिशय कौशल्यानें केलें आहे.

'मी' या कादंबरीचा विषय तर याहूनही भिन्न आहे. देशोन्नतीस आत्मत्याग अत्यावश्यक आहे या तत्त्वाचें प्रतिपादन या कादंबरींत हरिभाऊंनी केलें आहे. सुंदरीचा–त्याच्या जीवितसर्वस्वाचा–त्याग करून भाऊनें देशसेवेचा खडतर मार्ग स्वीकारला. भावानंद हें नवीन नांव धारण करून व भगवा वेष परिधान करून त्यानें देशाच्या सामाजिक व राजकीय उन्नतीसाठीं अहोरात्र परिश्रम करण्यांत तनमनधन वाहिलें. भावानंदासारख्या उदात्त, तेजस्वी संन्याशाचें सुंदर चित्र काढून हरिभाऊंनीं देशसेवेस अध्यात्माची जोड दिली. देशसेवा व अध्यात्म यांचें या कादंबरींतील मधुरमीलन अत्यंत स्फूर्तिदायक आहे. उच्च कर्तव्यासाठीं व ध्येयसिद्धीसाठीं प्रेममूर्तीचा त्याग करणारा हा त्यागराज खरोखरीच एक महात्मा आहे. त्यागावांचून आपाली कोणतीही गोष्ट उत्कृष्ट रीतीनें होणें शक्य नाहीं, हेंच तत्त्व या कादंबरीनें वाचकांच्या मनावर ठसविलें. आमत्याग व देशसेवा हीं दोन्ही तत्त्वें सर्व कालांत व सर्व जनांस सारखींच संमत असल्यानें या सर्वमान्य व त्रिकालाबाधित तत्त्वांवर उभारलेली ही कादंबरी चिरकाल टिकेल यांत शंका नाहीं.

## कादंबऱ्यांचे विषय

'जग हें असें आहे' मध्यें विशेष असें कोणतेंच सामाजिक, राजकीय अथवा आध्यात्मिक तत्त्व गोंवलेलें दिसत नाहीं. सावत्र मुलानें व त्याच्या दुष्ट पत्नीनें राधाबाईसारख्या सुशील साध्वीचा व तिच्या मुलांचा कसा छळ केला याचें वर्णन या कादंबरींत आहे. शेवटीं राधाबाई व तिचा मुलगा सीताराम यांची स्थिति उत्कृष्ट झाली व त्यांच्या शत्रूंवर अनेक संकटें येऊन त्यांना योग्य शासन झालें. एकंदरींत सज्जनांचा जय व दुर्जनांचा अपजय जगांत होतो असें दाखविण्याचा कादंबरीकाराचा हेतु दिसतो. हिंदुस्थानांत नौकरीसाठीं आलेल्या फेअरब्रेन साहेबासारख्या सज्जन युरोपिअन अधिकाऱ्याचें स्वभावचित्र हरिभाऊंनीं या कादंबरीत रेखाटलें आहे. त्याचप्रमाणें जुलमी इंग्रजी अधिकाऱ्याचा मासला बुलीस्नीक साहेबाच्या स्वरूपांत पहावयास सांपडतो. सिस्टर चॅरिटीमध्यें विश्वप्रेमाची चालती बोलती मूर्तीच वाचकांस दिसेल. एकंदरीनें एक मनोरंजक कथा यापलीकडे या कादंबरीस विशेष महत्त्व नाहीं.

'भयंकर दिव्य' या कादंबरींत बळवंतराव व द्वारकाताई या पुनर्विवाहित दांपत्याची सुशील, सुशिक्षित व सद्गुणी कन्या कमला हिच्यावर कोसळलेल्या चमत्कारिक संकटांचें वर्णन आहे. आपले कर्मठ वडील दादासाहेब यांच्या मताविरुद्ध पद्माकर कमलेशीं विवाह करतो. परंतु राजारामरूपी राक्षसाच्या हातीं सांपडून तो आपल्या पत्नीविषयीं नाहीं नाहीं ते संशय घेऊन तिचा त्याग करतो. राजारामाच्या कृष्णकृत्यांचा स्फोट झाल्यावर पद्माकराचा गैरसमज दूर होऊन कमला-पद्माकरांचा पुनरपि संयोग होतो. परंतु या भयंकर दिव्यामुळें कमलेच्या मुखावर व आयुष्यावर जी करुण छाया पडते ती कधीही नाहींशी होत नाहीं. मुलींना शिक्षण दिल्यास त्यांचें आयुष्य सुखपूर्ण होईलच अशी खात्री देतां येत नाहीं, हेंच कमलेच्या चरित्रावरून हरिभाऊंनीं स्पष्ट केलें आहे. पतिपत्नींस परस्परांविषयीं पूर्ण प्रेम, आदर व विश्वास असल्याशिवाय त्यांचा संसार सुखपूर्ण होणें अशक्यच आहे.

'मायेचा बाजार' या कादंबरींत इस्टेटीच्या लोभानें अण्णासाहेबासारख्या नराधमानें आपली अत्यंत सुशील, सुस्वभावी, सुशिक्षित पत्नी पद्मा हिचा जन्मभर जो छळ केला तो पाहून सहृदय वाचकांचे प्राण कासावीसच होतात. पत्नी कितीही चांगली असली तरी दुष्ट पतीशीं गांठ पडली कीं तिचें आयुष्य फुकट गेलेंच म्हणून समजावें. वसंतरावासारखा सुशील उदात्त विचारांचा तरुण पद्मेवरील एकनिष्ठ प्रेमा-

मुळें जन्मभर अविवाहित राहतो; परंतु, अण्णासाहेबांच्या पाषाणहृदयाला दयेचा पाझरसुद्धां फुटत नाहीं. प्रीतिविवाहाचा पुरस्कार केल्यास असले विषम विवाह आपोआप बंद होतील असें दाखविण्याचा तर या कादंबरीचा हेतु नसेल ना? पद्मेचा विवाह उदात्त व प्रेमळ वसंतरावाशीं झाला असता तर? असा प्रश्न ही कादंबरी वाचीत असतां शेंकडों वेळां वाचकांच्या मनांत येतो.

'आजच' ही कादंबरी अपूर्ण असून तींत इतकीं विविध पात्रें आहेत कीं, कथानकाचा ओघ कोणत्या बाजूनें वाहतो हें जाणणें फार कठीण आहे. यांत गणपतराव, नाना, यशवंतराव, कृष्णाबापू, पद्माकर-कमला, प्रभाकर, गोपाळा, भावानंदाचा शिष्य रामानंद, ताई इत्यादि बरींच पूर्व परिचयाचीं पात्रें असून अद्वैतानंद, शारदानंद, रावसाहेब जरठे, नारायणराव इत्यादि नवीन पात्रें आहेत. कित्येक पात्रांचें दर्शन फक्त एकदांच झाल्यामुळें त्यांचा स्वभावविकास कादंबरीकार कोणत्या रीतीनें करणार होता हें समजण्यास मार्ग नाहीं. अशा परिस्थितींत या कादंबरीवर कोणत्याही प्रकारें ठासून मत देणें धाष्टयाच आहे. परंतु कादंबरींतील पात्रांचें व निरनिराळ्या प्रसंगांचें वर्णन करितांना तदनुषंगानें लेखकानें जे विचार प्रकट केले आहेत त्यांवरून त्याच्या धोरणाची अस्पष्ट कल्पना येते. देशोन्नतीसाठीं प्रत्येक मनुष्य आपल्या बुद्धीप्रमाणें झटतो. गणपतरावास समाजसुधारणेशिवाय देशोन्नति होणें अशक्यच वाटतें तरी तो राजकीय स्वातंत्र्यासाठीं प्रयत्न करणाऱ्या काँग्रेसच्या अधिवेशनास हजर राहतो. परंतु राजकीय स्वातंत्र्यापेक्षां त्याला सामाजिक सुधारणेचें महत्त्व अधिक वाटतें. यशवंतरावाची स्थिति याच्या अगदी उलट आहे. राजकीय स्वतंत्रता मिळाली कीं, हिंदुस्थानचें नष्टचर्य संपलेंच असें त्याचें मत असून आपले राजकारणाचे विचार समाजापुढें मांडण्यासाठीं त्यानें एक वर्तमानपत्र काढलें होतें. नारायणरावास वरील दोन पंथ पसंत नसल्यानें तो ज्वलज्जहाल अराजक पंथास जाऊन मिळून त्या रीतीनें हिंदुस्थानची उन्नति करण्याच्या विचारांत आहे, तर यशवंतरावाचे स्नेही कृष्णाबापू ऊर्फ कृष्णराव यांस औद्योगिक चळवळींत हिंदुस्थानच्या उत्कर्षाचा मार्ग सांपडतो. अद्वैतानंद यानें भावानंदाप्रमाणेंच देशकार्याप्रीत्यर्थ जुन्या संन्यास्याश्रमाचें पुनरुज्जीवन केलें आहे. त्यानें हिंदुस्थानभर जागोजागीं आध्यात्मिक व देशोन्नतीसंबंधाच्या विषयावर व्याख्यानें दिलीं. परंतु केवळ व्याख्यानांचा उपयोग नाहीं, तर त्याच्या जोडीला क्रिया आवश्यक आहे असें

त्यास वाटूं लागलें. भावानंदाची संस्था व तिचें कार्य प्रत्यक्ष जाऊन पाहण्याचा बेत त्यानें निश्चित केला. एकंदरींत स्वामी अद्वैतानंद देशोन्नतीच्या मार्गांचें संशोधन करण्यांतच अद्याप गुंतलेले दिसतात. भावानंदाचा पंथ देशाची सर्व बाजूंनीं उन्नति करण्यासाठी झटत आहे. देशाची सामाजिक, राजकीय, औद्योगिक, आध्यात्मिक सर्व बाजूंनीं उन्नति झालीच पाहिजे अशा मताचा तो पंथ आहे. बाकीचे पंथ संकुचित अथवा एककली आहेत. परंतु हिंदुस्थानच्या सर्वांगीण उन्नतीची कल्पना फक्त भावानंदाच्या पक्षांतच आढळते. लोकांत जागृति उत्पन्न करण्याचें भावानंदाच्या मठाचें धोरण पसंत न पडून सरकारी अधिकाऱ्यांची त्याजवर इतराजी होते व ते भावानंदाच्या शिष्यांचे देशोन्नतीसाठीं अखंड चालू असलेले प्रयत्न शिथिल करण्याचा उद्योग आरंभतात.

अशा रीतीनें नाना प्रकारचे लोक नानाविध मार्गांनीं सुधारणा करण्याचे प्रयत्न करीत असून त्यांच्यामध्यें एकी नसल्यामुळें त्यांचे प्रयत्न परस्परांस विरोधी असेच झाले होते. आपल्या पक्षांत सत्य अधिक आहे असा प्रत्येकास जबर आभिमान असल्यामुळें हिंदुस्थानच्या प्रगतीचें पाऊल मुंगीच्या गतीनें पडत होतें. भावानंदाच्या विशाल बुद्धीनें व विशाल हृदयानें देशोन्नतीची जी विशाल कल्पना निर्माण केली होती, त्याचें आकलन होण्याइतकें लोकांचें अंतःकरण व बुद्धि विशाल झाली नव्हती असें दिसतें; आणि म्हणूनच सरकार, सामाजिक सुधारणेचे पुरस्कर्ते व राजकीय सुधारणांचे पुढारी या सर्वांस भावानंदाचा पंथ सारखाच अप्रिय झाला होता.

'कर्मयोग' ही हरिभाऊंची अगदीं शेवटची सामाजिक कादंबरी असून तीही अपूर्णच आहे. गणपतरावाचा पुत्र चंद्रशेखर हा या कादंबरीचा नायक आहे व त्याच्याच 'कर्मयोगा'चें वर्णन देण्याचा हरिभाऊंचा विचार असावा. कॉलेजांत असतां चंद्रशेखर पूर्णपणें नास्तिक होता. परंतु त्याच्या अंतःकरणांतील सुप्त स्वरूपांत असलेली धर्मभावना स्वामी अद्वैतानंदांच्या दर्शनानें व भाषणानें जागृत झाली, धर्मश्रद्धेवांचून कर्मश्रद्धा व्यर्थ होय, हा स्वामींचा उपदेश चंद्रशेखरास पटला असें दाखविण्याचा हरिभाऊंचा उद्देश असावा. कादंबरी अपूर्ण असल्यामुळें वाचकांस चंद्रशेखराचे विचार तेवढे कळतात, परंतु त्या विचारांची फलश्रुति काय झाली, चंद्रशेखराच्या हातून पुढें कोणतें कार्य झालें हें कळण्यास मार्ग नाहीं. धर्मश्रद्धेच्या भक्कम पायावर आपली कर्मश्रद्धा उभारून चंद्रशेखरानें भावानंदाच्या मठास आपलें

आयुष्य अर्पण केलें व भावानंदाच्या जुन्या पंथाचें पुनरुज्जीवन केलें, असें दाखविण्याचा हरिभाऊंचा उद्देश दिसतो. चंद्रशेखराची मामेबहीण लिली हिनेंही ऐहिक जगांतील मोहक सुखांचा मोह सोडून आत्मत्याग केला व ताई व सुंदरी यांच्याप्रमाणेंच समाजसेवेंत आपलें आयुष्य खर्च केलें असें दाखविण्याचें हरिभाऊंच्या मनांत होतेंसें दिसतें. त्यागावांचून समाजसेवा एकतानतेनें होऊंच शकत नाहीं हें तत्त्वही या कादंबरीच्या द्वारें वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा कादंबरीकारांचा बेत होता असें म्हणावेंसें वाटतें.

कला या दृष्टीन हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचा विचार करणें आवश्यक आहे. संगीत, चित्रकला, काव्य, नाटक इत्यादि कलांच्याप्रमाणें कादंबरीसुद्धां नियमबद्ध आहे. सौंदर्योत्पत्ति व आनंदनिर्मिति हे कलेचे मुख्य हेतु आहेत. कादंबरीच्या वाचनानें वाचकांच्या अंतःकरणांतील भावना उचंबळून आल्या नाहींत, त्यांस आल्हाद वाटला नाहीं, अथवा त्यांत कोणत्याच प्रकारची कल्पनाचमत्कृति त्यांस आढळली नाहीं, तर कलेच्या दृष्टीनें ती कादंबरी कमी प्रतीची असेंच मानलें पाहिजे. मानवी जीवितांतील निवडक प्रसंग घेऊन कादंबरीकार आपल्या कथानकाची रचना करतो, आणि प्रसंगांच्या निवडींतच त्याचें कौशल्य दिसतें. प्रसंगांची योग्य निवड करून त्यांची सौंदर्यपूर्ण रचना करणें हें श्रेष्ठ प्रतीच्या कादंबरीकारावांचून इतरांस साधणें शक्य नाहीं. ज्याप्रमाणें चित्रकाराच्या चित्रांत प्रमाणबद्धता नसल्यास तें बेडौल दिसतें त्याचप्रमाणें कादंबरीकारानें काढलेल्या संसाराच्या शब्दचित्रांत प्रमाणबद्धता नसल्यास तेंही बेडौल दिसून कलेचे मुख्य हेतु जे सौंदर्योत्पत्ति व आनंदनिर्मिति तेच सफल होत नाहींत. नुसता हिरा तितकासा सुंदर दिसत नाहीं. परंतु त्याला पैलू पाडून तो सोन्याच्या कोंदणांत बसविला म्हणजे त्याची प्रभा मनोहर दिसते. तद्वत् नुसते प्रसंग वाचकांस गोड वाटत नाहींत; परंतु योग्य पार्श्वभूमीवर रंगविल्यास ते चित्ताकर्षक वाटतात.

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांतील प्रसंग बहुधा रोजच्या जीवनक्रमांतील असून स्वाभाविक आहेत. नैसर्गिकपणा—सहजता हाच त्यांचा विशेष गुण आहे. 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरींत वर्णिलेले यमुनेच्या आयुष्यांतील प्रसंग त्यांच्या स्वाभाविकतेमुळेंच सहजसुंदर वाटतात. तीच स्थिति त्यांच्या 'यशवंतराव खरे,' 'मी' वगैरे कादंबऱ्यांची आहे. कादंबऱ्यांतील कल्पनेच्या विश्वांतील प्रसंग व पात्रें म्हणजे सत्यसृष्टींतील नानाविध प्रसंगांचे व पात्रांचे विविध नमुने होत. हरिभाऊंच्या

## कादंबऱ्यांचें रचनाकौशल्य

कादंबऱ्यांचीं कथानकें जरी रोजच्या व्यवहारांतील असलीं तरी वाचकांचें चित्त त्यांत तन्मय व्हावें म्हणून हरिभाऊंनीं उपयोजिलेल्या युक्त्या त्यांच्या रचनाकौशल्याची साक्ष पटवितात. आरंभापासून शेवटपर्यंत वाचकांना खालीं पुस्तक ठेवूं नये असेंच वाटावें यासाठीं ते कथानकांतील कांहीं गोष्टी गूढ ठेवितात व तें गूढ शेवटींच उकलल्यामुळें अखेरपर्यंत कादंबरी वाचल्याशिवाय गत्यंतर नसतें. 'मायेच्या बाजारां'तील सोनेरी टोळीचीं कृष्णकृत्यें, 'भयंकर दिव्यां'तील राजारामाचें कारस्थान शेवटींच उघडकीस येतें. स्वप्नांवर हरिभाऊंचा विश्वास होता. कांहीं स्वप्नें भविष्यकालीन प्रसंग सूचित करितात असें त्यांचें मत होतें. 'पण लक्षांत कोण घेतो,' 'मी,' 'यशवंतराव खरे' इत्यादि कादंबऱ्यांत पुढील कथानक सूचित करण्यासाठीं त्यांनीं स्वप्नांचा उपयोग केला आहे. आईच्या मृत्यूनंतर यमुनेस व दादास पडलेलीं स्वप्नें, सुंदरीच्या लग्नाबद्दलचें भाऊचें स्वप्न व गोविंदाचें स्वप्न हीं कथानकाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचीं आहेत. तीं स्वप्नें वाचूनवाचकांनाही चुटपूट लागून त्यांची जिज्ञासा व कुतूहल हीं वाढतात. स्वप्नांप्रमाणेंच कथानकाच्या रचनेंत त्यांनीं दृष्टांतांचाही कुशलतेनें उपयोग केला आहे. दृष्टांत म्हणजे एका दृष्टीनें जागेपणींचीं स्वप्नेंच होत. 'मी'कादंबरींत आईच्या मृत्यूनंतर भाऊरावास आईचें दर्शन झालें व त्याचा परिणाम त्याच्या मनावर फार झाला. भाऊरावानें संन्यासग्रहण करण्यापूर्वी ताईलाही आईनें लागोपाठ तीन रात्रीं दृष्टांत देऊन त्याजवरील भावी संकटाची पूर्वसूचना दिली. एकंदरीनें पाहतां त्यांचीं कथानकें गुंतागुतीचीं असतात व त्यांतील स्थलवर्णनें स्वानुभवाचीं दिसतात. बहुतेक कादंबऱ्यांत पुणें, मुंबई, सातारा इत्यादि शहरांचींच वर्णनें आहेत आणि तीं वस्तुस्थितीला धरून आहेत. 'यशवंतराव खरे' यामधील पर्वतीचें वर्णन, 'गणपतराव'मधील डेक्कन कॉलेजच्या बाजूचें वर्णन, 'मी'मधीलबंडगार्डनचें वर्णन अथवा चतुरशिंगीच्या बाजूचें वर्णन वाचतांना ज्यांनीं म्हणून पुणें पाहिलें आहे त्यांना मौज वाटेल यांत शंका नाहीं. कादंबऱ्यांतील स्थानविशिष्ट उल्लेख (Local references) महत्त्वाचे असून ते कादंबऱ्यांतील पार्श्वभूमि उत्कृष्ट सजविण्याचे कामीं उपयोगी पडतातच, परंतु त्यांतील प्रत्यक्ष पाहून लिहिलेलीं वर्णनें वाचून आपण परिचित वातावरणांतच आहोंत असें वाटल्यावांचून रहात नाहीं.

सामान्यतः हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील संविधानकांची रचना कौशल्यपूर्ण असली तरी त्यांच्या कादंबऱ्या 'करमणूक' पत्रांतून हप्त्याहप्त्यांनीं प्रसिद्ध झाल्या-

मुळें त्यांत कांहीं दोषही शिरले आहेत. एक प्रकरण लिहून झाल्यानंतर दुसरें आठ दिवसांनीं लिहिलें गेल्यामुळें कांहीं कादंबऱ्यांत विस्कळितपणा व विसंगति दिसले. त्यांच्या वर्णनांत पाल्हाळिकपणा असल्यामुळें केव्हां केव्हां कादंबऱ्यांचें वाचन कंटाळवाणें होतें. 'भयंकर दिव्यां'तील 'वैमनस्य', 'विषबीजें' इत्यादि प्रकरणें फार पाल्हाळिक असल्यामुळें पुनः वाचावयाची इच्छा होत नाहीं. पाल्हाळिकपणा हा दोष हरिभाऊंच्या बहुतेक कादंबऱ्यांत आढळतो. त्यामुळेंच अलीकडच्या लहान मुलांमुलींत त्या विशेष प्रिय नाहींत. त्याचप्रमाणें एकाच कादंबरीचें लेखन सतत दोनतीन वर्षे चालू राही. तेवढ्या अवधींत दुसरीं कथानकें सुचून ते दुसऱ्या कादंबरीस प्रारंभही करीत. त्यामुळें एकाच वेळीं त्यांच्या दोन कादंबऱ्या 'करमणुकीं'त सुरू असत. पहिली कादंबरी निम्मी अधिक झाली कीं, नव्या संविधानकांत त्यांची प्रतिभा रमून जाई व त्यामुळें पहिल्या कादंबऱ्या केव्हां केव्हां अपुऱ्या रहात, किंवा त्या पूर्ण केल्याच तर त्या कशाबशा संपविल्या जात. एकदां एकीकडचें लक्ष उडालें कीं उडालें, पुनः म्हणून तिकडे पहावयाचें नाहीं, अशी त्यांची वृत्ति होती. प्रकरण एकदां हातून लिहून गेलें म्हणजे त्याकडे पुनः त्यांची नजर वळत नसे. पहिल्या आवृत्तींत राहिलेले दोष पुनः कितीही आवृत्त्या निघाल्या तरी या त्यांच्या वृत्तीमुळें जसेच्या तसेच रहात. त्यांच्या कादंबऱ्यांत पुनरुक्ति बऱ्याच ठिकाणीं आढळते. एकाच तऱ्हेचे विचार निरनिराळ्या कादंबऱ्यांत दिसतात. 'गणपतराव', 'पण लक्षांत कोण घेतो' इत्यादि कादंबऱ्यांतील मित्रांचे वादविवाद एकाच स्वरूपाचे आहेत. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचीं संविधानकें सुटसुटीत, आटपसर नाहींत. त्यामुळें रचनासौंदर्याच्या दृष्टीनें त्यांत उणेपणा वाटतो. चारचौकी सातमजली वाड्यापेक्षां कधीं कधीं लहानसा टुमदार बंगलाही सुंदर वाटतो. हरिभाऊंचीं कथानकें चारचौकी वाड्यासारखीं विस्तृत आहेत. प्रसंग व पात्रें विविध प्रकारचीं असल्यानें त्यांची योग्य व्यवस्था लावून सुसंगतता राखणें फार अवघड आहे. त्यामुळें कादंबऱ्यांच्या शेवटल्या प्रकरणांत कादंबरीकार सर्व पात्रांचा एकदां परामर्श घेऊन कसाबसा समारोप करून टाकतात. असा समारोप कलेच्या दृष्टीनें तितकासा उठावदार होत नाहीं. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांची तुलना प्रो. ना. सि. फडके यांच्या 'जादूगार', 'दौलत' इत्यादि कादंबऱ्यांशीं केली असतां कलेच्या दृष्टीनें श्री. फडके हे श्रेष्ठ ठरतील. त्यांचीं कथानकें चटकदार व सुटसुटीत असून निरनिराळे प्रसंग गुंफण्याचें त्यांचें चातुर्य अप्रतिम आहे.

त्यांची कृति प्रमाणशीर, सुबक, झिलई दिल्याप्रमाणें चकाकणारी अशी वाटते. कादंबरीच्या रचनेकडे, तिच्या बाह्य सौंदर्याकडे, हरिभाऊ लक्ष पुरवीत नाहींत.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील कथानकरचनेचे दोष त्यांनीं आदर्श म्हणून मानलेल्या त्यांच्या आवडत्या इंग्लिश कादंबरीकारांमुळेंच त्यांच्यांत उतरले. सर्व इंग्लिश कादंबरीकारांत ते डिकन्सला श्रेष्ठ पद देत. ज्याला उत्कृष्ट सामाजिक कादंबऱ्या लिहावयाच्या असतील त्यानें डिकन्सच्या कादंबऱ्यांचें अध्ययन केलें पाहिजे, असें ते नेहमीं म्हणत. डिकन्सप्रमाणें त्यांनीं मानवी स्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण करून सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. परंतु डिकन्सच्या गुणांचेंच केवळ नव्हे तर दोषांचेंही त्यांनीं नकळत अनुकरण केलें. लांबच लांब कथानकें, पाल्हाळाचीं वर्णनें, पुनरुक्ति, इत्यादि सर्व दोष त्यांनीं डिकन्सपासूनच घेतले. (डिकन्सच्या *David Copperfield*, *Nicholas Nickleby*, *Dambey and Son*, *Little Dorrit* इत्यादि कादंबऱ्यांत हे सर्व दोष स्पष्ट दिसतात.

कादंबऱ्यांतील गोष्टी खऱ्याखुऱ्या आहेत, केवळ काल्पित नाहींत, असें भासविण्यासाठीं हरिभाऊंनीं कांहीं प्रसंग कथानकांत चातुर्यानें गुंफले आहेत व कांहीं गोष्टी कायमच्याच गूढ ठेविल्या आहेत. 'मी' नें ज्या 'लखोट्या'साठीं इतकी धडपड केली, ज्यापायीं त्याजवर खोलींत कोंडून राहण्याचा, किंबहुना आगींत जळून जाण्याचा प्रसंग येऊन ठेपला होता; त्या लखोट्याचें पुढें काय झालें व भाऊच्या जीवितावर त्याचा काय परिणाम झाला हें वाचकांस कळत नाहीं. परंतु 'मी' हें आत्मचरित्र आहे, यामुळें भाऊसच जर त्या लखोट्याबद्दल कांहीं समजलें नाहीं, तर तो वाचकांस तरी काय सांगणार ! भाऊचा उपद्यापी ऊर्फ जिज्ञासु स्वभाव दाखविण्यासाठीं या प्रसंगाचा त्यांनीं उपयोग केला आहे. मानवी आयुष्यांत अशा कित्येक गोष्टी घडतात कीं, ज्यांचें लहानपणीं अत्यंत महत्त्व वाटतें. त्या गोष्टींचा एकदां विसर पडला कीं, पुनः तिकडे लक्षही जात नाहीं. या लखोट्याच्या प्रसंगामुळें 'मी' हें अगदीं खरोखरी घडलेलें चरित्र वाटतें. तशीच गोष्ट भावानंदानें सुंदरीस लिहून ठेविलेल्या पत्राची आहे. भावानंदानें संन्यासग्रहण केल्यामुळें सुंदरीच्या हृदयावर जो आघात झाला, तत्संबंधीं कादंबरीकारानें मुग्धताच स्वीकारली आहे. ह्याचप्रमाणें भावानंदानें संन्यास स्वीकारण्यापूर्वी सुंदरीशीं या बाबतींत कोणत्याच प्रकारचें संभाषण केल्याचा उल्लेख नाहीं. त्यामुळें या पत्रांत भावानंदानें सुंदरीस काय लिहिलें

असेल हें जाणण्याची वाचकांची उत्कंठा पराकोटीस पोहोंचते. परंतु ती उत्कंठा कादंबरीकार तृप्त करीत नाहीं. खरोखरच भावानंदानें सुंदरीस लिहिलेल्या त्या खाजगी पत्रांतील मजकूर खाजगीच ठेवण्यांत कादंबरीकारानें भावानंदाच्या धीरोदात्त चारित्र्याशीं कांहींशा विसंगत वाटणाऱ्या गोष्टी कथन करण्याचें टाळून एक प्रकारचें कौशल्यच प्रकट केलें आहे. कारण या पत्रांत भावानंदानें आपल्या सुंदरी-विषयींच्या प्रेमासंबंधींच लिहिलें असलें पाहिजे ही गोष्ट उघड आहे. परंतु, वैराग्यशील संन्याशयाच्या तोंडीं स्निग्धकोमल प्रेमाची भाषा घालणें चमत्कारिक झालें असतें. तो प्रसंग मोठ्या खुबीनें टाळला आहे. 'पण लक्षांत कोण घेतो'चा उपोद्‌घात व अर्पणपत्रिका हीं वाचकांस फसविण्यासारखींच आहेत. यामुळें यमुना नांवाच्या स्त्रीनें लिहिलेलें हें आत्मचरित्र असून तें 'करमणूक' पत्राच्या संपादकाच्या हातीं येऊन त्यानें तें प्रकरणशः छापून काढलें, असें कित्येक वाचकांस खरोखरीच वाटल्याचें ऐकिवांत आहे. एका वाचकभगिनीनें तर 'यमुने'नें लिहिलेल्या आत्मचरित्रावर 'रचणार हरि नारायण आपटे' हे वरच्या पृष्ठावरील शब्द वाचून अत्यंत आश्चर्य प्रगट केलें!! यमुनेनें लिहिलेल्या चरित्रावर हरिभाऊंचें नांव काय म्हणून? अशी शंका बिचारीच्या डोक्यांत आली! यथार्थ-वादाच्या पूर्णतेसाठीं हरिभाऊंनीं योजलेले प्रसंग व कथानकाची गोडी अखेरपर्यंत राहण्यासाठीं कांहीं गूढें कायम ठेविण्याच्या युक्त्या पाहून त्यांच्या रचनाचातुर्याचें अत्यंत कौतुक वाटतें.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील उत्तमोत्तम व संस्मरणीय पात्रांचा विचार करूं लागलों म्हणजे विविध प्रकारचीं मानवी स्वभावचित्रें दृष्टीसमोर दिसून 'मूर्ति तितक्या प्रकृति' या म्हणींतील सत्य प्रतीत होतें. मानवी स्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण करून निर्माण केलेलीं हीं पात्रें खरींखुरीं चालतींबोलतीं माणसें वाटतात. त्यांचे संवाद ऐकण्यास वाचकांचे कान उत्सुक असतात. त्यांच्या दुःखानें ते दुःखी होतात. त्यांच्या आनंदानें आनंदित होतात. स्वतःच निर्माण केलेल्या मूर्तीत चैतन्य ओतून त्यांस जिवंत करणें व अशा रीतीनें कादंबरीमध्यें सत्यसृष्टीचा आभास उत्पन्न करणें हें उत्कृष्ट व अभिजात कलावन्तासच सहजसाध्य आहे. कल्पित व्यक्तींशीं तादात्म्य पावल्याशिवाय, त्यांच्या सुखदुःखाशीं पूर्णत्वानें समरस झाल्याशिवाय, कादंबरी-काराच्या हातून अशीं उच्च दर्जाचीं पात्रें निर्माण होणेंच संभवनीय नाहीं. आपण

उत्पन्न केलेल्या कादंबरीच्या जगांतील स्त्रीपुरुष पात्रांशीं हरिभाऊ तन्मय होतात, यामुळेंच त्यांच्या कादंबऱ्या पुनः पुनः वाचाव्याशा वाटतात.

कलेच्या दृष्टीनें पाहतां 'यशवंतराव खरे' यांतील यशवंतरावाचें पात्र उत्कृष्ट आहे. मानवी स्वभाव स्थिर, अचल नसून कालगतीप्रमाणें व परिस्थितीप्रमाणें त्यांत चलबिचल किंवा फेरबदल होत असतो. तेव्हां कादंबरींतील पात्रांचा मनोविकास दाखविण्यांतच कादंबरीकाराचें विशेष कौशल्य असतें. कादंबरींतील पात्रें सज्जनांच्या किंवा दुर्जनांच्या कायम ठशाच्या स्थिर भूमिका घेऊन कादंबरींतील रंगभूमीवर प्रारंभापासून आल्या तर त्यांत कादंबरीकाराचें कसलें कौशल्य? पूर्ण सुविचारी अथवा पूर्ण दुर्विचारी मानवी व्यक्ति विश्वांत संभवत नाहींत. सदसद्विचारांचा कलह मानवी मनांत सदोदित चालत असतो. उत्कृष्ट तऱ्हेचें स्वभावचित्र रंगविण्यासाठीं मानवी हृदयांतील विकार-विचारांच्या नाजुक जाळ्याचे धागे हळुवार हातांनीं कादंबरीकारास उलगडावे लागतात. व्यक्तीच्या अंतःकरणांत अदृश्य रूपानें प्रवेश करून त्यांच्या भावनांचें व विचारांचें पृथक्करण करण्यास कादंबरीकाराची दृष्टि सूक्ष्म, अंतर्भेदी, हृदयसागरांत खोल बुडी मारून त्याचा ठाव घेणारी असली पाहिजे. कादंबरीकाराचें मनुष्यस्वभावाचें ज्ञान जितकें अधिक, दृष्टि जितकी सूक्ष्म, मनोव्यापारांचें पृथक्करण करण्याची कला जितकी मार्मिक तितकें त्यानें रेखाटलेलें स्वभावचित्र सुंदर, प्रमाणबद्ध व चैतन्ययुक्त असें होईल. या दृष्टीनें परीक्षण केलें असतां 'यशवंतराव' हें पात्र हरिभाऊंच्या उत्तमोत्तम पात्रांपैकीं एक आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. यशवंतरावाचें बालपण दारिद्र्यावस्थेंत अत्यंत हालांत गेलें. रावबहादुर आडमुठे यांच्या सारख्या उन्मत्त श्रीमंताच्या घरीं झालेल्या अपमानानें त्याच्या मानी मनास मोठा धक्का बसला! 'मला नको ही म्हारकी; त्याच्यापेक्षां उपास काढलेला बरा' असे बाणेदार उद्गार बारा वर्षांच्या त्या सुकुमार यशवंताच्या सुंदर मुखांतून बाहेर पडले! त्याची आई गंगाबाई बिचारी दुःखानें पोळलेली, दारिद्र्यानें गांजलेली! तिनें त्याची समजूत कशीबशी घातली, परंतु दुसऱ्या वेळीं आडमुठ्यांच्या ज्येष्ठ चिरंजिवानें न्हाव्याची कात्री घेऊन यशवंतरावास न कळत मागून येऊन हळूंच त्याची शेंडी कापून टाकली. तेव्हां आपली 'भली थोरली' शेंडी गेलेली पाहतांच यशवंतरावानें त्याला मारण्यासाठीं हात उगारला नाहीं तोंच आडमुठ्यांच्या सखूबाई तेथें अवतरतांच एकदम भडका उडाला व शिव्यांची अभिवृष्टि

झाली. रावबहादुर येतांच त्यांनीं यशवंतरावास पोलिसांच्या ताब्यांत देण्याची धमकी दिली! सारेजण तेथून निघून गेल्यावर यशवंतरावही तेथून निघून जाणार तों मथीच्या प्रेमळ शब्दांनीं त्याला अडविलें. मथीला झिडकारून त्यास तेथून जाववेना! सहानुभूतीचें, प्रेमाचें सामर्थ्य असेंच अपूर्व असतें. मथीच्या मधुर, कोमल बोलांनीं त्याचें हृदय विरघळून गेलें. मथीची समजूत करून तो निघून जाणार तोंच तिच्या नांवाची ओरड करीत दादासाहेब पुनः तेथें आले. त्यांस पाहतांच पुनः संताप, त्रास, तिरस्कार इत्यादि विकारांनीं त्याच्या मनांत प्रवेश केला व तेथून तो निघाला तों पर्वतीच्या बाजूस चालूं लागला. यशवंतरावाच्या मानसिक जीवनांतील या आणीबाणीच्या प्रसंगाचें वर्णन अत्यंत हृदयंगम आहे.

पर्वतीच्या बाजूस तो गेला असतां त्याची व श्रीधरपंताची गांठ पडली व त्यांनीं त्यास पराकाष्ठेची सहानुभूति दाखवून आपल्या घरीं राहवून घेतलें. श्रीधरपंत अतिशय विद्वान् व बहुश्रुत गृहस्थ होता. परंतु त्यास आपल्या विद्वत्तेची घमेंड अतिशय असून मोठ्या लोकांची–विशेषतः रावबहादुरांची–निंदा करण्यांत त्यास धन्यता वाटे. या गुरूच्या तालमींत तयार झाल्यामुळें यशवंतरावही गर्विष्ठ व आढ्यताखोर झाला. आडमुठ्यांच्या घरच्या दुष्टपणानें, शाळेंतील मास्तरांच्या श्रीमंतांविषयींच्या पक्षपातानें, जेथें तो मधुकरी मागण्यास लहानपणीं जात असे तेथील स्त्रीपुरुषांच्या निर्दयपणानें व आप्पलपोटेपणानें त्यास अत्यंत क्लेश सोसावे लागले व जगाच्या दुष्ट अंगाचा अनुभव आल्यानें जगाबद्दल त्याचें मत वाईट झालें. कावीळ झालेल्या मनुष्याप्रमाणें दूषित दृष्टीनें तो जगाकडे पाहूं लागतांच प्रत्यक्ष आईवरचाही त्याचा विश्वास उडून जाऊन आईचें आपल्यावर प्रेम नाहीं अशी भलतीच समजूत त्यानें करून घेतली.

आत्यंतिक दारिद्र्यामुळें अंतःकरणांतील प्रेम लपवून यशवंतरावाशीं कठोरतेनें वागणें गंगाबाईस भाग पडे! श्रीधरपंतांकडून त्यास सहानुभूति मिळाली. परंतु त्यांची पत्नी सत्यभामाबाई हिजकडून मात्र मिळाली नाहीं. या कजाग भांडखोर बाई, आडमुठ्यांच्या सखूताई व कृष्णाबापूची बहीण सोनूताई यांच्या उदाहरणांवरून साऱ्या स्त्रीजातीबद्दल त्याचे विचार अनुदार झाले. आईबद्दल त्याचा गैरसमज झाला, तेव्हांपासून मत्सरानें त्याच्या अंतःकरणांत ठाणें दिलें. बाह्यतः क्षुल्लक वाटणाऱ्या प्रसंगामुळेंही यशवंतरावाच्या मनांत जें विलक्षण परिवर्तन झालें, त्याचें वर्णन

वाचून कादंबरीकाराच्या कौशल्याची खात्री पटते. सहानुभूतीच्या, प्रेमाच्या अभावींच यशवंतरावाचा स्वभाव चमत्कारिक होऊन जगाबद्दल तिरस्कारबुद्धि त्यानें धारण केली.

श्रीधरपंतांच्या उत्तेजनानें तो शाळेंतील उत्तम विद्यार्थ्यांत गणला गेला. त्याचे विचार श्रीधरपंतांच्या विचारांचा प्रतिध्वनि असे. सामाजिक सुधारणेची तादृश जरूरी नाहीं, अगोदर राजकीय सुधारणाच झाली पाहिजे, असें त्याचें मत बनलें. असो.

मनोविकासाच्या दृष्टीनें यशवंतरावाचें चित्र सर्वोत्कृष्ट आहे. त्याच्या मनोविकारांत व विचारांत हळू हळू निरनिराळ्या प्रसंगांमुळें होत गेलेलें परिवर्तन हरिभाऊंनीं अत्यंत कुशलतेनें रेखाटलें आहे.

या राजकीय पुढाऱ्याप्रमाणेंच सामाजिक सुधारणेचे पुरस्कर्ते 'गणपतराव' हें पात्रही अत्यंत महत्त्वाचें आहे. एके दिवशीं स्फूर्ति होऊन मिलसाहेबांस साक्षी ठेवून व त्यांच्या *Subjection of Women* या पवित्र ग्रंथावर हात ठेवून 'आजपासून मी स्त्रियांच्या उन्नतीप्रीत्यर्थ झटेन,' अशी त्यानें घेतलेली शपथ पाहून त्याच्या भावना-प्रधान कोमळ मनाचें कौतुक वाटतें. सामाजिक सुधारणेवांचून हिंदुस्थानची स्थिति सुधारणार नाहीं असें त्याचें मत होतें. स्त्रीशिक्षण सुरू झालें पाहिजे, प्रौढविवाह-पद्धति अंमलांत आली पाहिजे, पुनर्विवाहास आडकाठी नसावी, जातिभेद नाहींसा व्हावा अशा तऱ्हेची, त्याची विचारसरणी बनली होती. त्याचा स्वभाव फार उतावीळ होता. 'हळू हळू' हे शब्द त्यास माहीतच नव्हते. सर्व सुधारणा एकदम झाल्या पाहिजेत असें त्यास वाटे. मिल व स्पेन्सर यांच्या ग्रंथांच्या अध्ययनानें त्याचीं मतें नास्तिक झालीं होतीं. परंतु तो मोठा सुशील, सदाचरणी, सुसंस्कृत असून समाजोन्नतीचा त्यास ध्यास लागला होता. परंतु त्याचे विचार एकदेशीय होते. गणपतरावांचें चरित्र रेखाटून हरिभाऊंनीं एक उत्कृष्ट प्रकारचें तत्कालीन समाज-सुधारकाचें चित्र रंगविलें आहे.

यशवंतरावाइतकेंच किंबहुना अधिक संस्मरणीय व हृदयंगम असें 'मी' मधील भावानंदाचें पात्र होय. यशवंतरावाप्रमाणेंच याचें बालपण कष्टांत गेलें व त्याच्या आईकडूनही त्यास सहानुभूति बिलकूल मिळाली नाहीं. मार देण्यापुरताच त्याचा व आईचा संबंध असे. लहानपणीं 'व्यतिपात, बेडगळ, नादी' म्हणून भाऊरावांची संभावना होई! परंतु सुंदरीच्या गोड बालमूर्तीचें दर्शन झाल्याबरोबर त्याच्या

अंतःकरणांत तिच्याबद्दल जो निर्मल प्रेमभाव उत्पन्न झाला, त्यामुळें त्याच्या मूळ स्वभावांत व आयुष्यांत विलक्षण परिवर्तन झालें! जीवितास अत्युत्कट उदात्तता देण्याचा विशुद्ध प्रेमाचा हा नैसर्गिक धर्म हरिभाऊंच्या इतर/कोणत्याही कादंबरींत आढळत नाहीं. भाऊरावाच्या जीवितांत क्रांति घडविणारें हें सुंदरीबद्दलचें त्याचें विमल प्रेम हा या कादंबरीचा विशेषच होय. सुंदरीसाठीं तो शाहणा झाला, सुंदरी-मुळेंच त्याचा हट्टी, स्वार्थी स्वभाव नाहींसा होऊन त्याच्या अंतःकरणास उदात्तता आली. सुंदरीबद्दलचा त्याचा ओढा अखेरपर्यंत कायम राहिला व अत्यंत बिकट प्रसंगांतही त्यानेंच त्यास अत्यंत धैर्य दिलें. निर्मल प्रेमाचें सामर्थ्य अलौकिक आहे. सामान्यत्वाच्या जड बंधनांतून अत्यंत तरल अशा दैवी सृष्टींत नेऊन सोडणारी ती जादू आहे. सुंदरीची व त्याची भेट झाली नसती तर तो कदाचित् विक्षिप्त, हट्टी, दुराग्रही झाला असता. त्याच्या मनांतील सुंदरीबद्दलच्या गाढ प्रेमाचा पुरावा 'स्वप्न कीं सत्य' या प्रकरणांत सांपडतो. सुंदरीप्रीत्यर्थ त्यानें स्वतःवर जिवावरचें दुखणें ओढवून घेतलें. या एका गोष्टीवरूनही त्याच्या अमर्याद प्रेमाची कल्पना येईल.

शिवरामपंत—सुंदरीचे वडील—यांच्या शिकवणुकीमुळें व त्यांच्या प्रोत्साहनामुळें भाऊची गणना हुषार विद्यार्थ्यांत होऊं लागून भराभर परीक्षा पास होऊन तो एल्एल्. बी. झाला. परंतु तत्पूर्वींच त्याची आई वारली व तिच्या कपाळावर हात ठेवून त्यानें 'आई, मी ताईला अणुमात्र अंतर देणार नाहीं...आणखी तुझ्या-प्रमाणेंच सत्य मार्गानें वागेन' अशी प्रतिज्ञा केली. हा एकच क्षण! परंतु त्या एकाच क्षणांत त्याच्या मनाचा कच्चेपणा लयास गेला व वाटेल तीं संकटें कोस-ळलीं तरी त्यांस धैर्यानें तोंड देण्याइतका आत्मविश्वास त्याच्या ठायीं उत्पन्न झाला. भाऊच्या अंतःकरणांत परिवर्तन करणारा हा दुसरा प्रसंग होय.

शिवरामपंतांच्या उपदेशानें व सत्यपरायण आणि थोर अशा पुरुषांच्या चरित्रांच्या पारायणानें, आपलें सर्व आयुष्य परोपकारांत घालवावें, केवळ 'मी एकटा, मी एकटा' असें म्हणत बसूं नये, असें त्यास वाटलें. कल्पनेंतील संसारसुखाच्या रम्य चित्रांपेक्षां आपण, ताई व सुंदरी लोकांच्या सुखासाठीं कायावाचामनानें झटत आहोंत या चित्रानेंच त्याचें मन मोहित झालें.

वकिली न आरंभितां कॉलेजांतील तरुण विद्यार्थ्यांस एकत्र जमवून इतिहास, अर्थशास्त्र, रामायण—महाभारतांतील व उपनिषदांतील अल्प कथा व त्यांतील उन्नत

तत्त्वें यांवर व्याख्यानें देण्याचा व त्याचप्रमाणें रासायनिक व सृष्टशास्त्रीय ज्ञान सप्रयोग देण्याचा उपक्रम त्यानें आरंभिला. ' नवे विचार ' हें वर्तमानपत्र त्यानें सुरू केलें व आपले विचार निर्भीडपणें लोकांपुढें मांडून त्यानें समाजाचा रोष आपणांवर ओढवून घेतला.

एक दिवस देशोन्नतीबद्दल विचार करीत असतां राजकीय पारतंत्र्य व सामाजिक पारतंत्र्य यांतून आपल्या देशाची मुक्तता करण्याचा मार्ग त्यास सांपडला. एक तेजस्वी विचार त्याच्या मनःक्षितिजावर उदय पावून त्यानें त्याचें शरीर, मन, बुद्धि, हीं व्यापून टाकलीं. त्या विचाराचें व त्याचें तादात्म्य झालें व मिशनऱ्यांप्रमाणें आत्म-त्याग करून देशसेवा करावी अशी त्यास स्फूर्ति झाली. शिवरामपंत व ताई यांच्या पायांस साक्ष ठेवून आपला संकल्प पार पाडण्याची त्यानें प्रतिज्ञा केली. ही प्रतिज्ञा त्याच्या तोंडून निघाली त्याच क्षणीं शिवरामपंतानें सुंदरीशीं लग्न करण्याविषयीं त्यास शब्द टाकला. ' अशक्य! अशक्य! ' असें भाऊराव त्यास उत्तर देत असतां त्याच्या नेत्रांतून दोन अश्रुबिंदू गळाले.

भाऊरावाच्या आयुष्यांतील परिवर्तनाचा हा तिसरा टप्पा होय. भाऊरावाच्या मनांत प्रेम व कर्तव्य या दोन अत्यंत महत्त्वाच्या गोष्टींमध्यें झगडा सुरू झाला! जिला त्यानें लहानपणापासून आपलें एकच एक आशास्थान मानलें त्या प्रेमसर्वस्वाचा त्याग करण्याचा विलक्षण प्रसंग त्याजवर येऊन ठेपला. जिचा त्यानें बालपणापासून सतत ध्यास घेतला होता, ती त्याची प्रेममूर्ति त्याला सहजसाध्य असतां कर्तव्यपूर्ती-साठीं, देशोद्धारासाठीं त्यानें सर्वस्वत्यागाचा निश्चय केला. सुंदरीबद्दल त्याला वाटणाऱ्या प्रेमाचें खरें स्वरूप लक्षांत घेतलें असतां त्याच्या अलौकिक त्यागाचें अधिकच महत्त्व वाटतें. सर्वस्वदान हीच संन्याश्याची खरी कसोटी आहे. देशासाठीं त्यानें मांडलेल्या पवित्र होमांत त्यानें सुंदरीचा—आपल्या सुखसर्वस्वाचा—बळी दिला! आश्रमान्तर करून त्यानें भावानंद हें नांव धारण केलें व मठस्थापना करून स्वीकृत कार्यास प्रारंभ केला. राजकीय, सामाजिक दोन्ही स्थिति सुधारून सर्वांगीण देशो-न्नति करण्याचें ध्येय त्यानें पुढें ठेविलें. अविश्रांत श्रम, अहोरात्र केल्यानें भावानंदास मृत्यूनें लौकरच गांठलें. ' एक माणूस गेला म्हणून काय झालें ? एक शिपाई पडला तर दुसऱ्यानें लगट केली पाहिजे! ' हे भावानंदाचे मृत्युसमयींचे उद्गार अर्थपूर्ण आहेत. एक शिपाई पडून दुसरा लगट करण्यास नसल्यामुळेंच हिंदुस्थान आजवर

पारतंत्र्यांत आहे. भावानंदानें आपला शिष्य रामानंद यास लिहिलेल्या पत्रांवरून त्याच्या जीविताचें तत्त्वज्ञान समजतें. खऱ्या देशसेवकानें सर्वसंगपरित्याग करून ' देशाचें चिरकालिक हित हाच परमार्थ, देशाची पारतंत्र्यांतून सुटका हाच मोक्ष ' मानावा असें त्यानें लिहून ठेविलें.

भावानंदाचें उत्कृष्ट व तेजस्वी चित्र रेखाटून हरिभाऊंनीं, देशसेवेस आत्मत्याग अत्यावश्यक आहे, हें तत्त्व प्रतिपादन करून आपल्या प्राचीन संन्यासमार्गाचें अर्वाचीन कालांतही अत्यंत महत्त्व आहे, हें निर्विवाद सिद्ध केलें. सुंदरीवर त्याचें अखेरपर्यंत नितान्त प्रेम होतें व त्यानें तिला दिलेल्या अमर्याद दुःखाचीही जाणीव त्याच्या अंतःकरणांत सदैव वास करीत होती. यामुळें तर त्याचा त्याग अनुपम वाटतो. दुःख सहन करण्यांतच मानवी मनाचा थोरपणा आहे. बुद्ध, ख्राइस्ट मोठे कां? तर त्यांच्या अंतःकरणास झालेलें दुःख सारें विश्व व्यापून राहिलें होतें म्हणून!

भावानंदाच्या हृदयांतील विकारविचारांचे नाजुक तंतु हरिभाऊंनीं कोमल हातांनींच उलगडून दाखविले आहेत. त्याच्या आयुष्यांत प्रेम व कर्तव्य यांचा झगडा निर्माण करून भावानंदाच्या अंतःकरणाचें अलौकिक उज्ज्वल स्वरूप दाखविण्यांत हरिभाऊंनीं आपल्या लेखनकौशल्याची पराकाष्ठा केली आहे. विरोधी प्रसंग एकत्र गुंफून भावानंदाच्या मनांतील कर्तव्याकर्तव्यांच्या झगड्यास कादंबरीकारानें अधिकच रंग चढविला. मनोविकासाच्या दृष्टीनेंही भावानंद हें पात्र हरिभाऊंच्या कलाभिज्ञतेचें द्योतक वाटतें.

' मायेचा बाजार ' यांतील वसंतरावाचें पात्र अगदीं वेगळ्याच नमुन्याचें आहे. सुशिक्षित तरुण वसंतराव आजन्म अविवाहित राहतो. परंतु अविवाहित राहण्याचें कारण देशसेवा हें नव्हे. त्याची बालमैत्रीण पद्माताई हिच्यावरील त्याचें अत्यंत शुद्ध स्वरूपाचें एकनिष्ठ प्रेम हेंच त्याच्या यावज्जीव ब्रह्मचर्याचें कारण होय. दुर्दैवानें पद्मेस अण्णासाहेबासारखा पशुवृत्तीचा पति मिळाला आणि तिची इस्टेट आपल्या हातांत यावी म्हणून त्यानें या आपल्या निष्पाप, देवतातुल्य पत्नीचा अनन्वित छळ केला. पद्मेची स्थिति लांडग्याच्या ताब्यांत सांपडलेल्या कोकराप्रमाणें झाली. पद्मेच्या दुःस्थितीनें अंतःकरण कळवळून जाऊन पद्मेच्या जिवाचें रक्षण करण्यासाठीं व तिच्या दुष्ट नवऱ्याच्या छळापासून तिला मुक्त करण्यासाठीं वसंतरावानें अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा केली. परंतु हें सर्व करीत असतां त्यानें आपल्या

हृदयांतील भावना एक क्षणमात्रही बाहेर दिसूं दिल्या नाहींत. त्याचें मनोधैर्य खरोखर अप्रतिम होतें. पद्मेसाठीं त्यानें नाहीं नाहीं ते अपमान सोसले, परंतु तिचा दुःखभार हलका करण्याची त्यानें पराकाष्ठा केली. ध्येयभूत प्रेमासाठीं धैर्यानें खडतर व्रतपालन करणाऱ्या तरुण वसंतरावाचें फार कौतुक वाटतें. व्यक्तिगत उदात्त ध्येयासाठीं आयुष्य वेंचणारे तरुण हल्लींच्या समाजांतही दुर्मिळ आहेत. वसंतरावानें कोणत्याही प्रकारची समाजसेवा, देशसेवा केली नसली तरी आपल्या उदात्त विचारांना कृतीचें स्वरूप देऊन पद्मेसारख्या साध्वीची सेवा केली, याचें महत्त्वही बिलकूल कमी नाहीं. भावानंदासारखा महात्मा लाखांत एखादाच होईल, परंतु वसंतरावासारखे ध्येयासाठीं झटणारे तरुण समाजांत निर्माण झाले तरी देशाचें दैव उघडलें असेंच समजलें पाहिजे.

त्याच कादंबरींतील डॉ. भगवंतराव या परोपकारी गृहस्थाचें चित्रही चांगलें आहे. पहिली पत्नी निवर्तली असतांही दुसरें लग्न न करितां गरीब अनाथांस साह्य करण्याचें दयेचें व्रत त्यांनीं अंगिकारलें आहे. मथुराबाई व तिचीं भांवडें यांच्या-सारख्या दीन अनाथ कुटुंबाची सेवा करणें ते आपलें कर्तव्यच मानतात.

'आजच'मधील नारायणरावाचें पात्र राजकीय दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें आहे. गणपतराव प्रागतिक आहे, यशवंतराव जहाल आहे, तर नारायणराव ज्वलज्जहाल आहे. नारायणराव यशवंतरावाचा शिष्य; परंतु त्यास यशवंतरावाचे राजकीय सुधारणेचे सौम्य व शांततेचे मार्ग पसंत पडत नाहींत. त्याच्या पराकाष्ठेच्या उतावीळ व भावनाप्रधान स्वभावास हिंदुस्थानांत क्रान्ति व्हावी असें येतें व तो ज्वलज्जहाल अराजक पंथास मिळून अत्याचार करण्यास प्रवृत्त होतो. यशवंतरावाच्या मनाचा तोल कधीं नाहींसा होत नाहीं, परंतु नारायणराव बेताल होऊन अविचारीपणानें भलत्याच मार्गास लागतो व 'पूर्वीचे लोक सारे चुकले, आपणांसच काय ती देशाची खरी कळकळ आहे' अशी तो भलतीच समजूत करून घेतो.

'आजच'मधील कृष्णाबापू हे औद्योगिक चळवळीचे मोठे पुरस्कर्ते म्हणवून घेतात. त्याचें शिक्षण बेताचेंच झालें असून तो फार गडबड्या, लटपट्या गृहस्थ आहे. त्याचा फाजील आत्मविश्वास पाहून हंसूं येतें. साऱ्या रावसाहेब रावबहादुरांच्या-कडून मदत मिळवून गिरणी काढण्याचा त्याचा विचार होता. तो यशवंतरावाचा मित्र व भक्त होता. आपण फार शहाणे आहोंत असा त्यास अभिमान वाटे. पद्माकरास आपल्या जाळ्यांत पकडण्याचा त्याचा उद्देश दिसतो.

## हरि नारायण आपटे

'कर्मयोग' यांतील नायक चंद्रशेखर याचें स्वभावचित्र हरिभाऊंनीं अगदीं वेगळ्याच रीतीनें रेखाटलें आहे. स्वभावपरिपोष व मनाचें पृथक्करण दोन मार्गांनीं होऊं शकतें. शक्य तितकें संभाषणद्वारां पात्रांच्या स्वभावांतील गुणदोष दाखविणें ही सर्वोत्कृष्ट पद्धति होय. दुसरी पद्धति म्हणजे कादंबरीकारानें मध्यस्थी करून पात्रांच्या गुणदोषांची त्रयस्थ वृत्तीनें चर्चा करणें. पहिली पद्धति नाट्यांत पूर्णत्वानें अवलंबिली जाते. ज्यांना उत्कृष्ट संवाद साधत नाहींत ते कादंबरीकार दुसऱ्याच पद्धतीचा अवलंब करतात. परंतु पहिल्या प्रतीचे कलाभिज्ञ कादंबरीकार दोन्ही पद्धतींचा प्रसंगानुरूप उपयोग करून कलेच्या दृष्टीनें निर्दोष अशीं पात्रें निर्माण करतात. तात्त्विक दृष्टीनें मनुष्यस्वभावाचें निरीक्षण करणाऱ्या कादंबरीकारास मानसशास्त्रदृष्ट्या मनोव्यापारांचें पृथक्करण यशस्वी रीतीनें करतां येतें. या दृष्टीनें पाहतां हरिभाऊंनीं रेखाटलेलें चंद्रशेखराचें स्वभावचित्र महत्त्वाचें आहे. चंद्रशेखराचा कॉलेजांतील जीवनक्रम अत्यंत सुखांत जातो. त्याचे आईबाप प्रेमळ व सुशिक्षित असून त्यास पैशाची बिलकुल ददात नसते. वडिलांच्या—गणपतरावाच्या—समाजोन्नतीच्या विचारांचा व नास्तिकवादाचा त्याजवर लहानपणापासूनच संस्कार झाला असल्यामुळें तोही कॉलेजांत नास्तिकासारखें बोले. देशोन्नतीसाठीं झटण्याबद्दल कॉलेज सोडते वेळीं त्याच्या प्रिन्सिपॉलनें त्यास उपदेश केला. तो विद्याभ्यास संपवून घरीं आला व कांहीं तरी करावें असें त्यास वाटूं लागलें. काय करावें याबद्दल त्याचा निश्चय होईना. आपलें कार्यक्षेत्र कोणतें याचाच त्यास निर्णय करितां येईना. कॉलेजच्या मर्यादित क्षेत्रांत, 'आपल्याला जें नीतियुक्त म्हणून वाटेल तें करीत रहावें, लोक हाच परमेश्वर, त्यांच्या हितासाठीं झटणें हीच परमेश्वराची सेवा,' असें तो प्रतिपादन करी. मिल-स्पेन्सरांचा अनुयायी असें म्हणवून घेण्यांत त्यास धन्यता वाटे. परंतु कॉलेजच्या आवाराबाहेर पाऊल टाकून त्यानें जगांत प्रवेश केला, तेव्हां देशकार्याचे भिन्न भिन्न व परस्परविरोधी मार्ग पाहून तो क्षणमात्र गोंधळूनच गेला. 'पुढें काय करणार' म्हणून जो तो त्याला प्रश्न करी. परंतु त्याचेंच त्याला काय करणार तें समजत नव्हतें तर तो काय उत्तर देणार? अध्यात्म विषयाचा त्यास अतोनात कंटाळा. परंतु जामियतरामाच्या घरीं आलेल्या स्वामींच्या दर्शनानें तो विषय घेण्याची इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. स्वामींच्या उपदेशाचा त्याच्या मनावर अतोनात परिणाम झाला व कर्मश्रद्धेस धर्मश्रद्धेची जोड असलीच

पाहिजे; ' तुमच्या कर्मश्रद्धेच्या पाठीशीं धर्मश्रद्धा नसेल तर तुमची कर्मश्रद्धा फार दिवस टिकणार नाहीं, ' या स्वामींच्या उद्गाराचा परिणाम त्याच्या मनावर होऊन ' धर्मश्रद्धा आपल्यामध्यें कशी उत्पन्न होईल ' असे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. ' आपलें कर्तव्य कोणतें ! ' याचा शोध लावण्याचा त्यास ध्यास लागला. ' जगदीशा, मला स्वर्ग नको, मोक्ष नको, कैलास नको. मला पुनः पुनः देह देऊन हिंदुस्थानांत जन्माला घाल आणि त्याच्या उद्धारार्थ श्रम करण्याची बुद्धि दे, ' हे स्वामीजींचे उद्गार त्याच्या कानांत एकसारखे घुमत राहिले.

' आपल्याला कर्मश्रद्धा पाहिजे धर्मश्रद्धा करायची काय ? ' हें गणपतरावाचें मत त्यास पटेना. म्हणून स्वामीच्या सहवासांत कांहीं काळ घालवावा असें त्यास वाटूं लागलें. पुढें तो चार दिवस विश्रांतीसाठीं म्हणून आपल्या मामाच्या गांवीं गेला असतां तेथें भावानंदाची संस्था त्याच्या दृष्टीस पडली व त्या संस्थेस वाहून घेण्याचे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले.

' कर्मयोग ' ही कादंबरी अपूर्ण असल्याकारणानें चंद्रशेखरानें पुढें कोणते कार्य केलें, त्याची व स्वामींची भेट झाली किंवा नाहीं, त्याच्या मनांत धर्मश्रद्धा उत्पन्न झाली किंवा नाहीं, त्यानें भावानंदाच्या संस्थेसच आपलें आयुष्य वाहिलें कीं नाहीं इत्यादि गोष्टी समजणें अशक्य आहे. या कादंबरींत आपणांस फक्त चंद्रशेखराचे विचारच कळतात. अर्थात् कथानायक विचारी असला तरी निष्क्रिय आहे. कादंबरीचीं अडीचशेंवर पृष्ठें व शेहेचाळीस प्रकरणें झालीं तरी मुख्य पात्र निष्क्रिय आहे हा या पात्रांत मोठाच दोष आहे. स्वतः कोणतीही गोष्ट धडाडीनें करण्याचें कर्तृत्व त्याच्यांत दिसत नाहीं. तो विद्वान् आहे, विचारी आहे, त्याची दृष्टि व्यापक आहे, तरी कर्तव्याचा मार्ग त्यास सांपडत नाहीं ! त्याचा मामा, गणपतराव, स्वामीजी त्यास अनेक वेळां उपदेश करतात; परंतु काय करावें हें निश्चितपणें त्यास ठरवितां येत नाहीं हें पाहून आश्चर्य वाटतें ! एम्. ए. पर्यंत शिक्षण घेणाऱ्या तरुणास ' आपण पुढें काय करणार ' याची यत्किंचितही कल्पना नसावी हें केवढें नवल ! ' विश्रांति ! आपल्या लोकांना विश्रांति पुष्कळच वर्षे—पुष्कळच शतकें मिळाली आहे नाहीं कां ! ' या ताईच्या उद्गारानें तर चंद्रशेखर स्तम्भितच झाला. परंतु वाचक मात्र चंद्र-शेखराचे विचार व कृतिशून्यता पाहूनच स्तम्भित होतात ! सारांश, कथानायकच असा असल्यामुळें ही कादंबरी तितकीशी उठावदार झाली नाहीं.

परंतु त्याच्या विचारांचें पृथक्करण करणारे हरिभाऊ मात्र खरे खरे मानसशास्त्रज्ञ वाटतात. चिमुकल्या चंद्रीच्या सहजोद्गारामुळें चंद्रशेखराच्या मनावर झालेला परिणाम व त्यास मिळालेली स्फूर्ति कादंबरीकारानें किती कुशलतेनें रेखाटली आहे! ठोकळ्यांचा बंगला बांधीत असतां, 'कुठं चुकतं आहे हें कुणाला ठाऊक, कुठं तरी चुकतं आहे खास!' या चंद्रीच्या स्वाभाविक शब्दांनीं आपल्याला इषाराच मिळाला, असें त्यास भासलें. एखाद्या साध्या भाषणानें त्याचे विचार कोणीकडच्या काणाकडे तरी जात.

स्वामीजींच्याकडे हरिद्वारास जाऊन रहावें, कां लिलीच्या दुःखाचें कारण समजून घेऊन त्याचा परिहार करावा, कां ताईच्या संस्थेस जाऊन मिळावें, कां विक्रमशीलासारख्या नराधमाच्या हाती सांपडलेल्या निष्पाप नर्मदेस सोडवावें अशा तऱ्हेचे चार प्रश्न एकदम पुढें उभे राहून चंद्रशेखर गांगरून गेला व काय करावें हेंच त्यास समजेना. ही कादंबरी पूर्ण झाली असती तर चंद्रशेखराचा 'कर्मयोग' आपणांस कळला असता. किंचित्काल मागे पडलेल्या अशा भावानंदाच्या मठाचें चंद्रशेखराच्या हातून पुनरुज्जीवन करून विक्रमशीलानें फसविल्यामुळें 'पतिताश्रमां'त आलेल्या नर्मदेशी त्याचा पुनर्विवाह लावण्याचें कादबरीकाराचे मनांत होतें, अशी कल्पना करण्यास जागा आहे. चंद्रशेखरास अखेर कर्तव्याचा मार्ग सांपडून तो कर्मयोगी कसा झाला ही महत्त्वाचीच गोष्ट कादंबरीत न आल्यानें वाचकांचें कधीही भरून न येणारे असें नुकसान झालें आहे.

भावानंदाचे गुरु शिवरामपंत व यशवंतरावाचे गुरु श्रीधरपंत ही दोन पात्रें ठळक उठून दिसणारीं आहेत. प्रत्येकाचें तत्त्वज्ञान भिन्न व परिणामकारी आहे. श्रीधरपंतांपेक्षां शिवरामपंत कितो तरी बऱ्या दर्जाचे गृहस्थ आहेत. त्यांचे आचारविचार अत्यंत अनुकरणीय असून त्यांच्यासारखा प्रेमळ शिक्षक, प्रेमळ पति, प्रेमळ बाप, नियमनिष्ठ पुरुष, सरळ व्यवहारज्ञ, मनुष्यांची योग्य पारख करणारा व कर्तव्यतत्पर गृहस्थ विरळाच. त्यांची व्यापक दृष्टि व उदात्त विचार वाखाणण्यासारखे होते. शिवरामपंतांनीं आपल्या आयुष्यांत अत्यंत महत्त्वाच्या अशा दोन गोष्टी केल्या. अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत त्यांनीं आपल्या कन्येस अविवाहित ठेवून शिक्षण दिलें, व व्यापक दृष्टीच्या उदात्त देशसेवकांचा पंथ तयार केला. भावानंदानें आत्मत्याग करून मठस्थापना केली, हें शिवरामपंतांच्या शिकवणुकीचेंच फळ होय. भावा-

नंदाचे विचार इतके विशाल झाले याचें कारण शिवरामपंतांचीच थोर शिकवणूक. 'आधीं राजकीय कीं आधीं सामाजिक?' हा प्रश्न, ज्यांना कांहीं करायला नको त्यांचा. ज्यांना उद्योग करावयाचा, त्यांनीं जें हातून होईल तें करण्याचा सपाटा चालवावा, आधीं तें, आणखी मग हें, आधीं अमुक सुधारा, आणखी मग तमुक सुधारा, असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. सगळ्या शरिराला अशक्तता आली असतां एक हात आधीं लठ्ठ करून घ्या, मग बाकीच्या शरिराचें पाहूं, असें म्हणण्यापैकीं 'आधीं अमुक, मग तमुक' असें म्हणणाऱ्याचें म्हणणें असतें. आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय हा प्रश्न काय? ज्याला जें रेटेल तें त्यानें पुढें रेटावें, हा शिवरामपंतानें भाऊस केलेला उपदेश त्याच्या आयुष्याचें रहस्यच दर्शवितो. "कोणची गोष्ट सुधारायची म्हटली म्हणजे ती अगदीं अंतर्भागापासून सुधारली पाहिजे," हें शिवरामपंतांचें वाक्य मननीय आहे. त्यांच्या अंगीं विद्वत्ता फार नव्हती, त्यांचें वाचनही अगाध नव्हतें; परंतु त्यांची दूरदृष्टि, धैर्य, सहनशीलता हीं अवर्णनीय होतीं. शिवरामपंतांचें चित्र वंदनीय आहे. पण कलेच्या दृष्टीनें हें पात्र सदोष आहे असें म्हणावेंसें वाटतें. या पात्रांत एकही दोष दाखविला नसल्यानें तें अतिमानुष वाटून तितकेंसें आकर्षक भासत नाहीं.

त्या दृष्टीनें पाहतां श्रीधरपंतांचें स्वभावचित्र अत्यंत कुशलतेनें रेखाटलें आहे. श्रीधरपंतांचें अगाध वाचन व विद्याव्यासंग, त्यांचें खोंचदार, कुचकें भाषण, स्वतः शांत राहून बायकोला चिडविण्यासाठीं त्यांनीं सोडलेल्या फुसकुल्या, त्यांची आढ्यता व थोर म्हणून समजले जाणाऱ्या लोकांची व रावबहादुरांची निंदा करण्याचा स्वभाव, त्यांचीं राजकीय मतें, त्यांचे भोंवतीं जमणारें भगत-मंडळ, नाकारून बोट चालवीत किंचित् रेंकून बोलण्याची, त्यांची लकब या सर्वांचें वर्णन वाचून हरिभाऊंच्या निरीक्षणशक्तीचें कौतुक वाटतें. श्रीधरपंत हें पात्र हरिभाऊंच्या उत्कृष्ट पात्रांपैकीं एक आहे.

वरील पात्रांप्रमाणेंच 'भयंकर दिव्यां'तील पद्माकर व प्रभाकर या मित्रद्वयांचीं स्वभावचित्रें चांगलीं उतरलीं आहेत. संशयपिशाच्चानें पद्माकरास पछाडल्यापासून त्यांच्या मैत्रींत जें परिवर्तन झालें त्याचें वर्णन उत्तम आहे. गणपतरावाचे मित्र नाना, विष्णुपंत, रघुनाथराव, बळवंतराव हे विचारांनीं गणपतरावासारखेच आहेत, समाजोन्नति हेंच या सर्वांचें ध्येय असून ते सर्वजण कर्ते सुधारक होते. 'भयंकर दिव्यां'-

तील पद्माकराचे वडील दादासाहेब पुराणमताभिमानी असले तरी त्यांचा करारी-पणा, दृढ निश्चय पाहून त्यांच्याबद्दल आदर वाटतो. त्यांची सुशील सद्‌गुणी सून कमला हिनें आजारीपणांत त्यांची एकनिष्ठपणें सेवा करून त्यांच्या अन्तःकरणांत परिवर्तन घडवून आणलें. जिच्याप्रीत्यर्थ त्यांनीं पद्माकराचें नांव टाकलें होतें, तिची वाखाणणी करून तिचा त्याग केल्याबद्दल आपल्या मुलाचीच निर्भर्त्सना करणारे दादासाहेब पद्माकरापेक्षां किती तरी श्रेष्ठ आहेत !

ज्यांना जगाच्या कुटाळक्या करण्यावांचून दुसरा धंदा नाहीं, अशीं पात्रें म्हणजे ' भयंकर दिव्या 'मधील सदुनाना, ' मायेच्या बाजारां 'तील दिगंबरपंत व कृष्णाजीपंत दादा व ' कर्मयोगां 'तील भाऊसाहेब हीं होत. हे सारेच जण स्वतःस जुन्याचे अभिमानी म्हणवितात व स्त्रियांची व नवीन सुधारणांची निंदा करण्यांत मोक्ष मानतात. सज्जनांस त्रास देणें हेंच यांचें ब्रीद! लष्करच्या भाकरी भाजल्या-शिवाय त्यांना चैन पडत नाहीं! कुणाची स्तुति म्हणून त्यांना सहन होत नाहीं, कीं कोणाचें चांगलें पाहवत नाहीं! त्यांच्या पोकळ विद्वत्तेच्या गप्पा मात्र ऐकून घ्याव्या. आपलें काम साधून घेण्यासाठीं त्यांनीं केलेल्या खुषामती पाहण्यासारख्या आहेत! हे घमंडानंदन पाहून कपाळावर आंठ्याच उभ्या राहतात. धर्माभिमानाचा खोटा आव आणणारे हे ढोंगी नवीन सुधारणेपासून अलिप्त असतात, असें मात्र कोणीं समजूं नये. स्वतःच्या स्वार्थासाठीं केव्हां केव्हां आपल्या सुधारकीपणाच्या गोष्टी सांगण्यांत ते धन्यता मानतात. असलीं कुटाळ विघ्नसंतोषी पात्रें रेखाटून आपाततः हरिभाऊंनीं विनोद उत्पन्न केला आहे.

' यशवंतराव खरे 'मधील रावबहादूर आडमुठे व त्यांची खुशामत करणारे शास्त्री-बुवा ही जोडीही और आहे. रावबहादूर म्हणजे आत्मप्रौढी व उन्मत्तपणा यांची मूर्तिच होय. त्यांच्या म्हणण्यास माना डोलविणाऱ्या शास्त्रीबुवांचा लाळघोटेपणा पाहून चीड येते.

' जग हें असें आहे ' यांतील बुलीस्नीक साहेब व बाबू मृत्तिकाभूषण ही जोडी-बरच्यासारखीच आहे! साहेब बुटांच्या लाथा मारीत असतांही बाबूजींचें चाल-लेलें अस्खलित इंग्रजी पांडित्य पाहून हंसूं लोटतें !

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील कलिपुरुष म्हणजे ' मधल्या स्थिती 'तील गोविंद-राव चकणे, ' पण लक्षांत कोण घेतो ' यामधील शंकरमामंजी, ' जग हें असें

आहे ' यांतील चिन्तोपन्त, 'भयंकर दिव्यां'तील राजाराम, 'मायेच्या बाजारां'तील पद्मेचा नवरा अण्णासाहेब व 'कर्मयोगां'तील विक्रमशील हे होत. कादंबरी कंटाळवाणी होऊं नये म्हणून विनोदी प्रसंग व पात्रें कादंबरीकार मधून मधून घालतात तर कलि-पुरुषाच्या कर्तबगारीवरच बव्हंशीं कथानक अवलंबून असतें. त्यामुळें कथानायकाच्या स्वभावाचा परिपोष करण्यांत कादंबरीकारास जितकें कौशल्य लागतें त्याच्या कितीतरी पट अधिक कौशल्य कलिपुरुषाची भूमिका रंगवितांना त्यास लागतें. नायकाच्या मार्गांत हरतऱ्हा करून विघ्नें आणण्याची कामगिरी कलिपुरुषाकडे असते! मनुष्य कितीही दुष्ट असला तरी त्याच्या हृदयांतील देवाचा अंश नाहींसा होत नाहीं व त्यामुळेंच अनेक लोकांचा त्यानें छळ केला, शेंकडों अनन्वित भयंकर दुष्कृत्यें केलीं तरी, केव्हां तरी, क्षणभरच कां होईना, सद्विचार त्याच्या मनांत येतो व आपण निष्पाप माणसांना छळलें असा अनुतापहि त्यास होतो. अशा तऱ्हेचा पश्चात्ताप बहुधा त्याचीं दुष्कृत्यें उघडकीस येऊन जेव्हां त्याची फजिती होते तेव्हांच होतो. या जगांत जसा पूर्णपणें दोषरहित तसाच सर्वस्वीं दोषपूर्ण दुर्गुणी मानव आढळणें अशक्य आहे. कांहीं कादंबरीकार कलिपुरुषास दुर्गुणांचे पुतळे तर कथानायकास सद्गुणांच्या मूर्ति बनवितात. अर्थात् अशा स्वभावचित्रांत कलेचा अंशही नसतो. या दृष्टीनें पाहिलें असतां शंकरमामंजी, चिन्तोपंत व विक्रमशील हीं पात्रें दुष्ट असलीं तरी या जगांतीलच आहेत असें वाटतें. तत्कालीन भिक्षुक म्हणजे शंकरमामंजींचेच अवतार होत व अशा तऱ्हेच्या व्यक्ति त्या वेळच्या पुण्यांत अजब नव्हत्या. चिन्तोपंत दुष्ट असला तरी बायकोच्या नादानें जास्त बिघडलेला आहे. बनावट मृत्युपत्राच्या बद्दल त्याच्या मनाला केव्हां केव्हां रुखरुख लागलेली दिसते. विक्रमशील अत्यंत दुष्ट, घातकी आहे, परंतु नर्मदेस फसवितांना त्यालाही केव्हां केव्हां अनुताप होतो. परंतु गोविंदराव, अण्णासाहेब व राजाराम हे मानवकोटींतील वाटत नाहींत. त्यांच्या भयंकर कृत्यांनीं हृदय थरारून जाऊन ते पृथ्वीवरील राक्षसच वाटतात; सद्विचार, पश्चात्ताप त्यांना क्षणमात्रही स्पर्श करीत नाहींत. हे मात्र खरेखुरे पाषाणहृदयी, निर्विकार कलिपुरुष आहेत.

काकूबाई, ठमाबाई ( मधली स्थिति ), रखमाबाई, सीताबाई ( गणपतराव ), माईसाहेब, वहिनी, ( पण लक्षांत कोण घेतो ), सखुबाई, सोनी ( यशवंतराव ), सरस्वती ( जग हें असें आहे ) इत्यादि पात्रें दुष्ट व अशिक्षित आहेत. शिक्षण

नसल्यामुळें त्यांचीं मनें अत्यंत संकुचित व विचार अनुदार बनले आहेत. त्यांचा कजागपणा, जहांबाजपणा व स्वार्थीपणा पाहून त्यांच्याबद्दल तिरस्कार वाटतो. परंतु जात्याच सद्गुणी स्त्रिया अशिक्षित असूनही सज्जनच असतात. त्यांची सहनशीलता व प्रेमळपणा संकटें आलीं असतांही नष्ट होत नाहींत. अशा साध्वी सुशील स्त्रियांत सरस्वती, अंबुताई, जानकीबाई ( मधली स्थिति ), गोपिकाबाई, यमुनेची आई, उमासासूबाई, यमुनेची सासू ( पण लक्षांत कोण घेतो ), राधाबाई ( जग हें असें आहे ), माईसाहेब, गंगाबाई ( यशवंतराव ), भाऊची आई ( मी ) यांची गणना होईल.

परंतु थोड्याफार शिक्षणानें ज्यांचीं मनें सुसंस्कृत झालीं आहेत, अशा स्त्रिया म्हटल्या म्हणजे लक्ष्मीबाई (गणपतराव), यशोदाबाई, यमुना (पण लक्षांत कोण घेतो ), ताई, सुंदरी (मी ), मालति, पद्मा व मथुराताई (मायेचा बाजार ), कमला, द्वारकाताई ( भयंकर दिव्य ), सरस्वतीबाई व लिली ( कर्मयोग ) या होत. स्थलसंकोचास्तव या सर्वांचा परामर्श घेणें अशक्य आहे. तथापि यांतील अत्युत्कृष्ट पात्रांचाच फक्त विचार करूं.

स्त्रियांचें जीवित सर्वस्वीं पतीवर अवलंबून असल्यानें त्यांना चांगलें अथवा वाईट बनविणें हें बव्हंशीं त्यांच्या पतीच्याच हातीं असतें. पाश्चात्य शिक्षणपद्धति सुरू झाल्यावर पुरुष विश्वविद्यालयाचे पदवीधर होऊन त्यांच्या आचारविचारांत विलक्षण क्रांति झाली. परंतु स्त्रिया मात्र जशाच्या तशाच राहिल्यामुळें विषम जोडपीं समाजांत दिसूं लागलीं व त्यामुळें गृहसौख्याचें रमणीयत्व किती तरी पटीनें कमी झालें. स्त्रियांना शिक्षण नसल्यानें त्यांना पुरुषांचे विचार, कल्पना व आकांक्षा समजून घेणें अशक्य होऊन पुरुषांच्या जीवनांतील त्यांचें वर्चस्व साहजिक नष्ट झालें. गृहसौख्य हाच देशोन्नतीचा पाया असल्यानें तेंच न लाभल्यामुळें पुरुषवर्गांत एक प्रकारचें असमाधान उत्पन्न झालें. घरांत राबावें, मुलांचें संगोपन करावें, यांपलीकडे स्त्रियांच्या कर्तव्याची मजल जात नव्हती. परंतु स्त्रियांच्या उन्नतीवरच समाजाचें व देशाचें भवितव्य सर्वस्वीं अवलंबून आहे हें जाणून कांहीं सुशिक्षित, सुसंस्कृत तरुणांनीं आपल्या पत्नीस स्वतःच शिक्षण देण्यास सुरुवात करून बदललेल्या परिस्थितींत त्यांस शक्य तितकें कार्यक्षम करण्याचा प्रयत्न केला. सर्व बाबतींत आपण पतीची खरीखुरी सहधर्मचारिणी झालें पाहिजे म्हणून अतिशय हौसेनें व उत्सुकतेनें शिक्षण

घेऊन नव्या सुधारणांचा ज्यांनीं स्वीकार केला, त्यांमध्यें लक्ष्मीबाई, यशोदाबाई, यमुना या प्रमुख होत. त्यांनी जुन्या संस्कृतीस चिकटून राहून नव्यांतील उत्तमोत्तम गोष्टींचाच अंगिकार केला. लिहिणें-वाचणें, सभेस जाणें, फिरावयास जाणें, शिवणें-टिपणें इत्यादि नवीन गोष्टी त्यांनीं घेतल्या खऱ्या; परंतु गृहकृत्यांतील त्यांची टापटीप व प्रावीण्य वाखाणण्याजोगें आहे. भलती मर्यादा सोडून देऊन पतीच्या मित्रांशीं त्या मोकळेपणानें वागतात. परंतु वडील स्त्रियांचा आदर राखण्यासही त्या तितक्याच तत्पर असतात. अशा सुशील, सद्गुणी, विनयशील गृहदेवता असल्यावर सौख्यास काय तोटा असणार?

ताई व सुंदरी हीं दोन्ही पात्रें तत्कालीन समाजांत न आढळण्यासारखीं असलीं तरी हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील सर्व पात्रांत ताई व सुंदरी या दोघी मैत्रिणींच्या भिन्न भिन्न स्वभावदर्शनानें दोन्हीही चित्रें अत्यंत आकर्षक झालीं आहेत. प्रतिकूल परिस्थितीमुळें प्रेमळ व कोमल मनाच्या ताईचें कर्तव्यकठोर, बाणेदार, अभिमानी व तेजस्वी स्त्रीमध्यें रूपांतर झालें. लहानपणीं आईच्या काचानें व तरुणपणीं नवऱ्यानें केलेल्या असह्य छळानें व अपमानानें तिचें सारें स्वत्व जागृत होऊन चवताळलेल्या शूर सिंहिणीसारखी तिची स्थिति झाली. भावानंदाचा आत्मत्याग व धैर्य दोन्हीही तिच्या अंगी आहेत. तिची निर्भय व स्वतंत्र वृत्ति पाहून कौतुक वाटतें. ताईचें चित्र रेखाटून हरिभाऊंनीं एक आदर्श समाजसेविका वाचकांच्या समोर उभी केली आहे. परंतु सुंदरी मात्र ताईच्या उलट आहे. प्रेमळ आईबापांच्या प्रेमछत्राखालीं वाढलेली ही प्रेमलतिका अत्यंत नाजुक व सुंदर आहे. जगाचे तीव्र आघात सहन करण्याचें सामर्थ्य तिच्यांत नाहीं. सुंदर वेलीला वृक्षाच्या आधारावांचून जगणें शक्य नसतें तशीच सुंदरीचीही स्थिति आहे. भाऊरावाशीं तिचा विवाह झाला असता, तर तिच्या अंगच्या नैसर्गिक गुणांचा विकास झाला असता! परंतु भावानंदाच्या संन्यासानें तिच्या गुणांचा विकास होण्यास वावच सांपडला नाहीं. ताईचें तेज प्रखर, डोळ्यांस सहन न होण्यासारखें आहे, तर सुंदरीचें तेज चंद्रिकेप्रमाणें शीतल व शांत आहे. श्रीरामचंद्रानें अखेरीस त्याग केल्यानंतर रघुकुलाची मंगलदेवता जशी तपस्विनी झाली त्याप्रमाणें परिस्थितीमुळें गृहदेवता होण्याचा मान न लाभल्यामुळें कोमल मनाच्या सुंदरीनेंही तपश्चर्येचा खडतर मार्ग स्वीकारला. तिची ती विरक्त, शांत, करुण तपोमूर्ति वाचकांस मोहित करून सोडते.

हरिभाऊंनीं निर्माण केलेल्या सर्व स्त्रियांत ताई व सुंदरी या अत्यंत उच्च दर्जाच्या आहेत. ताई धैर्यानें देशसेवेचें व्रत अंगिकारते तर सुंदरी आजन्म ब्रह्मचारिणी राहून ताईच्या बरोबरीनें देशकार्य करिते. सुशील, सुसंस्कृत व स्वतंत्र विचारानें आपल्या इष्ट ध्येयाच्या सिद्धीसाठीं आयुष्य वेंचणाऱ्या या स्त्रिया निर्माण करून हरिभाऊंनीं समाजोन्नतीचा खरा मार्ग दाखविला.

पद्मा तर केवळ दुःखमूर्ति आहे. पैशाच्या लोभानें तिच्या पतीनें तिचा अतोनात छळ केला व शेवटीं झिजून झिजून तिचा अंत झाला. या सद्गुणी मुलीचा असा हृदयद्रावक अंत झालेला पाहून अत्यंत वाईट वाटतें. दुष्ट व अयोग्य मनुष्याशीं जन्माची गांठ बांधली गेल्यामुळें तिच्या जन्माचें मातेरें झालें. तिची न्यायप्रियता, निःस्वार्थीपणा व सहनशीलता अप्रतिम आहेत.

कर्मयोगांतील चंद्रशेखराची मामेबहीण लिली हें पात्रही आधुनिक सुशिक्षित मुलीचें चित्र या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. ही मुलगी आपली छाप जगावर ठेवणार, जगाला हंसून हंसून ती त्यांत सुधारणा करणार इत्यादि भविष्य स्वामी अखंडानंद तिच्याबद्दल वर्तवितात. ताईच्या संस्थेस आयुष्य वाहण्याचे तिचे विचार चालू असतात. तिच्या स्वभावांत विनोद व गांभीर्य यांचें उत्कृष्ट मिश्रण आहे. ही कादंबरी अपूर्ण असल्यानें लिली खरोखर काय करते हें कळण्यास मार्ग नाहीं. परंतु ही कादंबरी पूर्ण झाली असती तर लिलीचें पात्र अत्यंत हृदयंगम झालें असतें यांत शंका नाहीं.

'माझ्या कादंबऱ्यांत एकही पात्र असें नाहीं कीं, जें व्यवहारांत मीं प्रत्यक्ष पाहिलें नाहीं' हे हरिभाऊंनीं काढलेले उद्गार मननीय आहेत. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांतील बहुतेक प्रसंग व पात्रें सत्यसृष्टींतीलच आहेत. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत उमटलेले सत्यसृष्टींतील निरनिराळ्या पात्रांचे व प्रसंगांचे पडसाद शोधून काढणें अगत्याचें आहे. 'मधल्या स्थितीं'तील विनायकराव व गोविंदराव चकणे हीं वास्तविक पात्रें असून त्याचप्रमाणें डॉ. मुंगळे, अनंतराव, गोपाळराव इत्यादि मंडळींच्या मदिराक्लबाचें वर्णनही खरेंच आहे. त्यांतील हर्षनिधान थिएटर म्हणजे विजयानंद नाटकगृह व रामभाऊ एडिटरांचें 'शंखध्वनि' वर्तमानपत्र म्हणजे पुण्याचें प्रसिद्ध 'पुणें-वैभव' वर्तमानपत्रच होय. 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरींतील यमुनेची प्रतिकृति हरिभाऊंच्या दृष्टीसमोर होती. जानवेकरांच्या वाड्यांत हरिभाऊ

रहात असतां या मुलीस होणारा जाच त्यांच्या दृष्टीस पडला होता. या मुलीस दुर्दैवेंकरून वैधव्य प्राप्त झालें व यमुनेप्रमाणेंच तिच्या सासरच्या मंडळींनीं तिजवर केशवपनाचा दुर्धर प्रसंग तिची इच्छा नसतां गुदरविला. त्याचप्रमाणें शंकरमामंजींच्या गर्भाधानास ब्राह्मण मिळेनात म्हणून त्यानें यमुनेवर नीचपणानें भयंकर प्रसंग आणला ही कल्पनाही खऱ्या जगांतील अशाच एका प्रसंगावरून त्यांना सुचली. शंकरमामंजी हें पात्र त्यांस परिचित अशा दोन पुरुषांचें मिश्रणच आहे. यमुनेच्या आजोळसासरची मंडळी व त्यांची वागण्याची पद्धति हीं सुद्धां त्यांच्या भोंवतालच्या मंडळींचींच चित्रें होतीं.

'गणपतराव' म्हणजे खुद्द हरिभाऊंचेंच स्वभावचित्र होय. विष्णुपंत व लक्ष्मीबाई यांच्या गृहसौख्याचें चित्र हरिभाऊंनीं रावसाहेब गोविंदराव कानिटकर व त्यांच्या सुशिक्षित पत्नी काशीताई यांच्यावरूनच घेतलें असावें.

'मी'मधील भाऊचें लहानपण, त्याच्या खोड्या, शाळेंतून घरीं आलें म्हणजे 'भूक भूक' करीत दारावर चढून उभें राहण्याचा परिपाठ, पुस्तकाची अवजड पोतडी व त्यांतील अगणित वस्तु, त्याचा हट्टीपणा, वाचनाची विलक्षण गोडी इत्यादि इत्यादि गोष्टी निःसंशय हरिभाऊंच्या स्वतःच्या अनुभवाच्याच आहेत. भावानंदाच्या ध्येयवादांत हरिभाऊंच्या विचारांची छटा स्पष्ट उमटलेली आहे.

'यशवंतराव खरे' या कादंबरींतील यशवंतरावाचे गुरु श्रीधरपंत हे कै. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांचेंच चित्र असावेंसें दिसतें. श्रीधरपंतांचा विद्याव्यासंग, ऐतिहासिक विषयांची आवड, त्यांचीं सामाजिक व राजकीय मतें, त्यांचा टीकाखोरपणा व स्तुतीची आवड, त्यांच्या भोंवतालीं जमणारी खुषामती मंडळी, त्यांचें 'खुबीदार रेंकणें'युक्त भाषण, त्यांचे अंतर्भेदी नेत्र, त्यांचा दुराग्रह, रावबहादुरांवर त्यांचे ताशेरे, लहान विद्यार्थ्यांसमोर थोर लोकांवर टीका करण्याची संवय इत्यादि इत्यादि गोष्टींवरून श्रीधरपंत व विष्णुशास्त्री यांच्यांतील साम्य वाचकांच्या ध्यानीं येईल. विष्णुशास्त्री वर्गांत विद्यार्थ्यांच्या समोर हेडमास्तरांची निंदा करीत, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. 'Tell me the name of that great author of उजळणी ?' असा प्रश्न विद्यार्थ्यांना करून शिक्षणखात्यांतील एका अधिकाऱ्याची ते खूप चेष्टा करीत असत असें त्यांचे विद्यार्थी सांगतात. या व इतर बारीक सारीक गोष्टींवरून वरील अनुमान चुकीचें ठरणार नाहीं असें वाटतें.

## हरि नारायण आपटे

'आजच' या कादंबरींतील यशवंतरावाच्या विचारांचें, आयुष्क्रमाचें व ध्येयाचें परीक्षण केलें असतां या पात्राचें स्वभावचित्र रेखाटतांना लोकमान्य टिळकांची मूर्ति हरिभाऊंच्या समोर असावी असा भास होतो. यशवंतरावाचे देशोन्नतीसंबंधीं विचार, त्याचें वर्तमानपत्र, त्याची समाजसुधारकांवरील टीका व विरोध, 'तुझें सगळें आयुष्य दुसऱ्याला नांवें ठेवण्यांत गेलें' हे त्याविषयींचे कृष्णरावाचे उद्गार व 'माझ्या नांवें ठेवण्यांत कांहीं तरी सद्धेतु असतो,' हें त्यावरील यशवंतरावाचें उत्तर, त्याचा निर्भीड स्पष्टवक्तेपणा, व नारायणरावानें 'विभूति' या नांवानें त्याचा केलेला निर्देश पाहून यशवंतराव व लोकमान्य टिळक या दोन व्यक्तींमध्यें पुष्कळसें साम्य वाटतें.

नारायणरावाचे बेफाम विचार तत्कालीन तरुण व ज्वलज्जहाल गृहस्थांच्या विचारांचा प्रतिध्वनीच होत. गणपतराव प्रागतिक, यशवंतराव जहाल तर नारायणराव ज्वलज्जहाल अराजक पंथाचा दिसतो. कृष्णरावाची उद्योगधंदे वाढविण्याची हौस कै. नामजोशी यांचें स्मरण करून देते. श्रीधरपंताची पत्नी सत्यभामाबाई म्हणजे खरोखर त्राटिकेचाच अवतार! आपल्या एका नातेवाईक स्त्रीच्या स्वभावावरून हरिभाऊंनीं सत्यभामाबाईचें चित्र रंगविलें. रावबहादुर आडमुठ्यांचे खुषमस्करे शास्त्रीबुवा यांची प्रत्येक वाक्याच्या आरंभीं 'आतां हें पहा' असें म्हणण्याची लकब हरिभाऊंनीं आपल्या एका मित्राच्या संवयीवरूनच घेतली. कर्मयोगांतील भाऊसाहेब म्हणजे एक पेन्शनर हेडमास्तरच होत. हे गृहस्थही जुन्याचा अति अभिमान दाखवीत व स्वतःस प्रति बृहस्पतीच समजत!

'आजच'मधील स्वामी अद्वैतानंद यांचे धार्मिक विचार व देशोन्नतीचे प्रयत्न स्वामी विवेकानंद यांच्यासारखे वाटतात. शिकागो येथील धर्मपरिषदेस अमेरिकेंत जाण्यापूर्वी स्वामी विवेकानंद पुण्यास आले होते, तेव्हां ते आनंदाश्रमांतही गेले होते असें म्हणतात. हरिभाऊंना त्यांच्याबद्दल विशेष आदर होता. अद्वैतानंदानें पुढें काय केलें हें कादंबरी अपूर्ण असल्यामुळें समजत नाहीं, परंतु स्वामी विवेकानंदांनीं मात्र 'रामकृष्ण मिशन' या संस्थेची स्थापना केली व तिच्या ब्याण्णव शाखा जगभर पसरलेल्या आहेत.

कर्मयोगांतील चंद्री म्हणजे हरिभाऊंची लाडकी कन्या शांताताईच होय. चंद्रशेखराचे व चंद्रीचे संवाद म्हणजे हरिभाऊ व ताई यांच्यामधील प्रत्यक्ष घडलेले संवादच होत. ताईची हुषारी, चाणाक्षपणा, प्रेमळपणा, तिचा गडबड्या स्वभाव

व तिचें थोरासही लाजविणारें शहाणपण यांचें स्मारक चंद्रीच्या रूपांत त्यांनीं कायमचें करून ठेविलें आहे.

चंद्रशेखराचे प्रिन्सिपॉल डेक्कन कॉलेजच्या बेनसाहेबांचें स्मरण करून देतात. ‘जग हें असें आहे’ यांतील फेअरब्रेन साहेब, बुलीस्नीक, सिस्टर चॅरिटी हीं पात्रें व शर्यतीच्या मैदानावरील अपघाताचा प्रसंग खराच आहे. ‘भयंकर दिव्यां’तील The Bombay Big Bubble Banking Bureau व सत्यसृष्टींतील बॉंबे बँकिंग कंपनी अथवा स्पीसी बँक यांचें साम्य लक्षांत येण्याजोगें आहे. ‘मायेच्या बाजारां’तील अण्णासाहेब म्हणजे पुण्यांतील एका प्रसिद्ध गृहस्थांचा एम्. ए., एल्‌एल्. बी., झालेला मुलगा होय. याची बायको पद्मेसारखीच एकुलती एक मुलगी होती. बायकोनें माहेरून पैसे आणले नाहींत कीं हा नराधम तिला पायाखालीं तुडवीत असे व केव्हां केव्हां चार चार दिवस कोंडूनही ठेवी !

वरील विवेचनावरून हरिभाऊंनीं खऱ्या सृष्टींतील व्यक्ति कादंबरींत जशाच्या तशाच रंगविल्या असें मानणें असमंजसपणाचें होईल. जगांतील खऱ्या मनुष्यांचीं स्वभावचित्रें योग्य तो फेरफार करूनच त्यांनीं कौशल्यानें रेखाटलीं. आपल्या आयुष्यांतील स्वानुभवांच्या व्यक्तींचा व प्रसंगांचा उपयोग करून त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें मनुष्य-स्वभावाचे सुंदर नानाविध मासले वाचकांच्या समोर उभे केले. मनुष्यें जगांतलींच असलीं तरी त्यांना घडविण्याची कुशल कारागिरी हरिभाऊंचीच आहे.

केवळ विनोदाकरितां म्हणून कित्येक कादंबऱ्यांत व नाटकांत निरर्थक पात्रें कांहीं लेखक घालतात. हरिभाऊंनीं असें ओढूनताणून कोणतेंच विनोदी पात्र निर्माण केलें नाहीं. हरिभाऊंचा विनोद शाब्दिक कोट्यांवर अवलंबून नसून प्रसंगाच्या रचनेवर व पात्रांच्या स्वभाववैचित्र्यावर अवलंबून आहे. स्विफ्टनें आपल्या ‘गलिव्हरच्या सफरी’ लिहून मानवजातीविषयींचा आपला तिरस्कार व बेपर्वाई प्रकट केली आहे. त्याचा विनोद त्यामुळें अत्यंत खोंचदार व झोंबणारा आहे. परंतु मनुष्यस्वभावांतील दोषांचें सहानुभूतीनें दिग्दर्शन करून विनोद उत्पन्न करण्याचें हरिभाऊंचें ध्येय दिसतें. स्विफ्ट विनोदी बोलतो. परंतु त्याच्या चेहऱ्यावरचें गांभीर्य क्षणमात्रही लोपत नाहीं. हरिभाऊ विनोदी प्रसंग रंगवितांना आपल्याशींच गालांतल्या गालांत हंसतात. त्यामुळें त्यांचा विनोद सूक्ष्म, सहानु-

भूतिपूर्ण व न बोंचणारा असा उतरला आहे. गणपतरावाचा धांदल्या, उतावळा स्वभाव, सर्व सामाजिक सुधारणा एकदम व्हाव्यात याबद्दलची त्याची आत्यंतिक उत्सुकता, मिलच्या *Subjection of Women* वर हात ठेवून त्यानें घेतलेली शपथ, आपल्या पत्नीचें वेडेंवांकडें, सत्रा डागांनीं व वांकड्यातिकड्या ओळींनीं भरलेलें अशुद्ध पत्र वाचून त्याला आलेलें प्रेमाचें भरतें पाहून अतिशय मौज वाटते. ‘ पण लक्षांत कोण घेतो ’ मधील शंकरमामंजींचा फाजील धर्माभिमान, त्यांचे भस्माचे पट्टे, जपजाप्य, देवपूजा, त्यांची आपल्या गरीब पत्नीशीं वागणूक व व्यसनासक्ति पाहून केव्हां हंसू येतें, तर केव्हां चीड येते. ‘ मायेच्या बाजारां ’तील दिगंबरपंत हा शंकरमामंजींचाच दुसरा अवतार आहे. हा गृहस्थ स्वतःच्या पत्नीस तर छळतोच, परंतु गरीब बिचाऱ्या मथुराताईच्या मागें हात धुवून लागतो. शंकरमामंजींची गटारयंत्रावरची सभा व दिगंबरपंताचा मारुतीच्या पारावरील अड्डा यांतही बरेंच साम्य आहे. त्याच कादंबरींतील रावसाहेब गिरिधरपंत यांच्याकडील चहाचा वस्तुपाठ, पत्तेपिटी, मोरमास्तरांचा लाळघोटेपणा, रावसाहेबांची हाताखालच्या मास्तरांशीं वागण्याची पद्धति, वहिनीबाईचा मोरमास्तर, दिगंबरपंत यांसारख्या कुटाळांबद्दलचा तिरस्कार वगैरे गोष्टी पाहून करमणूक होते. कृष्णाजीपंतदादांच्या सहाव्या लग्नाचें ‘ शुभमंगल सावधान ’ चालू असतां ‘ तुमच्या बायकोचा गेला प्राण ’ असें एका गृहस्थानें येऊन मोठ्यानें ओरडणें व पांचव्या पत्नीच्या मृत्यूची बातमी येऊन सांगणें या गोष्टीनें अनिवार हंसू लोटतें. ‘ भयंकर दिव्यां ’तील सदुनानामध्यें दुष्टपणाचा भाव नाहीं. फक्त सुधारकांची निंदा करण्याची व स्वतःच्या सोंवळेपणाचा टेंभा मिरविण्याची त्याला हौस वाटे. सुधारकाच्या घरचें पाणी त्यास चालत नाहीं, मात्र सोडावॉटर चालतें. ‘ यशवंतराव खरे ’ यामधील श्रीधरपंत व सत्यभामाबाई यांचे संवाद विनोदानें भरलेले आहेत. ते कितीदां जरी वाचले तरी कंटाळा येत नाहीं. रावबहादुर आडमुठे व शास्त्रीबुवा यांचीं संभाषणें वाचकांची करमणूक करतील तर मथीच्या लग्नाचा फार्स व रावबहादुरांनीं व्याह्यांची केलेली फसवणूक पाहून वाचकांची हंसून हंसून मुरकुंडी वळेल.

‘ भयंकर दिव्यां ’तील प्रो. डॅन्डी, सोन्याबापू, सदुनानांचे जांवई काकासाहेब व गुंडंभट हीं पात्रेंही हरिभाऊंच्या विनोदाची चांगलीच कल्पना देतात. ‘ कर्मयोगां ’तील भाऊसाहेब, त्यांचा ऑर्थोडॉक्सीचा अभिमान, त्यांचा चिकट स्वभाव, त्यांचे व

पण्डिताबाईचे संवाद, त्यांचे शिष्य विक्रमशीलराव यांचा गुरुबद्दलचा आदर इत्यादि गोष्टी चटकदार व हास्यरसाचा परिपोष करणाऱ्या आहेत.

श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व कै. गडकरी यांच्याप्रमाणें हरिभाऊंनीं पावलों-पावलीं शाब्दिक कोट्या केल्या नाहींत, तरीही विनोदी लेखक या दृष्टीनें त्यांचा दर्जा उच्च आहे. त्यांचा विनोद पात्रांच्या नैसर्गिक गुणदोषांमुळें स्वाभाविकपणें उत्पन्न होत असल्यामुळें हृदयंगम वाटतो.

गुलाबाच्या रोपाला गुलाब येऊन त्याच्या कोमल परिमलानें आसमंतांतील प्रदेश जसा दरवळून जातो, त्याचप्रमाणें यथार्थवादाच्या (Realism) बीजांतून हरिभाऊंचा मनोवेधक ध्येयवाद स्वभावतःच निर्माण झाला आहे व त्याच्या दर्शनानें मन साहजिकच उल्हसित होतें. प्रत्येक कादंबरींत तत्कालीन समाजाचें हुबेहूब चित्र रंगवून त्यांनीं समाजांतील दोष बहुजनसमाजाच्या निदर्शनास आणले व त्यापुढें पांचसात पावलें टाकून हे दोष नष्ट करण्याचे मार्ग सूचित केले; एवढेंच नव्हे, तर सुधारलेल्या समाजाचें मनोहर ध्येयचित्र रेखाटलें. त्यांनीं केलेलें मार्गदर्शकाचें/कार्य त्यांच्या बुद्धिमत्तेचें द्योतक आहे. त्यांनीं थोड्याशा परिश्रमानें प्राप्त होणारींच ध्येयें समाजापुढें मांडलीं व सांप्रतच्या समाजस्थितीचें निरीक्षण केलें असतां हरिभाऊंची ध्येयसृष्टीच आपल्या सभोंवतालीं वावरत आहे असें आपणांस आढळून येईल. चंद्रकोर सुंदर असते, परंतु तिला हस्तगत करण्याचें ध्येय कोणी समोर ठेविल्यास दुष्प्राप्य ध्येय मनांत धरल्याबद्दल जगांत त्याचें हंसें मात्र होईल. परंतु हरिभाऊंनीं असल्या दुर्लभ गोष्टी बहुजनसमाजापुढें न ठेवितां, थोड्याशा प्रयत्नांनीं सुसाध्य अशाच गोष्टी त्याजपुढें मांडल्या. विष्णुपंतांची पत्नी लक्ष्मीबाई जशी गृहकृत्यांत प्रवीण, तशीच मोठी विदुषीही आहे. जुन्या व नव्या संस्कृतींचा मनोहर संगम तिच्या ठिकाणीं झालेला दिसतो. आपल्या सुशिक्षित पतीशीं सर्व कार्यांत सहकार्य करणारी, विनय-शील, प्रेमळ, हास्यमूर्ति लक्ष्मीबाई साक्षात् महालक्ष्मीच भासते. वडील मंडळींचा आदर राखणारी व दुसऱ्यांस हौसेनें साहाय्य करणारी लक्ष्मीबाई खरोखरच आदर्श गृहिणी आहे.

‘ जग हें असें आहे ’ यांतील राधाबाई दारिद्र्यावस्थेंत राहूनही तिच्या अंतः-करणाची उदारता, तिचा बाणेदारपणा अणुभरही कमी होत नाहीं. तिचें पातिव्रत्य, सहनशीलता, क्षमाशीलता, स्वाभिमान व मातृप्रेम हीं अनुपम आहेत. ती खरोखर

भूलोकची देवीच असून तिच्याबद्दल वाचकांसही अत्यंत आदर वाटतो. सखारामाच्या मृत्यूच्या प्रसंगीं राधाबाईच्या शोकाचें कादंबरीकारानें केलेलें वर्णन अत्यंत हृदयंगम आहे. राधाबाईचें अंतःकरण मातृप्रेमानें ओथंबलेलें आहे. राधाबाई ही खरोखर एक आदर्श मातृदेवताच होय.

सुशील राधाबाई व सिस्टर चॅरिटी यांची कादंबरीकारानें केलेली तुलना मार्मिक व मनोहर आहे. सिस्टर चॅरिटीचें विश्वविशाल हृदय विश्वप्रेमानें भरलेलें होतें. त्या दोन्हीही मूर्ति एकाच सत्वाच्या होत्या. परंतु सिस्टर चॅरिटीनें 'आत्म' या शब्दाचा त्याग करून 'विश्व' हा शब्द धरला होता. सिस्टर चॅरिटी प्रत्यक्ष दयेची देवीच वाटते.

भावानंदाची भगिनी ताई हिनें तर आपलें सर्व आयुष्य गरिबांच्या सेवेंत खर्च केलें. तिचें धैर्य, करारीपणा, उदात्तता, सहनशीलता, प्रेमळपणा, गरिबांविषयींची कळकळ, शांतपणा वाखाणण्यासारखा आहे. ताई म्हणजे हिंदुसमाजांतील आदर्श समाजसेविकाच होय.

'देशाचें चिरकालिक हित हाच परमार्थ; देशाची पारतंत्र्यांतून सुटका हाच मोक्ष' असें मानणारा सर्वसंगपरित्यागी महात्मा भावानंद हाच हरिभाऊंच्या मतें आदर्श देशसेवक आहे.

'कर्मयोगां'तील स्वामी अखंडानंद यांचे विचार उदात्त, अंतःकरण शुद्ध व आचरण सोज्ज्वळ आहे. त्यांच्यांत दंभ, ढोंग यांचा अंशही नाहीं. त्यांची कर्मश्रद्धा धर्मश्रद्धेनें युक्त आहे. दरिद्र-नारायणाची सेवा करणें हाच त्यांचा धर्म. तरुणांत कर्तव्यजागृति व धर्मजागृति करण्याचें कार्य त्यांनीं आरंभिलें होतें. त्यांच्या गुरूच्या आज्ञेप्रमाणें भरतभूमीच्या उद्धारार्थ त्यांनीं आपलें आयुष्य वेंचलें. स्वामी अखंडानंद यांचें चित्र रेखाटून हरिभाऊंनीं आदर्श संन्यासी जगापुढें उभा केला.

'भयंकर दिव्यां'तील प्रभाकर म्हणजे अकृत्रिम स्नेहाची मूर्ति आहे. पद्माकरानें त्याजबद्दल नाहीं नाहीं ते संशय घेतले, परंतु प्रभाकराच्या वागण्यांत किंचितही फरक झाला नाहीं! वाटेल त्या प्रतिकूल परिस्थितींत टिकणारी मैत्री चिरकालिक स्वरूपाची नाहीं असें कोण म्हणेल!

हरिभाऊंचा ध्येयवाद ( Idealism ) पोकळ, क्रियाशून्य नाहीं; मरीब, क्रियावान् ( Practical ) आहे. आदर्श गृहिणी, आदर्श माता, आदर्श समाज-

सेविका, आदर्श देशसेवक, आदर्श संन्यासी, आदर्श मित्र यांचीं त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांत सुंदर चित्रें रंगविलीं. 'मी'मधील शिवरामपंत म्हणजे खरोखरच आदर्श गृहस्थ आहेत. त्यांच्यासारखा प्रेमळ गुरु, प्रेमळ बाप व प्रेमळ पति या पृथ्वीवर विरळाच! इतकें असूनही ते अस्वाभाविक वाटत नाहींत इतकें त्यांचें स्वभावचित्र सुंदर वठलें आहे. सारांश, या विविधप्रकारच्या आदर्श व्यक्ति रेखाटून हरिभाऊंनीं उच्च ध्येयात्मकतेबरोबरच मनुष्यस्वभावाचेंही सूक्ष्म ज्ञान प्रकट केलें आहे यांत शंका नाहीं.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचें सौंदर्य मार्मिक संवाद व मनोरम वर्णनें यांत सांठविलेलें आहे. 'पण लक्षांत कोण घेतो'मधील 'लहानपणची आठवण' या प्रकरणांत लहान मुलामुलींचे खेळ, भांडणें, एकोपा व संवाद यांचें सुंदर वर्णन आहे. 'मी'मध्यें भाऊस झालेलें सुंदरीचें प्रथम दर्शन व 'आई, गले मला हाच नौला आवलतो' हे सुंदरीचे उद्गार, त्यावर 'त्याला नाहीं असली ही झांबरी बायको आवडत...... त्याला मुळींच नकोस तूं' हें तिच्या आईचें उत्तर व 'कां हो? नको कां म्हणतां? मला हवी!' असे भाऊच्या तोंडून घाबऱ्या घाबऱ्या आलेले शब्द अत्यंत नयन-मनोहर असें दृश्य समोर उभें करितात. भाऊ व सुंदरी या दोघां बालकाचें झालेलें प्रेमाकर्षण व त्यावर सुंदरीच्या आईचें विनोदी भाषण अतिशय गोड आहे. त्या दोघां मुलांचा अकृत्रिम, निर्मल प्रेमभाव अत्यंत मोहक वाटल्यावांचून रहात नाहीं.

'यशवंतराव खरे' या कादंबरींत यशवंतरावाची भली मोठी शेंडी रावबहादुरांचे ज्येष्ठ चिरंजीव कापून टाकतात; त्यामुळें संतापून यशवंतराव त्याजवर हात उगारतो; परंतु त्याच वेळीं सखुताई व रावबहादुर दोघेही तेथें येऊन बिचाऱ्यावर शिव्यांचा अग्निवर्षाव करतात, त्यानें यशवंतराव होरपळून जाणार असें वाटतें. परंतु तेथून सर्व मंडळी गेल्यानंतर आपल्या मधुर प्रेमळ बोलांनीं चिमुकली मथी निर्मल प्रेमामृताच्या धारांचा वर्षाव करून त्याच्या अंतःकरणांतील संतापाग्नि शांत करते. यशवंतराव व मथी या दोघांचा संवाद सुंदर असून शुद्ध प्रेमाचें सामर्थ्य व प्रभाव दर्शविणारा आहे.

'कर्मयोगा'तील चंद्रशेखर व चंद्री या बहिणभावांचे सुखसंवाद पुनः पुनः वाचावेसे वाटतात. चंद्रीची गोड बडबड, इसापनीति सांपडल्यानंतरचा तिचा तो आनंद, शिकण्याची हौस, भावावरचें निःसीम प्रेम व चंद्रशेखरास आपल्या लहानग्या बहिणीच्या हुषारीबद्दल वाटणारा अभिमान, कौतुक व प्रेम पाहून आनंद वाटतो.

## हरि नारायण आपटे

गणपतराव व त्याची पत्नी सरस्वती, त्याचप्रमाणें रघुनाथराव व यमुना यांच्यामधील संवाद स्वाभाविक, प्रेमळ व सहजसुंदर उतरले आहेत. या संवादांतील विनोद मार्मिक व हृदयंगम आहे. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील सुंदर संवादांचे उतारे किती तरी देण्यासारखे आहेत; परंतु स्थलसंकोचास्तव तसें करितां येत नाहीं.

संवादाच्या दृष्टीनें जसे हरिभाऊ श्रेष्ठ आहेत, त्याचप्रमाणें त्यांची वर्णनशैलीही अत्युत्कृष्ट आहे. हुबेहूब चित्र रंगविण्यांत त्यांच्यासारखा दुसरा कुशल कलाभिज्ञ मराठी वाङ्मयांत क्वचितच सांपडेल. 'मायेचा बाजार' या कादंबरींतील 'चौघांची भेट,' हें प्रकरण हरिभाऊंच्या वर्णनशैलीची साक्ष पटवील. मथुराताईनें हृदयाशीं धरलेल्या बाबीचें निस्तेज मुख व दोन्ही बाजूंस तिच्या दोन भावांनीं मिठी मारून तिच्याजवळ आणलेलीं तोंडें हा चौघां भावंडांच्या भेटीचा प्रेमरूप ब्रह्मानंद कोणास उल्हसित करणार नाहीं ?

नवऱ्याच्या प्रेमपत्रानें अत्यानंद होऊन पद्मावती निश्चेष्ट पडली. स्वानंदसाम्राज्यांत तन्मय झालेल्या पद्मावतीचें वर्णनही हृद्य आहे. 'जग हें असें आहे' यांतील सखारामाचा इस्पितळांत झालेला हृदयद्रावक अंत, राधाबाई व सिस्टर चॅरिटी यांची शोकावस्था हीं हृदयस्पर्शी भाषेंत वर्णिलीं आहेत. करुणरसाचा परिपोष हरिभाऊंना फार उत्तम साधतो. दुःखाचे प्रसंग ते उत्कृष्ट रंगवून वाचकांचीं हृदयें हलवून सोडतात. 'मधल्या स्थितीं'तील अंबूताईचा मृत्यु, 'पण लक्षांत कोण घेतो' मधील यमुनेच्या आईचा व रघुनाथरावांचा मृत्यु हृदयास पाझर फोडणारा आहे. 'मायेच्या बाजारां'तील पद्मेचें सर्व जीवनच करुणमय आहे.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतील सृष्टिसौंदर्याचीं वर्णनेंही अत्यंत चित्ताकर्षक आहेत. वृक्ष, लता, पर्वत, नद्या, वनराजी, सूर्योदय, सूर्यास्त इत्यादिकांचीं वर्णनें करून त्यांचें हुबेहूब चित्र ते वाचकांच्या नेत्रांसमोर उभें करतात. सृष्टीची रानावनांतली नैसर्गिक शोभा पाहून त्यांची वृत्ति तन्मय होऊन जाते आणि निसर्गसुंदर स्थल दृष्टीस पडलें कीं, निसर्गदेवतेच्या सौंदर्याचें आपल्या नेत्रांनीं ते जणूं प्राशनच करीत आहेत असें वाटतें. निसर्गाच्या शाश्वतिक सौंदर्यापुढें मनुष्यानें आपल्या कलेच्या द्वारें निर्माण केलेलें सौंदर्य त्यांस अगदीं फिक्कें वाटे. देवळांतल्या देवाच्या मूर्तीचें दर्शन घेण्यापेक्षां निसर्गांत चिरकाळ वास करणाऱ्या परमेश्वराचें दर्शन त्यांस प्रिय वाटत असे. सृष्टिसौंदर्याच्या दर्शनानें मानवाची चित्तवृत्ति शांत, निर्मळ व उदात्त

होते, असा त्यांचा विश्वास होता. चित्तशुद्धीसाठीं मनुष्यानें निसर्गनिर्मित रम्य, पवित्र स्थलीं एकान्तांत कांहीं काल घालविणें आवश्यक आहे, असें त्यांचें मत होतें. मानवांचा सहवास त्यांस अत्यंत प्रिय असला तरी सृष्टीच्या सहवासांत त्यांची वृत्ति शांत होऊन तेथील सहज सौंदर्यानें ते मोहून जात. ' कर्मयोग ' या कादंबरींतील वनेश्वरीचें वर्णन, ' आजच 'मधील हरिद्वार व हिमालयांतील अंतर्भागाचें वर्णन हीं वरील विवेचनास पुष्टि देणारीं आहेत. हरिद्वार, महाबळेश्वर, काश्मीर इत्यादि नैसर्गिक सौंदर्यासाठीं प्रसिद्ध असलेलीं स्थळें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलीं होतीं. त्यामुळें त्यांचीं कादंबऱ्यांतील स्थलवर्णनें मनोहर आहेत. निसर्गावर त्यांचें अत्यंत प्रेम होतें व बहुधा रोजच्या रोज त्याच्या सहवासांत ते कांहीं वेळ खर्च करीत. व्यावहारिक जगांतील घडामोडींनी त्रासलेल्या मनाला निसर्गदेवतेवांचून कोण शांति देणार ! सृष्टिसौंदर्याचा मानवी मनावर होणारा परिणाम हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्यांत ठिकठिकाणीं वर्णन केला आहे. निसर्गासाठींच केवळ निसर्ग त्यांस प्रिय होता असें नव्हे तर, निसर्गाचा मनुष्याच्या मनावर अत्यंत परिणाम होतो, यासाठींच त्यांस निसर्गाचें महत्त्व अधिक वाटे. वर्ड्स्वर्थप्रमाणें ते सृष्टीच्या सौंदर्यानें तन्मय होत असत, आणि त्यांनीं आपली प्रतिभा काव्यलेखनांत खर्च केली असती तर वर्ड्स्वर्थप्रमाणेंच ' सृष्टीचे कवि ' असें नांव त्यांस प्राप्त झालें असतें. कलात्मक सौंदर्यप्रतीति त्यांचे ठायीं निःसंशय होती. परंतु केव्हां केव्हां रचना-सौंदर्याकडे त्यांनीं दुर्लक्ष केल्यामुळें त्यांचीं वर्णनें पाल्हाळिक होतात. असो.

यशस्वी सामाजिक कादंबरीकारास समाजांतील नाना संप्रदाय व चालीरीति यांचें ज्ञान जरूर असलें पाहिजे. एकंदर समाजाच्या परिस्थितीची चांगली कल्पना असल्याशिवाय त्याच्या हातून उच्च दर्जाचें वाङ्मय निर्माण होणें शक्य नाहीं. मनुष्यस्वभावाचें सूक्ष्म परिज्ञान होण्यासाठीं त्यास समाजांत मिसळून प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे. जितका प्रत्यक्ष जगाशीं त्याचा परिचय अधिक तितकीं त्यानें रेखाटलेलीं मनुष्यस्वभावाचीं चित्रें अधिक सुंदर, स्वाभाविक व विविध प्रकारचीं अशीं उतरतील. समाजापुढें असणाऱ्या जिव्हाळ्याच्या सर्व प्रश्नांचें त्यास सांगोपांग ज्ञान असणें आवश्यक आहे. कारण त्यावांचून त्याच्या कादंबऱ्यांचें महत्त्व कोणास वाटणार नाहीं. कादंबरीकार उत्कृष्ट मानसशास्त्रज्ञ असला तरच त्यानें निर्माण केलेलीं पात्रें खरीं अशीं वाटतील. मानवी मनांतील परस्परविरोधी अशा नाना

मनोव्यापारांची सूक्ष्म क्रिया त्यास कळली पाहिजे. समाजांतील स्त्रीपुरुष स्वीकार करतील अशा तऱ्हेचा समाजसुधारणेचा मार्ग त्यास आंखतां आला तरच त्याच्या कामगिरीचें महत्त्व! व अशा तऱ्हेचा समाजसुधारणेचा मार्ग सूचित करावयाचा झाल्यास भविष्यकालाचा पडदा दूर सारून त्या पलीकडच्या गोष्टी सूक्ष्म तऱ्हेनें निरीक्षण करणारी दिव्य दूरदृष्टि त्यास असलीच पाहिजे. द्रष्टयाचेंही काम कादंबरी-कारास करावें लागतें. अवलोकनशक्ति अत्यंत सूक्ष्म असून तिचा उपयोग त्यास स्वानुभवानें संपादन केलेल्या ज्ञानानें आपल्या कादंबऱ्या परिणामकारी बनविण्यांत करितां येतो. <सामाजिक कादंबरीकाराचें सहानुभूतीचें क्षेत्र अत्यंत विशाल स्वरूपाचें असलें तरच स्वतःच निर्माण केलेल्या पात्रांशीं त्याचें तादात्म्य होऊं शकेल; व असें तादाम्य झाल्याशिवाय स्वभावचित्रलेखन उत्कृष्ट होणें असंभवनीय आहे. याशिवाय सहृदयता, सौंदर्यप्रतीति, कथानकरचनेचें व भाषेचें सौंदर्य, इत्यादि महत्त्वाच्या गुणांवांचून कादंबरीकारास यश येणार नाहीं. परंतु समाजास सन्मार्ग दाखविण्याइतका ध्येयवाद कादंबरीकाराच्या ठायीं जरूर हवा; कारण त्रिकालाबाधित उदात्त तत्त्वांवर व उच्च दर्जाच्या ध्येयवादावर उभारल्याशिवाय कोणतीही कादंबरी चिरंतन स्वरूपाची होणें असंभवनीय आहे. >

हरिभाऊंना आपल्या हिंदुसमाजांतील चालीरीतीचें उत्तम ज्ञान होतें. बाल-विवाह, एकत्रकुटुंबपद्धति, केशवपन, स्त्रियांत शिक्षणाचा अभाव इत्यादि गोष्टीं-मुळें आमच्या गृहसौख्याचा पाया ढिला झाला याची त्यांस जाणीव होती. नाना तऱ्हेच्या खोत्या धर्मसमजुती व लोकभ्रम यांखालीं स्त्रियांची अनेक दृष्टींनीं कुचंबणा चाललेली होती. ही परिस्थिति पाहून हरिभाऊंच्या अंतःकरणांतील दयानिधि साहजिक उचंबळून आला व आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें समाजांत जागृति उत्पन्न करून, स्त्रियांची उन्नति करण्याचें ध्येय पुढें ठेवून त्यांनीं तें सिद्धीस नेलें. सामाजिक जुलुमामुळें स्त्रियांची स्थिति करुणास्पद झाली होती तर, राजकीय जुलुमामुळें देश परतंत्र होऊन देशांतील पुरुष हतबल झाले होते. उद्योगधंदे खालावून देशांतील लोक पराकाष्ठेचे दरिद्री झाले होते. अशा रीतीनें देशाच्या सामाजिक, राजकीय व औद्योगिक परिस्थितीचें पूर्ण ज्ञान त्यांस असल्यानें त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें ही स्थिति सुधारण्याचे अनेक मार्ग सूचित केले. 'मधली स्थिति,' 'गणपतराव,' 'पण लक्षांत कोण घेतो,' 'मी,' इत्यादि कादंबऱ्यांत

समाजोन्नतीचे मार्ग त्यांनीं स्पष्ट आंखले आहेत. 'मी' कादंबरींत 'आत्मत्याग' हाच देशसेवेचा खरा मार्ग असून देशाची स्थिति सुधारण्यासाठीं कोणी सामाजिक तर कोणी राजकीय प्रश्न हातीं घ्यावेत व याच मार्गाचा अवलंब केल्यानें देशाची सर्वांगीण सुधारणा होईल, असें तत्त्व त्यांनीं प्रतिपादन केलें. 'आजच' यामध्यें सामाजिक, राजकीय व औद्योगिक विषयांवर चर्चा केली, तर 'कर्मयोगा'त कर्म-श्रद्धा व धर्मश्रद्धा दोन्हींची जरूर आहे, हें तत्त्व लोकांच्या मनावर बिंबविलें. हरिभाऊंना देशोन्नतीस आवश्यक अशा सर्व सामाजिक व राजकीय प्रश्नांची कल्पना होती व त्यांच्या अंगीं उत्कृष्ट प्रकारचा ध्येयवाद असल्यानें त्यांनीं सुंदर ध्येयसृष्टि निर्माण केली व देशोन्नतीचा मार्ग दाखवून दिला. त्यांनीं कादंबऱ्यांत घेतलेले प्रश्न लोकांच्या पूर्ण परिचयाचे होते. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं सूचित केलेल्या सामा-जिक सुधारणा लोकांच्या आटोक्याच्या बाहेरच्या नव्हत्या. त्यामुळें त्यांच्या ध्येय-सृष्टींतील सुधारणांचा स्वीकार सामान्य जनतेकडून लौकर व फारसे प्रयास न पडतां झाला. नवीन सुधारणा समाजापुढें मांडण्याची त्यांची हातोटी इतकी उत्तम होती कीं, तरुण पिढींतील सुशिक्षितांचें सहज मतपरिवर्तन झालें व जुन्या मंडळींचें मन विशेष न दुखवितां त्यांनीं आपल्या सुधारणांचे प्रश्न पुढें मांडल्यानें त्यांचा विरोध तीव्र स्वरूपाचा झाला नाहीं. जुन्या मंडळींनीं जरी त्यांस नांवें ठेविलीं तरी तरुणांनीं सुधारणा अंमलांतच आणल्यामुळें नांवें ठेवण्यापलीकडे फारशी प्रतिक्रिया त्यांनीं केली नाहीं. हरिभाऊ भराऱ्या मारणारे ध्येयवादी नसून क्रियावान् व्यावहारिक ध्येयवादी होते. म्हणूनच त्यांची ध्येयसृष्टि प्रत्यक्ष सृष्टींत अवतरलेली थोडक्याच काळांत त्यांस दिसली. जुन्या लोकांशीं ते फटकून वागले नाहींत, तर त्यांचा रोष पत्करून ते त्यांस चिकटून राहिले. त्यामुळें जुन्या मतांच्या मंडळींवरही त्यांचें शेवट-पर्यंत चांगलें वजन राहिलें.

आपटे घराणें अतिशय मोठें होतें. कुटुंबांतील मंडळी, आजोळचे नातेवाईक व त्या सर्वांचे आप्तेष्ट मिळून मोजदाद केल्यास कुटुंबांत घरचीच सरासरी पांचपंचवीस मंडळी होती. शिवाय त्यांचा मित्रपरिवारही मोठा होता. त्यामुळें मनुष्यस्वभावाचे सूक्ष्म निरीक्षण करण्यास त्यांस संधि मिळाली. त्यांनीं हिंदुस्थानभर प्रवासही केला होता, त्यामुळें प्रत्यक्ष जगांतील नानातऱ्हांच्या घडामोडींशीं व मनुष्यांशीं त्यांचा परिचय झाला. त्यांची अवलोकनशक्ति अत्यंत सूक्ष्म होती. त्या शक्तीच्या जोरावर

त्यांस जगाचें व मनुष्यस्वभावाचें ज्ञान संपादन करतां आलें व यामुळेंच त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांत नानातऱ्हांच्या वृत्तींचीं विविध पात्रें त्यांनीं रंगविलीं. यशवंतराव, भावानंद, गणपतराव, यमुना, ताई, रावबहादुर आडमुठे, शंकरमामंजी, दिगंबरपंत इत्यादि पात्रांचें परीक्षण केलें असतां हरिभाऊ हे श्रेष्ठ प्रतीचे मानसशास्त्रज्ञ होते, असें कबूल करणें भाग आहे. मनुष्याच्या हृदयांतील नाना विकारविचारांचे धागे उलगडण्यांत ते प्रवीण असून त्यांच्या सहानुभूतीचें क्षेत्र विशाल होतें. या त्यांच्या व्यापक सहानुभूतीमुळेंच नानाप्रकारच्या पात्रांशीं समरस होऊन त्यांचीं हुबेहूब चित्रें त्यांस रेखाटतां आलीं. लहानथोर गरीबश्रीमंत असा भेद त्यांच्यापाशीं नव्हता. त्यांनीं आपल्या कोणत्याही कादंबरींत शृंगार-रसास प्राधान्य दिलें नाहीं; किंबहुना शृंगार-रसावांचूनही उत्कृष्ट प्रकारची कादंबरी लिहिणें शक्य आहे हें त्यांनीं सिद्ध केलें. त्यांच्या कादंबऱ्यांतील पतिपत्नींचे संभाषणप्रसंग अत्यंत मर्यादेनें व शालीनतेनें लिहिले गेले असल्यानें त्यांच्या कादंबऱ्या वाचण्यास लहान मुलांमुलींस संकोच वाटत नाहीं. त्यांच्या कादंबऱ्या लहान मुलांमुलींस व स्त्रियांस वाचावयास देण्यास कोणीही हरकत घेणार नाहीं. सदभिरुचीचा कादंबरीकार या दृष्टीनें त्यांची योग्यता अलौकिक आहे. अलीकडील शृंगारपर चटोर कादंबऱ्या वाचण्यास सवकलेल्या वाचकांना हरिभाऊंच्या कादंबऱ्या नीरस वाटतात! परंतु, अशा क्षुद्र अभिरुचीच्या वाचकांची लोकप्रियता संपादन करण्याचा हरिभाऊंना केव्हांही मोह पडला नाहीं. कादंबऱ्या खपाव्या म्हणून भावनोद्दीपक वैषयिक ( Sensational ) गोष्टी त्यांनीं लिहिल्या नाहींत. सामान्य जनतेंत सदभिरुचि उत्पन्न करून त्यांची उन्नति करण्याचा त्यांनीं आपल्या लेखणीच्या द्वारें प्रयत्न केला.

हरिभाऊंच्या पूर्वी सामाजिक कादंबऱ्या अशा नव्हत्याच. मराठी कादंबरीची स्थिति खरोखरी अत्यंत दीनवाणी होती. शास्त्रीबोवांच्या ‘ अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी, ’ छत्र्यांचा ‘ बालमित्र, ’ इत्यादि इंग्रजींतून केलेलीं भाषांतरें कादंबरीच्या पूर्वेतिहासांत प्रथमारंभीं दृष्टीस पडतात. यानंतर श्री. हळवे, रिसबुड यांच्या मुक्तामाला, मंजुघोषा, वसंतकोकिला, विश्वासराव इत्यादि कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. रंगेल राजपुत्र व सौंदर्यसंपन्न राजकन्या यांच्या प्रेमविषयक गोष्टींशिवाय यांत कांहीं नसे. नायक-नायिकांचें प्रेम, त्यांजवर आलेलीं अद्‍भुत संकटें व शेवटी गोड मीलन अशा पद्धतीच्या संस्कृत थाटावर रचलेल्या या कादंबऱ्या असत.

परंतु यक्ष-किन्नरांच्या, राजाराणींच्या अद्‌भुत गोष्टींनीं इंग्रजी शिक्षणानें सुसंस्कृत झालेल्या वाचकांचें समाधान होईना. इंग्रजी वाङ्मयांतील थॅकरे, डिकन्स यांच्या 'वस्तुस्थितिनिदर्शक' कादंबऱ्यांसारख्या कादंबऱ्या मराठी वाचकांस हव्याशा वाटूं लागल्या.

इ. स. १८७९ सालीं शंकर मोरो रानडे यांच्या 'नाटयकथार्णवा'मुळें अद्‌भुत कादंबऱ्यांस कांहींसा आळा बसला. यापुढील दहा वर्षें म्हणजे 'करमणुकी'चा जन्म होईपर्यंत रेनॉल्ड्‌स्‌च्या कादंबऱ्यांनीं स्फूर्ति होऊन कित्येकांनीं वस्तुस्थितिनिदर्शक कादंबऱ्या लिहिल्या. परंतु हरिभाऊंची 'मधली स्थिति' ही कादंबरी प्रसिद्ध झाली व त्याबरोबरच मराठी कादंबरीच्या स्वरूपांत परिवर्तन झालें. 'आजकालच्या गोष्टी' लिहिण्याचा हरिभाऊंचा संकल्प अपूर्व तर होताच; परंतु 'पुण्यग्रामरहस्य' वगैरे पूर्व-कादंबऱ्यांपेक्षां त्यांतील वस्तुस्थितीचें हुबेहूब चित्र रंगविण्याचें कौशल्य, वर्णनाची शैली, साधी भाषा व प्रसंग निवडण्याचें चातुर्य इत्यादि गुण असामान्य होते. गुंजीकर, धनुर्धारी इत्यादि स्वतंत्र कादंबरीकारांप्रमाणेंच इंग्रजी कादंबऱ्यांमुळें हरिभाऊंना स्फूर्ति झाली असली व आपल्या 'मधल्या स्थिती'चा पहिला भाग त्यांनीं रेनॉल्ड्‌स्‌च्या कादंबरीच्या आधारें जरी लिहिला असला तरी, त्या कादंबरीचा बाकीचा भाग व त्यांच्या इतर सर्व सामाजिक कादंबऱ्या रचनेच्या दृष्टीनें स्वतंत्र आहेत. यावरून त्यांच्या लेखनशक्तीचें अलौकिक सामर्थ्य वाचकांच्या लक्षांत येईल.

हरिभाऊंची भाषा साधी, प्रसादयुक्त, बांधेसूद व सरस आहे. तिच्यांत नटवेपणा नाहीं. कुलीन युवतीप्रमाणें ती गंभीर, भारदस्त व शालीनतेनें युक्त आहे. तिची गति शांत, धीरगंभीर आहे. हरिभाऊंच्या स्त्रीपात्रांच्या तोंडीं घातलेली भाषा पाहून स्त्रियांस सुद्धां अचंबा वाटेल! स्त्रियांच्या तोंडीं असलेले वाक्प्रचार व म्हणी यांवर त्यांचें प्रभुत्व आहे. वृद्ध स्त्रिया, तरुण स्त्रिया व लहान मुली यांना शोभेशी योग्य भाषाच त्यांच्या मुखांतून बाहेर पडते. घरगुती भाषा लिहिण्यांत हरिभाऊंच्या-वर ताण करणारा कादंबरीकार अजून जन्मास यावयाचा आहे. आरंभींच्या 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरींत त्यांच्या भाषेचें मनोहर स्वरूप जसें दृष्टीस पडतें तसें अखेरच्या कादंबऱ्यांत दिसत नाहीं. पूर्वीचा बांधेसूदपणा कांहीं कमी होऊन त्यांच्या भाषेचें स्वरूप कांहींसें विस्कळित, बोजड व एकाच पद्धतीचें झालेलें दिसतें.

विचारांतील नावीन्य कमी होऊन त्याच त्याच विचारांची पुनरुक्ति झाल्यानें कादंबऱ्यांतील कांहीं भाग कंटाळवाणे वाटतात. वर्णनांत पाल्हाळिकपणा शिरल्यामुळें केव्हां केव्हां 'हें वर्णन संपून गोष्टीस सुरुवात कधीं होणार?' असा प्रश्न वाचकांना येऊन पडतो. थोडक्या समर्पक शब्दांत ज्या गोष्टी सांगतां येतील त्यांसाठीं त्यांनीं पानेंच्या पानें लिहिलीं आहेत. क्षुल्लक सिद्धांताचें सविस्तर विवरण हाही त्यांच्या लेखनपद्धतीचा एक दोषच आहे.

परंतु हे दोष वर्ज्य केल्यास हरिभाऊंच्या सारख्या उत्कृष्ट अभिरुचीच्या कादंबऱ्या लिहिणारा कादंबरीकार विरळाच, असें मराठी वाङ्मयाच्या अभिमान्यांस कबूल करावें लागेल. त्यांचा ग्रंथविस्तारही डिकन्स, स्कॉट वगैरे नामांकित ग्रंथकारांच्या तोडीचा आहे.

हांस हांस हांसणें, उद्गारणें, उत्तरणें, स्मितणें, मेस्मेरित होणें, पत्तेपीट, चहाचटी मंडळी, चहापीट, सोंगटीपीट, फिदफिदणें, सायकल दुचकणें इत्यादि पुष्कळच नवीन शब्दांचीं नाणीं हरिभाऊंनीं पाडलीं. यांपैकीं कित्येक शब्द प्रचारांतही आले आहेत.

हरिभाऊंच्या मागून त्यांच्याच धर्तीवर कादंबऱ्या लिहिणारे अनेक कादंबरीकार निर्माण झाले. त्यांमध्यें कै. कृष्णाजी केशव गोखले, कै. नाथमाधव, कै. सहकारीकृष्ण, श्री. नारायण हरि आपटे हे प्रमुख होत. तथापि हरिभाऊंची कृति इतक्या उज्ज्वल स्वरूपाची आहे कीं, इ. स. १८८५ पासून ते श्री. वामन मल्हार जोशी यांच्या 'रागिणी'चा जन्म होईपर्यंतच्या कादंबऱ्यांच्या इतिहासांतील कालास 'हरिभाऊंचें युग' असेंच नांव देणें योग्य होईल.

शेक्स्पिअर, व्हिक्टर ह्यूगो, ब्राउनिंग इत्यादि पाश्चात्य ग्रंथकारांप्रमाणें सर्व मानवजातीच्या कल्याणाचा जरी हरिभाऊंनीं विचार केला नाहीं, शेक्स्पिअर, बर्नार्ड शॉ यांच्याप्रमाणें हरिभाऊंची दृष्टि जरी विशाल नाहीं, तरी त्यांच्या पूर्वींच्या मराठी कादंबरीकारांपेक्षां ते सर्व दृष्टीनें श्रेष्ठ आहेत. त्यांनीं समाजांतील विशिष्ट वर्गाच्या सुखदुःखांचा विचार करून इष्ट सुधारणा सुचविल्या ही कामगिरी सुद्धां लहानसहान नाहीं. तत्कालीन समाजांतील दोषाविष्करण करण्याचें कार्य त्यांनीं केलें. परंतु आतां ते दोष समाजांतून नष्ट झाल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांचें महत्त्व कमी होण्याचा संभव आहे. 'पण लक्षांत कोण घेतो,' 'मी,' 'यशवंतराव,' इत्यादि कादंबऱ्या पुनः पुनः वाचाव्याशा वाटतात.

त्यांच्या कांहीं कादंबऱ्यांचीं भाषांतरें हिंदी, गुजराथी, बंगाली इत्यादि भाषांमध्यें झालीं आहेत. यावरून त्यांच्या लोकप्रियतेची साक्ष पटेल. परंतु काल हा खरोखर मोठा मार्मिक टीकाकार आहे. कमी प्रतीच्या शेंकडों कादंबऱ्या तो आपल्या उदरांत गडप करतो. कालाच्या कसोटीला हरिभाऊंच्या 'मी,' 'यशवंतराव खरे,' इत्यादि कादंबऱ्या खास उतरतील. परंतु इतर कादंबऱ्यांत तत्कालीन समाजास महत्त्वाच्या अशा प्रश्नांची चर्चा त्यांनीं केली असल्यानें त्यांच्या वाचनानें मनोरंजन झालें तरी कांहीं अंशीं त्यांचें महत्त्व कमी होईल ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. असो.

शेक्स्पिअर, होमर, कालिदास या विभूतींच्या रांगेंत हरिभाऊंना जागा मिळाली नाहीं, तरी थॅकरे, डिकन्स, स्कॉट यांच्या रांगेंत त्यांस मानाची जागा खात्रीपूर्वक मिळेल. सामाजिक कादंबरीचें विशाल व अत्यंत मनोहर जग निर्माण करून हरिभाऊंनीं आपल्या समाजास कायमचें उपकृत केलें आहे, यांत तिळप्राय संशय नाहीं.

# प्रकरण बारावें

## ऐतिहासिक कादंबऱ्या

हरिभाऊंच्या पूर्वी, ज्यांना ऐतिहासिक असें म्हणतां येईल, अशा कादंबऱ्या फारशा झाल्या नव्हत्या. अद्‌भुत-वीरकथा ( Romances ) मात्र कांहीं होत्या. परंतु त्यांत इतिहासाचा अंश अत्यल्प होता.

इतिहास व दंतकथा या दोन आधारस्तंभांवर त्यांनीं ऐतिहासिक कादंबरीच्या मंदिराची उभारणी केली. ऐतिहासिक प्रसंगांच्या निर्जीव ठोकळ्यांत नवचैतन्य ओतून त्यांनीं गतकाल जिवंत केला. शिवाजी, रामदास, चाणक्य, चंद्रगुप्त, उदय-भानू, कमलकुमारी, जिजाबाई इत्यादि इतिहासप्रसिद्ध व्यक्तींच्या चरित्रांचें वर्णन करून त्यांनीं चालतींबोलतीं माणसेंच जणूं फिरून निर्माण केलीं.

इतिहास व ऐतिहासिक कादंबरी यांचें ध्येय सत्यशोधन व सत्यकथन हेंच आहे. परंतु त्यांचे मार्ग मात्र भिन्न आहेत. जी गोष्ट इतिहासकार रूक्षपणें, कोमल भावनां-कडे लक्ष न देतां, कठोरतेनें कथन करील, तीच गोष्ट ऐतिहासिक कादंबरीकार मित्राप्रमाणें काव्यमय अशा मनोरम पद्धतीनें सुंदर व उदात्त भावना जागृत करून सांगेल. वनस्पतिशास्त्रज्ञ ज्याप्रमाणें गुलाबाच्या फुलाचें विदारण करून त्याचें वर्णन करील, त्याच पृथक्करणात्मक पद्धतीनें इतिहासकार गतकालाचा वृत्तान्त सांगेल. परंतु ऐतिहासिक कादंबरीकाराची दृष्टि गतकालीन प्रसंगाच्या काव्यमयतेकडे असल्यानें सत्यकथन व सत्यशोधन करितांना तो सौंदर्याविष्करणाकडेच अधिक लक्ष देईल.

इतिहासांत सुद्धां पूर्ण सत्य आढळत नाहीं. कारण प्रत्येक इतिहासग्रंथावर इतिहासकाराच्या पूर्वग्रहांची छाप पडलेली असते. इतिहासकाराचें व्यक्तित्व त्यांत प्रतिबिंबित झाल्यानें इतिहासास अपूर्ण सत्य असेंच म्हटलें पाहिजे. हें अपूर्ण सत्य

पूर्ण करण्याचें कार्य ऐतिहासिक कादंबरीकारास करावें लागतें. इतिहासांत ठोकळ प्रसंग, राजांच्या कारकीर्दी व युद्धप्रसंग यांचेंच वर्णन असल्यानें, तत्कालीन स्त्री-पुरुषांचे आचारविचार, रीतिरिवाज, सामाजिक, राजकीय व धार्मिक परिस्थिति इत्यादिकांचें वर्णन यथास्थित करून इतिहासांतील उणेपणा नाहींसा करण्याचें काम ऐतिहासिक कादंबरी करते व ऐतिहासिक सत्याचें संशोधन करून इतिहासावर प्रकाश पाडते. ऐतिहासिक प्रसंगांचें खरें महत्त्व व ऐतिहासिक स्त्रीपुरुषांच्या चारित्र्याचें खरें रहस्य ऐतिहासिक कादंबऱ्यांत दृष्टीस पडतें.

ऐतिहासिक सत्यसृष्टि व कल्पनानिर्मित सुंदर काव्यसृष्टि यांच्या योग्य मीलनानेंच उत्कृष्ट दर्जाची ऐतिहासिक कादंबरी निर्माण होते. मराठे व रजपूत यांच्या इतिहासांतील नाना प्रसंगांचीं अंतस्थ कारणें आपल्या प्रतिभेच्या व कल्पनाशक्तीच्या जोरावर हरिभाऊंनीं शोधून काढलीं व अपूर्व यश संपादिलें.

हरिभाऊंच्या ‘ उषःकाल ’ कादंबरीनें कादंबरीच्या ऐतिहासिक भागांत क्रान्ति केली व ऐतिहासिक कादंबरीकारांत या एकाच कादंबरीमुळें त्यांस श्रेष्ठत्व मिळालें. हरिभाऊंचें लक्ष सामाजिक विषयांकडून ऐतिहासिक विषयांकडे कां वळलें, हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. सद्यःपरिस्थितीवरून मन उडून त्यांची प्रतिभा गतकाळांत कां रमली ?

ग्रँट डफनें लिहिलेला मराठयांचा इतिहास दोषपूर्ण आहे, त्यांतील शिवाजी-बद्दलची बहुतेक विधानें सत्यास सोडून आहेत, असें महाराष्ट्रांतील कित्येक विद्वानांस वाटून त्यांनीं मराठयांच्या इतिहासाचें संशोधन करण्यास इ. स. १८६५ मध्येंच सुरुवात केली. इ. स. १८८५ मध्यें शिवाजीमहाराजांच्या रायगडावरील पवित्र समाधीचा जीर्णोद्धार करण्याची उत्कृष्ट कल्पना कांहीं देशभक्तांच्या डोक्यांत आली! परंतु ती कल्पना प्रत्यक्षतः खरी होण्यास दहा वर्षें लागलीं. इ. स. १८९५ हें वर्ष महाराष्ट्राच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे. त्या वेळीं इतिहासाच्या प्रेमानें सुशिक्षितांचीं अंतःकरणें ओथंबलेलीं होतीं. देशाभिमानाची तेजस्वी भावना तरुणांच्या हृदयांत खेळत होती. रायगड, सिंहगड, तोरणा इत्यादि शिवाजी-महाराजांच्या इतिहासप्रसिद्ध किल्ल्यांचें दर्शन घेण्यास कित्येक मंडळी जात होती. या किल्ल्यांचीं सुंदर वर्णनें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होत होतीं. इतिहासप्रेमाची ही जोराची लाट उत्पन्न होण्यापूर्वींच कै. न्या. रानडे यांनीं आपल्या मराठ्यांच्या

## हरि नारायण आपटे

इतिहासाबद्दलचा निबंध लिहिल्यामुळें ऐतिहासिक सत्यावर बराच प्रकाश पडला होता. इतिहाससंशोधनाचें कार्य याच वेळीं सुरू होऊन अनेक अस्सल ऐतिहासिक कागदपत्रें उपलब्ध झालीं होतीं. अशा स्थितींत हरिभाऊंचें भावनामय अन्तःकरण इतिहासभक्तीनें भरून गेलें यांत नवल काय? बरीच ऐतिहासिक सामग्री उपलब्ध झाल्यामुळें आपल्या तेजस्वी प्रतिभेनें गत कालांतील नाना चित्ताकर्षक प्रसंग रंगवून त्यांतील नीरसपणा नष्ट करून समाजांत देशाभिमान जागृत करावा अशी त्यांना साहजिक अत्युत्कट इच्छा झाली व त्यांच्या प्रतिभेनें शिवाजीमहाराजांच्या ओजस्वी चारित्र्याचें परीक्षण करून आपली 'उषःकाल' ही कादंबरी अत्यंत चटकदार भाषेंत लिहिली व महाराष्ट्रीय जनतेस चटका लावून सोडला. स्वराज्याचा उषःकाल, स्वराज्यसूर्याचा उदय, त्यास लागलेलें ग्रहण व त्याचा झालेला अस्त या सर्वांचें त्यांनीं तीक्ष्ण दृष्टीनें परीक्षण केलें. अशा तऱ्हेनें मराठेशाहीच्या इतिहासावर त्यांनीं प्रकाश पाडण्याचा प्रयत्न केला.

म्हैसूरचा वाघ (१८९०-९१), उषःकाल (१८९५-९७), केवळ स्वराज्यासाठीं (इ. स. १८९८-९९), रूपनगरची राजकन्या (१९००-१९०२), चंद्रगुप्त (इ. स. १९०२-१९०४), गड आला पण सिंह गेला (१९०३), सूर्योदय (१९०५-१९०८), मध्यान्ह (अपूर्ण-१९०६-१९०८), सूर्यग्रहण (अपूर्ण-१९०८-१९०९), कालकूट (अपूर्ण-इ. स. १९०९-१९११), व वज्राघात (१९१३-१९१५) अशा एकंदर अकरा ऐतिहासिक कादंबऱ्या हरिभाऊंनीं लिहिल्या. त्यांपैकीं तीन अपूर्ण असून आठ पूर्ण आहेत.

ऐतिहासिक कालानुक्रमाप्रमाणें त्यांचे चार विभाग करितां येतील. पहिला, प्राचीन—चंद्रगुप्त; दुसरा, मध्ययुगीन—कालकूट व वज्राघात; तिसरा, शिवकालीन—उषःकाल, सूर्योदय, गड आला पण सिंह गेला, सूर्यग्रहण, केवळ स्वराज्यासाठीं व रूपनगरची राजकन्या; चवथा, पेशवाईकालीन—मध्यान्ह, म्हैसूरचा वाघ.

प्रत्येक ऐतिहासिक कादंबरी रचण्यापूर्वी हरिभाऊ तत्कालीन इतिहासाचा अत्यंत सूक्ष्म रीतीनें अभ्यास करीत. वज्राघात कादंबरी लिहिण्यापूर्वी विजयनगरच्या इतिहासाची सामग्री मिळविण्याची त्यांनीं अतिशय खटपट केली. *A Forgotten Empire*-by **Sewell**, *A Never to be Forgotten Empire*-by **Suryanarayanrao** या विजयनगरासंबंधींच्या इतिहासग्रंथांचा त्यांनीं खोल अभ्यास केला होता. रामराजाच्या

सैन्यांतील कोणा मुसलमान सरदारानें फितुरी केली याबद्दलची दंतकथा या कादंबरीचा सूत्राधार आहे.

चंद्रगुप्त या कादंबरीसाठीं त्यांनीं पद्मपुराण व मुद्राराक्षस या दोन ग्रंथांचा मार्मिक अभ्यास केलेला दिसतो. शिवकालीन कादंबऱ्यांसाठीं इलिअट, डॉसन यांनीं केलेलीं पर्शिअन बखरींचीं भाषांतरें, काव्येतिहासंग्रह, पोवाडे, मनूकीचें आत्मवृत्त एवढीच ऐतिहासिक सामग्री त्यांजपुढें होती व तिच्याच आधारें त्यांनीं आपल्या मराठेशाहीवरील कादंबऱ्या लिहिल्या. प्रो. जदुनाथ सरकार, इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, श्री. गोविंद सखाराम सरदेसाई इत्यादि विद्वान् इतिहास-संशोधकांनीं शोधून काढलेलें ऐतिहासिक ज्ञानभाण्डार त्या वेळीं हरिभाऊंना लाभलें नव्हतें. तरी उपलब्ध साहित्याचा त्यांनीं अत्यंत मार्मिकपणानें उपयोग केला.

ऐतिहासिक कादंबऱ्या म्हणजे इतिहास नव्हे. त्या कथा असून त्यांत ऐतिहासिक सत्य पूर्णत्वानें असणें शक्य नाहीं. त्यांत ऐतिहासिक सत्याभास असतो व याच दृष्टीनें या कादंबऱ्यांचें निरीक्षण केलें पाहिजे. हरिभाऊंच्या प्रत्येक कादंबरींत ऐतिहासिक सत्याचें प्रमाण मोठें आहे. 'कालकूटां'तील पृथ्वीराज चव्हाण व जयचंद यांचें वैमनस्य इतिहासप्रसिद्धच आहे. 'चंद्रगुप्त' या कादंबरींतील चंद्रगुप्त, विष्णुगुप्त ऊर्फ चाणक्य, राक्षस, मुरादेवी, पर्वतेश (पोरस) हीं पात्रें ऐतिहासिक आहेत. 'उषःकालां'तील शिवाजी, तानाजी, येसाजी, रामदास, मुरारपंत, दादोजी, जिजाबाई हीं पात्रें व सुलतानगडावर स्वराज्याचें तोरण बांधण्याचा प्रसंग खरा आहे. 'सूर्योदयां'तील प्रतापगडचें युद्ध व अफजुलखानाचा वध हे प्रसंग खरे आहेत. त्याचप्रमाणें नेताजी, सय्यद बंडा, गोपीनाथपंत वकील हीं पात्रें ऐतिहासिक आहेत.

'सूर्यग्रहण' या कादंबरीचें कथानक शिवाजीमहाराज जयसिंगाच्या आग्रहावरून औरंगजेब बादशहास भेटण्यास आग्र्यास गेले व तेथें कैदेंत पडले असें आहे. जयसिंगास शिवाजीमहाराजांसंबंधीं वाटणारा आदर व प्रेम हीं इतिहासास धरूनच कादंबरीकारानें वर्णिलीं आहेत.

'गड आला पण सिंह गेला' यांतील बहुतेक भाग ऐतिहासिक आहे. शिवाजी, उदयभानू, कमलकुमारी, तानाजी, सूर्याजी, शेलारमामा, रायबा इत्यादि पात्रें ऐतिहासिक आहेत.

## हरि नारायण आपटे

' केवळ स्वराज्यासाठीं ' या कादंबरींतील संभाजी राजांचा हृदयद्रावक अंत, रायगडचा किल्लेदार सूर्याजी पिसाळ मोंगलांस फितूर होऊन रायगड मोंगलांच्या ताब्यांत देतो व संभाजीचा पुत्र शिवाजी व राजमाता येसूबाई औरंगजेबाच्या कैदेंत पडतात हा प्रसंग, तसेंच राजारामाचें जिंजीस जाणें व अतिशय शिकस्तीनें परत येणें हे तिन्ही अपयशाचे प्रसंग इतिहासांतील आहेत.

' वज्राघात ' म्हणजे विजयनगरच्या विनाशाचें चित्र होय. तालिकोटची लढाई व तींत झालेला रामराजाचा अंत, या गोष्टी इतिहासप्रसिद्ध आहेत व त्यावरच कादंबरीचें कथानक रचलेलें आहे. ऐतिहासिक व्यक्तींच्या गुणदोषांची चर्चा यथायोग्य व मार्मिक रीतीनें केलेली असून त्यांजविषयींच्या प्रचलित लोक-समजुतींस धक्का बसेल असें वर्णन कोठेंच आढळत नाहीं.

परंतु इतिहासांतील नाना प्रसंगांचे दुवे एकमेकांत सफाईनें अडकवून देऊन गतकाल मूर्तिमंत डोळ्यासमोर उभा करण्याचें दुष्कर कार्य कादंबरीकारानें कौशल्यानें पार पाडलें. देशाचा इतिहास म्हणजे केवळ त्यावर राज्य करणाऱ्या राजांचें चरित्र नसून देशांतील सामान्य, थोर, गरीब, श्रीमंत इत्यादि लोकांचें चरित्रच होय. परंतु इतिहासांत युद्धप्रसंग, सन व राजांचीं नांवेंच केवळ असल्यानें त्या कालाची योग्य कल्पना येत नाहीं. म्हणून आपल्या कल्पनेनें गतकालाची पार्श्वभूमि सुंदर रीतीनें सजवून तीवर ऐतिहासिक प्रसंग योग्य ठिकाणीं बसविणें हेंच ऐतिहासिक कादंबरीकाराचें महत्त्वाचें कार्य होय. हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्यांतील पार्श्वभूमि कशी रंगविली व ऐतिहासिक प्रसंगांचे सांधे बेमालूम कसे जुळविले हें पाहणें अगत्याचें आहे.

ऐतिहासिक भाग खुलविण्यासाठीं व ऐतिहासिक प्रसंगांचें रहस्य स्पष्ट करण्यासाठीं कादंबरीकारानें कल्पनारमणीय पात्रें व प्रसंग हीं निर्माण केलीं आहेत. त्या प्रसंगांनीं व पात्रांनीं मूळचें ऐतिहासिक कथानक अधिक चित्ताकर्षक होऊन उठून दिसतें. उषःकालांतील सुल्तानगडच्या किल्लेदाराचा देशाभिमानी पुत्र नानासाहेब व त्याची पत्नी चंद्राबाई या उपकथानकामुळें कादंबरी अधिक मनोरंजक झाली आहे. धारगांवचा प्रतापराव व त्याची वेडी पत्नी या दुसऱ्या उपकथानकामुळें गोष्टीस अधिकच रंग चढला आहे. बलभीमाच्या आसनाखालील भुयार, जगदंबेचें भव्य मंदिर व तेथें चालणारीं, शिवाजीमहाराज, त्यांचे अनुयायी व श्रीधरस्वामी यांचीं गुप्त खलबतें काल्पनिक असलीं तरी स्वाभाविक वाटतात.

## कादंबऱ्यांचा चटकदार आरंभ

' केवळ स्वराज्यासाठीं ' या कादंबरींतील किल्लेदारणीचें पात्र हरिभाऊंनीं निर्माण केलेलें असलें तरी अत्यंत सुंदर आहे. तिच्या कारस्थानावरच एकंदर कथानक अवलंबून आहे. दगलबाज सूर्याजी पिसाळ व त्याची स्वामिनिष्ठ, सत्यवादी, तेजस्वी पत्नी या दोन पात्रांतील विरोधदर्शन कादंबरीच्या सौंदर्यांत भरच टाकतें.

स्वराज्यस्थापनेच्या वेळीं तत्कालीन तरुणांच्या अंतःकरणांत चाललेल्या तळमळीचें प्रतिबिंब नानासाहेब व प्रतापराव ( उषःकाल ) यांच्यामध्यें पडलेलें दृष्टीस पडतें, तर संभाजीराजाच्या बेबंदशाहीमुळें स्वराज्याकरितां ज्यांचे प्राण तिळतिळ तुटत होते अशा तरुणांची मनःस्थिति हिराजी व शंकराजी ही पात्रें रंगवून त्यांनीं दिग्दर्शित केली आहे. हीं पात्रें काल्पनिक असलीं तरी त्या कालास शोभणारीं असल्यानें यत्किंचितही विसंगतता उत्पन्न होत नाहीं.

हरिभाऊ आपल्या कादंबऱ्यांचा आरंभ अत्यंत चटकदार करतात. चंद्रगुप्ताचें पहिलें प्रकरण ' वत्सलाभ, ' वज्राघाताचें पहिलें प्रकरण ' कुंजवनांत, ' सूर्योदयाचें प्रथम प्रकरण ' चिंता, ' सूर्यग्रहणाचें पहिलें प्रकरण ' पुरश्चरणाचें पवित्र स्थान ' हीं या दृष्टीनें अतिशय उत्तम साधलीं आहेत. नाटकांतील पहिल्या प्रवेशावर जसें नाटककाराचें यश अवलंबून असतें तसेंच कादंबरीतील प्रवेशप्रकरणावर कादंबरीकाराचें यश अवलंबून आहे. सर्वोत्कृष्ट कादंबऱ्यांची ही कसोटी हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांस लाविली असतां त्यांच्या कादंबऱ्या या कसोटीस सर्वस्वीं उतरतात असें म्हणतां येईल.

हिमालयांतील खोऱ्यांत वास करणाऱ्या गुराख्यास, तो हरवलेलें वत्स शोधीत असतां पौर्णिमेच्या शीतल चंद्रिकेंत वटवृक्षाखालीं पाचोळ्यावर ठेविलेल्या सुंदर राजबिंड्या बालकाचा—चंद्रगुप्ताचा—लाभ होतो व तदनंतर हरवलेल्या वांसराचाही लाभ होतो. हे दोन प्रसंग एकत्र गोंवून दुहेरी वत्सलाभ साधण्याचें कादंबरीकाराचें कौशल्य त्याच्या रसिकतेची साक्ष पटवितें. ' हा बालक असावा तरी कोण ? ' अशा रीतीचें कुतूहल जागृत करण्याचें कार्य या प्रसंगामुळें उत्तम रीतीनें साधलें आहे. चंद्रगुप्ताचें हें प्रथमदर्शन आकर्षक वाटतें.

उषःकालांत वाट चुकून मारुतीच्या देवालयांत आलेल्या तरुण शिपायांच्या मनांत तेथील प्रकार पाहून जशी नाना विचारांची खळबळ उडते तशीच त्या शिपायांस पाहून व देवालयांतील मारुतीची मूर्ति सरकलेली पाहून वाचकांच्याही मनांत उडते.

## हरि नारायण आपटे

'सूर्योदयां'त पहिल्याच प्रकरणांत एका मोठ्या वाघाचें व लहान वाघाचें युद्ध व त्यांत झालेली लहान वाघाची सरशी दाखवून अफजुलखानाच्या वधाचा व शिवाजीमहाराजांच्या विजयाचा पुढील कथाभाग सूचित केला आहे.

रसपरिपोष व कथापरिपोष करण्यांत हरिभाऊंचा हातखंडा आहे. मूळ कथानकाच्या जोडीस एक, दोन व केव्हां केव्हां तीनसुद्धां उपकथानकें ते निर्माण करितात व मूळ कथानकाशीं त्यांची सांखळी इतक्या कौशल्यानें जोडतात कीं, त्यांच्या कारागिरीचें अतिशय कौतुक वाटतें. मूळ कथानकाची गोडी अखेरपर्यंत कायम ठेवण्यासाठीं अशा तऱ्हांचीं उपकथानकें व पात्रें कादंबरीकारास योजावीं लागतात. 'उषःकाल' या कादंबरीचें मुख्य कथानक म्हणजे शिवाजीनें सुलतानगड काबीज करून बांधलेलें स्वराज्यमंदिराचें तोरण हें होय. हें मूळ कथानक उठून दिसावें म्हणून त्यांनीं तीन उपकथानकें घातलीं आहेत. नानासाहेब व त्यांची पत्नी चंद्राबाई या जोडीबद्दल वाचकांची सहानुभूति अखेरपर्यंत राहते. तरुण मराठा सरदाराच्या वेषांतील चंद्राबाई व तिच्याबद्दल आदरयुक्त प्रेम बाळगणारा उदार रणदुल्लाखान, नानासाहेबांवर अकृत्रिम प्रेम करणारी रणदुल्लाखानाची कोमलहृदयी साध्वी भगिनी मेहेरजान, यांच्यामुळें कादंबरींत अत्यंत गोडी उत्पन्न झाली आहे. मुसलमानांच्या निर्दय छळामुळें प्रतापराव व त्याची पत्नी यांची झालेली दुःस्थिति पाहून अंतः-करणांत करुणा उत्पन्न होते, तर रामदेवरावाची पत्नी रंभावती हिला बादशहाच्या अंतःपुरांत बळजबरीनें घालणाऱ्या सय्यदुल्लाखानाचा नीचपणा पाहून तिटकारा येतो. नानासाहेब व प्रतापराव जिवलग स्नेही असून मुसलमानांच्या जुलुमाला कंटाळून शिवाजीमहाराजांस जाऊन मिळतात. रामदेवरावाचा तर अतोनात छळ झाल्यामुळें शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नांबद्दल त्याची पूर्णपणें सहानुभूति असते. अशा रीतीनें मुख्य कथानकाशीं उपकथानकांचा अगदीं जिव्हाळ्याचा संबंध जोडला आहे.

'सूर्योदयां'तील अफजुलखानवधाच्या मुख्य कथानकाच्या जोडीस चंद्रराव मोऱ्याची कन्या ताराबाई हिनें आपल्या पित्याच्या वधाबद्दल शिवाजीवर सूड उगविण्यासाठीं रचलेलें कारस्थान आहे. दोन प्राणघातक अनर्थ गुदरले असतांही भवानी मातेच्या कृपेनें शिवाजीमहाराज सर्व संकटांतून पार पडले. 'उषःकालां'तील उपकथानकांइतकें हें कथानक चटकदार नाहीं, तरी कादंबरीची रसात्मकता त्यामुळेंच कायम राहिली आहे.

## कादंबऱ्यांतील रचना-चातुर्य

हरिभाऊंचीं ऐतिहासिक कथानकें गुंतागुंतीचीं असतात. कादंबऱ्यांतील कांहीं पात्रें वेष बदलून वावरत असल्यानें नानाप्रकारचे चमत्कारिक प्रसंग निर्माण होऊन गोष्टीचें मनोरंजकत्व वाढतें. 'उषःकालां'त तरुण मराठा सरदाराच्या वेषांतील चंद्राबाईवर रणदुल्लाखानाच्या अतिप्रसंगामुळें ओढवलेले विलक्षण प्रसंग, यमाजीनें बातमी काढण्याकरितां घेतलेलें मरिआईचें सोंग, कातकरी व कातकरीण बनून यमाजी व येसाजी यांनीं पुरंदर किल्ल्यांतून श्रीधरस्वामींची सुटका करण्याकरितां केलेलें कारस्थान, कांळ्याकभिन्न गृहस्थाचें गूढ, इत्यादि गोष्टी कथानकाच्या रहस्यांत भर घालतात.

पुरुषवेषांत हिंडणारी दुसरी स्त्री म्हणजे 'सूर्योदयां'तील चंद्रराव मोऱ्यांची कन्या ताराबाई ही होय! बालगोसाव्याचा वेष परिधान करून घनदाट अरण्यामध्यें भुयार खणून त्यांत दारूगोळा भरून शिवाजीमहाराजांचा सूड उगविण्याचें तिनें केलेलें धाडस विलक्षण आहे.

शिवाजीमहाराजांचे हेर गोसाव्याचा, कानफाट्याचा वेष घेऊन शत्रूकडील बातमी आणतात, तर कोणी भविष्य सांगणाऱ्या ज्योतिष्याचें सोंग घेऊन मोंगलांच्या छावणींत प्रवेश करितात. शहाजाद्याचा विश्वासू नौकर बनून मोंगलांचे गुप्त बेत समजून घेण्यासाठीं त्यांच्या गोटांत जाण्याचें खंडो बल्लाळाचें धैर्य ( केवळ स्वराज्यासाठीं ) अवर्णनीय आहे. प्रत्यक्ष शिवाजीमहाराजांनींही प्रसंग पडेल तेव्हां वेष पालटले आहेत. सुलतानगडाच्या साऱ्या गुप्त वाटा शोधण्यासाठीं ते सांवळ्याचे मामा होतात, तर अफजुलखानाशीं सामना देण्यापूर्वी त्याला जवळून न्याहाळून पाहून त्याचें सामर्थ्य अजमाविण्यासाठीं एक मुंडासें बांधून रताळीविक्याचें सोंग घेतात. 'रूपनगरची राजकन्या' या कादंबरींत दुर्गादास व इंदिरा या दोघां बहिणभावंडांनीं नाना वेष पालटून धन्याची कामगिरी बजाविली आहे. 'केवळ स्वराज्यासाठीं'-मधील रायगडच्या किल्लेदारणीनें संतिणीच्या वेषांत राहून शाहूमहाराज व राजमाता येसूबाई यांना सोडविण्याची अतोनात खटपट केली. 'गड आला पण सिंह गेला' या कादंबरींत तानाजीनें गोंधळ्याचें सोंग घेऊन सिंहगडच्या पायथ्याशीं असणाऱ्या लोकांस वश करून घेतलें. तोताराम गोंधळ्याचें हें सोंग व त्याचा तो पोवाडा हीं फार अप्रतिम साधलीं असून त्यामुळें वाचक देखील फसून जातो. अशा तऱ्हेच्या युक्त्या योजून हरिभाऊंनीं आपलें रचनाचातुर्य व्यक्त केलें आहे.

## हरि नारायण आपटे

हीरभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्या वाचीत असतां आपण जुन्या काळांत वावरत आहोंत असें तेव्हांच वाटतें. त्या वेळच्या स्त्रीपुरुषांचे आयुष्यक्रम हल्लींच्याहून किती तरी भिन्न! मुसलमानांचा अंमल चालू असल्यानें केव्हां गांवावर त्यांची धाड येईल याचा नेम नसे. घोड्यावर बसण्यांत व तरवार चालविण्यांत पुरुषांनाच केवळ नव्हे तर स्त्रियांनाही प्रवीण होणें अत्यंत आवश्यक असे. 'सूर्योदयां'तील जाधवरावांची पत्नी घोड्यावर बसण्यांत अत्यंत कुशल आहे. 'उषःकालां'त चंद्राबाई पुरुषवेषांत असून सुलतानगडापासून विजापुरापर्यंत घोड्यावर बसून मजल दरमजल करीत जाते. राजकीय परिस्थिति अशी बिकट असल्यानें धाडस व बाणेदारपणा दाखविण्याचे प्रसंग स्त्रियांवर नेहमीं येत. लोक घोड्यांवरून किंवा पायीं प्रवास करीत, परंतु प्रवासांत मुसलमानांचे हल्ले अचानक पडत. गोब्राह्मणांचा छळ चाले. अशा प्रसंगीं नेहमीं पडदानशीन असणाऱ्या स्त्रियांनाही अनेक वेळां पडद्याबाहेर यावें लागे. रणांत पराक्रम गाजवून 'मुसंड्यांची' हड्डी नरम करण्याची प्रत्येक तरुणास महत्त्वाकांक्षा असे. मुसलमानी अंमलाला कंटाळलेले तरुण शिवाजीस जाऊन मिळत. मुसलमानांच्याबद्दल पूज्यबुद्धि बाळगणारे स्वामिभक्त मराठे सरदार शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नास तीव्र विरोध करीत, इत्यादि तत्कालीन समाजांतील गोष्टींचें वर्णन हरिभाऊंनीं उत्तम रीतीनें केलें आहे. मराठ्यांची गनिमी काव्याची युद्धपद्धति, त्यांचीं बरची, ढाल, तलवार, इत्यादि हत्यारें, त्यांचे मुसलमानी धर्तीचे पोषाख, फारसीमिश्र मराठी भाषा, मुसलमानांशीं संबंध असल्यामुळें उर्दूभाषेवरील प्रभुत्व, मोठमोठ्या किल्ल्यांतील व वाड्यांतील हल्ला आला असतां जीव वांचवून तेथून निघून जाण्यासाठीं बांधलेलीं भुयारें, अवरंगजेबाच्या समुद्रासारख्या अफाट छावणीचीं, विजापूरच्या सुलतानाच्या राजवाड्यांचीं वर्णनें, बादशहाच्या जनानखान्यांतील कारस्थानें, इत्यादि गोष्टी वाचून आपण अगदीं भिन्न वातावरणांत संचार करीत असून त्या कालांत व आजच्या कालांत महदंतर आहे असें वाटल्यावांचून रहात नाहीं. ' चंद्रगुप्त ' वाचतांना प्राचीन हिंदुस्थान समोर दिसतें, तर स्वराज्यासंबंधींच्या कादंबऱ्या वाचतांना शिवाजी व रामदास यांचें महाराष्ट्र दृष्टीस पडतें. ' रूपनगरची राजकन्या ' वाचीत असतां औरंगजेब बादशहाच्या वेळच्या वातावरणांत वाचक वावरतात, तर ' मध्यान्हां 'त पेशवाईतील समाजांत हिंडत आहांत असें वाटतें. अशा रीतीनें गतकालीन समाजांतील चालीरीति, राजकारण,

स्त्रीपुरुषांचीं ध्येयें, त्यांचे विचार, त्यांच्या भावना, यांचें हुबेहूब शब्दचित्र काढण्याचा प्रयत्न हरिभाऊंनीं केलेला आहे.

शिवाजीमहाराजांस भवानी देवीचा साक्षात्कार होत असून प्रत्यक्ष देवता त्यांच्या देहांत संचार करी; तत्प्रसंगीं त्यांच्या मुखांतून प्रत्यक्ष भवानी मातेचीच वाणी निघे; या बखरींतील दंतकथेचा हरिभाऊंनीं पुढील कथाभाग सूचित करण्यासाठीं अत्यंत मार्मिक उपयोग केला आहे.

ऐतिहासिक कादंबऱ्यांत हरिभाऊंनीं अद्भुतरसाचा उत्कृष्ट परिपोष केला आहे. अद्भुत प्रसंग इतक्या स्वाभाविक रीतीनें घडवून आणले आहेत कीं, त्यांचा वाचकांच्या मनावर दृढ संस्कार होतो. बलभीमाच्या आसनाखालील भुयार, श्रीधरस्वामींची पुरंदर किल्ल्यावरून सुटका, चिमुकल्या सांवळ्याची करामत, 'सूर्योदयां'तील जावळीच्या अरण्यांतील भुयार, जाधवांच्या पत्नीचा पराक्रम, रायगडाच्या किल्लेदारणीची संतिणीच्या वेषांतील आश्चर्यकारक कामगिरी, दुर्गादास व इंदिरा यांना भिंतींत चिणून मारणें, 'वज्राघातां'तील मेहेरजानचें रहस्यमय जीवन, इत्यादि नाना प्रसंग अद्भुत असूनही स्वाभाविक वाटतात, यांवरून हरिभाऊंच्या कौशल्याची परीक्षा होते.

शिवकालीन कादंबऱ्यांत हरिभाऊंनीं ऐतिहासिक स्थलांसंबंधीं विशेष चुका केल्या नाहींत. सिंहगड, तोरणा, रायगड, पुरंदर, जिंजी इत्यादि किल्ले व विजापूर, आग्रा, दिल्ली, दौलताबाद, इत्यादि इतिहासप्रसिद्ध शहरें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलीं असल्यानें त्यांचीं वर्णनें बिनचूक आहेत. शिवाजी, रामदास, संभाजी, राजाराम, तानाजी, उदयभानू, अवरंगजेब इत्यादि प्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्तींचें रूप, वय, स्वभाव इत्यादिकांचीं वर्णनेंही हुबेहूब आहेत. परंतु 'रूपनगरची राजकन्या' या कादंबरींत स्थल, काल, व्यक्ति या बाबतींत बऱ्याच चुका आढळतात. उदेपूरचा राणा राजसिंह व जोधपूरचा पराक्रमी सरदार दुर्गादास हे कथानकाच्या काळीं पन्नाशी उलटलेले वयोवृद्ध गृहस्थ असून हरिभाऊंनीं त्यांना ऐन पंचविशींत ओढलें आहे. रोषनार बेगमेचें कारस्थान चोवीस वर्षांनीं पुढें ढकललें आहे. 'रूपनगर' हें स्थलही काल्पनिक आहे. मात्र अबूच्या पहाडांतील रम्य स्थळांचीं वर्णनें बिनचूक आहेत. परंतु दिल्ली व अबूचा पहाड या दोन स्थलांतील अंतर बरेंच असूनही कादंबरींतील पात्रें अत्यंत अल्पावकाशांत एका स्थळाहून दुसऱ्या स्थळास जातात!

हल्लींच्या काळांतही कदाचित् इतक्या लवकर प्रवास होणार नाहीं! परंतु ही स्थल-कालाची चूक ज्या मनूकी नामक इटॉलिअन इतिहासकाराच्या आधारें हरिभाऊंनीं कादंबरी लिहिली त्याची आहे.

'सूर्योदयां'त स्थलकालाची चूक नसली तरी ताराबाईचें कारस्थान मुख्य कथानकाशीं तितकेंसें कौशल्यानें जोडलें गेलें नाहीं. त्याचप्रमाणें प्रतापगडच्या नजीकच्या रानांत चाललेल्या कारस्थानाची वार्ता शिवाजीमहाराजांस लागत नाहीं ही गोष्ट त्यांच्या मुत्सद्दीपणास व दूरदर्शित्वास न शोभण्यासारखी आहे. जाधवाच्या पत्नीच्या प्रसंगावधानानेंच शिवाजीमहाराजांचे प्राण बांचले, शिवाजीमहाराज भोंदू साधूच्या भाषणानें फसले व केवळ दैवयोगानें त्यांची सुटका झाली, हा प्रसंग त्यांच्या ओजस्वी चारित्र्यास वैगुण्य आणणारा आहे.

सामाजिक कादंबऱ्यांप्रमाणेंच ऐतिहासिक कादंबऱ्याही हप्त्याहप्त्यानें 'करमणुकीं'-तून प्रसिद्ध झाल्यामुळें त्यांच्यांतही पाल्हाळ, पात्रांचा गोंधळ, कथानकरचनेंत अव्यवस्थितपणा इत्यादि दोष शिरले आहेत. 'सूर्योदयां'तील जावळीच्या रानाचीं वर्णनें, 'केवळ स्वराज्यासाठीं' मधील शेवटला ऐतिहासिक भाग, लांबच लांब असल्यानें कंटाळवाणे वाटतात. 'उषःकालां'त श्रीधरस्वामीस प्रथम नरहरस्वामी असें संबोधलें आहे. पुढें मात्र नरहरस्वामी हें नांव लुप्त होतें. 'वज्राघातां'त मेहेरजानवर देखरेख ठेवणारा रामराजाचा नोकर धनमल्ल याचा मध्यंतरीं कादंबरीकारास विसर पडलेला दिसतो. कथानकांतील पात्रांचीं नांवें वाजवीपेक्षां अधिक वेळ गुप्त ठेवण्यांत कादं-बरीकाराची चूक झालेली दिसते. 'उषःकालां'त, वाचकांना शिवाजीचें नांव तर्कानें कळल्यानंतर कितीतरी वेळानें कादंबरीकारानें तें उघड सांगितलें आहे. तशीच गोष्ट स्वराज्यांतील किल्लेदारणीसंबंधीं झाली आहे.

ऐतिहासिक कादंबऱ्यांत पात्रें व प्रसंग यांची पुनरुक्ति झाली आहे. भुयारें, बातमी काढण्याकरितां हेरांनीं घेतलेलीं गोसाव्यांचीं, कुडमुड्या ज्योतिष्यांचीं सोंगें, त्यांचीं कारस्थानें इत्यादि निरानिराळ्या कादंबऱ्यांतील गोष्टींत अतिशय सारखेपणा असल्यानें कांहींच नावीन्य वाटत नाहीं.

हरिभाऊंच्या पुढें आदर्श म्हणून स्कॉटच्या ऐतिहासिक कादंबऱ्या होत्या. *Talisman, Abbot, Ivanhoe, The Bride of Lammermoor, Monastery*, इत्यादि कादंबऱ्यांचें निरीक्षण केलें असतां, स्कॉटची दृष्टि गतकालाकडे

दिसते; परंतु हरिभाऊंची दृष्टि गतकालाकडे नसून भविष्यकालाकडे आहे. वैभवास पोहोंचलेल्या स्कॉटलंडच्या गतेतिहासाचें परीक्षण सर वॉल्टर स्कॉट यानें स्कॉटलंडवरील निरतिशय प्रेमामुळें केलें. स्कॉटिश देशभक्तांचे गुणानुवाद गाणें व जुन्या स्कॉटिश् समाजांतील स्त्रीपुरुषांचीं चरित्रें कथन करणें हाच त्याचा हेतु होता. परंतु हरिभाऊंना वैभवसंपन्न स्वतंत्र महाराष्ट्राचें चित्र रंगवून व स्वतंत्र, तेजस्वी, बाणेदार स्त्रीपुरुषांचीं चित्रें रेखाटून आमच्या समाजांत स्वातंत्र्येच्छा व देशाभिमान जागृत करावयाचा होता. गतेतिहासांतील कथानकें कथन करितांना सांप्रतचें हिंदुस्थान बंधनाच्या लोखंडी शृंखलेनें बद्ध आहे या गोष्टीचें त्यांस विस्मरण होत नाहीं. धाडसी, पराक्रमी, ओजस्वी अशा स्त्रीपुरुषांचे गुणानुवाद गात असतां, ‘ पहा हे तुमचे स्वार्थत्यागी शूर पूर्वज! देशांत स्वराज्यस्थापना करण्यास व राखण्यास ते कसे झटले तें पहा, ’ असेंच हरिभाऊ वाचकांस म्हणत आहेत असा भास होतो.

पात्रांच्या तोंडीं त्यांच्या योग्यतेप्रमाणेंच विचार व भाषा घातली आहे, यामुळेंच हरिभाऊंच्या कादंबऱ्या सुंदर वाटतात. शिवाजी, तानाजी, श्रीधरस्वामी, राजाराम, इत्यादिकांचीं भाषणें स्वदेशप्रेमानें पूर्ण भरलेलीं आहेत. त्यांचे विचार प्रौढ, गंभीर व उदात्त आहेत. अफजुलखान, अवरंगजेब इत्यादिकांच्या अंगीं जेत्यांस नैसर्गिक असा उन्मत्तपणा असल्यानें त्यांच्या दर्पोक्ति स्वाभाविक वाटतात. जिजाबाई, रायगडची किल्लेदारीण, जाधवरावाची पत्नी, मेहेरजान, येसूबाई, माता रणदेवी, रूपमती इत्यादि स्त्रीपात्रांचीं भाषणें अत्यंत सुंदर उतरलीं आहेत. त्यांच्या भाषणांत त्यांच्या मनाचा नैसर्गिक मोहकपणा, गांभीर्य, विनय व उदारपणा हीं दृष्टीस पडतात.

हरिभाऊंनीं ऐतिहासिक कादंबऱ्यांत सुमारें सव्वाशें ठळक पात्रें रेखाटलीं असून त्यांपैकीं सुमारें साठ ऐतिहासिक व बाकीचीं काल्पनिक आहेत. उषःकाल, सूर्योदय, सूर्यग्रहण, गड आला पण सिंह गेला, यांतील कथानायक शिवाजी आहे. चंद्रगुप्तांतील नायक चंद्रगुप्त, केवळ स्वराज्यासाठीं यांतील राजाराम, कालकूटांतील पृथ्वीराज चव्हाण, मध्यान्हांतील सवाई माधवराव, वज्राघातांतील रामराजा हे सर्व कथानायक ऐतिहासिक व्यक्ति आहेत. परंतु रूपनगरची राजकन्या रूपमती व म्हैसूरचा वाघ या कादंबरींतील कथानायक कासीम, हीं मुख्य पात्रें काल्पनिक आहेत. शिवाजीचे प्रतिस्पर्धी विजापूरचा आदिलशाहा, अफजुलखान, अवरंगजेब व

उदयभानू हे आहेत. चंद्रगुप्ताचा प्रतिस्पर्धी राक्षस, संभाजी-राजारामांचा अवरंगजेब, पृथ्वीराजाचा जयचंद, सवाई माधवरावाचा रघुनाथराव ऊर्फ दादासाहेब व रामराजाचा रणमस्तखान आहे. रूपमतीशीं उदेपुरी बेगमेचा विरोध आहे, तर कासिमाशीं वृद्ध खानाचा आहे.

शिवाजी आपल्या स्वामिभक्त मावळ्यांच्या मदतीनें व श्रीसमर्थ आणि भवानी-माता यांच्या कृपेनें शत्रूंचा नाश करतो. चंद्रगुप्त चाणक्याच्या कारस्थानकौशल्यानें राक्षसास जिंकतो. राजाराम, संताजी, धनाजी, खंडो बल्लाळ इत्यादि स्वार्थत्यागी थोर पुरुषांच्या मदतीनेंच पुनः स्वराज्याची स्थापना करतो. वज्राघाताचा अंत शोककारक आहे. रामराजाचा प्रतिस्पर्धी रणमस्तखान याचीच अखेर सरशी होते. रूपमतीचा पति राजसिंह अवरंगजेबास अचलेश्वरानजीक खिंडींत गांठून त्याच्या सैन्याचा धुव्वा उडवितो. वृद्ध खानाच्या मृत्यूमुळें कासीमचा भाग्योदय होऊन त्याच्या प्रियकरणीचा त्यास लाभ होतो. कालकूट कादंबरींतील पृथ्वीसिंगाचा द्वेष करणाऱ्या विमलेचीही फजिती होऊन तिला मूग गिळून स्वस्थ बसणें भाग पडतें.

ऐतिहासिक पात्रांचीं स्वभावचित्रें ऐतिहासिक सत्यास धरून आहेत. शिवाजी-महाराजांची उज्ज्वल धर्मनिष्ठा, गोब्राह्मणांचें प्रतिपालन करण्याची दक्षता, स्वातंत्र्य-प्रीति, समर्थ रामदासांबद्दलची अनुपम भक्ति, शत्रूंच्या स्त्रियांबद्दलही दाक्षिण्य व आदर, शत्रू मृत्यु पावतांच वैर विसरून जाऊन त्याला मूठमाती देण्याइतकी त्यांची उदारता, त्यांची अवर्णनीय मातृभक्ति व मित्रप्रेम, भवानी मातेची त्यांज-वरील कृपा व तिचे दृष्टांत, त्यांचा मुत्सद्दी व धोरणी स्वभाव, त्यांची असाधारण बुद्धिमत्ता व अत्यंत उदात्त चारित्र्य इत्यादि सर्व गोष्टी इतिहासास धरूनच आहेत.

अवरंगजेबाचें स्वभावचित्र रेखाटण्यांत हरिभाऊंचा निःपक्षपातीपणा स्पष्ट दिसतो. अवरंगजेब दुष्ट, कपटी, संशयी, विश्वासघातकी, धर्मवेडा खरा, परंतु त्यालाही एकच एक असें नाजुक प्रेमाचें स्थान होतें व तें म्हणजे त्याची प्रियतम कन्या झेबुन्निसा बेगम हें होय. झेबुन्निसा बेगमेच्या एका शब्दानें त्याचें कठोर हृदय विरघळून जाई. हिच्यावरील त्याच्या निःसीम प्रेमामुळें संभाजीचे बेगमेसंबंधींचे अपमानास्पद उद्गार त्यास सहन झाले नाहींत. या आपल्या आवडत्या कन्येसाठीं त्यानें नजरकैदेंत असतांना संभाजीराजांचे पुत्र शिवाजी ऊर्फ शाहूमहाराज व पत्नी येसूबाई यांचा प्रेमानें व आदरानें प्रतिपाळ केला. त्याच्या धर्ममताचा हरिभाऊंनीं उदार

अंतःकरणानें विचार केला आहे. इस्लामी धर्माचा स्वीकार केल्यावांचून कोणाही मनुष्यास परमेश्वर-प्राप्ति होणार नाहीं अशी त्याची प्रामाणिक समजूत असून एका हातांत तरवार व दुसऱ्या हातांत कुराण घेऊन सर्व हिंदुस्थानभर इस्लामी धर्माचा प्रसार करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. जुलूम करून कां होईना परंतु हिंदूंना मुसलमान करून त्यांना स्वर्गाचें द्वार खुलें करून द्यावें अशी त्याची इच्छा असून तसें करणें आपलें पवित्र कर्तव्य होय अशी त्याची भावना होती. अवरंगजेबाच्या स्वभावाची ही बाजू हरिभाऊंनीं मार्मिकपणें रेखाटली आहे. ‘ केवळ स्वराज्यासाठीं ’ या कादंबरींतील संभाजीचें चित्र हृदयस्पर्शी आहे. अवरंगजेबाच्या कैदेमधील संभाजीचा पश्चात्ताप, त्याच्या हृदयांतील खळबळ व त्याचें अखेरचें तेजस्वी वर्तन व बाणेदारपणा स्फूर्तिदायी आहे. संभाजीनें दहा वर्षें तुरुंगांत डांबवून ठेविलें असतांही ज्याच्या मनाची उदारता नष्ट होत नाहीं त्या राजारामाचा अलौकिक स्वार्थत्याग व देशाभिमान खरोखरी दैदीप्यमान आहे. संताजी, धनाजी, खंडो बल्लाळ यांसारखे त्यागी स्वामिभक्त व स्वराज्यासाठीं तळमळणारे देशभक्त यांनीं आपलें जीवित स्वराज्य-होमास अर्पण केलें. स्वामिकार्यासाठीं सर्वस्व-त्याग करणाऱ्या या स्वामिनिष्ठ पुरुषांची कामगिरी अलौकिक आहे. आपल्या मुलाचें—रायबाचें—ठरलेलें लग्न रहित करून शिवाजीमहाराजांच्या आज्ञेनें रणसंग्रामांत निधडया छातीनें उडी घालून गड घेणाऱ्या तानाजीचा पराक्रम कोणाच्या हृदयांत अभिमान उत्पन्न करणार नाहीं ! ‘ गड आला पण सिंह गेला ’ यांतील कमलकुमारी, उदयभानू, शेलारमामा, सूर्याजी इत्यादि सर्व पात्रें खरीं आहेत. ऐशीं वर्षांच्या शेलारमामाचा पराक्रम व उत्साह पाहून मन चकित होतें.

उषःकालांतील श्रीधरस्वामी यांचें चित्र अत्यंत बाणेदार, तेजस्वी व आदरणीय करण्याची कादंबरीकारांची इच्छा दिसते व वाचकही त्याच दृष्टीनें त्या पात्राकडे पाहतात. परंतु वाचकांची ही अपेक्षा सफल होत नाहीं, याचें कारण हरिभाऊंना ओजोगुण तितकासा साधत नाहीं हेंच असावें.

‘ चंद्रगुप्त ’ या कादंबरींतील राक्षसाचें चित्र असेंच फिकें पडलें आहे. मुत्सद्देगिरी व व्यवहारचातुर्य या दोन गुणांत तो त्याचा प्रतिस्पर्धी जो चाणक्य त्यापेक्षां कमीच असल्यानें तो चाणक्याच्या प्रत्येक कारस्थानांत गुरफटला जातो. सत्यनिष्ठ व सरळ अंतःकरणाच्या राक्षसावर साहजिकच अखेर चाणक्यास विजय मिळतो. परंतु त्या-

साठीं त्यास नानातऱ्हांचे डावपेंच खेळावे लागतात. राक्षस चाणक्यापेक्षां मुत्सद्देगिरींत हीन ठरला तरी त्याची राजनिष्ठा व स्वदेशप्रेम हीं अनुपम आहेत. त्याची तत्त्वनिष्ठा जबर आहे. ' चंद्रगुप्ताचें अमात्यपद स्वीकारलें तर चंदनदासास सोडून देतों,' या चाणक्याच्या पेंचाची तो पर्वा करीत नाहीं. ' चंदनदासाचे प्राण खुशाल घ्या. मी माझ्या प्रतिज्ञेपासून ढळणार नाहीं ' असाच जोरदार जबाब तो देतो.

राक्षसास वश करण्यासाठीं हरिभाऊंच्या चाणक्यास अनेक कारस्थानें योजावीं लागलीं. कुटिलतेच्या सर्व युक्त्या फसल्यावर चाणक्यास अखेर सरळपणाचा मार्ग स्वीकारावा लागला. रक्षाबंधन दाखवून चंद्रगुप्त हाच नंदवंशाचा अंकुर आहे असें चाणक्यानें सिद्ध केलें, तेव्हांच राक्षसानें चंद्रगुप्ताचें अमात्यपद स्वीकारलें. सरलहृदयी कादंबरीकारानें कुटिलपणावर सरलतेचा विजय दाखविला हें योग्यच झालें. राजकारणाच्या दृष्टीनें मुद्राराक्षसांतील राक्षसापेक्षां हरिभाऊंचा राक्षस फिका दिसला तरी अलौकिक तत्त्वनिष्ठेंत त्याच्यापेक्षां कितीतरी पटीनें तो श्रेष्ठ आहे.

चाणक्याची भूमिका रंगवितांना हरिभाऊंच्या प्रतिभेची स्वतंत्र भरारी दृष्टोत्पत्तीस येते. कादंबरीच्या पूर्वार्धांत चाणक्याचें स्वभावलेखन करतांना त्यांनीं आपल्या स्वतःच्या प्रतिभेवरच पूर्ण विश्वास टाकिला आहे. त्या बाबतींत मुद्राराक्षसाचा उपयोग करणें शक्यच नव्हतें. धनानंदानें विनाकारण केलेल्या अपमानाचा सूड घेण्याचें ध्येय चाणक्यानें आपल्यापुढें ठेविलें व त्यासाठीं कुटिल नीतीचा यथास्थित उपयोग केला. मुरादेवीचा रानांत टाकलेला पुत्र चंद्रगुप्त यास हातीं धरून व मुरेला पूर्णपणें ताब्यांत घेऊन धनानंदाचा व त्याच्या पुत्रांचा उच्छेद करण्याची घोर प्रतिज्ञा त्यानें तडीस नेली व नंदावर निष्ठा ठेवणाऱ्या राक्षसावर राजद्रोहाचा व फंदफितुरीचा आरोप आणला. सेनापति भागुरायण यास त्यानें पूर्णपणें आपल्या कबजांत आणलें व अखेरीस राक्षसास जिंकून त्यास चंद्रगुप्ताचें अमात्यपद स्वीकारण्यास लावलें. वस्तुतः चंद्रगुप्ताचें साचिव्य करण्यास चाणक्यापेक्षां खरोखरी योग्य पुरुष दुसरा नव्हता. असें असतांही त्यानें त्या पदाचा त्याग करून नदीतटाकीं पर्णकुटी बांधून तपश्चर्या करण्याचा मार्ग स्वीकारला! चाणक्याचा हा निर्लोभ व अलौकिक स्वार्थत्याग वाचकांच्या हृदयांस जिंकून टाकतो व त्याच्या सर्व दुष्ट—भयंकर—कृत्यांचा विसर पाडतो. त्याची बुद्धिमत्ता, कारस्थानें व कुशल भाषापद्धति यांचा प्रत्यय कादंबरींतही जागोजागीं येतो.

## उषःकालांतील सांवळ्या

'उषःकाला'तील सांवळ्या हें पात्र सर्वोत्कृष्ट आहे. त्याच्या चंचल व तीक्ष्ण नजरेंतून कोणतीही गोष्ट सुटणें अशक्यच असे. सांवळ्या सगळ्या गांवांतला गुंड पोरगा होता. जो तो त्याला वात्रट, चावट म्हणे. परंतु ज्याचें त्याचें त्याजवर विलक्षण प्रेम असे आणि त्याच्यासारखा इमानी पोरगा दुसरा कोठेंही नाहीं असें ज्याला त्याला वाटे. आवजी पाटील त्याला शिव्या देई, परंतु एक प्रहरभर तो त्याच्या नजरेस पडला नाहीं तर त्याला हुडकून आणून त्याच्यासमोर उभा करावा लागत असे. सांवळ्याच्या सत्यप्रियतेबद्दल, इमानीपणाबद्दल, हुषारीबद्दल ज्याची त्याची खात्री असून त्याचा वात्रटपणा त्याच्या इतर गुणांस शोभून दिसे. त्याची चपळता व धाडस खरोखर अवर्णनीय आहेत. सांवळ्या म्हणजे त्या काळच्या तरतरीत पोराचा एक उत्कृष्ट नमुना होता. त्याची तरतरी अविश्रांत व दृष्टि अत्यंत तीक्ष्ण व चंचल. ती कधीं म्हणून एका जागीं ठरावयाची नाहीं. सर्व दिशा हिंडून, सर्व गोष्टी एकदम आपल्या नजरेंत घेण्यास त्याचे नेत्र सदैव हपापलेले असत. जसे त्याचे नेत्र तशींच त्याचीं इतर इंद्रियें होतीं. कोठें कोणी कांहीं बोललें आणि तें सांवळ्याच्या कानांवर गेलें म्हणजे तें त्याच्या डोक्यांत कायमचें बसलें म्हणून समजावें. त्याची उत्साहशक्ति अतिशय जब्बर असल्यामुळें सर्पाच्या वळवळीप्रमाणें त्याला सदोदित वळवळीचें काम लागे. देशमुखांच्यावर जेव्हां भयंकर प्रसंग ओढवला, तेव्हां प्रतापरावाच्या पत्नीस पिआरिखानाच्या हातून सोडविण्याचें अचाट कार्य त्यानें केलें. या चिमुकल्या पोरानें न कळत मारलेल्या जबरदस्त घावानें तो मृत्युमुखीं पडला. प्रतापराव, त्याची पत्नी व तिचें मूल या सर्वांचे प्राण त्यानें आपल्या शहाणपणानें व धाडसानें वांचविले. रणदुल्लाखानाचा दुष्ट नोकर अहमदखान यास त्यानें गोड बोलून, झुलवून मराठ्यांच्या गोटांत नेलें. तेथें अहमदखानास बिबीच्या पोषाखांत पाहतांच नानासाहेब, प्रतापराव व इतर मराठे शिपाई यांना किती मौज वाटली असेल व अहमदखान किती ओशाळला असेल याची कल्पनाच करावी. शिवाजीमहाराज सुल्तानगडाची टेहळणी करण्यास आले व त्या वेळीं या चाणाक्ष पोरानें त्यांस ओळखलें व मोठ्या युक्तीनें त्यांस गडावरून फिरवून आणलें. सांवळ्या जसा वाचकांना तसाच हरिभाऊंनाही फार प्रिय दिसतो. 'सूर्योदयां'त शिवाजीमहाराजांच्या कृपेनं सांवळ्या सर्जेराव होतो व महाराज व जिजाबाई या दोघांची त्याजवर मर्जी राहते. 'सांवळ्या' यास कथानायक करून त्यावर एक

स्वतंत्र कादंबरी लिहिली गेली या एका गोष्टीवरूनच सांवळ्याची लोकप्रियता सिद्ध होते.

उषःकालांतील रणदुल्लाखानाचें पात्र कादंबरीकारानें फार सुंदर रंगाविलें आहे. या उदारहृदयी तरुणाचें हृदय नानासाहेबांच्या पुरुषवेषांत माहेरीं जाणाऱ्या पत्नीकडे नकळत ओढलें गेलें. त्याच्या मनांत सदसद्विचारांचा झगडा सुरू झाला. तिच्या सहवासाचा, संभाषणाचा मोह अनिवार होऊन आपण तिचा वेष ओळखल्याचें तिला बिलकूल समजूं न देतां त्यानें तिला सरदारकी देऊन विजापुरास एका मोठ्या वाड्यांत ठेविलें. तिच्या मोहकतेनें तो जरी मोहून गेला होता तरी पापविचार त्याच्या मनांत कधीं आला नाहीं व पापाचरण क्षणमात्रही त्याच्या हातून घडलें नाहीं. त्याची प्रेमनिराशा झाली तरी त्यानें तिला अत्यंत आदरानें व दाक्षिण्यानें वागविलें. एवढेंच नव्हे, तर अनुतप्त अंतःकरणानें त्यानें घडलेला सर्व वृत्तान्त सरळपणें रंगरावअप्पांच्या म्हणजे तिच्या सासऱ्याच्या कानावर घालून त्याजपाशीं क्षमेची याचना केली. पापभीरु, सरलवृत्तीच्या रणदुल्लाखानाच्या मनोविकारांचें व विचारांचें चित्र आकर्षक वाटतें.

'रूपनगरची राजकन्या' या कादंबरींतील नयनपाळ नांवाच्या अवरंगजेबास मिळालेल्या दुष्ट रजपुतांत इंदिरेसारख्या पवित्र, तेजस्वी देवतेमुळें केवढें तरी परिवर्तन झालें. तिच्याबद्दलच्या प्रेमानें त्याचें हृदय प्रकाशित होऊन त्यांतील अनुदार विचारांचा लोप झाला. तिला व तिचा भाऊ दुर्गादास यांना रोषनार बेगमेनें भिंतींत चिणलें असतां नयनपाळानें त्यांची युक्तीनें सुटका केली. अखेर अवरंगजेबाचा पक्ष सोडून तो राजसिंहास मिळाला व लढतां लढतां जखमी होऊन तो अचलेश्वराच्या डोंगराजवळ आसन्न-मरणावस्थेंत पडला असतां, त्याची व इंदिरेची आकस्मिक गांठ पडली. इंदिरेच्या नेत्रांतील पवित्र अश्रू त्याच्या अंगावर पडतांच त्यास धन्यता वाटली! त्याचें जीवित जरी अनुचित रीतीनें गेलें तरी अखेरीस इंदिरेसारख्या शुद्ध अंतःकरणाच्या साध्वीवर प्रेम केल्यामुळें त्याचा अंत सुखाचा झाला. नयनपाळ व रणदुल्लाखान हीं दोन्ही पात्रें हरिभाऊंच्या कल्पनेनें निर्माण केलीं आहेत.

रामराजा ही ऐतिहासिक व्यक्ति असून एका दंतकथेवर या पात्राची रचना कादंबरीकारानें केली आहे. स्त्रीविषयक बाबतींत रामराजाचें वर्तन अनुदार असे, असे ऐतिहासिक उल्लेख आढळतात. रामराजाबद्दलची दंतकथा मनोरम व अत्यंत

करुणपूर्ण आहे. एका मुसलमान कुलीन तरुणीचा–मेहेरजानचा–प्राण तरुण राम-राजानें वांचविला. तिच्या स्नेहपाशांत रामराजा सांपडला व त्या तरुणीनेंही कृतज्ञतेनें त्यास आपलें प्रेम अर्पण केलें. रामराजानें तिला शहरापासून दूर असलेल्या कुंजवनांत ऐषआरामांत ठेविलें. योग्य कालीं आपण आपलें प्रेम प्रकट करूं, ' मी तुला आपली पट्टराणी करीन, ' अशा तऱ्हेचीं वचनें तो मेहेरजानला नेहमीं देई. सरळ मनाची प्रेमळ मेहेरजान त्यांवर विश्वास ठेवी. परंतु रामराजाच्या मनांत प्रेम व महत्त्वाकांक्षा यांचा झगडा सुरू होऊन अखेर महत्त्वाकांक्षेचा विजय झाला. मेहेरजानच्या प्रेमापेक्षां त्याला विजयनगरच्या राजाचा जामात होणें अधिक प्रिय वाटलें. हळू हळू मेहेर-जानकडे येण्याचें तो टाळूं लागला व एके दिवशीं मेहेरजान निद्रावस्थेंत असतां तो तिला तसाच सोडून निघून गेला. जाते वेळीं मेहेरजानला देण्यासाठीं त्यानें एक पत्र मार्जिनेजवळ दिलें. तिच्या तोंडून मेहेरजानला अपत्य होणार हें वृत्त ऐकतांच त्याचा चेहरा कसासाच झाला. पत्रांतील मजकूर वाचून मेहेरजानच्या मानी मनास भयंकर धक्का बसला. रामराजाच्या विश्वासघातानें तिचें नवनीतापेक्षांही अत्यंत मृदु असें हृदय करपून गेलें. ज्या कुंजवनांत विस्रब्धपणें रामराजाच्या प्रेमळ सहवासांत अतिशय सुखपूर्ण असे दिवस तिनें घालविले होते तेंच कुंजवन तिला स्मशानवत् भासूं लागलें. अपमान सहन न होऊन तिनें आपले सर्व मनोविकार हृदयांत दाबून ठेविले व मन कठोर करून कुंजवनाचा त्याग केला. तेथून जातांना तिनें एक सुत-ळीचा तोडाही बरोबर नेला नव्हता. मेहेरजान कुंजवनांतून नाहींशी झाल्याचें वृत्त ऐकतांच रामराजाच्या हृदयावर वज्राघातच झाला. त्याचें मन त्यास खाऊं लागलें. महत्त्वाकांक्षेच्या मोहांत सांपडून आपणांवर एकनिष्ठ प्रेम करणाऱ्या त्या प्रेमळ पोरीचा आपण विश्वासघात केला, गोड गोड थापा देऊन तिला फसविलें याची त्याला जाणीव झाली. कांहीं कालपर्यंत त्याची वृत्ति बेभान झाली, त्यानें तिचा शोध करण्यास माणसें पाठविलीं. परंतु त्याचा स्वभाव स्वार्थी असल्यानें तो फार वेळ स्वतःस दोष देत बसला नाहीं. " मेहेरजानचा आपण परित्याग केला नाहीं. गुप्तपणाशिवाय तिच्या सुखांत अणुभरही कमीपणा नव्हता, " अशी त्यानें आपल्या मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचें अंतस्थ अंतःकरण मात्र त्यास टोंचित राहिलें. बरोबरच आहे; कारणांच्या सबबी पुढें करून बुद्धीचें समाधान करतां येईल; परंतु अन्तःकरणांतील परमेश्वराचें समाधान कसें होणार?

पुढें सासऱ्यास अपत्य नसल्यामुळें विजयनगरची गादीच रामराजास मिळाली. तेव्हां राजवैभवाच्या मदांत व पत्नीच्या सहवासांत नानाप्रकारचे विलास करण्यांत दंग झाल्यामुळें त्यास मेहेरजानची आठवण बुजल्यासारखी झाली. मात्र कुंजवनांतील व्यवस्था पूर्वीप्रमाणेंच राखण्याची त्यानें दक्षता ठेविली होती.

अशा रीतीनें महत्त्वाकांक्षेच्या सफलतेमुळें अधिकाराच्या व ऐश्वर्याच्या सुख-शिखरावर रामराजा विराजत असतां विजापूरकरांचा तरुण वकील रणमस्तखान याची व त्याची भेट झाली आणि त्या पहिल्या भेटींतच रामराजाचें अंत:करण या तरुणानें आकर्षून घेतलें. तरुण वकील कुंजवनांत राहूं लागला व गतस्मृति जागृत झाल्यामुळें लहर लागेल तेव्हां रामराजा कुंजवनांत येऊन तेथील पुष्करणीच्या बाजूनें हिंडूं लागला. रणमस्तखान म्हणजे आपलाच मुलगा व त्याची आई म्हणजे मेहेरजान अशी त्याची खात्री झाली. रणमस्तखानावर तो खरोखरीच मुलाप्रमाणें प्रेम करूं लागला. मेहेरजानबद्दलचें त्याचें प्रेम पुनः जागृत झालें. त्यानें तिची भेट घेण्याचा प्रयत्न केला. परंतु मार्जिनेनें त्याला दाद दिली नाहीं. मेहेरजाननें रणमस्त-खानास रामराजाचा द्वेष करण्यासच बालपणापासून शिकविलें होतें. किंबहुना कुंज-वन सोडल्यापासून मुलाकडून रामराजाचा सूड उगविण्याचें ध्येय तिनें पुढें ठेविलें होतें. रणमस्तखानाचा रामराजाविषयींचा द्वेष वृद्धिंगत होण्यास आणखी एक कारण झालें, तें म्हणजे नूरजहानचा भर दरबारांतील अपमान होय. ज्यानें नूरजहानची इज्जत घेतली, त्याचा वध करण्याची घोर प्रतिज्ञा नूरजहानच्या प्राप्तीसाठीं त्यानें केली. त्यासाठीं त्यानें विजापूरकरांची नौकरी सोडून देऊन रामराजाची नौकरी पत्करली व वरून वरून तो रामराजाशीं मित्रत्वानें वागूं लागला. मेहेरजानच्या जीविताचा पायाच ढासळला. रणमस्तखानानें या कारस्थानाचा सुगावा तिला लागूं दिला नाहीं. रामराजा मात्र त्यास पुत्राप्रमाणें वागवी. अखेर ज्या संधीची रणमस्त-खान आतुरतेनें वाट पहात होता ती येऊन ठेपली. विजयनगर व विजापूर यांमध्यें युद्ध सुरू झालें. त्या युद्धांत रामराजाचा पराजय झाला व खुद्द रणमस्त-खानानें—त्याच्या पुत्रानें—त्याचें शिर कापून आपली प्रतिज्ञा खरी केली. तें शिर घेऊन नूरजहानला नजर करण्यासाठीं तो धांवतच कुंजवनांतील पुष्करणीकडे आला. तेथें मेहेरजान व नूरजहान दोघीही बसल्या होत्या. मेहेरजाननें तें शिर रामराजाचें आहे असें ओळखलें व तें घेऊन तिनें पुष्करणींत उडी टाकली!

## स्त्रियांचीं स्वभाव-चित्रें

हरिभाऊंनीं रंगविलेलीं काल्पनिक पात्रें अत्यंत महत्त्वाचें कार्य करितात. ऐतिहासिक भाग जिवंत करण्याचें—त्यांत प्राण घालण्याचें—काम त्यांस करावें लागतें. रणदुल्लाखान, नयनपाळ, सांवळ्या इत्यादि काल्पनिक पात्रें उच्च दर्जाचीं आहेत.

हरिभाऊंनीं ऐतिहासिक कादंबऱ्यांत रेखाटलेलीं स्त्रीपात्रें सुंदर, स्वाभाविक व रेखीव आहेत. पुरुषांपेक्षां स्त्रियांचीं स्वभावचित्रें रेखाटण्यांत हरिभाऊ अधिक कुशल आहेत. स्त्रियांच्या स्वभावाचे नाना प्रकारचे नमुने त्यांच्या कादंबऱ्यांत पहावयास सांपडतात. महत्त्वाकांक्षी, दीर्घद्वेषी, धाडसी, देशाभिमानी, कारस्थानी, भोळ्याभाबड्या, प्रेमळ, कठोर इत्यादि सर्व प्रकारच्या स्त्रिया त्यांनीं रेखाटल्या आहेत.

'चंद्रगुप्तां'तील मुरादेवीचें पात्र महत्त्वाचें असून तिच्या अंतःकरणांतील पुत्रप्रेम व पतिप्रेम यांतील लढा हरिभाऊंनीं उत्कृष्ट रीतीनें रंगविला आहे. प्रत्यक्ष पतीचा घात करण्यास ती तयार झाली खरी! परंतु चाणक्यानें उभारलेल्या कारस्थानाच्या सिद्धीची वेळ येऊन ठेपतांच तिच्या मनांत चलबिचल उत्पन्न झाली. हृदयाची कठोरता विरघळून आपल्या पतीचा घात होऊं नये असें तिला वाटूं लागलें. दरबारांत न जाण्यासंबंधीं तिनें धनानंदास विनविलें. परंतु तो जेव्हां गेला, तेव्हां त्याचे प्राण वांचविण्यासाठीं तीही अंतःपुरांतून बाहेर पडली व धनानंद गर्तेत पडलेला पाहतांच त्यांतच उडी घालून तिनें केलेल्या पापकृत्याचें परिमार्जन केलें. महत्त्वाकांक्षा, सूडबुद्धि व पुत्रप्रेम इत्यादि भावनांच्या जाळ्यांत सांपडलेल्या मुरादेवीचा अंत करुणास्पद आहे. तिची समयसूचकता, बुद्धिमत्ता हीं कौतुक करण्यासारखीं असलीं तरी त्यांचा दुरुपयोग झाल्यामुळें तिच्या अंगच्या गुणांचें मातेरें झालें आहे.

आपल्या पित्यास विश्वासघात करून शिवाजीमहाराजांनीं ठार मारलें या समजुतीनें जिच्या अंतःकरणांत सुडाची तीव्र भावना व्यापून राहिली, त्या ताराबाईचें—चंद्रराव मोऱ्यांच्या कन्येचें—स्वभावचित्रही मार्मिक आहे. पित्याचा आकस्मिक मृत्यु व बंधुजनांचा बंदिवास, या दोन भयंकर अनर्थांमुळें तिला धक्का बसला. तिची पितृभक्ति अत्यंत जाज्वल्य स्वरूपाची असून तिचे मनोविकार तीव्र व जोरदार होते. परंतु त्या तिच्या प्रबल भावनांना विचारांचें नियंत्रण नसल्यानें तिची वृत्ति बेफाम झाली. बापाच्या मृत्यूचा सूड उगवून शिवाजीमहाराजांचा नाश करण्याचें ध्येय समोर ठेवून तिनें एक कृष्ण कारस्थान रचलें व आपला हेतु पूर्ण करण्यासाठीं हिंस्र श्वापदें जेथें दिवसासुद्धां लीलेनें संचार करितात अशा घनदाट अरण्यांत

ती गोसाव्याचा वेष घेऊन राहिली. जिचें आयुष्य ऐषआरामांत जावयाचें तिनें ध्येयपूर्तीसाठीं अचाट कृत्यें आरंभिलीं. तिचा स्वभाव हट्टी, संतापी, दुराग्रही व साहसी होता. एकाच कठोर व क्रूर ध्येयानें तिचा जीवितप्रांत व्यापून राहिल्यानें तेथें कोमलतेला, नाजुक भावनांना बिलकुल अवकाश राहिला नाहीं. परंतु रचलेला व्यूह ढांसळतांच तिचा जीविताधार नष्ट झाला. स्वतःच्या मनावरील तिचा ताबा जाऊन ती वेडी झाली. ताराबाईची तुलना ऑफिलिआशीं करतां येणें शक्य आहे. हॅम्लेटनें पोलोनिअसला मारल्यानंतर तीही वेडी झाली. परंतु ताराबाईप्रमाणें ती दुष्ट नव्हती. हॅम्लेटचा सूड घेण्याचा विचार क्षणमात्रही तिच्या मनांत आला नाहीं. ताराबाईचा आवेश, सामर्थ्य, दृढनिश्चय तिच्या अंगीं नव्हता. ती बिचारी सरळ, साधी असल्यामुळें आपल्या प्रियकरानें आपल्या पित्याचा नाश केला हें पाहतांच ती वेडी झाली.

'सूर्यग्रहणां'तील माता रणदेवीचें चित्र अत्यंत सुंदर व करुण आहे. किरातसिंगासारखा नीच पुत्र लाभल्यामुळें माता रणदेवी विरक्त होऊन गोसावीण झाली. तीर्थयात्रेंत, भजनपूजनांत ती आपली कालक्रमणा करूं लागली. ती वीरकुलांतील होती. परंतु किरातसिंग मोंगलांस जाऊन मिळाल्यामुळें तिनें संन्यस्तवृत्ति स्वीकारली. तिचा अधम पुत्र तिला विसरला! तीर्थयात्रा करीत असतां किरातसिंगाच्या घोड्यानें आपल्या धनिणीस ओळखलें! परंतु त्यावरच्या स्वारानें—किरातसिंगानें—मात्र तिला ओळखलें नाहीं. परंतु त्या स्वारास घोड्यानें जबरदस्तीनेंच तेथें आणविलें होतें व माता रणदेवीस पाहतांच तो एक पाऊलभरही पुढें चालेना, तेव्हां संतापून जाऊन किरातसिंगानें रणछोडास ठोसा लगाविला. हा ठोसा वर्मी लागून त्याच्या नाकपुड्यांतून रक्त वाहूं लागलें. माता रणदेवी पुढें झाली. तिनें त्याचे डोळे धरले; अनुसया व कौसल्या यांनीं त्याच्या तोंडावर पाणी मारलें. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या इमानी मुक्या जनावरानें मानेला हिसडा देऊन ती माता रणदेवीच्या हातावर टाकली व प्राण सोडला. त्याबरोबर घोड्यास तेथेंच टाकून त्या तेजस्वी तापसीकडे न पाहतां तो तेथून खुशाल चालता झाला! तो दृष्टीआड होतांच माता रणदेवीच्या नेत्रांत अश्रुबिंदु चमकूं लागले. नरानें पशूप्रमाणें व पशूनें नराप्रमाणें वर्तन केलेलें पाहून तिला खेद झाला, अचंबा वाटला! त्या अत्यंत रमणीय स्थळींही या बिलक्षण प्रसंगानें तिला क्षणमात्रही राहवेना.

' केवळ स्वराज्या 'साठीं यांतील किल्लेदारिणीनें आपल्या विश्वासघातकी पतीस केलेला विरोध, राजमाता व संभाजीचा पुत्र यांची मोंगलांपासून सुटका करण्यासाठीं प्रकट केलेलें धाडस, तिचें तेज व देशाभिमान हीं खरोखरीच अनुपम आहेत. पतीस पापविचारांपासून व पापकृत्यांपासून परावृत्त करण्याचा तिनें आटोकाट प्रयत्न केला. पुढें पत्नीच्या उदात्त चारित्र्याचा परिणाम होऊन सूर्याजी पिसाळ निवळला व आपलें शेष आयुष्य त्यानें चांगल्या रीतीनें घालविलें.

असो. अशा प्रकारें किती तरी पात्रांचें स्वभाव-वर्णन करतां येईल. परंतु केवळ दिग्दर्शनार्थ एवढें विवेचन पुरें झालें.

हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत अनेक सौंदर्यस्थलें आहेत. त्यांचीं सृष्टि-वर्णनें काव्यमय आहेत. ' वज्राघातां 'तील ' कुंजवनांत ' हें पहिलेंच प्रकरण अत्युत्कृष्ट काव्यरसानें ओथंबलेलें आहे. वर नीलाकाशांत चमकणारा चंद्र व त्याची शुभ्र ज्योत्स्ना, विस्तीर्ण पुष्करिणींत प्रफुल्लित झालेलीं शोभिवंत सुंदर कमलें व पुष्क-रिणींतील क्रीडानौकेंत बसून अमृतवृष्टि करणाऱ्या पूर्णचंद्राकडे आतुरतेनें, कौतुकानें पाहणारी लावण्यमूर्ति मेहेरजान हा सर्वच देखावा मनोरम असून त्यांतील काव्य-गुणानें रसिक हृदयें साहजिक मोहित होतात. या कादंबरींत जागोजागीं आलेलीं कुंजवनांतील पुष्करिणीचीं वर्णनें नितान्तसुंदर आहेत.

' रूपनगरची राजकन्या ' यांतील ' ओझरतें दर्शन ' हें प्रकरण सुंदर असून अचलेश्वराच्या मंदिराचें वर्णन काव्यमय आहे. ' सूर्यग्रहण ' या कादंबरींतील ' सुप्रभातीं ' व ' माता रणदेवीचें चरित्र ' हीं दोन्ही प्रकरणेंही अतिशय मनोरम अशीं आहेत. ऐतिहासिक कादंबऱ्यांतील सर्वच सौंदर्यस्थलें देणें शक्य नसल्यामुळें नमुन्यासाठीं येथें दोन चारच दिलीं आहेत, त्यांवरून हरिभाऊंची सौंदर्यसमीक्षकता व त्यांच्या अंगचा काव्यगुण वाचकांच्या सहज ध्यानांत येईल.

' चंद्रगुप्त ' व ' उषःकाल ' या दोन्ही कादंबऱ्यांचा विषय राज्यस्थापना हा आहे. ' गड आला पण सिंह गेला ' व ' सूर्योदय ' यांत स्वराज्याच्या भरभराटीच्या कालाचें वर्णन दिसतें, तर ' सूर्यग्रहणां 'त स्वराज्यावरील संकटाचें वर्णन केलें आहे. ' रूपनगरची राजकन्या ' यांत तर इतिहासांत सुप्रसिद्ध असलेल्या एका रजपूत युद्धाचा वृत्तान्त असून अखेरीस अवरंगजेबाचा पूर्णपणें पाडाव होऊन तो कसा फजीत झाला हें दाखविलें आहे.

## हरि नारायण आपटे

परकीयांच्या सत्तेखालीं देश गेला असतां जनतेची सर्वतोपरी दुरवस्था होते. राजकीय, सामाजिक व धार्मिक इत्यादि नाना तऱ्हांचे जुलूम तिला सहन करावे लागतात. परक्यांस प्रिय होण्यासाठीं अनेक लोक देशद्रोही होतात, व अशा तऱ्हेच्या बिकट परिस्थितींतून स्वदेशास मुक्त करण्यासाठीं एकाद्या लोकोत्तर विभूतीचा अवतार होत असतो, हेंच ऐतिहासिक सत्य आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारां सिद्ध करण्याचा हरिभाऊंचा हेतु दिसतो. शिवाजीमहाराज हे आदर्श नृप असून तानाजी, येसाजी, नानासाहेब, धनाजी व संताजी हे आदर्श सेवक व मित्र आहेत.

राज्यक्रांति होण्यापूर्वी सामान्य जनांतच प्रचलित राज्यपद्धतीविषयीं व सत्ता गाजविणाऱ्या अधिकाऱ्यांविषयीं नावड उत्पन्न झाली पाहिजे. कारण सामान्य रयतच देशाचा जीविताधार असून तिच्यावरच देशाचें वैभव व सौख्य सर्वस्वीं अवलंबून असतें. गरिबांच्या झोंपड्यांतच देशाचा जीवित-प्रवाह अखंड चालू असतो. तेव्हां त्यांच्या सहानुभूतिपूर्ण साहाय्यावांचून स्वराज्यस्थापनाच होणें अशक्य आहे, असें हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांवरून स्पष्ट दिसत नाहीं काय?

मोंगलांच्या जुलुमास त्रासलेल्या व शेतांवर काबाडकष्ट करून उपजीविका करणाऱ्या गरीब, प्रामाणिक व शूर मावळ्यांच्या मदतीवांचून शिवाजीराजांस स्वराज्यस्थापना करणें सुलभ झालें नसतें. परंपरेस चिकटून राहून व जुन्यास हृदयाशीं कवटाळून नवीन गोष्ट कितीही उत्तम असली तरी तीस त्याज्य मानणारा लोकपक्ष सर्व कालीं सर्व देशांत सांपडतो, हें इतिहासाचा सूक्ष्म अभ्यास करणाऱ्या जनांस अवगत आहेच. या दृष्टीनें पाहतां 'उषःकाल' या कादंबरींतील सुलतानगडाचे वृद्ध किल्लेदार रंगरावअप्पा यांचें चित्र महत्त्वाचें आहे. स्वराज्यापेक्षां स्वामिभक्ति त्यांस प्रियतर होती. विजापूरकरांशीं बेइमानी करणें त्यांच्या स्वप्नांतही नव्हतें. शिवाजी व त्याचे संवगडी यांस त्या काळची वृद्ध मंडळी टारगट पोरें समजून मोंगलांस विरोध करून स्वराज्यस्थापना करण्याच्या त्यांच्या कल्पनेस अविचार मानीत. नव्याजुन्या पिढींतील ही मौजेची तेढ जगताच्या आरंभापासूनच चालत आलेली आहे व हरिभाऊंच्या शिवकालीन कादंबऱ्यांत तत्संबंधींचें विवेचन जागोजागीं आढळतें. राजकारणाच्या समरभूमीवर हातीं शस्त्र घेऊन उभ्या राहणाऱ्या देशभक्तास परकीय शत्रूंचाच नव्हे तर स्वकीयांचाही अतोनात छळ सोसावा लागतो. परके बोलूनचालून परकेच असतात! परंतु स्वकीयांनीं, आप्तजनांनीं केलेला छळ असह्य होतो. अंगीं

सहनशीलता बाणलेली असल्यावांचून कोणतेंच देशकार्य हातून होणें शक्य नाहीं. सहनशीलतेच्या दृष्टीनें राजारामाचें पात्र अत्युत्कृष्ट वाटतें. देशाच्या आपत्कालीं सुद्धां ज्यांची स्वराज्यनिष्ठा अणुमात्रही कमी झाली नाहीं, स्वामिनिष्ठा भंग पावली नाहीं व आत्मत्यागाचें तेज लवमात्र मंद पडलें नाहीं अशा खंडो बल्लाळ, संताजी घोरपडे, बहिरव खंडो इत्यादि महात्म्यांच्या कथा कथन करून हरिभाऊंनीं महाराष्ट्रीय वाचकांच्या अंतःकरणांत उज्ज्वल देशभक्ति, स्वातंत्र्यप्रीति व स्वार्थत्याग प्रदीप्त करण्याचा मनापासून प्रयत्न केला. त्यांचा हा प्रयत्न सफल होऊन महाराष्ट्रांत शिवाजी वगैरे विभूतींच्याबद्दल उत्कट आदर वाढत गेला. त्यांनीं निर्माण केलेलीं ऐतिहासिक व काल्पनिक पात्रें आपल्या नित्य परिचयांतील आहेत, असें वाटल्यावांचून रहात नाहीं.

उषःकाल, रूपनगरची राजकन्या, वज्राघात, चंद्रगुप्त, गड आला पण सिंह गेला, या हरिभाऊंच्या कादंबऱ्या उत्कृष्ट आहेत. सूर्योदय, केवळ स्वराज्यासाठीं, या मध्यम असून कालकूट, मध्यान्ह, सूर्यग्रहण व म्हैसूरचा वाघ या कनिष्ठ आहेत. पहिल्या वर्गांतील कादंबऱ्यांचीं कथानकें, रचना, कथानकांचा विकास, स्वभावपरिपोष उत्तम साधलेला आहे.

'सूर्योदय' व 'केवळ स्वराज्यासाठीं' या दोन्ही कादंबऱ्यांत पाल्हाळिक वर्णनें फार आहेत. त्यांपैकीं बरींचशीं गाळून टाकलीं तरी रसहानि होत नाहीं ही गोष्ट, गेल्या दोन वर्षांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या संक्षिप्त आवृत्त्यांवरून स्पष्ट झाली आहे. 'सूर्योदय' या कादंबरींतील शिवाजीमहाराजांचें पात्र अत्यंत मिळमिळीत वाटतें. मुत्सद्दी, राजकारणप्रवीण, अत्यंत धूर्त व दूरदर्शी म्हणून नाणावलेल्या शिवाजीमहाराजांस प्रतापगडाजवळील जावळीच्या रानांत गुप्तपणें चालू असलेलें कारस्थान कळत नाहीं, ते त्यांत फशीं पडणार परंतु केवळ दैवयोगानें जाधवरावांच्या पत्नीच्या हस्तें त्यांचे प्राण वांचतात, ही गोष्ट त्यांच्या शौर्यास व दूरदर्शित्वास न शोभेशी आहे.

'केवळ स्वराज्यासाठीं' यांतील शेवटचा भाग नीरस उतरला आहे. त्यांत एकच एक कथानायक नसल्यानें वाचकांस फारशी गोडी वाटत नाहीं. संभाजीमहाराजांचा हृदयद्रावक अंत होईपर्यंतचें कथानक मनोरंजक व करुणरसपूर्ण आहे. परंतु त्यानंतरच्या भागांत किल्लेदारिणीच्या पात्राशिवाय एकही पात्र मनांत भरण्याजोगें वाटत नाहीं. कथानकाची मांडणी विस्कळित स्वरूपाची आहे. एक असा आकर्षण करणारा मध्यबिंदु नसल्यामुळें कथानकाचे निरनिराळे भाग अगदीं विलग झालेसे वाटतात.

## हरि नारायण आपटे

शिवकालीन कादंबऱ्यांत ‘ सूर्योदय ’ या कादंबरीशिवाय कोणत्याच कादंबरींत शिवाजीमहाराजांस प्रथम स्थान नाहीं. ‘ उषःकालां ’त शिवाजीमहाराजांपेक्षां नानासाहेबांस अधिक महत्त्व आहे, किंबहुना तोच ‘ उषःकाल ’ कादंबरीचा कथानायक आहे असें म्हणावेंसें वाटतें. शिवाजीमहाराजांचा मनोविकास कसा झाला हें कादंबरीकारानें दाखविलें नाहीं. कायम ठशाची ठराविक भूमिका घेऊन शिवाजीमहाराजांनीं कादंबरीच्या रंगभूमीवर प्रवेश केला असून प्रत्येक कादंबरींत तोच तो स्वभाव, त्याच त्या युक्त्या, तेच ते विचार, तेंच तें राजकारण आल्यामुळें तें पात्र जितकें सरस उतरावयास पाहिजे होतें तितकें उतरलें नाहीं. सांवळ्या, रणदुल्लाखान इत्यादि काल्पनिक पात्रें जितकीं सुंदर आहेत, तितकें शिवाजीमहाराजांचें पात्र नाहीं. ‘ गड आला पण सिंह गेला ’ यांतील शिवाजीचें पात्र क्रियाशून्य आहे. महत्त्वाचेंच पात्र असें क्रियाशून्य राहिल्यानें तो कादंबरींत एक प्रकारचा दोष वाटतो. ‘सूर्यग्रहण ’ या कादंबरींत माता रणदेवी, किरातसिंग या काल्पनिक पात्रांनीं वाचकांचें लक्ष जसें वेधलें जातें तसें शिवाजीमहाराजांच्या पात्रानें जात नाहीं.

‘ मध्यान्हां ’तही एक कथानायक नसल्यानें रसहानि झाली आहे. अंतस्थ गुप्त कारस्थानें, विश्वासघात, दंभ, कुटिलता यांनीं परिपूर्ण असलेल्या या कथानकांत धीरोदात्त, तेजस्वी पात्रांचा अभाव आहे. ‘ मध्यान्हां ’त हरिभाऊंचा प्रतिभासूर्य तेजोहीन झालेला दिसतो. सार्वजनिक कार्यांचा पसारा वाढल्यामुळें त्यांच्या हातून अखेरच्या दिवसांत स्फूर्तियुक्त लेखन झालें नसावें असें वाटतें.

तें कांहींही असलें तरी ऐतिहासिक कादंबरीकारांत हरिभाऊंचें प्रथम स्थान अद्याप अढळ आहे. महाराष्ट्राचे सर वॉल्टर स्कॉट या नांवानें त्यांचा गौरव करण्यांत येतो. हरिभाऊंच्या पूर्वी महाराष्ट्रवाङ्मयाच्या ऐतिहासिक उद्यानांत एखादें फूल फुललेलें होतें. परंतु अनेक अप्रतिम फुलांची माला गुंफून त्यांनीं सरस्वतीस अर्पण केली यामुळें त्यांना ‘ ऐतिहासिक कादंबऱ्यांचे जनक ’ हीच पदवी देणें योग्य होईल. स्वराज्यावर अनेक कादंबऱ्या लिहिणारे नाथमाधव व त्याचप्रमाणें पेशवाईवर आठनऊ कादंबऱ्या लिहून अल्प काळांत कादंबरीकारांत उच्च दर्जा प्राप्त करून घेणारे श्री. हडप यांच्या लेखनावर हरिभाऊंची पडलेली छाप स्पष्ट दिसते. ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याची हरिभाऊंची पद्धति त्यांनीं उचललेली आहे. विषयविवेचन, संविधानकाची रचना, स्वभावचित्रलेखन, पार्श्वभूमीची सजावट इत्यादि कोणत्याही

बाबतींत हरिभाऊंच्यापेक्षां त्यांनीं एखादा नवीन शोध लावल्याचें आढळत नाहीं. उलटपक्षीं नाथमाधवांच्या कादंबऱ्यांत ऐतिहासिक सत्य कायम राखण्यांत विशेष तत्परता दिसत नाहीं. नाथमाधवांचा शिवाजी व हरिभाऊंचा शिवाजी या दोघांमध्यें तुलना केली असतां हरिभाऊंचा शिवाजीच श्रेष्ठ ठरतो.

गतकालीन समाजाचें व आचाराविचारांचें चित्र ऐतिहासिक कादंबऱ्यांत हरिभाऊंनीं कुशलतेनें रंगविल्यामुळें त्या कादंबऱ्या वाचीत असतां आपण भिन्न कालांत, भिन्न जगांत वावरत आहोंत असें वाटल्यावांचून रहात नाहीं. ऐतिहासिक कादंबऱ्यांचें हृद्गत जें ऐतिहासिक सत्य तें जसेंच्या तसेंच उतरविण्यांत हरिभाऊंनीं कसूर केली नाहीं. त्यांच्या काळीं उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक सत्यास धरूनच त्यांनीं आपलीं कथानकें रचिलीं. त्यांच्या कादंबऱ्यांतील ऐतिहासिक सत्य व सत्याभास यांचें मीलन अपूर्व आहे. ऐतिहासिक कादंबऱ्यांत इतिहास अवश्य असला तरी त्यांचें मनोवेधकत्व त्यांतील पात्रांच्या मनोविकासावर, त्यांच्या विकार-विचारांच्या कौशल्यपूर्ण पृथक्करणावरच अवलंबून असतें. इतिहाससंशोधनामुळें नवीन शोध लागून हरिभाऊंच्या ऐतिहासिक पात्रांचें महत्त्व जरी थोड्या फार प्रमाणांत पुढें कमी झालें, तरी त्यांतील सत्याभास निर्माण करणाऱ्या काल्पनिक भागाचें महत्त्व केव्हांही कमी होणार नाहीं. कल्पनाशक्तीच्या सामर्थ्याच्या आधारावर निरनिराळ्या ऐतिहासिक प्रसंगांचे संबंध, ऐतिहासिक पात्रांचें मार्मिकतेनें केलेलें स्वभाव-चित्रलेखन, त्यांचे उद्देश इत्यादि गोष्टींचें महत्त्व अत्यंत असून तें चिरकाल टिकणारें आहे. ऐतिहासिक कादंबरीकारांतील हरिभाऊंचें अग्रेसरत्व अद्याप कायम आहे व त्यांना मागें सारणारा असा ऐतिहासिक कादंबरीकार अजून निर्माण व्हावयाचा आहे, यांत तिलप्राय संशय नाहीं.

# प्रकरण तेरावें

## अवांतर लेखन

सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांखेरीज हरिभाऊंनीं पुष्कळच अवांतर लेखन केलें. काव्य, नाटकें, भाषांतरें, निबंध, व्याख्यानें, गोष्टी, छोटीं चरित्रें इत्यादि वाङ्मयाच्या अनेक विभागांत प्रवेश करून तेथें त्यांनीं आपलें वैशिष्टय स्थापन केलें आहे.

'शिष्यजनविलाप' या एका स्वतंत्र काव्यामुळें हरिभाऊंची गणना कवींमध्यें झाली. ते शीघ्रकवि असून त्यांच्या कविता सरस आहेत. तथापि त्यांनीं काव्य-रचना मोठ्या प्रमाणावर केली नाहीं, म्हणूनच त्यांस केशवसुत, टिळक इत्यादि कवींच्या वर्गांत बसवितां येत नाहीं. त्यांना जीविताचें तत्त्वज्ञान जगास द्यावयाचें होतें, समाजस्थिति सुधारण्याचे उपाय सुचवावयाचे होते. त्यामुळें काव्यास आवश्यक अशा वृत्तांचें बंधन त्यांस आवडणें शक्य नव्हतें.

त्यांची बहुतेक कविता भाषान्तरात्मक आहे. 'जीवितसार' या कवितेशिवाय त्यांनीं शेलीच्या *Skylark* या कवितेचेंही भाषांतर केलें होतें. इंग्रजी कवितांच्या चुटक्यांचें त्यांनीं जसें भाषांतर केलें तसेंच अनेक संस्कृत कवितांचेंही केलें. भासकवीच्या नाटकांतील श्लोकांचीं त्यांनीं श्लोकबद्ध भाषान्तरें केलीं आहेत. भासकवीच्या नाटककथेंत भाषांतर केलेले सुमारें पासष्ट श्लोक आढळतात. त्यांच्या काव्याची भाषा सोपी व रसयुक्त असून, त्यांच्या कविता भाषांतरित आहेत असें भासत नाहीं. मनोरंजन व निबंधचंद्रिका ( पुस्तक ५, अंक ६ ) यांतील 'भाऊबीजेची ओवाळणी' ही कविता हरिभाऊंचीच आहे. तीतील भावना व विचार यांची मांडणी उत्तम आहे. अशा तऱ्हेच्या प्रासंगिक कविता हरिभाऊ नेहमीं लिहीत.

' गड आला पण सिंह गेला ' या कादंबरींतील तानाजीच्या तोंडीं घातलेला पोवाडा अत्युत्कृष्ट आहे. त्यांतील वीररसाचा परिपोष त्यांनीं अत्यंत कुशलतेनें केला असून आरंभींचें निरनिराळ्या देवतांस केलेलें आवाहन व अंबाबाई व शिव यांस केलेलें नमन पोवाड्याच्या पद्धतीस अनुसरून आहे. शिवाजीमहाराजांच्या चरित्राचें रहस्य, त्यांचा पराक्रम, गोब्राह्मणांचा प्रतिपाल करून स्वराज्य स्थापन करण्याचें त्यांचें ध्येय इत्यादि गोष्टी साध्या परंतु जोरदार भाषेंत मांडून त्यांनीं मोठ्या युक्तीनें शिवाजीमहाराजांना अनुकूल असें वातावरण निर्माण केलें; व नंतर मुसलमानांनीं चालविलेल्या हिंदूंच्या अमानुष छळाचें वर्णन करून त्यांच्याबद्दल मन कलुषित केलें; व अखेर ' जे जे मोगलांचे चाकूर। थूः रे थूः त्येंच्या जिनगानीवर ॥ ' असे उद्गार काढून मोगलांविषयीं व त्यांची इमानानें चाकरी करणाऱ्या मराठ्यांविषयीं तिरस्कार उत्पन्न केला. गोंधळ्याच्या तोंडीं शोभेल अशीच भाषा हरिभाऊंनीं पोवाड्यांत उपयोजिली आहे. पतिवर्ता, रगात, सूर्येनारायण, पाऱ्छाय, रस्त्यामंदि, ग्येलं, ध्येवा, ग्येलाजी, वगैरे मावळयांच्या तोंडीं नेहमीं असणाऱ्या शब्दप्रयोगांमुळें पोवाड्याचें सौंदर्य व स्वाभाविकता हीं वाढलीं आहेत. श्रोत्यांच्या अंगीं वीरश्रीचा संचार करण्याचें सामर्थ्य या पोवाड्यांत खचित आहे.

आपल्या प्रियतम मृतकन्येच्या स्मरणार्थ ' शांतिमंगल ' महाकाव्य रचण्याचा हरिभाऊंचा संकल्प होता. त्यांतील ' शारदावतार ' हा पहिला सर्ग लिहिण्यास त्यांनीं प्रारंभ केला होता. त्या सर्गांतील मंगलाचरणाचे फक्त बावीस श्लोकच लिहिले गेले आहेत. हें काव्य संपूर्ण झालें नाहीं, ही खरोखरीच अत्यंत खेदकारक गोष्ट होय. कन्यावियोगासारखा हृदयस्पर्शी करुण विषय व हरिभाऊंच्यासारखा प्रेमळ, भावनाप्रधान, रसिक व प्रतिभावान् लेखक असा योग जमल्यामुळें हें महाकाव्य उत्कृष्ट होऊन महाराष्ट्रवाङ्मयांत त्यास विशिष्ट स्थान प्राप्त झालें असतें, यांत शंका नाहीं. शारदावताराचें कवीनें केलेलें वर्णन महाकाव्यास शोभण्यासारखें आहे.

हरिभाऊ शीघ्रकवि होते. मित्रमंडळींशीं बोलतां बोलतां सहज रीतीनें अल्पकालांत ते काव्यरचना करीत. आपल्या मित्रांच्यावर, त्यांच्या लहान मुलांवर त्यांनीं मौजेनें विनोदी चुटके रचावेत. मंडळींत त्या श्लोकांच्यामुळें हंशा पिकला कीं, झाली काव्यहेतूची पूर्तता! मग ते गमतीचे चुटके लिहून ठेविण्याचे परिश्रम

कोणीं करावेत ? हरिभाऊंच्या विनोदी श्लोकांचा संग्रह मनोरंजक झाला असता; परंतु ते श्लोक रचले गेले नाहींत तोंच काळाच्या उदरांत गडप झाले.

'करमणुकी'च्या पहिल्या वर्षाच्या अंकांत हरिभाऊंनीं तीनचार कविता लिहिल्याचा उल्लेख आढळतो. परंतु त्यांखालीं नांव नसल्यानें हरिभाऊंच्या कविता कोणत्या हें ओळखणें कठीण झालें आहे.

हरिभाऊंनीं 'संत सखू' व 'सती पिंगला' हीं दोनच स्वतंत्र नाटकें लिहिलीं. महिपतिकृत 'संतलीलामृतां'त पस्तिसाव्या अध्यायांत संत सखूबाईची कथा आहे. तीच या नाटकाचा आधार होय. 'संत सखू' या नाटकाचें कथानक साधें, रसाळ, भगवद्भक्तिपूर्ण व करुण आहे. सखूला लहानपणापासून पंढरीच्या विठोबाचें वेड होतें. तिचे आईबाप सांथीच्या रोगानें वारले. तिची सासू—म्हाळसाबाई—सुनेचा नाना तऱ्हांनीं छळ करी. तिचा पति दिगंबरपंत मनानें दुष्ट नसला तरी आईच्या अर्ध्या वचनांत होता. हीं दोघें मायलेंकरें, बिचाऱ्या सखूस मारहाण करावयासही मागेंपुढें पहात नसत. असह्य सासुरवासानें सखूचें विठोबाबद्दलचें वेड अधिकच वाढलें. एके दिवशीं तिच्या वडिलांचे स्नेही विश्वंभरबोवा व त्यांची पत्नी गिरिजाबाई यांची व सखूची अकस्मात् कृष्णाबाईच्या घाटावर गांठ पडली. ते वारकरी असून पंढरीला चालले होते. त्यांच्या बरोबर ती जाण्यास निघाली. परंतु जेव्हां ही बातमी म्हाळसाकाकूंच्या कानीं गेली तेव्हां तिनें व दिगंबरपंतानें भर रस्त्यांतून तिला निर्दयपणें ओढीत घरीं आणलें व तळघरांत दोरखंडानें बांधून ठेविलें. परंतु अशा दु:स्थितींतही सखूला देवाचा विसर पडला नाहीं. सखूनें तसल्या हालअपेष्टांच्या स्थितींतही दृढ निष्ठेनें आपल्या नांवाचा जप चालविला आहे, हें पाहून विठोबास दया आली. त्यानें गिरिजाबाईचें रूप घेऊन सखूस सोडविलें व गरुडाबरोबर पंढरीस पाठविलें. सखू पंढरीस गेली व विठोबाच्या पायांवर तिनें डोकें ठेवितांच तिचे प्राण नश्वर देहाचा त्याग करून गेले. वारीस आलेल्या कऱ्हाडच्या भटभिक्षुकांनीं तिला ओळखून तिचें और्ध्वदेहिक केलें.

इकडे विठोबानें सखूबाईचें रूप घेऊन दिगंबरपंत व म्हाळसाकाकू यांची मर्जी प्रसन्न करून घेतली. सखूनें विठोबाच्या चरणांवर प्राण अर्पण केले हें कळतांच रुक्मिणीनें अमृतसिंचन करून सखूस जिवंत केलें व गरुडाबरोबर परत पाठविलें. कृष्णाकांठीं गिरिजेचें रूप धारण केलेला विठोबा तिला भेटला. तिच्या घरची घागर

सखूच्या स्वाधीन करून विठोबा अदृश्य झाला व सखू आपल्या घरीं गेली. ती घरीं पोहोंचण्यापूर्वी तिला दहन करणारे भिक्षुक तिच्या मृत्यूची बातमी सांगण्याकरितां जमले होते. सखू एक क्षणमात्रही दूर गेली नसतां हें ब्राह्मणांचें बोलणें खरें मानण्यास म्हाळसाकाकू व दिगंबरपंत तयार होईनात. सखूनें घरांत प्रवेश केल्याबरोबर ' भूत, भूत ' म्हणून ब्राह्मण पळून गेले. विलासी सखूचें पूर्व वेषांतील विरक्त सखूंत रूपांतर झालेलें पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें. सखूनें सर्व हकीकत सांगितली. परंतु खरी सखू पंढरीस गेली होती, तर मग दागदागिने घालून व शालू नेसून घरांत वावरणारी सखू कोण होती? या रहस्याचा उलगडा होईना. पंचाक्षरी बोलावून म्हाळसाकाकूनें सखूला छळण्यास पुनः सुरुवात केली. सखू परमेश्वरास आळवूं लागली व विठोबानें तिला प्रत्यक्ष दर्शन दिलें. इतक्यांत आकाशवाणी होऊन सर्व रहस्याचा उलगडा झाला. साध्वीस छळल्यामुळें म्हाळसाकाकू, भिमावर्से व पंचाक्षरीबोवा विव्हळत पडले होते. सखूच्या स्पर्शानें त्यांच्या वेदना नाहींशा झाल्या. सखूच्या रूपानें देवानें आपली सेवा केली हें कळतांच दिगंबरपंतानें तिची खरी योग्यता जाणून सखूचे पाय धरले. प्रत्यक्ष म्हाळसाकाकूनें तिचे पाय धरून क्षमा मागितली. निरतिशय प्रेम करणाऱ्या भक्तासाठीं देव वाटेल ते कष्ट सोशितो हा भाव नाटककारानें व्यक्त केला आहे. या नाटकांत स्त्रीहृदयाची उदात्तता, पावित्र्य, प्रेमलता व भक्तिप्रवणता दाखविली आहे, हा या नाटकाचा विशेषच आहे. अन्तःकरणाच्या शुद्धतेमुळें व देवावरील निःसीम भक्तीमुळें सखू देवता झाली!

या नाटकांतील शृंगाररसपूर्ण प्रवेश तितकेसे बरे वाटत नाहींत. कथानक, पात्रें, भाषा यांचें परीक्षण केलें असतां हें नाटक चांगलें वाटतें. नाटक हें केवळ वाचनाकरितां नसून प्रमुखत्वानें रंगभूमीसाठीं असतें. वाचक, प्रेक्षक व नट या तिन्ही लोकांच्या अपेक्षा ध्यानांत धरून नाट्यरचना झाल्यास तें नाटक खात्रीनें यशस्वी होईल. विद्वानांच्या बुद्धीस व हृदयास जागृत करणारें, प्रेक्षकांच्या भावना व विचार उचंबळून आणणारें व नटांच्या अंगच्या अभिनयादि गुणांस विकसित करणारें नाटक श्रेष्ठ दर्जाचें होय. हें नाटक प्रथम श्राव्य म्हणून लिहिलें गेलें. श्राव्याचें दृश्य करण्यासाठीं नाटककारास त्यांत बरेच फेरफार करावे लागले. नाट्यकला-प्रवर्तक मंडळीनें हें नाटक प्रथम रंगभूमीवर आणलें. त्याचे प्रयोग लोकप्रिय झाले, यावरून प्रयोगदृष्ट्या नाटकाची यशस्विता सिद्ध होते. या नाटकाची

पहिली आवृत्ति इ. स. १९११ त प्रसिद्ध झाली व पुढें दोनच वर्षांनीं दुसरी आवृत्ति काढावी लागली. 'संत तुकाराम', 'पुंडलीक', 'दामाजी' या पौराणिक नाटकांप्रमाणेंच 'संत सखू' हें नाटक अत्यंत लोकप्रिय आहे.

शिवलीलामृतांत सती पिंगलेची जी कथा आहे, तिचाच आधार 'सती पिंगला' या नाटकास घेतला आहे. रत्नपाल, मधुकरराव व कौटिल्य हे तिघे मित्र गुरुगृहींचें शिक्षण समाप्त झाल्यावर देशपर्यटनास निघून उज्जयिनीस येतात. रत्नपाल कौटिल्याच्या संगतीमुळें व्यसनासक्त होतो व पिंगला नामक वेश्येच्या मोहांत सांपडतो. त्याच्या धर्मपत्नीचा—कुसुममालेचा—त्यास विसर पडून कुसुममालाही कौटिल्याच्या कारस्थानांत सांपडून फशी पडते व उज्जयिनीस येते. उज्जयिनीस तिची व पिंगलेची आकस्मिक भेट होते. पिंगला व रत्नपाल यांत कौटिल्य वितुष्ट आणतो व रत्नपालाच्या मृत्यूची बातमी प्रसृत करतो. ती ऐकतांक्षणींच कुसुममाला व पिंगला चितेंत प्रवेश करण्याची तयारी करितात. इतक्यांत अवधूत गुरु चितेंतून वर येऊन, रत्नपाल जिवंत असून कौटिल्याचा प्राण घ्यायला पहात आहे असें सांगतात. मधुकर कौटिल्याला रत्नपालापासून सोडवितो व तिघे रंगभूमीवर प्रवेश करतात. अवधूत गुरु पिंगलेकडून रत्नपाल व कुसुममाला यांचा संयोग घडवितो. पिंगला सर्व मोहांचा परित्याग करून ईशसेवेंत व गुरुसेवेंत आयुष्य वेंचण्याचा निश्चय करते. कौटिल्यास पश्चात्ताप होऊन तो गुरुमहाराजांच्या चरणीं लीन होतो. अवधूत पिंगलेस गुरूच्या स्थानीं मानतो व "या तुझ्या झालेल्या चरित्रावरून तुझें वर्तन साध्वीप्रमाणें आहे, तेव्हां सर्व जन तुझें 'सती पिंगला' असेंच वर्णन करतील." असें जाहीर करतो.

'संत सखू'प्रमाणें या नाटकाचाही उद्देश एका सतीच्या शुद्ध चारित्र्याचें वर्णन करण्याचाच आहे. या नाटकावर 'मृच्छकटिका'ची छाया पडलेली दिसते. परंतु कथावस्तु, स्वभावपरिपोष, कथानकाची मांडणी, विनोद इत्यादि अनेक बाबतींत 'मृच्छकटिका'पेक्षां 'सती पिंगला' हें नाटक अगदींच फिकें व नीरस वाटतें. यांतील कोणताच प्रवेश आकर्षक वाटत नाहीं. चटकदारपणा, सरसता यामध्यें फारशी आढळत नाहीं. ज्या सती पिंगलेच्या चरित्रावर नाट्यरचना झाली आहे तिचें चित्र उठावदार, डोळ्यांत चटकन् भरण्यासारखें असें उतरलें नाहीं. पिंगलेला अनुताप कां झाला, कसा झाला, तिला विरक्तता कशी आली, ईशसेवेंत

जीवित घालविण्याचा तिचा निश्चय कशामुळें झाला इत्यादि गोष्टी जितक्या मार्मिकतेनें व कुशलतेनें रंगवावयास पाहिजे होत्या तितक्या त्या रंगविल्या न गेल्यानें वाचकांची व प्रेक्षकांची निराशा होते.

यांतील कलिपुरुष कौटिल्य असून त्याच्या मत्सरी व दुष्ट स्वभावावरच कथानकाची रचना सर्वस्वीं अवलंबून आहे. आरंभापासून अखेरच्या प्रवेशापर्यंत त्याचा दुष्टपणा लवमात्र कमी झालेला दिसत नाहीं. पश्चात्तापाचे उद्गार त्याच्या तोंडून केव्हांच निघत नाहींत. त्यामुळें त्याचा अखेरच्या दोन वाक्यांत वर्णन केलेला पश्चात्ताप अगदीं चमत्कारिक व अस्वाभाविक वाटतो.

'नाट्यकला प्रवर्तक मंडळी'नेंच हेंही नाटक रंगभूमीवर आणलें. परंतु तें विशेष लोकप्रिय झालें नाहीं. व्यक्तिगत विचार व भावना एकीकडे ठेवून आपलें व्यक्तित्व भासूं न देतां संभाषणद्वारां कथानकरचना व पात्रांचा मनोविकास केल्याशिवाय उत्कृष्ट दर्जाचें नाटक निर्माण होणें अशक्य आहे. कादंबरीमध्यें माहिती देण्यासाठीं, रहस्यस्फोट करण्यासाठीं, स्वतःचे विचार प्रकट करण्यासाठीं कादंबरीकार वाटेल तेव्हां प्रवेश करूं शकतो, तसें नाटककारास करतां येत नाहीं. त्यामुळें कादंबरीपेक्षां नाट्यरचना करण्यास अधिक कौशल्याची जरूरी आहे. 'संत सखू' व 'सती पिंगला' या दोन नाटकांवरून नाटककार या दृष्टीनें हरिभाऊंची योग्यता ठरवावयाची झाल्यास त्यांस श्रेष्ठ दर्जाच्या उत्कृष्ट नाटककारांत स्थान मिळणार नाहीं. त्यांचीं नाटकें मध्यमांपैकीं आहेत, उत्कृष्ट नाहींत.

हरिभाऊंनीं भाषान्तर केलेल्या ग्रंथांत 'गीतांजली', 'भासकवीच्या नाट्यकथा', 'तीन नाटकें व तीन प्रहसनें,' 'चाणाक्षपणाचा कळस' यांचा अंतर्भाव होईल.

या भाषान्तरांत 'गीतांजली' महत्त्वाची आहे. हरिभाऊंच्या पूर्वी रावसाहेब गोबिन्दराव कानिटकर यांनीं गीतांजलीचें भाषान्तर केलें होतें. परंतु त्यांचें भाषान्तर मॅकमिलन कंपनीस पसंत न पडून कंपनीच्या चालकांनीं गीतांजलीचें भाषान्तर करून देण्याविषयीं हरिभाऊंना अत्यंत आग्रह केला. त्यावरून हरिभाऊंनीं हें काम हातीं घेतलें. हरिभाऊंचें भाषान्तर प्रसिद्ध झाल्यानंतर त्यावर खोटा हक्क सांगणारा एक भाषान्तरकार निर्माण झाला होता. हा गृहस्थ नगरकडील होता. त्यासंबंधीं त्याचा, हरिभाऊंचा व मॅकमिलन कंपनीचा झालेला पत्रव्यवहार मौजेचा आहे.

## हरि नारायण आपटे

इंग्रजी न जाणणाऱ्या वाचकांस ही मराठी गीतांजली सुंदर वाटेल. मूळ गीतांजलींतील काव्य व अध्यात्म या मराठी भाषांतरांत उतरविण्याचा भाषान्तरकारानें आटोकाट प्रयत्न केला आहे. मूळ ग्रंथांतील विचार, भावना, काव्य, तत्त्वज्ञान हुबेहूब दुसऱ्या भाषेंत उतरविणें हेंच भाषान्तरकाराचें मुख्य काम आहे. मुळाशीं तुलना न करतां हरिभाऊंची गीतांजली वाचली तरी वाचतांना गोडी वाटते. यावरून भाषान्तराची भाषा चांगली साधली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. हरिभाऊंची 'गीतांजली' व रावसाहेब कानिटकर यांची 'गीतांजली' या दोहोंची तुलना केली असतां हरिभाऊंचेंच भाषान्तर मुळास धरून आहे असें स्पष्ट दिसतें. कानिटकरांनीं भाषान्तर करतांना पदरचे पुष्कळच शब्द घातले आहेत. हरिभाऊंनीं अक्षरशः भाषान्तर करण्याचा प्रयत्न केला आहे व त्यांचें भाषान्तर चांगल्यापैकीं आहे, तरी सूक्ष्म दृष्टीनें तें इंग्रजी गीतांजलीशीं ताडून पाहिल्यास त्यांत कोठें कोठें चुका आढळतात. गीतांजली गीत १ यांतील "**Thy infinite gifts come to me only on these very small hands of mine.**" यांतील अर्थ "तुझ्या देणग्या अनंत! त्याचें ग्रहण करणारे माझे हात अत्यल्प!" या भाषान्तरांत उतरत नाहीं. गीत २, "**When thou commandest me to sing, it seems that my heart would break with pride and I look to thy face and tears come to my eyes.**" याचें भाषान्तर हरिभाऊंनीं पुढीलप्रमाणें केलें आहे—"तूं जेव्हां मला एखादें गाणें गाण्याची प्रेरणा करतोस, तेव्हां माझ्या अंतःकरणांत अभिमानाचें भरतें येतें ( वाटतें कीं, मी आज धन्य झालों! ) माझ्या दोनही डोळ्यांवाटें प्रेमाश्रूंचे प्रवाह सुरू होतात! आणि मी तशांतच टक लावून तुझ्या मुखाकडे पाहूं लागतों." '**Commandest me**' याचा अर्थ 'प्रेरणा करणें' असा होत नाहीं. 'मी यःकश्चित् आणि तूं मला गायला सांगितलेंस याबद्दल कृतज्ञता वाटून माझ्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले ' असा कवीचा खरा भावार्थ आहे. आपल्यापेक्षां जे वरिष्ठ आहेत त्यांकडे टक लावून पाहणें अयोग्यच होय आणि कवीचा तसा भावार्थहि नाहीं. ' अभिमानानें व कृतज्ञतेनें माझें अंतःकरण भरून राहिल्यामुळें तुझ्याकडे पाहतांच माझ्या नेत्रांत अश्रू आले ' असाच अर्थ बरोबर दिसतो. असो. अशा तऱ्हेच्या बारीक सारीक चुका जरी आढळल्या तरी गीतांजलीच्या इतर भाषान्तरांपेक्षां हरिभाऊंचीच गीतांजली उत्तम आहे.

## भाषान्तरें व रूपान्तरें

हरिभाऊंची मित्रकन्या कु. शकुन्तला परांजपे ही हरिभाऊ दिसले कीं त्यांना प्रत्येक वेळीं एखादी नवी गोष्ट सांगण्याचा आग्रह करी. आणि गोष्ट सांगितल्या-वांचून ती त्यांना सोडीत नसे. भासकवीच्या नाटककथा तिला अर्पण करून तिच्या बंधनांतून हरिभाऊंनीं सुटका करून घेतली. गोष्टी या दृष्टीनें प्रतिज्ञायौगंधरायण, स्वप्नवासवदत्त, चारुदत्त या तीन कथा सरस आहेत. त्याचप्रमाणें पंचरात्र, दूत-वाक्य, प्रतिमा, अभिषेक, अविमारक, ऊरुभंग, कर्णभार इत्यादि कथा वाचतांना गोडी वाटते. कांहीं नाटकांचें त्यांनीं केवळ गद्यात्मक तर कांहींचें गद्यपद्यात्मक भाषान्तर केलें आहे. गोष्ट देत असतां कांहीं ठिकाणीं भाषान्तर, तर कांहीं ठिकाणीं मुळांतला भावार्थ दिला आहे. त्यामुळें भाषांतराच्या कडक कसोटीला त्या कथा उतरणार नाहींत. या पुस्तकाची प्रस्तावना वादग्रस्त आहे. हीं नाटकें भासाचीं आहेत अथवा दुसऱ्याच कोणा कवीचीं आहेत, या प्रश्नाचा निर्णय अद्याप झाला नाहीं. हरिभाऊंच्या मतें हीं तेरा नाटकें भासकवीचीं असून तो कालिदासापूर्वी शेंदोनशें वर्षे झाला असावा. नाट्यकलेच्या दृष्टीनें कालिदास-भवभूतीपेक्षां भास श्रेष्ठ आहे, असें त्यांचें मत होतें. "कालिदासाची कविता उद्यानलतेसारखी व भासाची वनलतेसारखी होय," असें त्यांनीं म्हटलें. परंतु हा प्रश्नही विवादास्पदच आहे. संस्कृत न जाणणाऱ्या लहानमोठ्या मित्रांच्या साठीं त्यांनीं भासकवीच्या नाटकांचीं 'सारें' काढून तीं आपल्या 'करमणूक' पत्रांत प्रसिद्ध केलीं व त्यांतील सौंदर्याचा लाभ त्यांनीं मराठी वाचकांस करून दिला.

'तीन नाटकें व तीन प्रहसनें' मनोरंजन व निबंधचंद्रिकेंत प्रसिद्ध झालीं होतीं. हीं सर्वच इंग्रजी व फ्रेंच नाटकांचीं रूपांतरें आहेत. सुप्रसिद्ध फ्रेंच कादंबरीकार व्हिक्टर ह्यूगो ह्याच्या 'हेर्नानी' नाटकाचें 'जयध्वज' हें रूपान्तर आहे. 'श्रुतकीर्तिचरित' हें कॉंग्रीव याच्या 'दि मोर्निंग ब्राइड' या नाटकाचें रूपांतर आहे. 'सुमतिविजय' हें शेक्स्पिअरच्या 'मेझर फॉर मेझर' या नाटकाचें रूपांतर आहे. 'धूर्तविलसित,' 'मारून मुटकून वैद्यबोवा' व 'जबरीचा विवाह' हीं तीन प्रहसनें फ्रेंच प्रहसनकार मोलीएर याच्या 'टार्टूफ्', 'लमेदसँ माल्ग्रे ल्वि' व 'ल मारिआज् फोर्से' या प्रहसनांचीं रूपांतरें होत.

या रूपांतरांवर पाश्चात्य चालीरीतींची छटा पडलेली आहे. त्यामुळें या गोष्टी परक्या देशांतील आहेत असें वाचतांना तात्काळ भासतें. 'श्रुतकीर्तिचरित' यांतील

'हेली' या पात्राचें नांवही परकी आहे. 'Measure for Measure' याचें 'सुमतिविजय' हें रूपान्तर चांगल्यापैकीं आहे. त्यांच्या सर्व प्रहसनांत 'मारून मुटकून वैद्यबोवा' हें प्रहसन उत्कृष्ट आहे. याचे प्रयोग रंगभूमीवर होऊन त्यानें शेंकडों प्रेक्षकांच्या हंसवून हंसवून मुरकुंड्या वळविल्या होत्या.

'चाणाक्षपणाचा कळस' ही रहस्यमय कथा असून गुप्तपोलिसांचें चातुर्य त्यांत पहावयास सांपडतें. ही कथा एखाद्या इंग्लिश गोष्टीचें रूपांतर असावें अशी दृढ शंका येते. गुप्त कारस्थानांची, डिटेक्टिव्हांच्या बहादुरीची ज्यांना आवड आहे त्यांना ही गोष्ट खाचित पसंत पडेल.

'करमणुकी'च्या बाहेर हरिभाऊंनीं फारच थोडें लिहिलें आहे. मनोरंजन, चित्रमयजगत इत्यादि नियतकालिकांत हरिभाऊंनीं जे लेख लिहिले व ज्या कित्येक पुस्तकांस त्यांनीं प्रस्तावना लिहिल्या त्यांपैकीं महत्त्वाच्या लेखांचा व प्रस्तावनांचा येथें निर्देश केला आहे. 'करमणुकीं'त त्यांचे अनेक लेख, चुटके, स्फुट गोष्टी प्रसिद्ध झालेल्या आढळतात, त्यांपैकीं कांहीं 'घटकाभर करमणूक' व 'स्फुट गोष्टी' या नांवाखालीं पुनः प्रसिद्ध झाल्या. 'करमणुकीं'त प्रसिद्ध झालेलें पुष्कळसें हरिभाऊंचें लिखाण त्याखालीं नांव नसल्यानें अज्ञातच राहिलें आहे. प्रारंभीं प्रारंभीं 'करमणुकी'चा बहुतेक मजकूर तेच लिहीत. असो.

'सहा अभंगांत श्रीतुकाराम महाराज' हा लहानसा निबंध हरिभाऊंचाच आहे. 'मोर्लेच्या आठवणी' या नांवाखालीं एक मोठी लेखमाला मनोरंजनांत देण्याचा त्यांचा बेत होता. तीपैकीं फक्त दोन लेखच प्रसिद्ध झाले. कै. देवलकृत संगीत 'संशयकल्लोळ' व आगरकरकृत 'हॅम्लेट' यांस हरिभाऊंनीं प्रस्तावना लिहिल्या आहेत.

शेक्स्पिअर हा हरिभाऊंचा अतिशय आवडता कवि होता. त्याच्या नाटकाचा त्यांनीं खोल अभ्यास केला होता. शेक्स्पिअरचीं Sonnets त्यांना विशेष आवडत. त्याबद्दल चित्रमयजगतांत 'शेक्स्पिअरचें आत्मचरित्रपर काव्य' या मथळ्याखालीं एक लेखमाला लिहिण्याचा त्यांचा विचार होता. परंतु तीपैकीं फक्त दोन लेख त्यांनीं लिहिले. ही लेखमाला पूर्ण झाली असती तर टीकात्मक वाङ्मयांत चांगलीच भर पडली असती.

'मराठीचा अभ्यास,' 'विदग्ध वाङ्मय' या विषयांवर हरिभाऊंनीं व्याख्यानें दिलीं. अकोल्याच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांनीं दिलेलें व्याख्यान सुप्रसिद्ध आहे.

Wilson Philological Lecturer म्हणून ' Marathi, Its Sources and Development ' या विषयावर त्यांनीं सहा व्याख्यानें दिलीं. इ.स. १९०१ सालीं Friends Liberal Association तर्फे ' The Philosophy of Fiction, ' ' Realism in Fiction ' व ' The Teaching of the Bhagavadgita ' या विषयांवर त्यांनीं इंग्रजींत व्याख्यानें दिलीं. याशिवाय डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांसमोर 'What Is a Nation' या विषयावर प्रि. बेनसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचें व्याख्यान झालें. बेनसाहेबांनीं व्याख्यात्यांची खूप प्रशंसा केली. त्याचप्रमाणें पुण्याच्या लिटररी ॲन्ड सायन्टिफिक क्लबमध्यें ' John Stuart Mill as Revealed in His Letters ' व ' Ethics of Mahabharata ' या विषयांवर आणि मुंबईच्या हेमंत व्याख्यानमालेंत ' प्राचीन काळची शस्त्रास्त्रें ' व ' हास्य ' या विषयांवर त्यांचीं व्याख्यानें झालीं.

' मराठीचा अभ्यास ' या व्याख्यानांत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आदिकरून संतकवींचीं संक्षिप्त चरित्रें व त्या प्रत्येकाचें वाङ्मयांतील स्थान याबद्दल विवेचन केलेलें आहे. महाराष्ट्रीय संतकवींच्या ग्रंथांचा हरिभाऊंचा अभ्यास खोल व मार्मिक वाटतो.

इ. स. १९०२ सालीं मुंबईस हेमंतोत्सवव्याख्यानमालेंत ' कादंबऱ्या ' या विषयावर कै. रा. सा. विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्या अध्यक्षतेखालीं हरिभाऊंचें व्याख्यान झालें. या व्याख्यानास श्रोत्यांची अतोनात गर्दी झाल्यामुळें कित्येक श्रोत्यांस जागा न मिळाल्यानें निराश होऊन परत जावें लागलें. अखेरीस पुरेशी जागा नव्हती म्हणून हेमंतोत्सवाचे चिटणीस प्रि. पाध्ये यांस सभाजनांची माफी मागावी लागली.

विषयविवेचन करीत असतांना, मोठ्या कथा म्हणजे कादंबऱ्या अशी त्यांनीं कादम्बरीची व्याख्या केली. स्वभावतःच मानव कथाप्रिय आहे, लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांसच गोष्टी आवडतात, असें प्रतिपादन करून त्यांनीं कादम्बरीकारांचे चार पंथ सांगितले. आयडिॲलिस्ट्स् ( अद्भुत पंथ ), रोमँटिस्ट्स्, सेन्सेशनॅलिस्ट्स् व रिॲलिस्ट्स् अशा चार वर्गांत त्यांनीं कादम्बरीकारांचें वर्गीकरण केलें. या चार पंथांखेरीज रॅशनॅलिस्टिक्स् म्हणून एक पांचवा पंथ त्यांनीं सांगितला. मानसशास्त्रदृष्ट्या हें वर्गीकरण अपुरें वाटतें.

## हरि नारायण आपटे

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या १३ व्या वार्षिक सभेच्या दिवशीं ( इ. स. १९११ ) श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांच्या अध्यक्षतेखालीं 'विदग्ध वाङ्मय ' या विषयावर हरिभाऊंनीं व्याख्यान दिलें. हेंच पुढें मित्रांच्या आग्रहावरून त्यांनीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. " त्यास ( मनुष्यास ) मनुष्यत्वांतून काढून देवत्वाकडे जाण्याबद्दल उत्सुक करून त्या मार्गाला सन्मुख करणारे असे जे कोणाचेहि अंत:स्फूर्तीनें शब्दरूप घेऊन मुखावाटे बाहेर पडलेले किंवा लेखणीनें लिहून ठेविलेले विचारोद्गार, त्या सर्वांना वाङ्मय ही संज्ञा आहे, " अशी त्यांनीं वाङ्मयाची व्याख्या केली आहे. वाङ्मयाप्रमाणेंच कला, काव्य, यांच्या व्याख्या देऊन अखेरीस काव्यव्याख्यांचा निष्कर्ष काढला आहे. सत्य व सत्याभास यांसंबंधींचें त्यांचें विवेचन सूक्ष्म व मार्मिक आहे. 'विदग्ध वाङ्मय ' या निबंधाची मांडणी, विषयप्रतिपादनपद्धति व भाषा सुंदर आहे, त्यामुळें तो पुन:पुनः वाचावासा वाटतो.

इ. स. १९१२ सालीं अकोल्याच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं दिलेल्या व्याख्यानाचा विषय 'महाराष्ट्र-वाङ्मयाची उन्नति ' हा आहे. त्यासाठीं त्यांनीं, युनिव्हर्सिटींत मराठी भाषा आवश्यक विषयांत घातली पाहिजे, मॅट्रिक्युलेशनपर्यंत सर्व शिक्षण मराठीच्या द्वारें झालें पाहिजे, मराठी साहित्यसभेनें मराठी कोशाची नवीन आवृत्ती तयार केली पाहिजे व हिंदुस्थानांतील सर्व भाषांच्या प्रतिनिधींनीं सहकार्य करून विविध शास्त्रांतील पारिभाषिक शब्दांचा कोश कायम केला पाहिजे, असे चार उपाय सुचविले.

भगवद्गीतेवरील इंग्रजी व्याख्यानांत भगवद्गीतेवरील शंकराचार्यांच्या अद्वैतमताचें संक्षिप्त विवेचन त्यांनीं केलें आहे. त्या वेळीं भगवद्गीतेचा अभ्यास इतका सार्वत्रिक रूढ नव्हता. असें असतां हरिभाऊंनीं गीतेचा अभ्यास करून इंग्रजींत व्याख्यान दिलें ही विशेष गोष्ट आहे.

हरिभाऊंच्या Wilson Philological Lectures ची तुलना डॉ. भाण्डारकर यांच्या त्याच विषयावरील व्याख्यानांशीं केली असतां तीं कमी प्रतीचीं ठरतात. भाषाशास्त्र ( Philology ) हा खरोखरी त्यांचा विषय नव्हता. वाङ्मयाचा त्यांचा अभ्यास जसा सूक्ष्म होता तसा भाषाशास्त्राचा केव्हांही नव्हता. त्यामुळें हीं व्याख्यानें अगदीं बरबर व सामान्य स्वरूपाचीं वाटतात. भाषेच्या उत्पत्तीसंबंधीं

हरिभाऊंनीं कांहींच लिहिलें नाहीं. प्राकृत भाषांचा त्यांचा अभ्यास खोल नसून भाषांचें सूक्ष्म संशोधन त्यांनीं केलें नव्हतें, असें हीं व्याख्यानें वाचतांना वाटतें. शब्दांची उत्पत्ति व भाषांची उत्पत्ति यांमधील भेद स्पष्ट न करतां त्यांनीं तो मुद्दा तसाच सोडला आहे. भाषेंत बदल होण्याचें कारण केवळ उत्क्रांति नसून परजातींशीं व व्यापारी वर्गांशीं व्यवहार हें आहे. Vedic Sanskrit पासून Classical Sanskrit कशी निर्माण झाली, याचें सोपपत्तिक विवेचन हरिभाऊंनीं केलेलें नाहीं. व्याख्यानांची इंग्रजी भाषा बरी आहे. परंतु शास्त्रीय दृष्ट्या विवेचन सूक्ष्म नसल्यानें त्यांची किंमत बरीच कमी झाली आहे.

या वाङ्मयविषयक व्याख्यानांखेरीज सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून अनेक प्रसंगीं त्यांनीं भाषणें केलीं. इ. स. १९१५ सालच्या प्रांतिक परिषदेचे स्वागताध्यक्ष म्हणून त्यांनीं केलेलें भाषण, सेवासदनांतील व्याख्यानें, नगरला व पुण्याला शिक्षकांसाठीं दिलेलीं व्याख्यानें प्रसिद्ध आहेत.

हरिभाऊंचा आवाज लहान होता, पण त्यांत माधुर्यगुण विशेष असे. त्यांची वाणी स्पष्ट व अस्खलित होती. बहुधा आपलीं व्याख्यानें अगोदर लिहून काढून ते वाचीत. त्यांची भाषाशैली उत्तम असून श्रोत्यांचीं मनें आकर्षण करून घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या वाणींत होतें.

मुलांना उन्हाळ्याची सुट्टी देण्याच्या दिवशीं बसंतपूजन करून त्या उत्सवानिमित्त कोणा तरी विद्वानाकडून त्यांस उपदेश करवावयाचा व तो उपदेश छापवून त्याची एक एक प्रत प्रत्येक मुलास द्यावयाची, असा नूतन मराठी विद्यालयाच्या चालकांचा रिवाज अनेक वर्षे चालू आहे. या उपदेशांपैकीं बरींच उपदेशपर व्याख्यानें विद्यार्थ्यांस देण्याचा मान हरिभाऊंना लाभला. हीं सर्वच व्याख्यानें 'मुलांस उपदेश' या नांवाखालीं पुढें पुस्तकरूपानें त्यांनीं प्रसिद्ध केलीं. या पुस्तकांत पुणें म्युनिसिपॅलिटीच्या शाळांतील विद्यार्थ्यांस 'राजनिष्ठा' या विषयावर दिलेलें व्याख्यान आणि 'वाचन' व 'वेळ' हे कानिटकर मंडळींच्या 'मनोरंजनां'त प्रसिद्ध झालेले हरिभाऊंचे निबंध समाविष्ट केले आहेत.

राजनिष्ठा, सभ्यता, उद्योग, आत्मसंयमन, जुन्या काळचा उपदेश, आनंद, मुलांनीं काय करावें? बाळपणीं काय शिकावें? वाचन, वेळ कसा घालवावा? खेळ, विश्रांति, पहावें काय आणि तें कसें? मुलांचीं कर्तव्यें, इत्यादि तेरा विषयांवर त्यांनीं निबंध

लिहिले. या निबंधांचें वाचन लहानांसच केवळ नव्हे, तर थोरांसही हितकारक होईल. मुलांची मनोवृत्ति समजून घेऊन त्यांना पचेल व रुचेल असा बोध केल्यामुळें हें पुस्तक मुलांना पसंत पडण्यासारखें आहे. 'विश्रांति', 'वेळ कसा घालवावा' व 'आनंद' या निबंधांतील विचार पुनःपुनः मनन करण्याजोगे आहेत. लहान मुलांना बक्षीस म्हणून देण्यास हें पुस्तक उत्तम आहे.

हरिभाऊंनीं सुमारें तीस पस्तीस स्फुट गोष्टी लिहिल्या. 'कसे दिवस गेले' ही पहिल्या प्लेगासंबंधीं गोष्ट आहे. 'काळ तर मोठा कठीण आला' या गोष्टींत दुष्काळांतील हृदयद्रावक दृश्य दृष्टीस पडतें. ही गोष्ट वाचतांना डोळ्यांत वारंवार अश्रू उभे राहतात. त्यांच्या प्रत्येक गोष्टींत एखादें तरी नीतितत्त्व चातुर्यानें गुंफलें गेलें असल्यानें त्या गोष्टीचा लहान थोर सर्व वाचकांच्या मनावर उत्तम परिणाम होऊन त्यांच्या अन्तःकरणांतील सात्त्विक विचार व भावना उत्तेजित होतात. त्यांच्या गोष्टींतील वातावरण शुद्ध स्वरूपाचें असून त्यांनीं वाचकांच्या अभिरुचीस उच्च दर्जाचें वळण लाविलें आहे. त्यांच्या गोष्टींचे विषय रोजच्या व्यवहारांतीलच आहेत. लघुकथेंत एखाद्या दुसऱ्या प्रसंगावर कथानकाची उभारणी करून संभाषणद्वारां स्वभावचित्रलेखन करावें लागतें. लघुकथेचें कथानक सुटसुटीत चटकदार असलें तरच गोष्ट उठावदार होते. हरिभाऊंच्या गोष्टींतील कथानकें साधीं परंतु चटकदार आहेत. त्यांतील संवाद उत्कृष्ट असून पात्रें खरीं-जिवंत मनुष्येंच वाटतात. त्यांतील विचार गंभीर असून नीतिबोध शर्करावगुंठित असल्यानें मधुर वाटतो. त्यांच्या कित्येक गोष्टींत विनोदाच्या छटा पसरल्या असल्यानें त्यांचें रम्यत्व अधिकच वाढलें आहे. गोष्ट सांगण्याची त्यांची पद्धति गोड असून भाषा साधी परंतु गंभीर आहे. 'हरवलेली किल्ली', 'पुरी हौस फिटली', 'पहिलेंच भांडण', 'हात लावला कीं सोनें', 'कृष्णदेव यादव' या त्यांच्या गोष्टी उत्कृष्ट आहेत. 'डिस्पेप्शिआ' व 'खाशी तोड' या गोष्टी विनोदपूर्ण आहेत. 'दोन चित्रें', 'तीन फुलें' व 'गेलेला आनंद' या गोष्टींतील तत्त्वज्ञान मननीय आहे. हरिभाऊंची लघुकथा-लेखनपद्धति कै. कृष्णाजी केशव गोखले यांनीं अंगिकारली होती. 'खूप केलीत, सुनबाई', 'पत्ता चुकला', 'नवराबायको' इत्यादि त्यांच्या गोष्टीही चांगल्या आहेत. त्यांच्याप्रमाणेंच हरिभाऊंचें अनुकरण करणारे पुष्कळ लेखक झाले. परंतु लघुकथालेखकांतील हरिभाऊंचा उच्च दर्जा कायम आहे.

# छोटीं चरित्रें

छोटींमोठीं मिळून हरिभाऊंनीं सुमारें पंधरा वीस चरित्रें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं दहा बारा थोर स्त्रियांचीं आहेत. 'आठ स्त्रीरत्नें' या नांवाखालीं त्यांनीं राणी भवानी, भास्कराचार्यांची लीलावती, जोधपूरची रणशूर राणी दुर्गावती, या आर्य स्त्रियांचीं व कॅरोलिन हर्शेल, सिस्टर डोरा, एलिझाबेथ फ्राय, मेरी सॉमार्व्हिल या पाश्चात्य उदारचरित स्त्रियांचीं चरित्रें लिहिलीं. याशिवाय 'घटकाभर करमणूक' या नांवाच्या पुस्तकांत त्यांनीं द्रौपदीच्या तेजस्वी चारित्र्याचें कथन केलें आहे. महाराणी व्हिक्टोरियाचें छोटें चरित्रही त्यांनीं लिहिलें आहे. कै. न्यायमूर्ति रानडे, श्रीरामकृष्ण परमहंस, भक्त कनाप्पा नायनार, ईसाप, एडमे जॉन लक्लेअर यांचीं चरित्रें लहान असलीं तरी सुंदर आहेत. खना व आवियार या प्राचीन आर्यावर्तांतील विद्यासंपन्न स्त्रियांचीं चरित्रें मनोरंजक आहेत. या सर्व चरित्रांत हरिभाऊंनीं पुष्कळशी माहिती थोडक्यांत चांगल्या प्रकारें दिली आहे.

'सगुणाबाईचीं आपल्या मुलीस पत्रें' व 'गोविंदरावांचीं आपल्या मुलांस पत्रें' हीं दोन्ही पुस्तकें तरुण मुलांमुलींना अजूनही उपयुक्त आहेत. सगुणाबाईनें आपल्या नवविवाहित कन्येस केलेला उपदेश अविभक्त कुटुंबांतील प्रत्येक मुलीनें लक्षांत धरण्याजोगा आहे. या पत्रांवरून हरिभाऊंनीं आपल्या गृहस्थितीचें किती सूक्ष्म निरीक्षण केलें होतें, हें लक्षांत येतें.

हरिभाऊंनीं ज्ञानेश्वरींतील शब्दांचा एक कोश तयार केला होता असें म्हणतात. परंतु तो छापल्याचें अजून ऐकिवांत नाहीं. तो छापला गेल्यास ज्ञानेश्वरीचें अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांचे बरेच श्रम वांचतील.

हरिभाऊंनीं कांहीं वर्णनात्मक निबंध लिहिले होते. त्यांपैकीं 'लक्ष्मण झोला' व 'खंडाळयाच्या घाटांत' हे अप्रतिम आहेत. त्यांतील वनश्रीच्या वर्णनानें रसिक हृदयें उचंबळून येतात.

काव्य, नाटकें, रूपांतरें, भाषांतरें, लेख, निबंध, प्रस्तावना, व्याख्यानें, उपदेश, गोष्टी, छोटीं चरित्रें इत्यादि वाङ्मयप्रकारांचा हरिभाऊंच्या अवांतर लेखनांत अन्तर्भाव होतो. यावरून हरिभाऊंची तीक्ष्ण बुद्धि किती विविधप्रकारच्या लेखनपद्धतींत रमत असे, हें स्पष्ट दिसतें. हरिभाऊंच्या अवांतर लेखनाचा हा विस्तार पाहून त्यांच्या अष्टपैलू बुद्धिमत्तेचें कौतुक वाटल्यावांचून राहवत नाहीं.

# प्रकरण चौदावें

# सार्वजनिक कामगिरी

कादम्बरीकार या नात्यानें जसा हरिभाऊंचा परिचय अखिल महाराष्ट्रास आहे तसा सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून नाहीं. कारण त्यांची वाङ्मयसेवा जशी सर्वांस अवगत आहे तशी त्यांची सार्वजनिक कामगिरी नाहीं. हरिभाऊंच्या वाङ्मय-विस्ताराबद्दल कौतुक वाटतें, नाहीं असें नाहीं. परंतु त्यांच्या सार्वजनिक कार्याबद्दल निःसंशय जास्त कौतुक वाटतें. त्यांच्या कादंबऱ्यांत त्यांचे विचार प्रतिबिंबित झाले आहेत. परंतु त्यांच्या सार्वजनिक कार्यांत त्यांच्या उदात्त हृदयाचा उत्कृष्ट परिचय होऊन त्यांच्याबद्दलचा आदरभाव वृद्धिंगत होतो. कादम्बरीकार हरिभाऊ यांच्या-पेक्षां हरिभाऊ ही व्यक्ति श्रेष्ठ आहे. त्यांनींच निर्माण केलेल्या कादंबऱ्यांपेक्षां ते श्रेष्ठ आहेत. व्यक्ति या दृष्टीनें त्यांचें श्रेष्ठत्व त्यांच्या सार्वजनिक कार्यातच वाचकांच्या दृष्टीस पडेल. त्यांच्या अंगीं सार्वजनिक कार्यकर्त्यास आवश्यक असा गुणसमूह होता. ते स्वार्थत्यागी होते. दुसऱ्यासाठीं स्वतःला कितीही त्रास झाला, तरी तो ते शांतपणें सहन करीत. त्यांस लोकांविषयीं अगत्य असून आल्या गेल्या लोकांची वर्दळ सोसण्यास ते सदैव तयार असत. स्वार्थत्यागाच्या जोडीस क्षमाशीलता, प्रेमळपणा, सहानुभूति इत्यादि सद्गुण त्यांच्यापाशीं होते.

आनंदाश्रमानें त्यांना सार्वजनिक कार्ये करण्यास पुरेशी फुरसत दिली होती. घरची स्थिति बऱ्यापैकीं असल्यानें कुटुंबासंबंधीं सांपत्तिक दृष्ट्या काळजी करण्याचें कारण त्यांस उरलें नव्हतें. त्यामुळें सार्वजनिक कार्याची जबाबदारी स्वीकारणें त्यांस सुलभ झालें. कित्येक समाजसेवक व देशसेवक घरांतल्या मंडळींची उपेक्षा करून समाजोपयोगी व देशोपयोगी कामें करितात. तसें मात्र हरिभाऊंनीं केव्हांही केलें

नाहीं. स्वजनांविषयीं अन्तःकरणपूर्वक सहानुभूति व खरी अभिजातता त्यांच्या ठिकाणीं वास करीत होती. आपटे कुटुंबांत पांचपंचवीस मंडळी असत. त्यांच्यापैकीं कोणीही संकटांत सांपडलें कीं, हरिभाऊ त्यांच्या मदतीसाठीं धांव घेत. त्यांच्यापैकीं कोणी आजारी पडल्यास त्याची रात्रंदिवस शुश्रूषा करण्यास हरिभाऊ नेहमीं सिद्ध असत. घरांतल्या मंडळीप्रमाणेंच मित्रांच्या साठीं वाटेल तसे कष्ट ते सोशीत. प्लेगच्या दिवसांत त्यांनीं घरच्या मंडळींची, मित्रांची व परक्यांची जी सेवा केली ती खरोखर अनुपम आहे. 'Charity begins at home' या उक्तीप्रमाणें स्वतःच्या घरांतच त्यांनीं सार्वजनिक कार्यास प्रारंभ केला. कुटुंबाबाहेरील कामास त्यांनीं शाळेंत असतांनाच सुरुवात केली होती. आगरकर व टिळक डोंगरीच्या तुरुंगांत असतां त्यांच्यासाठीं ज्यांनीं वर्गोवर्गीं व्याख्यानें देऊन Defence Fund जमा केला त्यांमध्यें हरिभाऊ प्रमुख होते, हें मागें सांगितलेंच आहे. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, विद्यार्थिदशेंतच सार्वजनिक कार्याचे धडे त्यांनीं गिरविले.

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें स्मारक करण्याची कल्पना श्री. कृष्णाजीपंत उकिडवे यांनीं काढली. न्यू इंग्लिश स्कूलच्या धर्तीवर मराठी शाळा स्थापन करण्याचा त्यांनीं विचार केला. या कामीं श्री. डोंगरे, श्री. सिनकर व श्री. करंबेळकर हे तिघे त्यांचे सहकारी होते. हे सर्व ट्रेन्ड शिक्षक होते. इ. स. १८८२ सालीं न्यू इंग्लिश स्कूल मोरोबादादाच्या वाड्यांतून गर्देवाड्यांत गेलें होतें. तेव्हां मोरोबादादाच्या वाड्यांतच 'नूतन मराठी विद्यालय' प्रथम सुरू झालें. हरिभाऊंना कै. विष्णुशास्त्री यांच्याविषयीं अत्यंत आदर होता. 'नूतन मराठी विद्यालय' स्थापून विष्णुशास्त्री यांचें स्मारक करण्याची ही कल्पना त्यांना फार आवडली. ही शाळा स्थापन करतेवेळीं श्री. उकिडवे व श्री. डोंगरे यांनीं हरिभाऊंचा सल्ला घेतला होता. अशा रीतीनें नूतन मराठी विद्यालयाच्या जन्मापासूनच हरिभाऊंचा या संस्थेशीं निकट संबंध होता. पुढें इ. स. १८८५ सालीं शाळेला एक इंग्रजी वर्ग जोडला गेला. इंग्रजी शिकविण्याचें काम संस्थेस नुकतेच येऊन मिळालेले श्री. रामकृष्ण भिकाजी ऊर्फ दामुअण्णा कुलकर्णी यांच्याकडे देण्यांत आलें. दरवर्षी एक एक इंग्रजी वर्ग वाढत जाऊन इ. स. १८८८ सालीं इंग्रजी चौथीचा वर्ग उघडण्यांत आला. श्री. दामुअण्णा हे एकटेच इंग्रजी शिकविणारे होते. त्यांना एकट्यालाच सर्व वर्गांना शिकविण्याचें काम होईना, तेव्हां हरिभाऊ व त्यांचे मित्र

श्री. पानसे यांनीं कांहींही वेतन न घेतां शाळेंत शिक्षकाचें काम करण्याचें ठरविलें. हरिभाऊ इंग्रजी शिकवीत, तर श्री. पानसे संस्कृत घेत. पुढें दोन वर्षांनीं पानसे पगार घेऊं लागले. परंतु हरिभाऊंनीं मात्र बरींच वर्षें हौसेनें व बिलकूल वेतन न घेतां चारपांच वर्षें काम केलें.

शिक्षक या नात्यानें हरिभाऊंच्या विद्वत्तेचा प्रभाव विद्यार्थ्यांवर फार पडत असे. विषयांतील नैपुण्य व विद्यार्थ्यांविषयीं प्रेमभाव यांमुळें विद्यार्थी हौसेनें शिकत. केवळ शब्दार्थ सांगून न थांबतां अमुक एक सीन कां घातला किंवा त्याची रचना अमुक प्रकारची कां केली, हें सांगण्याकडे त्यांचें लक्ष असे. ते विद्यार्थ्यांस कोणत्याही प्रश्नाचा व्यापक दृष्टीनें विचार करायला शिकवीत. त्यांच्या तासाला विद्यार्थी तन्मय होऊन जात. कारण ते स्वतःच आपल्या विषयाशीं तद्रूप होऊन शिकवीत. त्यांना विद्यार्थ्यांबद्दल अतिशय कळकळ वाटे व प्रसंग-विशेषीं गरीब, होतकरू व बुद्धिमान् विद्यार्थ्यांस मदत करण्यास ते चुकत नसत. त्यांचे एक जुने शिष्य त्या वेळची आठवण म्हणून सांगतात कीं, क्वचित् प्रसंगी हरिभाऊ वर्गावर शिकवीत असतां छापखान्याकडील मनुष्य मजकूर मागावयास येई, तेव्हां विद्यार्थ्यांस दुसरें कांहीं काम सांगून तेथल्या तेथें ते कादंबरीचीं प्रकरणें खरडून देत, इतकी त्यांची लेखणी हुकमी होती. असो.

हरिभाऊंनीं शाळेंतील काम सोडलें तरी शाळेची उन्नति व्हावी यासाठी ते मनापासून झटत. युरोपियन अधिकाऱ्यांशी हरिभाऊंचा स्नेह असे. खुद्द गव्हर्नर व शिक्षणखात्यांतील अधिकारी यांच्यापाशीं हरिभाऊंचें चांगलें वजन असून ते हरि-भाऊंच्या शब्दास मान देत. नूतन मराठी विद्यालयाच्या चालकमंडळींत युरोपिअन अधिकाऱ्यांवर छाप पाडून त्यांच्याकडून संस्थेचीं कामें करवून घेणारा एकही गृहस्थ नव्हता. त्यामुळें एखादें महत्त्वाचें काम निघालें की, चालकमंडळी हरिभाऊंच्याकडे धांव घेत व हरिभाऊही आपलें वजन खर्च करून सर्व कामें यशस्वी रीतीनें पार पाडीत. शाळेस ग्रँट मिळवून देण्यासाठीं मुंबईचे गव्हर्नर नॉर्थकोट यांस भेटून हरि-भाऊंनीं पुष्कळ खटपट केली व त्यांच्याच प्रयत्नामुळें शाळेस सरकारी ग्रँट मिळाली. दिवसेंदिवस शाळेची प्रगति होऊन ती न्यू इंग्लिश स्कूलशीं स्पर्धा करूं लागली. तेव्हां फर्ग्युसन कॉलेजप्रमाणें आपल्या शाळेस जोडून एक आर्ट्स् कॉलेज स्थापन करावें, अशी महत्त्वाकांक्षा चालक मंडळींत उत्पन्न झाली. या नवीन कॉलेजास

परवानगी द्यावी यासाठीं मुंबई सरकार व मुंबई विश्वविद्यालय यांकडे हरिभाऊंना बरीच खटपट करावी लागली व ती त्यांनीं मोठ्या आनंदानें केली.

हरिभाऊंच्याच प्रयत्नामुळें नूतन मराठी विद्यालयास खाजगीवाल्यांचा वाडा व जव्हारकरांची बखळ मिळाली. जेव्हां इ. स १९१५ मध्यें न्यू पूना कॉलेज सुरू झालें तेव्हां हरिभाऊंना अत्यंत धन्यता वाटली हें सांगणें नकोच.

कॉलेजच्या व्यवस्थापक मंडळाचे ते सभासद होते. या मंडळाचे चेअरमन कै. डॉ. भाण्डारकर हे होते. कॉलेजसंबंधीं सभेंत कांहीं विशेष प्रश्न उपस्थित झाला म्हणजे डॉ. भाण्डारकर " हें हरिभाऊंना पसंत आहे का ? " असा प्रश्न विचारीत. हरिभाऊंच्यावर डॉक्टरसाहेबांचा इतका विश्वास होता कीं, हरिभाऊंस जी गोष्ट मान्य ती डॉक्टरसाहेबांनाही मान्य होई. न्यू पूना कॉलेजबद्दल हरिभाऊंना अत्यंत आपलेपणा वाटे. आपला ५००० रुपयांचा ग्रंथसंग्रह त्यांनीं कॉलेजच्या ग्रंथसंग्रहालयास नजर केला होता. शाळेच्या मुलांना ज्या दिवशीं उन्हाळ्यानिमित्त सुट्टी होई त्या दिवशीं मुलांना उपदेशपर व्याख्यान देण्याचा हरिभाऊंचा क्रम कित्येक वर्षें चालू होता. हरिभाऊंचे श्री. गोपाळराव गोखले, प्रो. पानसे, प्रि. राजवाडे, डॉ. परांजपे इत्यादि मित्र डेक्कन एज्युकेशन सोसायटीमध्यें होते. परंतु हरिभाऊंची विशेष सहानुभूति नूतन मराठी विद्यालय व न्यू पूना कॉलेज यांच्याकडेच होती. नूतन मराठी विद्यालय व न्यू पूना कॉलेज यांना हल्लींचें स्वरूप प्राप्त होण्यास हरिभाऊंचे प्रयत्न विशेष कारणीभूत झाले, ही ध्यानांत धरण्याजोगी गोष्ट आहे. नूतन मराठी विद्यालयांतील शिक्षकाचें काम पतकरून हरिभाऊंनीं सार्वजनिक कार्याच्या विस्तृत जगांत पाहिलें पाऊल टाकलें.

रावसाहेब गोविन्दराव कानिटकर यांच्यामुळें हरिभाऊंचा श्री. आगरकर, श्री. गोपाळराव गोखले यांच्याशीं दाट परिचय होऊन ते हळू हळू न्या. रानडे यांच्या पक्षांत पूर्णत्वानें सामील झाले. संमतिबिलाच्या चर्चेपासून सामाजिक चळवळींत हरिभाऊ प्रत्यक्षपणें पडूं लागले. तुळशीबागेंतील सभेविरुद्ध हरिभाऊ व त्यांच्या क्लबांतील १७ मंडळी यांनीं स्वतःच्या सह्यांनिशीं सदर सभेच्या निषेधात्मक हस्तपत्रकें वांटलीं व प्रत्यक्षपणें सभेंत हजर राहून निषेध व्यक्त केला. रा. ब. रानडे, डॉ. भांडारकर व श्री. नूलकर हे या सभेचा प्रकार दुरून पहात उभे राहिले होते. पुढें क्रीडाभुवनांत बिलास अनुकूल असलेल्या मंडळींची सभा झाली. तेव्हां विरुद्ध

पक्षाच्या लोकांनीं डॉ. भांडारकर, प्रि. आपटे, श्री. आगरकर व त्यांचे अनुयायी यांच्यावर समोरच बांधीत असलेल्या घराच्या विटांचा मारा व शिव्यांचा भडिमार सुरू केला. हरिभाऊ व त्यांचे मित्र यांना चांगलाच मार मिळाला. याचा परिणाम इतकाच झाला कीं, न्या. रानडे व डॉ. भाण्डारकर यांच्या तरुण अनुयायी मंडळींचा चांगलाच गट झाला. हरिभाऊ व त्यांचे मित्र यांस स्फुरण चढून त्यांनीं बुधवारांत बेलबागेसमोर जागा घेऊन 'मित्रमंडळ' नांवाचा क्लब स्थापन केला. समविचारी मंडळी एकत्र जमून नाना विषयांवर तेथें विचारविनिमय होत असे. हा क्लब बरींच वर्षें चालू होता. या क्लबांत नूलकर बंधू, सितारामपंत देवधर, प्रो. भानू, प्रो. राजवाडे, श्री. गोपाळराव गोखले, प्रो. पानसे इत्यादि चाळीस मंडळी होती. हे सर्वजण सामाजिक बाबतींत न्या. रानडे यांचे कट्टे अनुयायी होते. हैद्राबाद, वऱ्हाड, खानदेश, या बाजूची रानडेपक्षाची मंडळी मे महिन्यांत पुण्यास आली कीं या क्लबास भेट दिल्याशिवाय रहात नसत. या क्लबाचें हिराबागेंत सम्मेलन झालें, त्या प्रसंगीं डॉ. भाण्डारकर अध्यक्षस्थानीं होते. त्यांनी मंडळींच्या उद्योगाची व उत्साहाची प्रशंसा करून म्हटलें, "आजपर्यंत आम्ही उषरावर्षक केलें. आतां कर्षण निष्फळ होणार नाहीं अशी आम्हांस उमेद आली आहे." याच्या पुढच्याच वर्षीं रा. चिन्तामणराव भट यांनीं 'मित्रमंडळ' क्लबांतील मंडळीस मुद्दाम लोणावळ्यास बोलावून न्या. तेलंग यांचा परिचय करून दिला. हे उत्साही, तरुण समाजसेवक पाहून न्या. तेलंग यांस फार आनंद व कौतुक वाटलें व त्यांनीं मंडळीची प्रशंसा करून समाजहिताचीं कार्यें करण्यास त्यांस उत्तेजन दिलें.

'सुधारक' पत्रांतील सर्व मराठी भाग आगरकरांचा असे. इंग्रजी भागांत श्री. गोपाळराव गोखले लिहीत. माधवराव जोशीही इंग्रजी लेख केव्हां केव्हां सुधारकांत देत. प्रो. भानू, सितारामपंत देवधर व हरिभाऊ मधून मधून लिहीत. श्री. आगरकर यांना दम्याचा विकार होता, त्यामुळें प्रकृति बिघडून त्यांस लेखनाचें काम होईनासें झालें. तेव्हां "हरिभाऊ सुधारकाचें काम स्वीकारतील तर मी सुधारक आनंदानें त्यांच्या स्वाधीन करीन," असे उद्गार त्यांनीं श्री. गोखले यांजपाशीं काढले. ही कल्पना गोखल्यांना पसंत पडली. त्यानंतर हरिभाऊंसह त्रिवर्गांनीं एकत्र बसून विचार केला व शेवटीं सुधारक पत्र हरिभाऊंच्या स्वाधीन करावें असें नक्की ठरलें. पत्रावर नांव आगरकरांचें ठेवून लेख लिहिण्याचें काम हरिभाऊंनीं करावें असा

विचार झाला. "मी लेख लिहीन, परंतु वर आगरकरांचें नांव असलेंच पाहिजे" हें हरिभाऊंचें म्हणणें सर्वांस मान्य झालें. परंतु याच सुमारास श्री. सीतारामपंत देवधर नुकतेच नगरहून पुण्यास आलेले होते. ते पूर्णपणें रानडे-आगरकर पक्षाचे असून लेखनाबद्दल त्यांचा चांगला लौकिक होता. हरिभाऊंच्या मागें आनंदाश्रम संस्था व त्यांचें करमणूक पत्र या दोन जबाबदाऱ्या असल्यानें श्री. देवधर यांचेकडे सुधारकाचें काम द्यावें, असें त्यांनीं व श्री. माधवराव जोशी यांनीं मिळून ठरविलें. देवधरांवर आगरकरांचा विश्वास होता व त्यांच्या लेखनकौशल्याबद्दल व जोरदार विचारांबद्दल आदरही होता. तेव्हां त्यांना ही कल्पना अतिशय आवडली. त्याप्रमाणें श्री. देवधर आगरकरांच्या हाताखालीं सुधारकाचे संपादक झाले. तथापि सामाजिक सुधारणेचें मुखपत्र म्हणून 'सुधारका'बद्दल हरिभाऊंना नेहमीं आपलेपणा वाटे. १९१२ सालीं जेव्हां तें अगदींच चालेनासें झालें तेव्हां पांचसहा महिनेपर्यंत हरिभाऊंनीं तें स्वतःच्या जबाबदारीवर व आपल्या संपादकत्वाखालीं सुरू केलें होतें.

संमतिबिलाची धामधूम व चहा-प्रकरण झाल्यापासून, सुधारक लोक खड्यासारखे वगळून टाकले पाहिजेत, असें माधवराव नामजोशी भर सभेंत बोलून दाखवूं लागले. केसरींत सुधारकांवर एकसारखा भडिमार चालूच होता. यामुळें पक्षभेद निर्माण झाला. न्या. रानडे हे सार्वजनिक सभेचे जनक व चालक असून गोखले सेक्रेटरीचें काम करीत. सार्वजनिक सभेंतून रानडे पक्षाचें उच्चाटन करण्याचा विरुद्ध पक्षांतील लोकांनीं बेत केला. विरुद्ध पक्षाच्या मंडळींनीं आपल्या बाजूचे बरेच लोक सार्वजनिक सभेचे सभासद म्हणून घेऊन त्यांच्या मतांच्या जोरावर आपल्या पक्षाचे व्यवस्थापक निवडले. या प्रसंगीं हरिभाऊ व त्यांच्या क्लबाची मित्रमंडळी यांनीं आपल्या पक्षातर्फे फार मेहनत केली; परंतु रानडे पक्षाला हाणून पाडण्यासाठीं म्हणून मुद्दाम जेथें कांहीं तरी लोक जमा करून बहुमत करण्यांत आलें तेथें रानडे पक्षाच्या तरुण सुधारकांच्या मेहनतीचा काय उपयोग होणार! न्या. रानडे यांनीं सार्वजनिक सभेचें काम इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें केलें होतें कीं, त्यामुळें सरकारांत तिचें वजन फार होतें. कौन्सिलमध्यें महत्त्वाचे प्रश्न उपस्थित झाले तर त्यांबद्दल सार्वजनिक सभेचें मत काय आहे, याबद्दल युरोपियन कौन्सिलरसुद्धां अगाऊ खाजगी रीतीनें विचारीत. विरुद्ध पक्षानें सार्वजनिक सभा अशा रीतीनें काबीज केल्यामुळें न्या. रानडे यांना साहजिक वाईट वाटलें. राजनिष्ठेच्या पायावर, धर्म अगर

ज्ञाति हा भेद न मानतां नेमस्तपणानें व प्रागतिक दृष्टीनें लोकहिताच्या गोष्टी सरकारपुढें जोरानें मांडून लोकसेवा करणें हेंच सार्वजनिक सभेचें ध्येय होतें. या सभेकडून लोकहिताची बाजू मांडली गेल्यानें सरकारासही चांगली मदत झाली. सार्वजनिक सभा म्हणजे रानडे ही गोष्ट सर्वत्र मशहूर होती. परंतु १८९५ च्या कॉंग्रेसमध्यें जहाल-नेमस्त पक्षांतील वितुष्ट अधिकच वाढलें. इ. स. १८९५ मध्यें कॉंग्रेसची बैठक पुणें येथें झाली. त्या वेळीं गोखले, हरिभाऊ व श्री. विनायक नारायण आपटे यांनीं पुष्कळ मेहनत केली. कॉंग्रेससंबंधीं बाटाघाटीच्या सभा आनंदाश्रमांत झाल्या. कॉंग्रेसच्या मंडपांत स्पेशल कॉन्फरन्स भरूं द्यावयाची नाहीं, असा विरुद्ध पक्षाचा डाव होता. "कॉंग्रेसच्या मंडपांत स्पेशल कॉन्फरन्स भरल्यास आम्ही मंडप जाळूं," अशा तऱ्हेच्या धमक्या त्यांनीं रानडे पक्षांतील मंडळीस दिल्या. "त्याच मंडपांत सामाजिक परिषद भरवूं. पाहूं कसा मंडप जाळतात तें." असें मंडळी म्हणत असतां रानड्यांनीं तंटा नको म्हणून फर्ग्युसन कॉलेजच्या आवारांत दुसरा मंडप उभा केला. 'कॉंग्रेस समाचार' म्हणून तात्पुरतें दैनिक त्या वेळी काढण्यांत आलें होतें, तें चालविण्याचें काम हरिभाऊंच्याकडे होतें. कॉंग्रेस यशस्वी झाली, व निराळा मंडप उभारल्यानें स्पेशल कॉन्फरन्सही उत्कृष्ट रीतीनें पार पडून दुसऱ्या पक्षांतील मंडळीस मंडपांत दंगा करण्यास अवसरच मिळाला नाहीं. त्यामुळें ते लोक क्षुब्ध होऊन त्यांनीं सार्वजनिक सभा आपल्या पक्षाची केली व रानडे पक्षाचें उच्चाटन झालें.

सार्वजनिक सभा पूर्णत्वानें जहाल पक्षाची झाली व त्यामुळें निरुपायास्तव 'डेक्कन सभा' या नांवाची दुसरी संस्था काढणें रानडे पक्षास भाग पडलें. न्या. रानडे यांना नवीन संस्था स्थापन करणें खरोखरी पसंत नव्हतें. 'सर्वांस संभाळून घेऊन एकीनें काम करावें' असें त्यांस वाटे. परंतु श्री. विष्णु मोरेश्वर भिडे, श्री. शिवराम हरि साठे, राघोपंत नगरकर व इतर तरुण मंडळी यांस त्वेष येऊन त्यांनीं, 'सार्वजनिक सभेंत राहून काम करण्यास ज्याअर्थीं आतां जागा राहिली नाहीं त्याअर्थीं दुसरी संस्था काढण्याखेरीज गत्यंतर नाहीं,' असा प्रश्न न्या. रानडे यांजपुढें मांडला. अत्यंत कष्टानें न्या. रानडे या गोष्टीस तयार झाले. रानडे पक्षाची मंडळी मुंढवें येथील कीर्तने यांचे बागेंत जमली व तेथें 'डेक्कन सभा' स्थापन झाली. केसरीच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें 'ताडीबागेंत सभा स्थापन झाली' वगैरे शब्दांनीं रानड्यांच्यावर

टीकेचा वर्षाव झाला. तारीख ४ नोव्हेंबर १८९६ रोजीं डेक्कन सभा स्थापन झाली. स्थापनेच्या वेळच्या प्रसिद्धिपत्रकाचा मसुदा खुद्द न्या. रानडे यांनीं तयार केला होता. सार्वजनिक सभेंतून फुटून नवीन संस्था काढतांना न्या. रानडे यांना अत्यंत दुःख वाटलें. या प्रसिद्धिपत्रकाच्या शेवटच्या भागावरून त्यांच्या त्या वेळच्या मनःस्थितीची चांगली कल्पना होते. न्या. रानडे म्हणतातः—

" It need hardly be said by those, whose best work was given so long to the Sarvajanik Sabha, that this step has been taken most relunctantly and after a severe mental struggle. The rupture of old ties in the case of some, as dear and strong as any ties could be, is always painful; but there are occasions when public duty requires even this great sacrifice. It is felt that the present is one of those occasions, and only a deliberate conviction that this is so, reconciles them to the step now taken and the effort which it costs. "

डेक्कन सभेखेरीज ' Liberal Union ' म्हणून एक क्लब स्थापन करण्यांत आला होता. न्या. रानडे जेव्हां पुण्यास असत, तेव्हां ते नेहमीं या क्लबांत येत असत. रा. ब. जटार, अण्णासाहेब भिडे, रा. रा. विष्णुपंत सोहोनी, प्रो. काथवटे, ना. गोखले, श्री. शिवराम हरि साठे, काशिनाथपंत गाडगीळ, राघोपंत नगरकर, हरिभाऊ व त्यांची मित्रमंडळी दररोज क्लबांत येत. त्या वेळीं न्या. रानडे यांच्या भाषणाचा लाभ मिळून सर्वांच्या मनावर त्याचा उत्तम परिणाम होई. त्यांच्या सामाजिक व राजकीय विषयांवरील चर्चा हरिभाऊंच्यासारख्या उत्साही कार्यकर्त्यांच्या अंगीं आवेश उत्पन्न करीत. न्या. रानडे यांचे पट्टशिष्य ना. गोपाळराव गोखले यांचेकडे डेक्कन सभेच्या सेक्रेटरीचें काम देण्यांत आलें. इ. स. १८९७ सालीं वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्यासाठीं गोखल्यांना विलायतेस जावें लागलें. तेव्हां हरिभाऊ व श्री. विष्णु अनंत पटवर्धन या दोघांना सभेचे सेक्रेटरी नेमण्यांत आलें. यामुळें रानडे व हरिभाऊ यांचा निकट परिचय झाला. याच वेळीं रानड्यांच्या राजकीय व सामाजिक पक्षांच्या तत्त्वज्ञानाचें हरिभाऊंना सूक्ष्म रीतीनें अध्ययन करतां आलें. इ. स. १८९६ मध्यें अतिवृष्टि होऊन हिंदुस्थानभर भयंकर दुष्काळ पडला त्या वेळीं शेतकरी लोकांची खरी स्थिति काय आहे, यासंबंधानें माहिती जमविण्यास रानडे यांनीं हरिभाऊंना सांगितलें. त्याप्रमाणें निरनिराळ्या शंभर खेड्यापाड्यांत पत्रें

पाठवून हरिभाऊंनीं अत्यंत परिश्रमानें सर्व माहिती गोळा केली व त्यावरून रानड्यांच्या सांगण्याप्रमाणें सरकारकडे पाठविण्यासाठीं एक सुंदर रिपोर्ट तयार केला. डेक्कन सभेचे सेक्रेटरी या नात्यानें ना. गोखले यांच्या जागीं हरिभाऊंनीं कसोशीनें काम केलें व गोखल्यांची उणीव भासूं दिली नाहीं. हरिभाऊंची सार्वजनिक कामा-संबंधींची खरी कळकळ व काम करण्याची हातोटी पाहून न्या. रानडे यांस फार आनंद वाटला. ना. गोखले व हरिभाऊ हे सार्वजनिक कार्यांत रानड्यांचे डावे उजवे हात होते असें म्हटल्यास त्यांत बिलकुल अतिशयोक्ति होणार नाहीं.

ना. गोखले विलायतेंत असतां इकडे प्लेग सुरू झाला. त्या कामीं सरकारनें जे प्रतिबंधक उपाय योजिले त्यांत रोगव्याप्त भागांतून लोकांना जबरदस्तीनें बाहेर काढण्याच्या कामीं व घरें धुवून काढण्याच्या वगैरे कामीं सरकारनें गोऱ्या सोल्जर लोकांचा उपयोग केला व जनतेस त्यापासून अत्यंत त्रास होऊन त्याचें पर्यवसान रँडसाहेबांच्या खुनांत झालें, ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. सोल्जर लोकांनीं स्त्रियांवर अत्याचार केल्याच्या बातम्या पसरून लोकांत भयंकर असंतोष माजला. याबद्दलच्या सविस्तर हकीकतीचीं पत्रें कांहीं लोकांनीं ना. गोखले यांजकडे पाठविलीं. हरि-भाऊंनींही याबद्दल त्यांना बरींच पत्रें लिहिलीं होतीं. या सर्व हकीकतीवर पूर्णपणें विश्वास ठेवून ना. गोखले यांनीं इंग्लंडांतील वर्तमानपत्रांत सदर बातम्या प्रसिद्ध केल्या. त्यावरून त्यांच्यावर मोठें काहूर उसळलें. सदर बातम्या निव्वळ खोट्या आहेत, असें मुंबईसरकारनें स्टेट सेक्रेटरी यांस कळविलें. त्या कामीं हरिभाऊंनीं शक्य तितकी माहिती मिळवून डेक्कन सभेच्या द्वारें खुलासा करण्यासाठीं ती स्टेट सेक्रेटरी यांच्याकडे पाठविली. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ना. गोखले परत आल्यानंतर झालेल्या अत्याचारांबद्दल पुरावा देण्यास लोक पुढें येईनात. त्यामुळें ना. गोखले यांची स्थिति चमत्कारिक झाली. केलेले आरोप खोटे ठरविण्यांत आले व या प्रकरणांत माफी मागण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं, असा उपदेश रानड्यांनीं ना. गोखल्यांना केला. गोखल्यांची रानड्यांच्यावर अढळ निष्ठा होती. आपल्या गुरूच्या शब्दास मान देऊन अखेर गोखल्यांनीं मनांत नसतांही उघडपणें आपली चूक कबूल करून माफी मागण्याचें मनोधैर्य दाखविलें. विचारी, समंजस लोकांनीं याबद्दल गोखल्यांचें अभिनन्दनच केलें; परंतु विरुद्ध पक्षानें मात्र 'भ्याड, कच्च्या दिलाचे' इत्यादि विशेषणें त्यांस नजर करून त्यांजवर

अनुदार टीकेचा एकसारखा भडिमार सुरू केला. दुसऱ्या पक्षाच्या इतरेतर लहान-सान पत्रांनींही तीच री ओढली. गोपाळराव कोमल मनाचे होते. सार्वजनिक कार्य-कर्त्यांच्या अंगीं वाटेल ती टीका सोसण्यास जो कठोरपणा अवश्य असतो तो त्यांच्या ठिकाणीं नव्हता. त्यामुळें या टीकेनें त्यांच्या मनास फार त्रास झाला. गोपाळरावांस होत असलेल्या त्रासास कांहीं अंशीं आपण कारणीभूत झालों याबद्दल हरिभाऊंना अत्यंत वाईट वाटलें. परंतु ज्यांच्यावर अत्याचार झाला ते लोक पुढें येईनात, त्यामुळें सर्वांचाच नाइलाज झाला. असो. हरिभाऊ व विष्णुपंत पटवर्धन यांनीं दोन वर्षे डेक्कन सभेच्या सेक्रेटरीचें काम केलें. गोखले परत आल्यावर त्यांनीं पुनः सेक्रेटरीचें काम आपल्याकडे घेतलें. यानंतर लौकरच गोखले डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या कामांतून मुक्त होऊन सार्वजनिक चळवळींत पूर्ण लक्ष घालूं लागले. तेव्हां त्यांच्या व हरिभाऊंच्या रोज भेटी होऊं लागल्या. हरिभाऊ विचारी, समतोल दृष्टीचे व नेमस्त असल्यानें गोखल्यांना फार प्रिय झाले. गोपाळरावांस प्रतिपक्ष्याच्या निंद्य टीकेनें जेव्हां फारच त्रास होई तेव्हां ते स्वत: आनंदाश्रमांत येत किंवा हरि-भाऊंना आपल्याकडे बोलावीत. हरिभाऊंच्या शांत व मधुर बोलांनीं त्यांचा मनस्ताप पुष्कळच कमी होई. अशा रीतीनं उभयतांचा बंधुत्वाचा संबंध जडून तो अखेरपर्यंत कायम राहिला. पुण्यांत रानड्यांच्या खालोखाल तत्कालीन तरुण पिढींत गोखले व हरिभाऊ हे दोघे प्रागतिक पक्षांतील पुढारी गणले जात.

याच सुमारास गोपाळरावांनीं राजकीय बाबींसंबंधीं विचार करण्यासाठीं एक लहानसा क्लब स्थापन केला. या क्लबांत हरिभाऊ, श्री. शिवराम हरि साठे, प्रो. काथवटे, विष्णुपंत पटवर्धन इत्यादि मंडळी असत. क्लबाच्या बैठकी श्री. शिवराम हरि साठे यांच्या घरी दर रविवारीं होत. याच क्लबांतील चर्चेमुळें गोपाळरावांनीं आपली सर्व्हंट्स् ऑफ इंडिया संस्था स्थापन केली. या बैठकींत प्रागतिक पक्षाचें धोरण ठरून त्याच्याबरहुकूम सर्व सार्वजनिक कार्ये होत. हा क्लब मेसॉनिक पद्धतीवर होता. क्लबातील राजकीय व इतर विषयांवरील चर्चेत हरिभाऊ प्रामुख्यानें भाग घेत.

करमणूक पत्राखेरीज ज्ञानप्रकाशाचे संपादक म्हणून इ. स. १८८८ पासून १८९४ पर्यंत हरिभाऊंनीं काम केलें. दामुअण्णा कुळकर्णी मराठी भाग लिहीत व हरिभाऊ इंग्रजी लिहीत. इ. स. १८९४ मध्यें ते मद्रास येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनास हजर राहिले. कॉंग्रेस संपल्यानंतर ते सिलोनासही गेले होते. त्यांच्या

गैरहजेरींत ज्ञानप्रकाशच्या संपादकाचें काम त्यांनीं श्री. वासुदेव गोविंद आपटे यांच्याकडे सोंपविलें. कांहीं वर्षें हरिभाऊ व वासुदेवराव आपटे दोघेही त्यांत लिहीत. इ. स. १९०६ मध्यें ज्ञानप्रकाशची मालकी सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीकडे आली. तेव्हां हरिभाऊंच्या देखरेखीची तादृश जरूरी उरली नाहीं. हरिभाऊंनीं ज्ञानप्रकाशांत अनेक लेख लिहिले, संपादक म्हणून काम केलें, परंतु त्याबद्दल त्यांनीं कधीं एक पैसासुद्धां घेतला नाहीं. ज्ञानप्रकाश हें पूर्वींपासूनच प्रागतिक पक्षाचें म्हणून प्रसिद्ध आहे. त्यामुळें गोखले व हरिभाऊ यांना केसरीकार विरुद्ध पक्षाचे पुढारी मानून त्यांच्यावर नेहमीं टीका करीत.

इ. स. १८९६-९७ हीं दोन वर्षें जनतेस अत्यंत अनर्थकारक ठरलीं. दुष्काळानें अगोदरच ग्रस्त झालेल्या लोकांवर प्लेगराजानें हल्ला करून त्यांस जर्जर करून सोडलें. इ. स. १८९६ च्या ऑक्टोबर महिन्यांत मुंबईस प्लेग प्रथम सुरू होऊन हळू हळू त्यानें सर्व महाराष्ट्र व्यापून टाकला. कुटुंबेंच्या कुटुंबें त्यानें नाहींशीं केलीं. रोग नवीन, त्यामुळें त्यावरची औषधयोजना डॉक्टर तरी कशी करणार? मुंबईतले लोक गुजराथ, पुणें, खानदेश इकडे निघून गेले व त्यामुळें रोगाचा फैलाव जास्त जलद झाला.

पुण्यास प्लेगाची सुरुवात इ. स. १८९७ च्या सप्टेंबरअखेर झाली. सर्व शहर-भर प्लेगाचा प्रादुर्भाव होऊन दैनिक मृत्युसंख्या बेसुमार वाढली. आज अमुक मनुष्य लागला, तमुक गेला, याशिवाय दुसरी वार्ता ऐकूं येईनाशी झाली. प्लेगानें लहान थोर, वृद्ध तरुण या सर्वांचे निष्ठुरतेनें बळी घेतले. प्लेगास भिऊन कित्येक लोक गांव सोडून गेले व पुण्यास भीषण स्वरूप प्राप्त झालें. हा रोग सांसर्गिक असल्यानें मित्र मित्रांस ओळखीनासे झाले, नातेवाईक आप्तेष्टांसही उपयोगी पडेनासे झाले. प्लेगनें लागलेल्या रोग्यांची अशा स्थितींत कळकळीनें कोण शुश्रूषा करणार? प्रत्येकास आपला प्राण प्यार! स्वतःचा जीव धोक्यांत घालून स्वखुषीनें मृत्युमुखांत उडी घालण्यास कोण धजणार?

प्लेगचा बंदोबस्त करण्यासाठीं सरकारनें सेग्रिगेशन व गोऱ्या सोल्जरांची तपासणी हे दोन उपाय योजिले. त्यामुळें तर जनतेस अतोनात त्रास होऊं लागला. सारें पुणें ओस पडलें. प्लेगनें ग्रस्त झालेले रोगी व त्यांचे नातेवाईक यांशिवाय फारसे लोक गांवांत राहिले नाहींत. प्लेगनें मृत्यु पावलेल्या लोकांचीं प्रेतें

उचलण्यासही कोणी माणूस मिळेनासें झालें. खरोखर त्या वेळीं कित्येक घरांत जे हृदयद्रावक प्रसंग रोजच्या रोज घडत होते त्यांचें वर्णन करणें अशक्य आहे!

या भयंकर प्रसंगीं स्वतःच्या प्राणांची पर्वा न करितां निधड्या छातीनें दुःख-पीडित जनांच्या मदतीस जे उदार हृदयी, स्वार्थत्यागी पुरुष धावून गेले त्यांत हरिभाऊ प्रमुख होते. घरांतील वडील मंडळी ' नको नको ' म्हणत असतां ते प्लेग-ग्रस्त रोग्यांची चौकशी करण्यास जात. प्लेगनें वारलेल्या मनुष्याचें प्रेत उचलण्यासही भीतीनें कोणी येत नसत. त्यामुळें प्रेतांची वाट लावणें संकटाचें होऊन बसलें. प्लेगदूषित भागांत स्वतः हिंडून हरिभाऊंनीं ही सर्व परिस्थिति प्रत्यक्ष पाहिली. लोकांचे चाललेले हाल व दुःख पाहून त्यांच्या स्वभावतःच दयाशील अन्तःकरणास पाझर फुटला व तेव्हांपासून प्लेगनें गेलेल्या मनुष्यांची शेवटची व्यवस्था करण्यास त्यांनीं पदरचे रोजीं दोन दोन तीन तीन रुपये देऊन तीन चार नोकर ठेविले. त्याचप्रमाणें प्लेगाच्या रोग्यांसाठीं काढलेल्या हॉस्पिटलांतील रोग्यांस ते दररोज भेट देण्यास जात. आनंदाश्रमांत गेल्यास मदत मिळते, हें लोकांच्या अनुभवास आल्या-मुळें कित्येक गोरगरीब साहाय्य मागण्यास येत. आनंदाश्रमांत कोणी मदत मागण्यास आला असतां त्याजवर विन्मुख होऊन जाण्याचा प्रसंग कधीं आला नाहीं. साहाय्य करण्याच्या कामीं गरीब श्रीमंत असा भेद हरिभाऊंनीं केव्हांही केला नाहीं. अशा रीतीनें अन्तःकरणपूर्वक लोकसेवा करतांना त्यांनीं आपल्या शरिराची अथवा पैशाची फिकीर केव्हांही केली नाहीं. त्यांच्या मित्रांपैकीं कांहीं प्लेगनें लागले, तेव्हां तर त्यांनीं अहोरात्र त्यांच्याजवळ बसून त्यांची शुश्रूषा केली. कोणाकडून बोलावणें आलें कीं, पुढचें जेवणाचें ताट बाजूला सारून ते जात. मध्यरात्रीं कोणीं हांक मारली तरी त्यांनीं तसेंच जावें. खरोखर अशा तऱ्हेची अलौकिक कामगिरी निरपेक्ष व खऱ्या थोर पुरुषाशिवाय कोणाच्या हातून होईल?

हरिभाऊंच्या प्रयत्नामुळें जनता व सरकार यांतील तेढ कांहींशी कमी झाली व लोकांचें दुःख थोडेंसें हलकें झालें. प्लेग-व्हॉलंटिअर म्हणून हरिभाऊंनीं कित्येक वर्षें काम केलें. घरांतील सर्व मंडळी गांवाबाहेर झोंपडींत रहावयास गेली, तरी हरिभाऊ मात्र आनंदाश्रमांतच रहात. फक्त कधीं कधीं संध्याकाळीं जेवावयास तेवढे घरीं जात. हरिभाऊ प्लेगांत पुण्यांतच रहात, म्हणून त्यांची परिचित मंडळी आपल्या घरच्या दागदागिन्यांच्या पेट्या आनंदाश्रमांत आणून ठेवीत. त्या दिवसांत चोरांचें फार

भय असे; परंतु आनंदाश्रमांत रात्रभर पहारा असल्यानें हरिभाऊंच्यावर जबाबदारी टाकावयास कोणास हरकत वाटत नसे.

पहिल्याच प्लेगांत हरिभाऊंच्यावर मित्रवियोगाचा प्रसंग गुदरला. माधवराव जोशी व हरिभाऊ यांचा अकृत्रिम स्नेह होता. पुण्यास प्लेग सुरू झाला तेव्हां 'आज झोंपडी-वर जाऊं, उद्यां जाऊं', असें करतां करतां एके दिवशीं माधवरावांना ताप आला. हरिभाऊ संध्याकाळीं नेहमींप्रमाणें त्यांजकडे गेले तों माधवरावांस फणफणून ताप आलेला. माधवरावांनीं गांठ आल्याचें हरिभाऊंस सांगितलें तेव्हां त्यांच्या पत्नी पार्वती-बाई जवळच उभ्या होत्या. 'गांठ' हा शब्द कानीं पडतांच त्यांस एकदम धक्का बसला! माधवरावांनीं गांवाबाहेर जाण्याची इच्छा दर्शविली तेव्हां 'आतां येथेंच' असें सद्गदित कंठानें उत्तर देऊन हरिभाऊंनीं तोंड फिरविलें, त्याबरोबर पार्वती-बाईना रडें कोसळलें. घाबरलेल्या मनःस्थितींत त्यांनीं हरिभाऊंना एकदम म्हटलें, "आपल्यावांचून आतां मला कोणी नाहीं." तेव्हां "मला आपला धाकटा भाऊ समजा. मी तुम्हांस अंतर देणार नाहीं," असें हरिभाऊंनीं त्यांना वचन दिलें. त्यांनीं माधवरावांची अहोरात्र अत्यंत कळकळीनें शुश्रूषा केली. प्लेगच्या रोग्याजवळ बसणें म्हणजे तेव्हां खरोखरी अलौकिक दिव्यच होतें. परंतु हरिभाऊंना स्वतःच्या जिवाची भीति कधीं वाटली नाहीं. माधवराव अखेर इहलोक सोडून गेले! बिचाऱ्या पार्वतीबाईच्यावर दुर्दैवाचा घाला पडला. हरिभाऊंनीं पार्वतीबाई व त्यांचा मुलगा गंगाधर यांस किबे वाड्यांत आणून ठेविलें. पुढें गंगाधरही प्लेगनें लागला. तेव्हां त्या दोघांस प्लेग हॉस्पिटलमध्यें त्यांनीं पाठविलें. तो मुलगाही पुढें वारला. त्या वेळीं प्लेग झाला कीं, नातेवाईक मंडळीही त्या माणसास टाकून जात. परंतु हरिभाऊ मात्र सर्वांचा समाचार घेत. हरिभाऊंनीं पार्वतीबाईस बहीण मानून त्यांची उत्तम व्यवस्था केली. पुढें आपणांप्रमाणेंच अनेक दुर्दैवी स्त्रियांस मदत करावी, असें पार्वतीबाईना वाटूं लागलें. हरिभाऊंच्या सांगण्याप्रमाणें पार्वतीबाईनींही दोन तीन वर्षें प्लेगनें लागलेल्या माणसांना औषधपाणी देणें, त्यांच्याजवळ बसणें, इत्यादि कामें केलीं. असो.

प्लेग-व्हॉलंटिअर म्हणून हरिभाऊंनीं सुमारें १० वर्षें काम केलें. तें जनतेस तसेंच सरकारलाही मान्य होऊन त्यांनीं त्यांस कैसर-इ-हिंद मेडल बक्षीस दिलें. पदव्या मिळविण्याच्या हेतूनें हरिभाऊंनीं हें काम केलेलें नसून केवळ कर्तव्यबुद्धीनें केलें, ही गोष्ट कोणीही नाकबूल करणार नाहीं.

## नगरसभेंत प्रवेश

प्लेगच्या कहरांत शेंकडों लहान मुलें अनाथ झालीं. आईबापांविना पोरक्या झालेल्या पोरांचें संगोपन कोण करणार? मुलांचे हाल पाहून हरिभाऊंनीं चार-पांच मुलें आपल्या घरींच संभाळलीं. त्यांत एक आठ नऊ वर्षांचा गंगादीन नांवाचा मुलगा होता. तो दोन चार महिने आनंदाश्रमांत ठेवून घेतला होता. त्याच-प्रमाणें एका आठ नऊ महिन्याच्या मुलीला बाई ठेवून संभाळलें. तिच्या नातेवाई-कांचा पुढें शोध लागला व त्यांनीं तिला नेलें. अनाथ मुलें घरीं संभाळणें जड जाऊं लागलें, तेव्हां हिराबागेंत एक 'अनाथाश्रम' (Orphanage) काढण्याचें ठरलें. हिराबागेंतील या अनाथाश्रमामुळें प्लेगांत उघड्या पडलेल्या लहान मुलांमुलींची सोय झाली. ऑर्फनेज् काढण्याच्या कामीं हरिभाऊंचाच पुढाकार होता. त्यांनीं व श्री. ल. र. गोखले यांनीं या संस्थेचे सेक्रेटरी या नात्यानें कित्येक वर्षें काम केलें.

हरिभाऊंनीं प्लेगमध्यें जी उत्कृष्ट कामगिरी केली तीमुळें त्यांचा सरकारी अधि-काऱ्यांशीं निकट संबंध येऊन परिचय झाला. हरिभाऊंची लोकसेवेची कळकळ त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यानें प्रो. आबाजी विष्णु काथवटे यांची बदली मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें होतांच म्युनिसिपालिटींतील त्यांच्या रिकाम्या झालेल्या जागेवर सरकारनियुक्त सभासद म्हणून तारीख २१।२।१९०० च्या जाहीरनाम्यानें हरिभाऊंची नेमणूक झाली. त्यांची बिलकुल कल्पना व अपेक्षा नसतां हें काम त्यांच्या गळ्यांत पडलें. त्यांच्या एका आवडत्या इंग्रज ग्रंथकारानें स्थानिक-स्वरा-ज्याच्या कामांत पडून उत्कृष्ट रीतीनें लोककार्य केलें होतें. त्यामुळें अनायासें चालून आलेली जागा स्वीकारून आपणही लोकसेवा करावी, असें त्यांना वाटलें असल्यास नवल नाहीं. लोकसेवेच्या, समाजकार्याच्या गोष्टी केवळ आपल्या कादंबऱ्यांत लिहून त्यांस मनःशान्ति मिळेना. आपण बोलून दाखविलेले सुधारणेचे विचार कृतींत आणण्यास म्युनिसिपालिटी हा एक उत्कृष्ट मार्ग आहे असें वाटून त्यांनीं सरकारनें देऊं केलेली जागा आनंदानें स्वीकारली.

परंतु म्युनिसिपालिटीच्या बारभाई कारभारांत नांव मिळविण्यास जी एक विशिष्ट तऱ्हेची मनोवृत्ति लागते ती हरिभाऊंच्यांत नव्हती. विद्वत्ता, व्यासंग, मनाची उदारता, लोकसेवेची खरी आवड इत्यादि गुण त्यांच्या अंगीं असले तरी म्युनिसि-पालिटीच्या कारभारांत इतके गुण पुरेसे होत नाहींत. उलट कित्येक प्रसंगीं ते सभासदत्वास हानिकारक ठरतात. जो मनुष्य निवडणुकीच्या अगोदर व नंतर

मतदारांना खूष करील व इतर सभासदांवर आपल्या पांडित्यानें नव्हे, तर व्यवहार-चातुर्यानें छाप बसवून निरनिराळ्या पक्षांच्या अखंड चालू असलेल्या अनेक खलबतांत नाना तऱ्हांचे पेंच कुशलतेनें लढवील व इतर सभासदांस आपल्या मुठींत ठेवील तोच मनुष्य म्युनिसिपालिटीच्या गोंधळी कारभारांत यशस्वी होईल. हरिभाऊंच्या-सारख्या ध्येयप्रधान, विद्वान् व सरळ मनाच्या पुरुषास असले मुत्सद्देगिरीचे डावपेंच कसे साधणार? त्यांनीं म्युनिसिपालिटींत अठरा एकोणीस वर्षें सतत काम केलें, परंतु डावपेंच त्यांना केव्हांही साधले नाहींत व त्यामुळें या कामापासून त्यांना अतिशय त्रास सोसावा लागला. अशा स्थितींत म्युनिसिपालिटीच्या पाशांत हरिभाऊ अठरा एकोणीस वर्षें कसे अडकून राहिले याचें पुष्कळांस गूढ वाटण्याचा संभव आहे. परंतु हरिभाऊंना सार्वजनिक कामाची हौस होती व नेमस्त पक्षाची मंडळी म्युनिसिपालिटींत कमी असल्यानें त्या पक्षांतील इतर पुढारी हरिभाऊंना म्युनिसि-पालिटींत टिकून राहण्यास उत्तेजन देत. श्री. न. चिं. केळकर यांची वाङ्मयसेवक या नात्यानें हरिभाऊंशीं स्नेह जोडण्याची इच्छा असूनही म्युनिसिपालिटीच्या कामांत दोघेही परस्परविरोधी पक्षांच्या कात्रींत सांपडल्यानें त्यांचा स्नेह जमणें शक्य झालें नाहीं. म्युनिसिपालिटींत चालणाऱ्या व्यक्तिविषयक कारस्थानांची हरिभाऊंना बिल-कुल आवड नव्हती, परंतु आपण नेमस्त पक्षाचे प्रतिनिधी आहोंत व तो पक्ष अल्प-संख्याक असल्यानें ही जबाबदारी संभाळणें आपलें कर्तव्य आहे या बुद्धीनेंच केवळ अखेरपर्यंत त्यांनीं अप्रिय अशा या दगदगींत स्वतःस गुंतवून टाकिलें.

इ. स. १९०० पासून इ. स. १९१९ पर्यंत ते म्युनिसिपालिटीचे सभासद होते. त्यांपैकीं इ. स. १९०५ सालच्या निवडणुकींत फक्त एकदांच पदवीधरांच्या जनरल वॉर्डतर्फे लोकनियुक्त सभासद म्हणून ते निवडून आले. या वॉर्डातर्फे उभे राहिलेल्या उमेदवारांस मतदारांच्याकडे खेटे घालावे लागत नसत व पैसाही खर्च करावा लागत नसे. त्यामुळें या मतदारसंघातर्फे निवडून येणें हरिभाऊंना सुलभ झालें. परंतु सुरतेच्या कॉंग्रेसच्या नंतर जहाल-नेमस्त पक्षांत भयंकर तेढ उत्पन्न झाली व नेमस्त पक्षांतील विद्वान् मनुष्यास सुद्धां या वॉर्डातर्फे निवडून येणें कठीण झालें. या वॉर्डातर्फे निवडून येण्याची हरिभाऊंनीं पुनः खटपट केली नाहीं. इ. स. १९०० च्या सुमारास ३८ पैकीं १८ सरकारनियुक्त सभासद असत. त्यांत चारपांच सरकारी अधिकारी असून बाकीचे शहरांतील विद्वान् व कर्तृत्ववान् पुरुष असत.

सरकारनें केलेली निवड चांगलीच असे. सरकारनियुक्त सभासदांत सर विश्वेश्वर अय्या, ना. गोखले, रा. ब. वासुदेव बापूजी कानिटकर, सरदार नौरोजी पदमजी, रा. ब. काशिनाथ बाळकृष्ण मराठे, सरदार कैकोबाद दस्तुर इत्यादि नांवें आढळतात. कोणाही स्वाभिमानी पुरुषास या सरकारनियुक्त सभासदांच्या रांगेत बसण्यास कमीपणा वाटेल असें दिसत नाहीं. हल्लीं म्युनिसिपालिटींत सरकारनियुक्त कां होईना, पण अनुभविक व कर्तृत्ववान् पुरुष नाहींत व लोकही खऱ्या योग्यतेच्या माणसांना निवडीत नाहींत, त्यामुळें अपात्र व स्वार्थी माणसांच्या हातांत सर्व कारभार जाऊन शहरांत गैरव्यवस्था होते. सरकारनियुक्त सभासद म्हणून हरिभाऊ म्युनिसिपालिटींत काम करीत असतां जहाल पक्षानें त्यांना नाना प्रकारें दूषणें दिलीं. परंतु लोकनियुक्त सभासद म्हणून निवडून देण्यास मतदारांच्या दाराशीं जे खेटे घालावे लागतात, जो अवास्तव खर्च व कालाचा अपव्यय करावा लागतो, तो मात्र हरिभाऊंना करावा लागला नाहीं.

एकोणीस वर्षांत जनरल कमिटीच्या ७९१ सभांपैकीं ४८४ सभांस हरिभाऊ हजर होते. प्रत्येक सभेपायीं त्यांचे कमींत कमी सुमारें दोन अडीच तास खर्च होत. याशिवाय घरीं किंवा इतरत्र महत्त्वाच्या कामासंबंधीं चर्चेत, वाटाघाटींत अथवा पक्षापक्षांतील भांडणांत जो वेळ खर्च झाला असेल तो निराळाच. नुसत्या जनरल कमिट्यांच्या सभांमध्यें हरिभाऊंचे १२०० तास खर्च झाले. म्युनिसिपालिटींतील भांडणें तेथेंच ठेवून निर्विकार मनानें घरीं आल्यावर मजेंत वेळ घालविण्याइतका मनाचा घट्टपणा त्यांच्या ठिकाणी नव्हता. सभेंत घडलेल्या गोष्टींबद्दल दोन दोन दिवस ते मनाला लावून घेत, त्यामुळें त्यांचें चित्त अस्वस्थ होई. हरिभाऊ म्युनिसिपालिटीचें काम अन्तःकरणपूर्वक करीत व सभेमध्यें पक्षाभिनिवेशानें कोणी भलतें-सलतें भाषण केलें म्हणजे त्यांस साहजिक वाईट वाटे. म्युनिसिपालिटीच्या सभांमध्यें खोल, गंभीरपणें व पक्षभेद बाजूस ठेवून कोणत्याही प्रश्नाची चर्चा क्वचितच होते. अशा तऱ्हेच्या खालच्या प्रतीच्या वातावरणांत हरिभाऊंसारखा सुसंस्कृत, ध्येयवादी व सरळहृदयी अत्यंत दुःखी झाला, ह्यांत नवल काय? सरस्वतीची सेवा करून चिरस्थायी वाङ्मय निर्माण करणारी हरिभाऊंची बुद्धि व वेळ म्युनिसिपालिटीच्या क्षुद्र कामांत निष्कारण खर्च झाला, याबद्दल कोणासही खेद वाटल्यावांचून राहणार नाहीं.

## हरि नारायण आपटे

इ. स. १९१५ पासून इ. स. १९१८ पर्यंत तीन वर्षें हरिभाऊ म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षस्थानीं होते. हरिभाऊंच्या वेळेपासून अध्यक्षांची कचेरी स्वतंत्र झाली व सरकारी कागदपत्रें व इतर महत्त्वाचीं प्रकरणें स्वतः पाहून त्याची व्यवस्था करण्याची पद्धति अंमलांत आली.

म्युनिसिपालिटीच्यासंबंधानें हरिभाऊंची सर्वांत महत्त्वाची कामगिरी ड्रेनेजबद्दलची होय. सरकारनें नेमलेल्या एंजिनिअरनीं ड्रेनेजमध्यें चुका करून पैशाची उधळपट्टी केली आणि ड्रेनेजचें काम बरोबर न झाल्यानें शहराचें आरोग्य बिघडलें. यामुळें म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष या नात्यानें हरिभाऊंना सरकारशीं एकसारखें युद्ध करावें लागलें. आपण सरकारनियुक्त सभासद आहोंत ही जाणीव सर्वस्वीं बाजूस ठेवून हरिभाऊंनी निर्भीडपणें व जोरदार रीतीनें पत्रें लिहून ड्रेनेजमधील दोष दाखविले व खरी परिस्थिति सरकारच्या नजरेस आणिली. हरिभाऊंच्या पत्रांचा सरकारवर चांगलाच परिणाम झाला. ड्रेनेजमध्यें पुढें सुधारणा करण्यास सरकारकडून जी मदत मिळाली त्याचें श्रेय हरिभाऊंनाच दिलें पाहिजे.

म्युनिसिपालिटीच्या स्कूलबोर्डावर हरिभाऊंनीं एकदर तेरा वर्षें काम केलें. सतत सहा वर्षें ते स्कूलबोर्डाचे चेअरमन होते. स्कूलबोर्डाच्या चेअरमनला दिवसांतून दोन तास तरी काम करावें लागतें व त्या मानानें पाहतां या कामांत हरिभाऊंचा पुष्कळच वेळ खर्च झाला असला पाहिजे असें दिसतें. म्युनिसिपल व खाजगी प्राथमिक शाळांतील शिक्षक व शिक्षकिणी यांना त्यांनीं इ. स. १९०५ व इ. स. १९०६ या दोन सालीं किंडरगार्टन पद्धतीवर एकंदर बारा व्याख्यानें दिलीं. मुलांमुलींच्या शाळांत त्यांनीं किंडरगार्टन साहित्याचे सेट्स् व मुलींच्या शाळांत स्वयंपाकाचीं भांडीं दिलीं. तत्पूर्वीच्या स्कूलबोर्डाच्या चेअरमनांमध्यें शिक्षणासंबंधीं इतकी कळकळ व सुधारलेल्या शिक्षणपद्धतीविषयीं इतकी आवड आढळून आली नाहीं. याशिवाय म्युनिसिपल शाळांतील मुलांमुलींना दरमहा वर्गातील नंबरावर स्कॉलरशिपा देण्याची पद्धति हरिभाऊंनीं इ. स. १९०७ सालीं सुरू केली. त्यामुळें मुलांमुलींना उत्तेजन मिळून त्यांची अभ्यासांत उत्तम प्रगति झाली. ही उत्तम पद्धति पुढें थोडया वर्षांनीं कां बंद झाली हें समजत नाही. लागोपाठ स्कूलबोर्डाचा चेअरमन एकच एक राहिल्याचें हें एकच उदाहरण आहे. यावरून स्कूलबोर्डचे चेअरमन या नात्यानें हरिभाऊंचें काम उत्कृष्ट झाल्यामुळें सर्वांस मान्य झालें होतें असें स्पष्ट दिसतें.

याखेरीज म्युनिसिपालिटींतील सुमारें चाळीस सब-कमिट्यांचे सभासद म्हणून त्यांनीं काम केलें. इ. स. १९१५ सालीं ते अध्यक्ष झाल्यामुळें इतर कमिट्यांत त्यांचें नांव अर्थात् दिसत नाहीं.

" पुणें शहरांत लहान मुलें फार कां मरतात? " याबद्दल हरिभाऊंनीं संशोधन करून एक सविस्तर रिपोर्ट तयार केला होता. या रिपोर्टाचा विचार करण्यासाठीं आठनऊ सभासदांची कमिटी दोन वर्षें बसली होती. परंतु या कमिटीनें दोन वर्षें विचार करून अखेर हा रिपोर्ट दप्तरीं ठेवून द्यावा असें ठरविलें!! हल्लींही आमच्या या पुणें शहरांत जन्मास येणाऱ्या हजार मुलांत ५०० मुलें पहिल्या वर्षांतच स्वर्ग गांठतात. यासंबंधीं इ. स. १९२९ मध्यें पार्लमेंटमध्येंही उल्लेख करण्यांत आला होता. परंतु अजून या प्रश्नाकडे लोकांचें लक्ष तितकेंसें वेधलें गेलें नाहीं, ही खेदाची गोष्ट होय.

इ. स. १८९० सालीं म्युनिसिपालिटीच्या साह्यानें पुण्यास एक म्यूझिअम् स्थापन झालें. त्याच्यांत अनेक परिवर्तनें झालीं. परंतु त्याला बाळसें कधींच आलें नाहीं. विद्येचें माहेरघर म्हणून नांवाजलेल्या पुणें शहरांत उत्कृष्ट म्यूझिअम् जरूर पाहिजे असें हरिभाऊंना साहजिक वाटलें; व या जुन्या म्यूझिअमूचें पुनरुज्जीवन करण्याची एक सुंदर योजना तयार करून इ. स. १९१६ च्या मे महिन्यांत त्यांनीं अध्यक्ष या नात्यानें सभासदांपुढें मांडली. ही योजना वाचली असतां त्यांत हरिभाऊंची विद्वत्ता व शिक्षणाबद्दलची खरी कळकळ दिसून येते. परंतु अरसिकांच्या पुढें केलेल्या कवित्वाप्रमाणें हरिभाऊंची मेहनत व्यर्थ ठरली व इ. स. १९३० सालपर्यंत म्यूझिअम् मरणोन्मुख स्थितींत कसेंबसें जीव धरून राहिलें. बऱ्याचशा प्रेक्षणीय वस्तु नाहींशा झाल्या व अवजड वस्तु मात्र तशाच राहिल्या. हल्लीं अध्यक्ष तुळपुळे व इतर प्रमुख नागरिक यांच्या प्रयत्नामुळें हें म्यूझिअम् पुनः वाढीस लागूं पहात आहे, ही आनंदाची गोष्ट होय.

इ. स. १९१८ सालीं म्युनिसिपालिटीचे नवीन सभासद निवडून आले, तेव्हां श्री. नरसिंह चिन्तामण केळकर व हरिभाऊ यांच्यामध्यें अध्यक्षपदाबद्दल स्पर्धा सुरू झाली. अनेक मसलती व खलबतें होऊन श्री. केळकर यांस बहुमत मिळणार असें दिसतांच हरिभाऊंनींच मनाचा मोठेपणा दाखवून श्री. केळकर यांचें नांव सुचवून एकमतानें अध्यक्षाची निवडणूक पार पाडली.

## हरि नारायण आपटे

हरिभाऊंची अध्यक्षपदाची मुदत संपल्यानंतर पदरचे शंभर रुपये खर्च करून त्यांनीं म्युनिसिपालिटीच्या शंभर दीडशें नोकरांस फलाहार दिला व शेवटचा निरोप घेत असतांना प्रेमळ व कळकळीचें भाषण केलें. त्यांच्यासारख्या माणसास पदरचे रु. १०० खर्च करणें खरोखरी जडच होतें. त्यांच्या नंतर पुष्कळ श्रीमंत व कर्तृत्ववान् अध्यक्ष होऊन गेले, परंतु म्युनिसिपालिटीच्या नोकरांस प्रेमानें निरोप देणारा व त्यांच्यासाठीं एवढा खर्च करणारा उदार अध्यक्ष एकही निघाला नाहीं!

अलीकडे म्युनिसिपालिटीनें रु. २५० खर्च करून हरिभाऊंचें तैलचित्र दिवाण-खान्यांत लाविलें आहे, तें चांगलें साधलें आहे. हरिभाऊंची योग्यता लक्षांत घेऊन त्यांचें तैलचित्र काढण्यांत म्युनिसिपालिटीच्या सभासदांनीं जी गुणग्राहकता दाखविली त्याबद्दल ते प्रशंसेस पात्र आहेत. असो.

पुण्यांतील किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटल स्थापन करण्याचें बरेंचसें श्रेय हरिभाऊंनाच आहे. सरदार कुप्पुस्वामी मुदलियार हे बरींच वर्षे म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. म्युनिसिपालिटीच्या दिवाणखान्यांत सरदारसाहेबांच्या तसबिरीचा अनावरणसमारंभ झाला, त्या प्रसंगीं त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क यांनीं सरदारसाहेबांनीं पुण्यांत हॉस्पिटल काढण्यासाठी बावीस हजार रुपयांची देणगी दिली असल्याचें जाहीर केलें. समारंभ संपल्यानंतर दुसरे दिवशी हरिभाऊ सरदार कुप्पुस्वामी यांस भेटले व वरील रक्कम स्त्रियांकरितां व स्त्रियांच्या देखरेखीखालीं चालणाऱ्या हॉस्पिटलास द्यावी व गव्हर्नरसाहेबांस ही कल्पना पसंत पडल्यास सदर हॉस्पिटलास किंग एडवर्ड यांचें नांव द्यावें, असें त्यांनीं सुचविलें. सरदारसाहेबांस ही कल्पना मान्य झाली व गव्हर्नरसाहेबांची त्यास अनुमति मिळाली. या हॉस्पिटलासाठीं खुद्द गव्हर्नरसाहेबांनीं पन्नास हजार रुपये मिळवून दिले व हरिभाऊंनीं इतर मंडळींच्या साह्यानें एकंदर दोन लाख रुपये गोळा केले. हरिभाऊंनीं तयार केलेल्या योजनेप्रमाणें रास्त्याच्या पेठेंत 'किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटल' या नांवाची संस्था स्थापन झाली व तीवर स्त्री डॉक्टरचीही नेमणूक झाली. धनिक लोकांनीं जरी या संस्थेस द्रव्यसाहाय्य केलें असलें, तरी एका अर्थी हरिभाऊ हेच या संस्थेचे जनक आहेत. हॉस्पिटल काढण्याची कल्पना हरिभाऊंचीच होती व ही कल्पना अस्तित्वांत आणण्यास त्यांनीं अविश्रांत परिश्रम केले. या संस्थेच्या कमिटींत ते अखेरपर्यंत सभासद म्हणून होते.

## प्रांतिक परिषदेचे स्वागताध्यक्ष

आळंदी देवस्थानांत हरिभाऊ कित्येक वर्षे पंच म्हणून होते. कोणत्याही लहानमोठया संस्थेशीं केवळ मानापुरता संबंध ठेवावयाचा अशी हरिभाऊंची भावना केव्हांही नव्हती. आपण मनोभावें, शक्त्यनुसार काम करून त्या त्या संस्थांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करावा ही त्यांची नेहमींची वृत्ति असे. आळंदी संस्थानांत गुरवांनीं पुंडावा माजविला व ते स्वतःस मालक म्हणवूं लागले. गुरव विरुद्ध पंच असा खटला कोर्टांत चालू झाला. हरिभाऊंनीं त्याबद्दलचे सर्व कागदपत्र स्वतः काळजीपूर्वक पाहण्याचे परिश्रम घेतले. या खटल्यांत त्यांनीं कोर्टात दिलेली साक्ष उत्कृष्ट ठरून त्यामुळेंच पंचाच्या बाजूचा निकाल झाला. पंच मालक ठरून गुरव पुजारी ठरले. इतर पंचांनींही मेहनत केली नाहीं असें नाहीं, परंतु निकालाचें श्रेय सर्वतोपरि सरपंच हरिभाऊ यांनाच आहे.

मिस्टर कॅपेल—कलेक्टर—यांच्या सूचनेवरून ‘ डफरिन फंड ’ सुरू झाला. प्रारंभीं लेडी नॉर्थकोट यांनीं दोनशें रुपये दिले होते. लेडी नॉर्थकोट यांच्याबरोबर गरीब कुटुंबांसाठीं फंड जमा करण्यास हरिभाऊ हिंडत असत. लेडी नॉर्थकोट यांच्या सूचने-प्रमाणें हरिभाऊंनीं दोन हिंदू नर्सेस तयार केल्या होत्या. डफरिन फंड नर्सेस म्हणून त्या पुण्यांत काम करीत. हरिभाऊ व रावसाहेब विष्णु अनंत पटवर्धन हे पंधरा वर्षे डफरिन फंड कमिटीचे जॉइंट सेक्रेटरी होते. अलीकडे सेवासदनतर्फे बऱ्याच नर्सेस तयार होतात. परंतु डफरिन फंड नर्सेस त्यांच्या अगोदरपासून पुण्यांत काम करीत होत्या, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

इ. स. १९१५ सालीं पुण्यास प्रांतिक परिषद भरविण्याची हरिभाऊंची कल्पना होती. परिषदेचे स्वागताध्यक्ष म्हणून त्यांनीं केलेलें इंग्रजी भाषण उत्तम आहे. इ. स. १९०७ सालच्या सुरतेच्या बखेड्यानंतर आठ वर्षे गेलीं तरी काँग्रेस झाली नाहीं. या आठ वर्षांच्या अवधींत नामदार गोखले कालवश झाले. महर्षि दादाभाई नौरोजी व सर फेरोजशहा मेथा यांच्या प्रकृतीचें अस्वास्थ्य वाढून ते पूर्वीप्रमाणें राजकारणांत भाग घेईनासे झाले. प्रांतिक परिषद भरविण्याची पद्धति होती, परंतु सुरत काँग्रेसनंतर सात'वर्षे परिषद भरली नाहीं.

इ. स. १९१५ च्या जुलै महिन्यांत ही परिषद पुण्यांत भरली. प्रागतिक पक्षाचे कट्टे अनुयायी व अभिमानी बॅरिस्टर होर्मसजी वाडिया यांची अध्यक्षस्थानीं योजना केली होती व ना. गोखले यांच्या अभावीं स्वागताध्यक्षाचे जागीं हरि-

भाऊंची नेमणूक झाली होती. मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन हे अधिवेशनास आले होते. डॉ. भाण्डारकर राजकीय कामांत पूर्वी लक्ष घालीत नसत. परंतु या प्रसंगीं तेही परिषदेस हजर राहिले होते. शिवाय महात्मा गांधी, सर नारायण चंदावरकर, सर लल्लुभाई सामळदास, ना. समर्थ, ना. परांजपे वगैरे प्रागतिक पक्षांतील बरेच प्रमुख गृहस्थ हजर होते. दादाभाई नौरोजी व सर फेरोजशहा हे प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें येऊं शकले नाहींत. ना. गोखले यांची उणीव मात्र प्रत्येकास पदोपदीं भासत होती. स्वागताध्यक्ष या नात्यानें हरिभाऊंनीं ना. गोखले यांजविषयीं काढलेले उद्गार विशेष संस्मरणीय आहेत. त्यांवरून हरिभाऊंना गोखल्यांबद्दल वाटणारें प्रेम व आदर वाचकांच्या ध्यानीं येईलः

" I know, you all miss him to-day more than ever. He would have stood where I am, one of the humblest of his admirers, standing to welcome you. You miss his potent and eloquent voice, his majestic figure, his superb ability, his magnanimous bearing, his inspiring patriotism, his ardour, his energy, his sweet reasoning and his words of wisdom. I enjoyed the privilege of his friendship and confidence, for more than twenty-five years and I can say that he was a man who deserved canonization as a saint. He was a combination of Faith, Hope, and Charity, faith in God and his work, hope for the future good of his country and a feeling of charity towards the whole of mankind. " ही परिषद अतिशय महत्त्वाची होती व तीं यशस्वी रीतीनें पार पाडण्यासाठीं हरिभाऊंनीं फार परिश्रम केले.

हरिभाऊंची आणखी एक महत्त्वाची कामगिरी म्हणजे इन्फ्लुएन्झा हॉस्पिटल होय. इ. स. १९१८ सालीं इन्फ्लुएन्झा सांथीचा भयंकर प्रसार होऊन मृत्युसंख्या अतोनात वाढली. रोग नवीन असल्यानें डॉक्टर लोकांना त्यावर औषधयोजना निश्चित करण्यास बरेच दिवस लागले. इन्फ्लुएन्झानें प्रत्येक कुटुंबांतील बहुतेक सारीं माणसें धरणीवर पडूं लागलीं. त्यामुळें आजाऱ्यांची शुश्रूषा घरांत होईना. जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. या साथींत स्त्रिया व लहान मुलें यांची मृत्युसंख्या अधिक होती. इन्फ्लुएन्झानें आजारी पडलेल्या रोग्यांची शुश्रूषा व्हावी यासाठीं म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष या नात्यानें नूतन मराठी विद्यालयाच्या इमारतींत हरि-

भाऊंनीं चोवीस तासांच्या आंत एक उत्तम दवाखाना व त्यास जोडून एक हॉस्पिटल सुरू केलें. एका दिवसांत रोग्यांची इतकी उत्कृष्ट व्यवस्था केलेली पाहून कलेक्टरासही फार आश्चर्य वाटलें. दिवसांतून दोन वेळां हरिभाऊ हॉस्पिटलास भेट देत. रोग्यांची उत्तम शुश्रूषा व्हावी एवढ्यासाठीं पुष्कळ नर्सेस त्यांनीं नेमिल्या होत्या. या हॉस्पिटलसंबंधीं त्यांस इतकी मनापासून कळकळ होती कीं, तेथें नोकर कमी असल्यास ते आपल्या घरचे नोकर तेथील काम करण्यास पाठवीत. इन्फ्लुएन्झा सांसर्गिक असूनही हरिभाऊंनीं स्वत:च्या जिवाची कधींच पर्वा केली नाही.

राजकारणांत हरिभाऊ रानडे-सांप्रदायाचे भक्त होते. कॉंग्रेसच्या ध्येयावर व तत्त्वांवर त्यांची निष्ठा होती. कॉंग्रेसच्या बहुतेक सर्व अधिवेशनांस डेलिगेट किंवा प्रेक्षक म्हणून ते हजर असत. कॉंग्रेसच्या कार्यांत स्त्रियांनीं कळकळीनें भाग घ्यावा, अशी त्यांची इच्छा असे. निदानपक्षीं स्त्रियांनीं कॉंग्रेसला हजर रहावें यासाठीं त्यांनीं दुसऱ्या कॉंग्रेसच्या वेळीं विनंतिपत्रक काढलें होतें व श्री. काशीताई कानिटकर यांस आग्रह करून डेलिगेट केलें. हरिभाऊंनी कॉंग्रेसमध्यें प्रत्यक्ष भाषणें केलीं नाहीत. त्या वेळीं महर्षि दादाभाई, न्या. रानडे, सर फेरोजशहा मेथा, ना. गोखले इत्यादि मंडळी राजकारणाच्या क्षेत्रांत तळपत होती. हरिभाऊंनीं कॉंग्रेसमध्यें प्रामुख्यानें भाग घेतलेला दिसत नाहीं. बहुधा न्या. रानडे यांच्या राजकीय पंथाबद्दल सहानुभूतिपूर्ण भक्ति व्यक्त करण्यासाठीं हरिभाऊ कॉंग्रेसच्या अधिवेशनांना हजर राहण्याची खबरदारी घेत, असें वाटतें.

कॉंग्रेसप्रमाणेंच सामाजिक परिषदही त्यांस प्रिय होती. सामाजिक परिषदेच्या बहुतेक अधिवेशनांस ते हजर राहिले होते. परिषदेंतील ठरावांसंबंधीं खाजगी रीतीनें आपल्या मित्रांबरोबर ते पुष्कळ चर्चा करीत. परंतु आनंदाश्रमासारख्या पुराणमताभिमानी संस्थेची जबाबदारी त्यांच्यावर सर्वस्वीं असल्यानें सामाजिक परिषदेमध्यें प्रत्यक्ष कार्य करणें त्यांस अशक्य होऊन बसलें. तो काळ मतप्रदर्शनाचा असल्यानें सामाजिक परिषदेस हजर राहणें म्हणजे आपण नवीन सुधारणांचे पुरस्कर्ते आहोंत, असेंच जाहीर करण्यासारखें होतें. समाजोन्नतीसाठीं आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें त्यांनीं कसा एकसारखा प्रयत्न केला, हें वाचकांस अवगत आहेच. आनंदाश्रमांतील नियमांनीं बद्ध झाल्यामुळें समाजसुधारणेचें त्यांचें ध्येय त्यांस प्रत्यक्ष रीतीनें आचरणांत तितकेंसें प्रकट करतां आलें नाहीं, याबद्दल त्यांस नेहमीं

खेद वाटे. परिस्थिति विरुद्ध असतां समाजोन्नतीसाठीं त्यांनीं शक्य तेवढें केलें असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. असो.

हरिभाऊंनीं मुंबई विश्वविद्यालयाची डिग्री घेतली नाहीं. परंतु विश्वविद्यालयानें त्यांची विद्वत्ता व खरी योग्यता जाणून त्यांस इ. स. १९०५ सालीं एम्. ए. चे परीक्षक नेमलें. हरिभाऊ बारा वर्षे सतत एम्. ए. चे परीक्षक होते. कांहीं वर्षे युनिव्हर्सिटी सेनेटचे ते फेलोही होते. परीक्षा पास न होतां परीक्षक होण्याचें भाग्य एखाद्याच्याच वांट्यास येतें. सर्वांत उच्च परीक्षेचे परीक्षक नेमून युनिव्हर्सिटीनें त्यांस बहुमान दिला. याहून अधिक मान तो काय द्यावयाचा होता? मॅट्रिक्युलेशन परीक्षेचे कंडक्टर म्हणूनही त्यांनीं बारा वर्षे काम केलें. त्याचप्रमाणें स्कूलफायनल परीक्षेचेही ते दोन वर्षे परीक्षक होते.

पुण्यांतील हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स् ( हुजुरपागा ) या संस्थेच्या कौन्सिल-मध्यें ते कित्येक वर्षे होते. तेथील काम पाहण्यासाठीं ते शाळेस वरचेवर भेट देत. ‘मुलींना शिक्षण देणारी एक उत्कृष्ट संस्था’ असा या शाळेबद्दल त्यांना अभिमान वाटे. सेंट जॉन अँब्युलन्स कमिटी व हिराबाग टाउन हॉल कमिटी यांचे ते सभासद होते. याशिवाय डिस्ट्रिक्ट कॉंग्रेस कमिटी, भाण्डारकर इन्स्टिटयूट या कमिटींमध्यें सभासद या नात्यानें त्यांनीं आस्थापूर्वक काम केलें.

आळंदी-देवस्थानचे ते ट्रस्टी होते. त्याचप्रमाणें जेजुरी-देवस्थानचे ट्रस्टी म्हणून चार सहा महिने त्यांनीं काम केलें. चिंचवड-देवस्थानचे ट्रस्टी होण्यासाठीं हरिभाऊंना आग्रह सुरू होता. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यांनीं तें मान्य केलें नाहीं.

“ Religious Endowment Conference ”साठीं इ. स. १९१४ सालीं मुंबई इलाख्याचे प्रतिनिधी म्हणून ते दिल्लीस गेले होते. तेथील काम त्यांनीं उत्तम प्रकारें केलें. इ. स. १९१७ सालीं नाशीक येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेंत त्यांनीं Local Self-government चा ठराव मांडून त्यावर भाषण केलें.

साहित्यसंमेलन ही त्यांची आवडती संस्था होती. इ. स. १९१२ मध्यें साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान हरिभाऊंनीं मंडित केलें होतें. बहुतेक प्रत्येक साहित्य-संमेलनास हजर राहून त्यांत मांडल्या जाणाऱ्या ठरावांवर ते भाषणें करीत.

म्युनिसिपालिटयांचें कॉन्फरन्स भरविण्याची कल्पना हरिभाऊंचीच होती. श्री. विठ्ठलभाई पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं हरिभाऊंनीं ही परिषद भरविली.

त्या वेळचे पुण्याचे कलेक्टर मिस्टर वेस्ट्रॉप यांनीं परिषदेस हजर राहून आपली सहानुभूति प्रकट केली. या म्युनिसिपल कॉन्फरन्सचें सर्व श्रेय हरिभाऊंनाच आहे.

निरनिराळ्या जातींतील स्नेहभाव वृद्धिंगत व्हावा या उद्देशानें स्थापन झालेल्या National Indian Association चे हरिभाऊ सभासद होते. या Association च्या मॅनेजिंग कमिटींत सभासद म्हणून त्यांनीं बरींच वर्षे काम केलें. पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृतींचा परस्परांशीं परिचय करून देण्याचा या संस्थेचा हेतु होता.

पुण्यांतील वीसपंचवीस प्रमुख संस्थांशीं हरिभाऊंचा अगदीं निकट संबंध आला. सार्वजनिक कार्याचें त्यांचें क्षेत्र विस्तृत होतें. कादंबरीलेखन हा त्यांचा आवडता व्यासंग होता. परंतु त्यांच्या दिनक्रमांतील बहुतेक सारा वेळ सार्वजनिक कार्यातच खर्च होत होता, असें दिसतें. आपलें कुटुंब व आपला आवडता व्यवसाय यामध्येंच ते गुरफटून राहिले नाहीत. आपल्या समजुतीप्रमाणें व विचारांप्रमाणें मानमरातबाची क्षणमात्रही अपेक्षा न करतां त्यांनीं लोकसेवा केली. विद्यार्थि-दशेपासून हृदयाशीं धरलेलें वाङ्मयसेवेचें व लोकसेवेचें ध्येय त्यांनीं अशा रीतीनें पार पाडलें व आपलें जीवित सफल केलें. लोकसेवेची खरी अन्तःकरणापासूनची इच्छा असल्यास एकटा मनुष्य कसें आणि किती काम करूं शकतो, हें हरिभाऊंच्या जीवितक्रमावरून वाचकांच्या ध्यानीं येईल.

---

## प्रकरण पंधरावें

# हरिभाऊंचें मित्रमंडळ

ज्या मनुष्याला या जगतांत खरा एकही मित्र नाहीं, त्याचें जीवित व्यर्थ होय. तो मनुष्य एखाद्या ऐश्वर्यसंपन्न, घनदाट वस्तीच्या शहरीं वास करीत असला तरी तो वनवासच भोगीत आहे असें खुशाल मानावें. त्याचे घरांत पंचवीस मनुष्यें असलीं तरी तो बिचारा एकलकोंडाच असतो. काव्यावांचून जसें वाङ्मय, गंधावांचून जसें फूल तसें मैत्रीविना जीवित नीरस होय. दिव्य, एकतान मैत्रीची प्रतीति येण्यास मनुष्य सहिष्णु, सहृदय व क्षमाशील असावा लागतो. दुसऱ्याच्या आनंदानें तात्काल प्रफुल्लित होण्यासारखें व परदुःखानें पाझर फुटण्याइतकें त्याचें हृदय भावस्पर्शी व कोमल असणें अत्यावश्यक आहे.

हरिभाऊंचें अन्तःकरण अति कोमल असून परक्याच्या दुःखानें नवनीतासारखें विरघळून जाई. त्यांचा मित्रपरिवार अतिशय मोठा होता. कारण मित्रांशी एकदां जोडलेला स्नेहबंध त्यांनीं कोणत्याही कारणानें केव्हांही तोडला नाहीं. स्नेहाच्या नाजुक सूत्रानें मित्रांचीं हृदयें बद्ध झालेलीं असतात. राग, मत्सर, लोभ इत्यादि विकृत स्वरूपाच्या भावनांचा त्यावर ताण पडल्यास तें सूत्र कांचून जाण्यास बिलकुल वेळ लागत नाहीं. परंतु अशा भावनांना हरिभाऊंनीं आपल्या अन्तःकरणांत थारा न दिल्यानें त्यांनीं निर्माण केलेलीं स्नेहसूत्रें त्यांच्या आयुष्याच्या अंतापर्यंत टिकलीं. एकदां ज्याला मित्र मानलें त्याच्या दोषांकडे दुर्लक्ष करावयाचें, त्याची निंदा केव्हांही करावयाची नाहीं, असा त्यांचा मोठा थोर बाणा होता. मित्रांचे दोष सामावण्याइतकें त्यांचें हृदय विशाल होतें. मित्रांच्या अंगच्या गुणांकडेच ते लक्ष देत आणि खरोखर मैत्री चिरंतन स्वरूपाची होण्यास हरिभाऊंचेंच तत्त्व युक्त नाहीं

काय ? त्यांच्या एखाद्या मित्राची कोणी निंदा करूं लागले कीं, त्यांना मनःपूर्वक राग येई. हरिभाऊंच्या सारखे उदारहृदयी मित्रप्रेमी पुरुष या जगांत क्वचितच आढळतात.

हरिभाऊंच्या मित्रांचे वेगवेगळे कंपू होते. कॉलेजमित्रांच्या कंपूंत श्री. कृष्णराव वाबळे, श्री. महादेव दिनकर जोशी, प्रो. पानसे, श्री. वाकनीस, श्री. नारायण महादेव समर्थ, विनायकराव पटवर्धन, अण्णासाहेब बांगीकर, बाबूराव काळे, प्रो. भडकमकर, निळकंठराव चौबळ, बाळकृष्णपंत अत्रे इत्यादि मंडळी असत. प्रो. भडकमकर शिवाय करून बाकीच्या मंडळींचा गपाष्टक क्लब असे. त्यांत हरिभाऊ, समर्थ, पानसे व चौबळ हे प्रमुख होते. या क्लबांत विनोद करणें, कोट्या करणें, नवीन रचलेल्या विनोदपर इंग्रजी अगर मराठी कविता म्हणून दाखविणें, पुण्याबाहेरील परगांवच्या बावळट दिसणाऱ्या लोकांची थट्टा करणें, इत्यादि प्रकार चालत. कॉलेजच्या सुखपूर्ण जीविताचा ज्यांना अनुभव असेल त्यांनाच या क्लबांतील गमतीची कल्पना करतां येईल. ‘ पॉप्युलर क्लबा ’ची ही मंडळी कॉलेजांत खरोखरच लोकप्रिय होती. त्यांच्यांत दुर्वर्तनाचा गंधही नव्हता. उलट समर्थ, हरिभाऊ यांच्यासारखी मंडळी ‘पॉप्युलर क्लबां ’त असूनही रात्रीच्या रात्री नवे नवे ग्रंथ वाचण्यांत घालवीत व इतर मित्रांना त्यांतील मौजा सांगून ते ग्रंथ वाचण्यास प्रोत्साहन देत.

रावसाहेब गोविन्दराव कानिटकर यांच्या घरीं वाङ्मय-भक्तांचा कंपू जमे. कानिटकर कंपूंत नारायण बापूजी कानिटकर, ज्ञानचक्षुकर्ते वामन बाळकृष्ण रानडे, श्री. ठाकुर, हरिभाऊ ही मंडळी असत. या कंपूंत नेहमीं वाङ्मयविषयक चर्चा चाले. श्री. गोविन्दराव आपले लेख व कविता हरिभाऊंना वाचून दाखवीत व हरिभाऊ आपल्या कादंबऱ्या त्यांना दाखवीत. ‘ मनोरंजन ’ मासिक हें कानिटकर कंपूच्या प्रयत्नांचेंच फल होय.

न्यू इंग्लिश स्कूल लोकप्रिय झाल्यामुळें त्याच नमुन्याची स्वार्थत्यागाच्या पायावर उभारलेली नमुनेदार मराठी शाळा स्थापून विष्णुशास्त्री यांचें स्मारक करावें, अशा हेतूनें ट्रेनिंग कॉलेजांतील तिसरें वर्ष पास झालेले जे उत्साही तरुण पुढें सरसावले त्यांचा व हरिभाऊंचा निकट संबंध होता. या कंपूस ‘ कै. विष्णुशास्त्री यांचें भक्तमंडळ ’ हें नांव चांगलें शोभेल. श्री. उकिडवे, श्री. डोंगरे, श्री. सिनकर, श्री. दामुअण्णा कुळकर्णी इत्यादि मंडळींशीं या शाळेमुळें हरिभाऊंचा दाट

स्नेह झाला. या नवीन संस्थेसाठीं आपल्या मित्रांना मदत करण्यास हरिभाऊ कसे मनापासून झटले हें मागें सांगितलेंच आहे.

आनंदाश्रमाची जागा मध्यवस्तींत उत्कृष्ट व घरीं वडील मंडळी नसल्यामुळें हरिभाऊंचें मित्रमंडळ तेथेंच जमावयाचें. विशेषेंकरून हरिभाऊंचें आकर्षण मोठें, त्यामुळें स्नेहीमंडळीस आनंदाश्रमांत दिवसांतून एक वेळ तरी गेल्याशिवाय चैन पडत नसे. आनंदाश्रमांत येणारी मंडळी म्हणजे दामुअण्णा, श्री. बाकनीस, श्री. पानसे, तात्या सोहोनी, कृष्णराव गोखले, माधवराव जोशी, प्रो. भानू, विनायकराव रानडे ही होत. ना. गोखले व श्री. आत्मारामपंत नूलकर मधून मधून येत. दामु-अण्णा व पानसे हे तर आरंभीं आरंभीं आनंदाश्रमाचे कायमचे गण असत. हरि-भाऊ, माधवराव जोशी व कृष्णराव यांची ग्रंथाविषयक चर्चा नेहमीं चाले. या स्नेह्यांना हरिभाऊ आपल्या कादंबऱ्यांतील प्रकरणें वाचून दाखवीत. केव्हां केव्हां एखाद्या विषयावर इंग्रजींत निबंध लिहून हरिभाऊ तो क्लबांत वाचीत. जोशी व गोखले हेही निबंध लिहीत असत. मे महिन्यांत गोविंदराव कानिटकर या मंडळीस येऊन मिळत. आनंदाश्रमांत मंडळी जमत पण आरंभीं हा क्लब असा नव्हता. बाहेरचे लोक मात्र हा एक नवीन स्थापन झालेला क्लब असें समजत. या सर्व मंडळींचें राजकीय व सामाजिक विचारांचे बाबतींत ऐक्य होत. हा क्लब अलीकडील पैसे लावून पत्ते कुटणाऱ्या जुगारी क्लबाप्रमाणें नव्हता व म्हणूनच न्या. रानडे, भाण्डारकर, आगरकर यांचें या मंडळीवर फार प्रेम होतें.

'That is no club where nothing is eaten and nothing drunk,' ( जेथें खाणेंपिणें नाहीं तो क्लब कसचा? ) ही डॉ. जॉन्सनची उक्ति या क्लबास लागू पडेल. हरिभाऊंना मित्रांना आपल्या घरीं जेवायला बोलावण्याचा, तसाच मित्रांच्याकडे जेवावयास जाण्याचा विशेष नाद होता. दर आठवड्यास मंडळींपैकीं कोणाच्यातरी घरीं फराळाचा अगर जेवणाचा घाट त्यांनीं जुळवून आणावयाचा. बहुधा माधवराव जोशांच्याकडे फराळाचे अगर जेवणाचे योग वारंवार येत. कारण ते स्वतंत्र असून फार हौशी होते. पर्वतीची रपेट झाल्यावर बहुधा जोशांच्याकडेच चहापानास मंडळी जमत. यासंबंधीं एक गंमतीची गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. माधवराव जोशी यांच्याकडे जुनी सोंवळी मंडळी नसल्यामुळें ते मधून मधून लष्करां-तील वाईज आणि कंपनींतून पाव व बिस्किटें आणवून मंडळीस चहास बोलावीत.

## सूज्ञ दीक्षितांचा मठ

एके रविवारीं बरीलप्रमाणें चहाचा बेत ठरला व मंडळीस सूचना देण्यास माधवरावांनीं हरिभाऊंस सांगितलें. इतर मंडळी भेटली, परंतु पानसे यांची भेट झाली नाहीं. तेव्हां हरिभाऊंनीं त्यांस खालीलप्रमाणें चिठ्ठी पाठविली :—

" सूज्ञ दीक्षिताच्या मठांतून स्वामी माधवराव यांच्या येथें आले आहेत. बरोबर बटूही आले आहेत. मंडळी येणार आहेत. तुम्ही स्वामींच्या दर्शनाला व तीर्थ-प्रसादाला यावें. " त्या वेळीं चहा, पाव, बिस्किटें यांचा फैलाव झाला नव्हता. त्यामुळें, पाव व बिस्किटें यांना ' स्वामी ' व ' बटू ' हीं सांकेतिक नांवें ठेविलीं होतीं. कोठें चहा असला तर " स्वामी येणार आहेत काय? " असा प्रश्न मंडळी विचारीत. वाईज आणि कंपनीच्या दुकानाला ' सूज्ञ दीक्षिताचा मठ ' हें नांव देण्यांत आलें होतें, हें चाणाक्ष वाचकांच्या तात्काल लक्षांत येईल. चिठ्ठी आली तेव्हां पानसे घरीं नव्हते. परंतु त्यांच्या खेडेगांवांतून आलेल्या वृद्ध आजोबांनीं ती चिठ्ठी वाचली. स्वामी आलेले आहेत व त्यांचे दर्शनास बोलावलें आहे हें वाचून त्यांस आनंद झाला व आपणही स्वामींच्या दर्शनास जावें असा विचार करून ते स्नान करून बसले. पानसे घरीं येतांच आजोबांनीं त्यांना चिठ्ठी दिली व म्हणाले, " आम्ही खेड्यांतले राहणारे. आम्हांला स्वामींचें दर्शन कशानें होणार? मी तुझ्याबरोबर येतों. "

पानसे यांस मोठीच अडचण पडली. तथापि आलेलें हंसूं दाबून गंभीरपणानें ते म्हणाले, " काका, ठीक आहे. मी अगोदर पुढें जाऊन दर्शनाची नक्की वेळ पाहून येतों. " पानसे माधवरावांच्या घरीं जातात तों जमलेल्या मंडळींनी स्वामी व बटू या उभयतांची सेवा सुरू केली होती. त्यास हातभार लावून पानसे ह्यांनीं आपली उडालेली तिरपीट मंडळींस सांगितली. तेव्हां एकच हंशा झाला! घरीं आल्यावर पानसे यांनीं आजोबांस सांगितलें कीं, " स्वामी फार वेळ तेथें टिकले नाहींत. पुनः योग आला म्हणजे जाऊं." आजोबांना हें सारें खरें वाटलें, परंतु स्वामींच्या दर्शनाचा योग आला नाहीं याबद्दल मात्र त्यांचें मन थोडें खट्टू झालें! अशा तऱ्हेच्या मौजांत या मित्रमंडळीचा काळ जात असे.

संमतिबिलास अनुकूल असणाऱ्या मंडळींची सभा क्रीडाभुवनांत झाली. त्या प्रसंगीं या आनंदाश्रमांतील मित्रमंडळीचाच पुढाकार होता. या सभेंत विरुद्ध पक्षानें बराच गोंधळ केला. बिलास अनुकूल असे आधार डॉ. भाण्डारकर यांनीं दिले.

त्यावर विरुद्ध टीका करतांना श्री. टिळक यांनीं केसरींत लिहिलें, "अहो डॉक्टर-साहेब, आरशी लावा आणि नीट वाचून पहा." रानड्यांच्यावरही टीकेचा भडिमार करण्यांत आला होता. परंतु ते भक्कम होते व टीकेस जुमानणारे नव्हते. आपल्या विद्यार्थ्यानें अशा रीतीनें लिहावें याबद्दल डॉ. भाण्डारकर यांस मात्र वाईट वाटलें. रानडे व भांडारकर यांच्या तरुण अनुयायांस स्फुरण चढलें व त्यांनीं बुधवारांत बेलबागेसमोर 'मित्रमंडळ' नांवाचा क्लब सुरू केला. समविचारी पुष्कळ मंडळी तेथें जमत. प्रक्षुब्ध वातावरण निवळल्यावर क्लबांत संभाषणें व निबंधवाचन इत्यादि क्रम पूर्ववत् सुरू झाला. या क्लबाची हकीकत मागें एकदां आलीच आहे.

सार्वजनिक कार्याच्या निमित्तानें हरिभाऊंचा अनेक मित्रांशी स्नेह जडला. रावसाहेब विष्णु अनंत पटवर्धन यांनीं व हरिभाऊंनीं प्लेग व्हॉलंटिअर, म्युनिसिपालिटीचे सभासद, डफरिन फंडाचे सेक्रेटरी म्हणून पुष्कळ वर्षें बरोबर काम केलें. हे कांहीं वर्षें आनंदाश्रमाचे ट्रस्टी होते. हिराबाग ऑर्फनेजच्यामुळें व म्युनिसिपालिटीमुळें श्री. ल. र. गोखले यांच्याशीं त्यांचा संबंध आला.

म्युनिसिपालिटीचे सभासद व त्यानंतर अध्यक्ष म्हणून काम करावयास लागल्यापासून पुण्यांतील रा. ब. रामनारायण अमरचंद, शेट माडीवाले, हणमंतराम रामनाथ, किसनदास विष्णुदास इत्यादि पुण्यांतील शेटसावकार व व्यापारी वर्गांतील मंडळीशीं हरिभाऊंचा विशेष परिचय होऊन आनंदाश्रमांत गुजराथी, मारवाडी लोकांची गर्दी उडूं लागली. कारण त्या वेळीं म्युनिसिपालिटीचें सारें राजकारण स्वाभाविकपणेंच आनंदाश्रमांतून चालत असे.

पुण्यांत मोठ्या हुद्यांवर काम करणाऱ्या बऱ्याच रेव्हेन्यु ऑफिसरांचा व हरिभाऊंचा स्नेह होता. त्यांपैकीं प्रमुख म्हणजे रा. ब. अंजनगांवकर, रा. ब. कुमठेकर, अण्णासाहेब रणसिंग हे होत. आनंदाश्रमांत जमणारी मंडळी प्रथम रा. ब. वाड यांच्याकडेच जमत. वाडक्लबांत हरिभाऊ, पानसे, वामनराव लेले ही मंडळी रोज येत. इ. स. १८९८ च्या प्लेगांत वाडसाहेब व वामनराव लेले वारल्यामुळें क्लब विस्कळित झाला. तेव्हां क्लबांतील मंडळी आनंदाश्रमांत जमूं लागली. रा. ब. कुमठेकर व रा. ब. अंजनगांवकर हे अखेरपर्यंत हरिभाऊंचे परम मित्र होते. कुमठेकर म्युनिसिपल सेक्रेटरी व हरिभाऊ म्युनिसिपालिटींत सभासद असल्यानें दोघांचा कामानिमित्त रोज संबंध येई.

## हरिभाऊ व ना. गोखले

राजकारणामुळें ज्यांचा हरिभाऊंशीं अत्यंत गाढ स्वरूपाचा स्नेह झाला त्यांत ना. गोपाळ कृष्ण गोखले हे अग्रगण्य होत. डेक्कन सभेच्यामुळें जडलेला त्यांचा स्नेह इतका दृढ झाला कीं, कधीं कोणाकडे विशेष न जाणारे गोपाळराव आनंदाश्रमांत हरिभाऊंशीं नाना विषयांवर चर्चा करीत. रात्रीं अपरात्रींसुद्धां तासचे तास घालवीत. विरुद्ध पक्षांतील लोकांच्या वाक्प्रहारानें कोंवळ्या मनाचे गोखले जेव्हां दु:खी होत तेव्हां हरिभाऊच त्यांचें समाधान करीत.

हरिभाऊंनीं शेक्स्पिअरचें कसून अध्ययन केलें होतें. फर्ग्युसन कॉलेजांत गोखले शेक्स्पिअर शिकवीत असत. शेक्स्पिअरच्या नाटकांतील कांहीं स्थळांच्या अर्थासंबंधीं गोखले व हरिभाऊ यांचे वाद होत असत. त्या वेळीं हरिभाऊंचाच अर्थ बरोबर, असें कबूल करणें गोखल्यांना अनेक वेळां भाग पडलें. हरिभाऊंच्या विद्वत्तेबद्दल, इंग्लिश व संस्कृत ग्रंथांच्या गाढ परिशीलनाबद्दल गोखल्यांना फार आदर वाटे. दोघेही वाङ्मयभक्त प्रागतिक पक्षाचे असल्यानें त्यांचा स्नेहभाव उत्तरोत्तर वाढतच गेला. एकदां बोलतां बोलतां ‘ कॅबिनेट मिनिस्टर ’ होण्याची आपली महत्त्वाकांक्षा गोपाळरावांनीं हरिभाऊंना सांगितली तर ‘ विख्यात कादंबरीकार ’ होण्याचें आपलें ध्येयही हरिभाऊंनीं त्यांस सांगितलें. एकमेकांवर त्यांचा दृढ विश्वास होता. त्यामुळें विचारविनिमय करतांना परस्परांशीं ते मोकळेपणानें बोलत.

हरिभाऊ पंचहौद मिशनमधील फादर रिव्हिंग्टन यांच्यापाशीं फ्रेंच भाषा शिकले. फ्रेंच वाङ्मय चांगलें समजण्याइतकें त्यांचें त्या भाषेवर प्रभुत्व होतें. फ्रेंच वाङ्मयाचे प्रोफेसर म्हणून हरिभाऊंना डेक्कन एज्युकेशन सोसायटीमध्यें घ्यावें, अशी गोपाळरावांची इच्छा होती. परंतु हरिभाऊंनीं डिग्री मिळविली नाहीं या कारणास्तवच गोखल्यांच्या सूचनेचा इतरांनीं स्वीकार केला नसावा, असें वाटतें.

सार्वजनिक चळवळींत हरिभाऊंच्यावरच गोखल्यांची मदार असे. प्रागतिक पक्षाचे दोघे प्रमुख पुढारी असाच समाजांत त्यांस मान होता. हरिभाऊंनीं मुंबई कायदे कौन्सिलमध्यें निवडून येऊन कार्य करावें, अशी गोखल्यांची अत्यंत इच्छा होती. गोखल्यांच्या आग्रहास्तव हरिभाऊ इ. स. १९०९ च्या निवडणुकीकरितां उभे राहिले. त्या वेळीं श्री. नरसिंह चिन्तामण केळकर त्यांचे प्रतिस्पर्धी होते. परंतु एकाएकीं श्री. केळकर यांस सरकारनें त्यांच्या शिक्षेचें निमित्त पुढें करून निवडणुकीस उभें राहण्याबद्दल बंदी केली. श्री. केळकर यांस सरकारनें बंदी करून नालायक

ठरविलें हें ऐकतांच हरिभाऊंना वाईट वाटलें. ‘ अशा प्रसंगीं उमेदवार म्हणून उभें राहणें मला पसंत नाहीं. सरकारनें केळकरांच्या बाबतींत नसतें खुसपट काढून अन्याय केला आहे. ते माझे प्रतिस्पर्धी असले म्हणून काय झालें! आमचे आम्ही पाहून घेऊं. परंतु आम्हांला सरकारनें संधि देऊं नये म्हणजे काय! ’ असे एका मित्रापाशीं उद्गार काढून ते लागलीच गोखल्यांचा सल्ला विचारण्यास गेले. तिकडून परत येतांना ते श्री. वासुकाका जोशी यांचेकडे येतात तों तेथें ‘ केळकरांची उमेदवारी नालायक ठरविण्याचा प्रयत्न हरिभाऊंनीं केला ’ असें लोक बोलत असल्याचें त्यांस समजलें, तेव्हां ते तसेच परत घरीं गेले. ते किती उदार बुद्धीनें वागत होते, परंतु पक्षद्वेषामुळें त्याचा असा विपर्यास केव्हां केव्हां होई. असो.

गोपाळरावांच्याबद्दल हरिभाऊंना अतिशय आदर व प्रेम वाटे. कादंबरींत त्यांनीं कल्पनेनें रेखाटलेलें भावानंदाच्या मठाचें चित्र गोखल्यांच्या **Servants of India Society** त अवतरलेलें पाहून त्यांस आनंद वाटे. इ. स. १९१४ साली गोखले अत्यवस्थ असतां आपला अंतकाल समीप आला असें वाटून त्यांनीं जवळच असलेल्या हरिभाऊंना म्हटलें, ‘ हरिभाऊ, कोणाच्या मृत्यूमुळें तुम्हांस विशेष दुःख झालें ? ’ त्या वेळीं ताई नव्हती. हरिभाऊंनीं उत्तर दिलें, ‘माझ्या मुलीच्या मृत्यूनें. ’ ‘एखाद्या स्नेह्यांचें नांव सांगा’ असें गोपाळरावांनीं विचारतांच ‘माधवराव जोशांच्या’ असें हरिभाऊंनीं चटकन् उत्तर दिलें. आतां आपण जाणार व त्यामुळें हरिभाऊंना दुःख होईल या विचारानेंच गोपाळरावांनीं वरीलप्रमाणें प्रश्न केला होता. ता. १९ फेब्रुवारी १९१४ रोजीं, हरिभाऊंना ‘ हरिभाऊ, जातों मीं ’ असें सांगून गोखल्यांनीं स्वर्गीं प्रयाण केलें. गोखल्यांच्या मृत्यूनें हरिभाऊंचा मोठाच आधार गेला व त्यांस परमावधीचें दुःख झालें.

राजकारणांतील मतभेदानें कित्येकांचें मित्रत्व लयास गेलेलें आपण पाहतों व ऐकतों. प्रसंग हीच मित्रत्वाची खरी कसोटी आहे. विरोधाची धग लागतांच पूर्वीची मैत्री बहुधा जागच्या जागींच विरघळून जाते, हा सामान्य जनांचा अनुभव आहे. अत्यंत विलक्षण परिस्थितींत मूळचा मित्रभाव कायम राखणें, ही दिसते तितकी सोपी गोष्ट खाचित नाहीं. परिस्थितीनें कितीही धक्के दिले तरी त्यांस न जुमानतां पूर्वस्वरूपांत कायम राहणारा स्नेहभाव किती निर्मल व सुंदर असेल ! कोणत्याही प्रसंगानें ज्याचें रूप बदलत नाहीं, असें प्रेम अत्यंत उच्च असून ज्यांच्यांत

तें आहे तीं माणसें उदारवृत्तीचींच असतात. वस्तुतः चित्रशाळेचे श्री. वासुदेवराव जोशी व हरिभाऊ यांच्या राजकीय प्रश्नांसंबंधीं मतांत जमीनअस्मानाचें अंतर! रोज संध्याकाळीं कोणत्या ना कोणत्या तरी कारणावरून आनंदाश्रमांत दोघांचे खटके उडावयाचे. ते त्यांचे कडाक्याचे वादविवाद पाहून आजूबाजूचीं माणसेंही भेदरून जात व या दोघांत आतां कायमचें वितुष्ट पडणार असें त्यांस वाटे. परंतु मौज ही कीं, संध्याकाळच्या वेळीं हरिभाऊंशीं भांडून घरीं जाणारे वासुकाका दुसरे दिवशीं सकाळीं हरिभाऊंच्या बरोबर फिरावयास जाण्यास आनंदाश्रमांत हजर!! मित्रप्रेमाच्या पवित्र गंगेंत सारे विरोध जसे कांहीं वाहूनच जात. ही मैत्री कायम राखण्याचें श्रेय जसें हरिभाऊंना तसेंच श्री. वासुदेवराव जोशी यांनाही आहे. खरें पाहिलें तर मानवी जीवनांत राजकारण हा अनेक भागांपैकीं एक भाग आहे. हरिभाऊ व वासुकाका यांनीं परस्परांच्या स्नेहासाठीं एकमेकांच्या राजकीय मतांकडे दुर्लक्ष केलें व आपल्या स्नेहांत तिळमात्रही अंतर पडूं दिलें नाहीं. चाळीस वर्षांच्या या निर्हेतुक व अकृत्रिम स्नेहाचें स्मारक म्हणून हरिभाऊंनीं 'सूर्योदय' ही कादंबरी वासुकाकांस अर्पण केली. ही कादंबरी चित्रशाळेंतच छापल्यामुळें त्यावरची अर्पणपत्रिका पाहून वासुकाकांनीं आपलें नांव वगळून पुढील मजकूर मात्र कायम ठेविलाः—'मतवैचित्र्यामुळें, किंबहुना मतविरोधानेंही पस्तीस वर्षांत ज्यांच्या व माझ्या स्नेहांत अणुभरसुद्धां अंतर पडलें नाहीं अशा माझे मित्रास हें पुस्तक अर्पण केलें आहे.'

कॉंग्रेसच्या निमित्तानें हरिभाऊंनीं हिंदुस्थानभर प्रवास केला. त्यामुळें अनेक विद्वान् गृहस्थांचा व त्यांचा चांगला परिचय झाला. ते नागपूर कॉंग्रेसला गेले असतां रावसाहेब कानिटकर व श्री. काशीताई यांच्यामुळें त्यांचा श्री. हरि महादेव पंडित या विद्वान् गृहस्थांशीं स्नेह झाला. पंडित मार्मिक व रसिक लेखक असून 'देशसेवक' पत्राचे संपादक होते. तेथील सामाजिक सुधारकांत ते प्रमुखांपैकीं होते. 'मी' ही ध्येयप्रधान कादम्बरी पण्डितांस अर्पण करून हरिभाऊंनीं त्यांच्या मैत्रीचें ऋण फेडलें.

इ. स. १८९० मध्यें नागपूरचे प्रसिद्ध समाजसुधारक श्री. वामनराव कोल्हटकर यांच्याशीं हरिभाऊंचा परिचय झाला. गोपाळराव गोखले यांच्या सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटींत ते पुण्यास आल्यावर उतरत. हरिभाऊही तेथें वारंवार जात असल्यामुळें अनेक राजकीय व सामाजिक प्रश्नांसंबंधीं त्या तिघांत भाषणें होत. याखेरीज सर मोरोपंत जोशी, रा. ब. रंगराव मुधोळकर यांचाही दृढपरिचय होता.

## हरि नारायण आपटे

मुंबईचे सॉलिसिटर श्री. हरि सिताराम दीक्षित यांचा व हरिभाऊंचा परमस्नेह होता. दीक्षित प्रागतिक पक्षाचे असून न्या. रानडे, ना. गोखले, सर फेरोजशहा मेथा यांचे चहाते होते. ते हरिभाऊंच्याप्रमाणेंच कॉंग्रेसचेही भक्त होते. त्यांनाही मित्रमंडळींची फार हौस असे. हरिभाऊ त्यांचेकडे मे महिन्यांत नेहमीं जात व तेही वरचेवर आनंदाश्रमांत येत. हे कौन्सिलचे मेंबर होते व कौन्सिलांतील प्रश्नांसंबंधीं त्यांची व हरिभाऊंची नेहमीं चर्चा चाले. दीक्षित गुजराथी असून हरिभाऊंशीं खऱ्या बंधुभावानें वागत.

अकोल्याचे प्रसिद्ध वाङ्मयसेवक श्री. विष्णु मोरेश्वर महाजनी यांचा हरिभाऊंच्यावर फार लोभ होता. हरिभाऊंच्या लेखनाचें सामर्थ्य व त्यांची खरी योग्यता रा. ब. अण्णासाहेब महाजनी यांनींच प्रथम जाणली. ते कित्येक वेळां आनंदाश्रमांत येऊन रहात व हरिभाऊंशीं वाङ्मयविषयक गोष्टी करतांना त्यांस फार आनंद वाटे.

सोलापूरचे श्रीमंत अप्पासाहबे वारद, सखारामपंत किर्लोस्कर, प्रभाकरपंत नागपूरकर, डॉ. किर्लोस्कर व शंकरराव देगांवकर हे हरिभाऊंच्या स्नेह्यांपैकीं होते. हरिभाऊंच्या बद्दलच्या आदरबुद्धीमुळेंच श्री. अप्पासाहेब वारद आनंदाश्रमांत उतरण्यास येत. असो.

हरिभाऊंच्या सर्वच मित्रांचीं नांवें देणें ही मोठी कठीण गोष्ट आहे. त्यांच्या विशेषस्नेहांतील गृहस्थ आणखीही कांहीं होते, ते म्हणजे इंदूरचे श्री. दामोदर विनायक कीर्तने, डॉ. तांबे, श्री. महादेव हरि मोडक, नागपूरचे बॅरिस्टर मोरोपंत दीक्षित, सोलापूरचे रा. ब. गणेश कृष्ण साठे, सातारचे रा. ब. पारसनीस, पुण्यांतील रँग्लर परांजपे, सरदार मुदलिआर, विनायकराव आपटे इत्यादि होत. रँग्लर परांजपे हे पुढें प्रागतिक पक्षाचे पुढारी म्हणून गणले गेले. त्यांचा व हरिभाऊंचा फार निकट स्नेहसंबंध होता.

श्री. वासुदेव गोविंद आपटे व श्री. बापूराव आंबेकर यांचा ज्ञानप्रकाशमुळें हरिभाऊंशीं जो परिचय झाला तो उत्तरोत्तर वाढतच गेला. श्री. बापूराव आंबेकर हे चांगले लेखक आहेत हें पाहून हरिभाऊंनीं ज्ञानप्रकाशपत्राचें संपादकत्व त्यांच्या हवाली केलें. हरिभाऊंवरील मित्रप्रेमाचें ऋण श्री. बापूराव यांनीं किती आस्थापूर्वक कळकळीनें पार पाडलें हें सर्वश्रुतच आहे.

## संस्थानिक स्नेही

दक्षिणेंतील संस्थानिकांपैकीं श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी व श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांचा व हरिभाऊंचा चांगला स्नेहसंबंध होता. उभयतां श्रीमंत विद्वान् व व्यासंगी असल्यामुळें हरिभाऊंची खरी योग्यता जाणून असत. श्रीमंत बाळासाहेब हरिभाऊंना भेटण्यास आनंदाश्रमांत येत, तेव्हां श्रीमंत रामायणांतील चित्रांचीं पेन्सिल स्केचेस् त्यांस दाखवीत व हरिभाऊंच्या सूचनेप्रमाणें त्यांत कमजास्त फेरफार करीत. रामायण व महाभारतकाळीं पुरुष व स्त्रिया कोणत्या प्रकारचीं वस्त्रें कशीं परिधान करीत असत, त्यांचे अलंकार, शस्त्रें, अस्त्रें वगैरे कोणत्या प्रकारचीं होतीं यांबद्दल हरिभाऊ व श्रीमंत यांची बरीच चर्चा होत असे. या चर्चेस अनुसरूनच श्रीमंतांनीं प्रसिद्ध केलेलें रामायण व तसेंच भाण्डारकर इन्स्टिटयूटकडून प्रसिद्ध होणारें महाभारत यांतील चित्रें काढलीं व काढविलीं आहेत.

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यासंबंधीं श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांनीं हरिभाऊंजवळ एकदां विनोदानें उद्गार काढले कीं, ‘ जुना समाज बिघडविण्यास इतर लेख व व्याख्यानें ह्यांपेक्षां तुमच्या कादंबऱ्याच जास्त कारणीभूत होत आहेत.’ श्रीमंतांचें म्हणणें चुकीचें नव्हतें. हरिभाऊंच्या ‘ पण लक्षांत कोण घेतो ’ इत्यादि कादंबऱ्या इतक्या परिणामकारक उतरल्या आहेत कीं, कट्टया जुन्या समजुतीच्या अभिमान्यांसही द्रव आल्यावांचून राहिला नाहीं.

श्री. रावसाहेब गोविंदराव कानिटकर व त्यांच्या पत्नी काशीताई या सुसंस्कृत व सुशिक्षित दांपत्याच्या आयुष्यक्रमाचा व विचारांचा हरिभाऊंच्यावर फार परिणाम होऊन त्यांचें मतपरिवर्तन कसें झालें हें मागें सांगितलेंच आहे. काशीताईंना कांहीं ‘ नाहीं ’ म्हणावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविलें होतें. हरिभाऊ मित्रांचे मोठे लोभी होते. त्यामुळें त्यांच्या भोंवतीं सदा कोणी ना कोणी असावयाचेंच. त्यामुळें त्यांची भेट होणें मुष्किलीचें होई. एकदां काशीताई आनंदाश्रमांत आल्या, तेव्हां गोपाळराव गोखले हरिभाऊंच्याकडे आले आहेत असें त्यांस समजलें. त्या घरीं परत जावयाला निघणार तों काशीताई आल्याची बातमी कळून हरिभाऊ खालीं आले व म्हणाले ‘ ताई, मजकडे कोणीही आलें असलें तरी तुमची भेट घेण्यास मी सदैव मोकळाच असतों असें समजा. ’ ‘ काशीताई आल्या म्हणजे मला कळवा. मग माझ्याकडे कोणीही आलेलें असो, ’ अशी त्यांनीं नोकरांना सक्त ताकीद देऊन ठेविली होती.

काशीताईच्याप्रमाणेंच माधवराव जोशी यांच्या पत्नी पार्वतीबाई यांच्याशीं हरिभाऊ खऱ्या बंधुभावानें वागत. माधवरावांच्या मागें पार्वतीबाई व त्यांचीं मुलें यांचा हरिभाऊंनीं उत्तम परामर्श घेतला.

हरिभाऊंचे जसे श्रीमंत वर्गांतील तसेच अगदीं गरीब स्थितींतीलही मित्र होते. परंतु एकदां ज्याला स्नेही मानलें तो गरीब असला तरी हरिभाऊ त्यास आपल्या बरोबरीनें वागवीत. गोगटे मास्तर म्हणजे एक गरीब शाळामास्तर, परंतु हरिभाऊ त्यांस ममतेनें वागवीत. गरीब म्हणून त्यांनीं केव्हांही कोणाचा अनादर केला नाहीं. श्री. रंगोपंत अत्रे म्हणजे हरिभाऊंच्या कॉलेजांतील स्नेह्याचे धाकटे भाऊ. परंतु त्या मित्रानें मृत्युसमयीं 'रंगोपंतास माझ्या जागीं समजा' असें हरिभाऊंना सांगितलें. हे मित्राचे अंतकाळचे शब्द हरिभाऊंनीं पूर्ण लक्षांत ठेविले. ते रंगोपंतास धाकटा भाऊ समजत. रंगोपंत बिन् चुकतां रोज आनंदाश्रमांत हजर असत. जेथें कोठें हरिभाऊ जातील तेथें रंगोपंत असावयाचेच. मौजेनें थट्टा करून हरिभाऊ त्यांना बेजार करीत. रंगोपंताचीही हरिभाऊंच्यावर पूर्ण निष्ठा होती.

मध्यप्रांत, वऱ्हाड, महाराष्ट्र यांतील बहुतेक सर्व प्रतिष्ठित गृहस्थांचा व हरिभाऊंचा परिचय होता. युरोपिअन समाजांतील कित्येक गृहस्थांचीं व हरिभाऊंची गाढ मैत्री होती. सर क्लॉड हिल, मिस्टर माउंटफर्ड, मिस्टर रॉबर्टसन्, सर जेम्स डुब्रोले, मिस्टर स्विफ्ट, फादर रिव्हिंग्टन, नामदार किंकेड, नामदार कीटिंग यांच्याशीं त्यांचा विशेष स्नेह होता. विशेषतः नामदार कीटिंग व ना. किंकेड हे हरिभाऊंशीं जिवलग मित्राच्या नात्यानें वागत.

हरिभाऊंचें इंग्रजी वाङ्मयाचें विस्तृत वाचन असल्यानें त्यांच्याशीं परिचय करून घेण्याची इच्छा इंग्रज गृहस्थांनाही साहजिकच होई. हिलसाहेब हरिभाऊंशीं वाङ्मय-विषयक वादविवाद नेहमीं करीत. एखादें नवीन इंग्रजी पुस्तक प्रसिद्ध झालें कीं, तत्काल तें विकत घेऊन हरिभाऊ वाचीत. एकदां एका इंग्रज गृहस्थानें 'अमुक एका कवयित्रीच्या कविता तुम्ही वाचल्या आहेत काय?' म्हणून त्यांस विचारलें. हरिभाऊंनीं तें पुस्तक पाहिलें नसल्यानें 'मीं त्या कविता वाचल्या नाहींत' असेंच उत्तर त्यांना द्यावें लागलें. परंतु या गोष्टीबद्दल त्यांस वाईट वाटल्यावांचून मात्र राहिलें नाहीं. त्यांनीं त्या कविता ताबडतोब विकत घेऊन जेव्हां वाचल्या तेव्हांच त्यांच्या मनाचें समाधान झालें.

## किंकेडसाहेबांचे पाहुणे

नामदार किंकेड यांचे पाहुणे म्हणून आठ दिवस हरिभाऊ त्यांच्याकडे राहिले होते. किंकेडसाहेबांना ऐतिहासिक गोष्टींचा फार नाद होता व ते हरिभाऊंशीं मोकळेपणानें नाना विषयांवर चर्चा करीत.

पुणें शहरांतील एक प्रमुख गृहस्थ व सार्वजनिक कामें करणारा पुढारी असा त्यांचा लौकिक असल्यानें बहुतेक युरोपिअन अधिकारी त्यांची ओळख करून घेत. पुण्यांतील कलेक्टर्स व कामिशनर्स यांच्याजवळ हरिभाऊंचें चांगलें वजन असे. मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड वुइलिंग्डन यांचें हरिभाऊंच्याबद्दल फार चांगलें मत होतें. परंतु कामाशिवाय ते कोणत्याही अधिकाऱ्यांकडे कधीं जात नसत. गव्हर्मेंटहौस-मधील पार्ट्यांच्यावेळीं ते निरनिराळ्या अधिकाऱ्यांच्या भेटी घेऊन बरींच कामें उरकून टाकीत.

हरिभाऊंच्या मित्रांचे विविध कंपू होते. परंतु प्रत्येक कंपूंत मध्यबिंदूप्रमाणें हरिभाऊ हजर असत. एकमेकांस विरोधी असणाऱ्या गटांतील लोक हरिभाऊंना मात्र मानीत. इतके भिन्न भिन्न विचारांचे व प्रकृतींचे त्यांचे स्नेही होते, परंतु तुसडेपणाचें वर्तन हरिभाऊंनी कोणाशीं केव्हांही केलें नाहीं. मित्रांच्यासाठीं पडेल ती झीज शांतपणें सोसावयाची हेंच त्यांच्या मित्राच्या संबंधींच्या आचरणाचें खरें रहस्य हाय.

जसें बरोबरीच्या स्नेह्यांत तसेंच ते आपल्या बालमित्र-मैत्रिणींत अगदीं रमून जात. लहान मुलांच्या गंमतीच्या गप्पांत हरिभाऊंची वृत्ति तन्मय झालेली पाहतांच कित्येकांस अत्यंत नवल वाटे. ' मुलांशीं एवढं काय बोलत बसतां ? ' असें कोणी म्हटल्यास ते म्हणत, ' लहान मुलांशीं लडिवाळपणानें बोलण्यांत जी मौज आहे ती तुम्हांस काय माहीत !' लहान मुलांच्या निर्मल, गोड सहवासांत हरिभाऊंचें अंतःकरण उल्लसित होई. आपल्या मित्रांच्या लहान मुलांमुलींना ते आनंदाश्रमांत घेऊन येत व त्यांना खाऊ, चित्रें किंवा बक्षिसें देऊन घरीं पाठवीत. कित्येकदां आपल्या बाल-मित्रांच्या निमंत्रणांवरून ते त्यांच्या घरीं जेवूनही येत. कां कोण जाणे, पण मुलांच्या-पेक्षां मुली त्यांना फार आवडत. एखादी हुषार मित्रकन्या आढळली कीं, तिला ते नाना तऱ्हांचीं पुस्तकें वाचावयास देऊन उत्तेजन देत. पुस्तकांतील वाचलेली गोष्ट तिनें सांगितली म्हणजे त्यांस मोठा आनंद वाटे. मुलींच्या शिक्षणाबद्दल त्यांना फार कौतुक असे.

## हरि नारायण आपटे

कधीं कधीं आपल्या बालमित्रांच्यावर तेथल्या तेथें कविता रचून त्या त्यांना वाचावयास देत, तेव्हां कवि व काव्यविषय या उभयतांसही हंसूं लोटे, हें सांगावयास नकोच. लहान मुलांना हरिभाऊ आपल्यांतीलच आहेत असें वाटावयाचें. हरिभाऊ त्यांच्या वाटेल तशा खोड्या काढीत व त्यांच्याबरोबर लहान मुलांप्रमाणें खेळत.

हरिभाऊ खरोखर जगन्मित्र होते. बालांत बाल व थोरांत थोर होण्याची हरिभाऊंची मनोवृत्ति पाहून अत्यंत कौतुक वाटतें. त्यांच्या मित्रवर्गात गरिबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्व वर्गांचे व सर्व जातींचे स्नेही असत. त्यांच्या मित्रांचें जग विशाल असल्यामुळें त्यांस मनुष्यस्वभावाचें उत्तम ज्ञान झालें. स्वानुभवानें प्राप्त झालेलें हें ज्ञान आपल्या कादंबऱ्यांत ओतून त्यांनीं सर्वांस ऋणी केलें आहे.

## प्रकरण सोळावें

# सामाजिक, धार्मिक व राजकीय मतें

पंचेचाळीस वर्षांच्या पूर्वीचा काल हा खरोखर मतप्रचाराचा काल होता. त्या वेळीं मतप्रतिपादन व मतप्रचार यांस जवळजवळ कृतीइतकेंच महत्त्व होतें. जुनाट समजुतींच्या व नाना रूढींच्या खालीं दडपल्या गेलेल्या हिंदु समाजांत नवीन कल्पनांचा, नवीन विचारांचा अभाव होता. पाश्चात्य संस्कृतीच्या संसर्गानें ज्यांच्या आचारविचारांत परिवर्तन झालें होतें, त्यांना समाजापुढें नवीन कल्पना मांडून त्यांत क्रान्ति घडवून आणावयाची होती. श्री. आगरकर, न्या. रानडे इत्यादि प्रमुख मतप्रचारकांत हरिभाऊंची गणना करतां येईल. आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें अनेक महत्त्वाच्या गोष्टींचा खल करून त्यांनीं सामाजिक सुधारणेचे प्रश्न परिणामकारक रीतीनें जनतेपुढें मांडले.

एकत्र-कुटुंबपद्धति, स्त्रीशिक्षण, बालविवाह, जरठ-कुमारीविवाह, प्रौढ विवाह, पुनर्विवाह, केशवपन, जातिभेद, परदेशगमन, पतित स्त्रियांचा उद्धार, इत्यादि महत्त्वाच्या सामाजिक प्रश्नांसंबंधींचे विचार हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत आढळतात. आगरकरांच्या प्रमाणें सणसणीत लेख लिहून या प्रश्नांची चर्चा न करितां कथांच्या द्वारें जुन्या नव्या मताच्या सर्व लोकांच्या पुढें समाजोन्नतीचे प्रश्न त्यांनीं अत्यंत कुशलतेनें मांडले आहेत आणि त्यामुळें या कथालोलुप जनांस एरवीं अत्यंत अप्रिय वाटणाऱ्या समाजसुधारणांबद्दल सहानुभूति वाटूं लागली.

हरिभाऊंनीं निर्माण केलेलीं पात्रें समाजोन्नतीचे विचार करितात, सामाजिक प्रश्नांवर वादविवाद करितात. कादंबऱ्यांत अशा तऱ्हेनें प्रदर्शिलेल्या मतांत हरिभाऊंचीं स्वतःचीं मतें कोणतीं हें ओळखणें तितकेंसें कठीण नाहीं. कारण मनुष्यास

पटलेल्या मतांची त्याच्याकडून अनेक स्थळीं साहजिक पुनरुक्ति होते. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत एकाच गोष्टीचा अनेक वेळां उल्लेख केलेला आढळल्यास ती गोष्ट त्यांना पूर्णपणें पसंत आहे असें सामान्यपणें मानण्यास हरकत नाहीं व त्याबद्दलचीं त्यांनीं प्रकट केलेलीं मतें त्यांचीं स्वतःचीं वैयक्तिक मतें आहेत असें निश्चित समजणेंच रास्त होईल. त्याचप्रमाणें त्यांच्या लिहिण्याच्या पद्धतीवरून व उद्देशावरूनही त्यांच्या मनाचा कल कळून येईल. शिवाय त्यांच्या परिचयाच्या गृहस्थांच्या माहितीवरूनही त्यांचीं मतें कोणतीं याचा निर्णय करितां येणें शक्य आहे.

‘ गणपतराव ’ या कादंबरींत गणपतरावाच्या तोंडीं हरिभाऊंनीं घातलेले विवाहासंबंधीं विचार महत्त्वाचे आहेत. गणपतराव नानाच्या पत्रांत लिहितो, ‘ जगांतील ज्या ज्या कांहीं उत्कृष्ट गोष्टी आहेत त्या सर्वांचें सार म्हणजे विवाह होय....आपणांस आनंद होवो, दुःख होवो, त्याचा सारखा वांटा आनंदानें उचलणारी अशी आपली अर्धांगी आहे अशी खात्री असल्यावर सुख म्हणजे काय हें कोणाला विचारायला पाहिजे काय ? कोणताही विचार येवो व तो कसलाही असो, आपल्या अंतःकरणांतून त्या दुसऱ्या अंतःकरणांत गेला कीं पुरे, दुःख हलकें झालेंच. ’

जॉन स्टुअर्ट मिलचें *Subjection of Women* हरिभाऊंना फार प्रिय होतें. व त्यांतील पुष्कळशीं मतें त्यांना ग्राह्य वाटत. वरील उताऱ्यांत वर्णन केलेल्या विवाहासारखे विवाह त्या काळीं हिंदुसमाजांत दुर्मिळ होते. बालविवाहाची चाल समाजांत सर्वत्र रूढ असल्यानें अशासारख्या उदात्त स्वरूपाचे विवाह सुशिक्षित तरुणांच्या कल्पनासृष्टींतच होत असत. पति सुशिक्षित व पत्नी अशिक्षित असल्यावर त्या दोघांत विचारांचें व भावनांचें ऐक्य होणें अशक्यच असतें. पाश्चात्य संस्कृतीच्या ज्ञानानें व इंग्रजी वाङ्मयाच्या परिचयानें तिकडच्या स्त्रियांप्रमाणें हिंदु स्त्रिया सुशिक्षित व्हाव्या असें हरिभाऊंना वाटे. इंग्रजी पुस्तकांतील स्वतंत्रतेचा वाद सांगणारे विचार वाचून गणपतरावांच्याप्रमाणेंच हरिभाऊंची मनःस्थितीही विलक्षण होत असावी.

‘ बालविवाह बंद होऊन मुली मोठ्या झाल्यावर आपल्या मनाप्रमाणें त्यांनीं लग्नें करावीं, पुनर्विवाह झाला तर त्याबद्दल कोणाला आश्चर्य वाटूं नये, पुरुषांप्रमाणेंच बायकांचीं कॉलेजें होऊन त्या बी. ए., एम्. ए. व्हाव्या ’ (गणपतराव, पृ. १०७), अशीं गणपतरावाप्रमाणें त्यांचीं मतें होतीं. ‘ जें चांगलें आहे तें लोकांनीं

पटकन् कां घेऊं नये? उदाहरणार्थ, पुनर्विवाहाची चाल...तसाच बालविवाह बंद कां होऊं नये? तसेंच स्त्रीशिक्षण कां वाढूं नये? जातिभेद कां मोडला जाऊं नये? एक कीं दोन सर्वच गोष्टी एकदम व्हाव्या तशा होऊन आपला देश सुधारलेल्या देशांसारखा सुखी व्हावा असें त्यांस वाटे. ' ( गणपतराव, पृ. ५७ ). उत्साहाच्या भरांत हरिभाऊंची मनःस्थिति केव्हां केव्हां गणपतरावासारखी होऊन साऱ्या सामाजिक सुधारणा एकदम घडून याव्या अशी इच्छा त्यांना होई. परंतु ध्येयाकाशांतून जमिनीवर उतरल्यावर ' लोकरूढीसारखा महाप्रचंड डोंगर " व त्यावर असणाऱ्या दुराग्रहाच्या, मात्सर्याच्या, आलस्याच्या प्रचंड शिला ' त्यांस दिसूं लागून ' धीरे धीरे कां होईना पण खात्रीची सुधारणा झाली पाहिजे,' असाच विचार दृढ होई.

' जनहिताचा कांहीं नवा विचार ज्यांच्या मनांत येईल त्यांनीं त्याचा उच्चार केला पाहिजे. ज्यांना होईल त्यांनीं त्याप्रमाणें आचार ठेवण्याला झटलं पाहिजे. जे जे आचार आज जगांत आले आहेत ते ते या तिन्ही स्थितींतून आले आहेत कीं नाहींत? पहिल्यानं विचार, मग उच्चार, आणखी मग आचार. गणपतरावासारखे लोक समाजाच्या सुधारणेला अगदीं अवश्य आहेत. ते जेव्हां खूप पुढें चला असें म्हणून लोकांना ओढतील तेव्हां लोक एक पाऊलभर पुढें सरकतील. तुम्ही, आम्ही, गणपतराव सगळे लोक समाजाच्या सुधारणेला सारखे उपयोगी आहों. ' समाजसुधारणेच्या विचारांचें विष्णुपंतांच्या तोंडीं घातलेलें हें पृथक्करण योग्य आहे.

गृहस्थिति सुधारल्यावांचून समाज सुधारणार नाहीं आणि समाज सुधारल्यावांचून देश सुधारणार नाहीं, अशा प्रकारची हरिभाऊंची विचारसरणी होती. यासाठींच आमच्या गृहस्थितींतील अनेक गोष्टींचा सांगोपांग विचार त्यांनीं केला. सामाजिक रूढींनीं व बंधनांनीं जखडून गेल्यामुळें स्त्रियांची स्थिति अनुकंपनीय झाली होती. अज्ञानाच्या गाढ तमानें मन भरून राहिल्यामुळें त्यांचा मनोविकास होत नव्हता. कोत्या विचारांनीं मनें व्यापून गेल्यामुळें कुटाळक्या करण्यांत, अनुदार विचारांत स्त्रियांचा काळ जात होता. याला कारण शिक्षणाचा अभाव व आमची एकत्रकुटुंबपद्धति, असेंच हरिभाऊंना वाटत होतें. एकत्रकुटुंबपद्धतीचे दुष्परिणाम त्यांनीं ' पण लक्षांत कोण घेतो ' या कादंबरींत वर्णिले आहेत. दहावीस माणसांनीं एकत्र डोकें खुपसून राहिल्यामुळें कोणालाच स्वतंत्रता मिळत नाहीं. बायकांना तोंड दाबून बुक्क्यांचा मार सहन करावा लागतो. पतिपत्नींना परस्परांपासून जितकें सौख्य मिळावें तितकें मिळत नाहीं.

घरांत कांहीं मिळविते व कांहीं न मिळविते पुरुष असले म्हणजे, घरांत जे हेवेदावे व कुजबूज सुरू असते तिचें वर्णनच करितां येत नाहीं. बायकांना मोकळेपणा न मिळाल्यानें त्यांचीं मनें कुचकीं होतात व गृहसौख्याचा नाश होतो. अशा स्थितींत एखाद्या स्त्रीस वैधव्य प्राप्त झालें म्हणजे तिचे हाल कुत्रा सुद्धां खात नाहीं. धर्माच्या नांवाखालीं तिचें केशभूषण हिरावून घेऊन तिला विद्रूप करण्याची घरांतल्या माणसांना घाई होते. तिच्या मनाची, तिच्या दुःखाची पर्वा कोणास वाटत नाहीं. यमुनेची हृदयद्रावक स्थिति वर्णन करून हरिभाऊंनीं आमच्या गृहस्थितींतील दोष समाजापुढें मांडले. स्त्रियांच्या दुःस्थितीबद्दलचे यमुनेचे उद्गार लक्षांत घेण्यासारखे आहेत. ' आम्हां दीन गाईंची खरोखर स्थिति काय असते, आमच्यावर ज्या त्या बाबतींत किती जुल्म होत असतो, अज्ञान अतोनात माजविल्यानें आमच्या आम्हीच आपलें किती नुकसान करतों, आम्हांला आमचें मन गुंतविण्यास श्रेष्ठ श्रेष्ठ असे विषय नसल्यामुळें आमचीं मनें नेहमीं दागदागिने, लुगडीं, चोळ्या, निंदा, कुटाळक्या इत्यादिकांत किती गुरफटून गेलेलीं असतात, एक ज्ञान नसल्यामुळें आमच्या मनावर दुराग्रहाचें पटल केवढें जबर असतें व तें निघण्याची कोण मारामार पडते! त्याप्रमाणें ' धर्म! धर्म! नीति! नीति!! ' म्हणून ओरडणाऱ्या लोकांपैकीं शेंकडा ८०-९० लोक केवळ आमचा चेंदा करीत असतात, या गोष्टी कोणाला दिसत नाहींत असें कां आहे? डोळे उघडून पाहील त्याला सर्व दिसेल, लक्षांत घेईल त्याच्या लक्षांत सारें येईल; पण डोळे कोण उघडतो, आणखी लक्षांत कोण घेतो! ' ' पण लक्षांत कोण घेतो ' या कादंबरीनें हरिभाऊंनीं जुन्यानव्या मतांच्या साऱ्या लोकांचे डोळे उघडले व त्यांच्या लक्षांत खरी स्थिति आणून दिली. असो.

केशवपनाच्या दुष्ट रूढीला ज्याप्रमाणें स्त्रियांचे बळी पडत होते, त्याचप्रमाणें जरठ-कुमारीविवाहानें सुकुमार बालिका कायमच्या दुःखोदधींत लोटल्या जात होत्या. भाऊरावाची बहिण गंगूताई हिचें लग्न वृद्ध दादासाहेबांशीं होण्याचें ठरलें तेव्हां कादंबरीकारानें पुढीलप्रमाणें उद्गार काढले:

' सध्यांचे दिवस अघोरघण्ट कपालकुण्डलांचे नव्हेत......तसल्या क्रौर्याचे, तसल्या करालेचे, तसल्या स्मशानवाटिकांचे, तसल्या अघोरघण्टकपालकुण्डलांचे दिवस जरी गेले, तरी आज त्या सगळ्यांचे भिन्नावतार झाले आहेत, हें विसरू

नका....त्या देवता क्षणोक्षणीं अनाथ बालिकांचे मेध करून बलिदानग्रहण करीत आहेत...हा चामुण्डाकरालेचा नवावतार तरी असा कोणता? अर्थात् रूढि, लोकरूढि, लोकमति, आणखीही हजारों नांवें तिला देतां येतील. या रूढिकरालेपुढें आपण क्षणोक्षणीं "नमस्ते! नमस्ते!" करून थयथयां नाचत नाहीं काय? तिची अवकृपा होऊं नये म्हणून आपण आपलीं घरें स्मशानवत् करून घेत नाहीं काय? तिच्या प्रसादार्थ आपल्या पोराबाळांचें, केव्हां केव्हां प्रत्यक्ष स्वतःच्या आत्म्याचें व शरिराचेंही बलिदान करीत नाहीं काय?'

जरठकुमारीविवाह व बालविवाह या दोन अत्यंत अनिष्ट पद्धतींमुळें आमच्या समाजांत बालविधवांचीं म्लानवदनें जिकडेतिकडे दिसत होतीं. अशा दुर्दैवी बालिकांबद्दल कोणा सहृदय मनुष्यास सहानुभूति वाटणार नाहीं? संसारसौख्याचा ज्यांनीं क्षणमात्रही आस्वाद घेतला नाहीं त्यांच्यावर संन्यासाची जबरदस्ती समाजाकडून होत असे. गृहस्थाश्रम योग्य रीतीनें पाळतां आला तरच चतुर्थाश्रम योग्य रीतीनें पार पडेल. गृहस्थाश्रमाच्या शाळेंत त्यागाचे धडे शिकल्यावांचून संन्यासाश्रमांतील सर्वस्वत्याग कसा शक्य होणार? सर्व आश्रमांतील प्रधान आश्रमांत—गृहस्थाश्रमांत—बालविधवांस प्रवेश मिळूं नये? ज्या बालविधवांस संसार करण्याची इच्छा असेल त्यांना पुनर्लग्न करण्याचा हक्क असावा व समाजानेंही त्यांस चांगल्याप्रकारें वागवून घ्यावें असें हरिभाऊंचें मत होतें. पुनर्विवाहास ते अनुकूल होते, एवढेंच नव्हे तर पुनर्विवाहित कुटुंबांचीं उत्तम चित्रें त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांत रेखाटलीं आहेत. 'भयंकर दिव्य' यांतील द्वारकाताई व 'कर्मयोगा'तील गणपतरावाची पत्नी सरस्वतीबाई या दोघी पुनर्विवाहित असल्या तरी त्यांचें चारित्र्य उदात्त व आदरणीय आहे. गृहिणी व माता या दोन्ही दृष्टींनीं त्या आदर्श स्त्रिया आहेत.

बालविधवांची उन्नति होण्यास पुनर्विवाह हा एक मार्ग आहे असें जरी त्यांना वाटत असलें तरी तो सर्वोत्कृष्ट मार्ग आहे असें त्यांचें मत नव्हतें. पतीच्या मृत्यूनंतर पत्नी जर पतीचें चिंतन करीत जीवित घालविते तर पत्नीच्या मृत्यूनंतर पतीनेंही पावित्र्यानें विधुरावस्थेंत काळ घालवावा असें त्यांचें मत होतें.

प्रथम पत्नीच्या मृत्यूनंतर दुसरा विवाह करण्याची वेळ आली तेव्हां आपल्या सुधारकी विचारांप्रमाणें त्यांना पुनर्विवाह करतां आला नाहीं. ते तसें करते तर त्यांना कुटुंबाचा संबंध कायमचा सोडावा लागला असता. आनंदाश्रमासारख्या

धार्मिक संस्थेची जबाबदारी त्यांच्यावर होती म्हणूनच त्यांस आपले सुधारकी विचार अंमलांत आणणें कठीण झालें.

संमतिवयाचा प्रश्न त्या काळीं अत्यंत महत्त्वाचा होता. हरिभाऊ संमतिवयाच्या कायद्यास अनुकूल असलेल्या मंडळींत प्रमुख होते. तुळशीबागेंतील सभेस विरोध करण्यासाठीं तरुण सुधारकांनीं जें विनंतिपत्रक प्रसिद्ध केलें, त्यावर हरिभाऊंनीं सही केली होती हें मागें एकदां सांगितलेंच आहे. हरिभाऊ व गोपाळराव गोखले यांनीं खटपट करून मित्रमंडळ क्लबाच्या सभासदांकडून ‘ मी आपल्या मुलीचें ती सोळा वर्षांची होईपर्यंत लग्न करणार नाहीं, ’ अशा शपथा घेतल्या होत्या. या सुधारक-मंडळांत कांहीं विधुर होते तर कांहीं जणांच्या घरांत अद्याप कन्यारत्नाचा मागमूसही नव्हता. परंतु त्या काळचीं सामाजिक बंधनें इतकीं कडक होतीं कीं, त्या प्रतिज्ञा-पत्रकावर सही देतांना कित्येकांचे हात कांपत होते. या गोष्टीवरून त्या काळच्या सामाजिक परिस्थितीची कल्पना वाचकांस होईल. कुटुंबाचीं समाजाचीं बंधनें तडातड तोडून आपल्या इच्छेप्रमाणें आयुष्य घालविणें तितकेंसें कठीण नाहीं; परंतु कुटुंबांतील जुन्या लोकांचा संबंध न तोडतां त्यांच्या समाधानासाठीं स्वतःला अप्रिय असणाऱ्या गोष्टी करीत राहणें ही गोष्ट खरोखर फार अवघड आहे. अण्णासाहेबांच्या विरोधाला न जुमानतां हरिभाऊंनीं संमतिवयाच्या प्रश्नासंबंधीं त्या वेळीं चाललेल्या चळवळींत पुढाकार घेतला होता, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

त्या काळच्या इतर सुधारकांप्रमाणें हरिभाऊ जातिभेद मानीत नसत. परजातीच्या मित्रांच्या घरीं ते जेवीत. गव्हर्मेंट हौसमधील पार्ट्यांस ते सहकुटुंब जात. मित्रांच्या घरीं भोजनास गेल्यास सोंवळ्यास रजा देत. पत्नीस बरोबर घेऊन रोज फिरावयास जात. सुधारकमित्रांचा जमाव त्यांच्या भोंवतीं नेहमीं असे. पुण्यांतील सुधारकांच्या यादींत त्यांचें नांव असून ‘ सुधारक ’ हें विशेषण त्यांस कायमचेंच मिळालें होतें.

पटेल बिलास ते अनुकूल होते. इ. स. १९१९ मध्यें इंदुरास असतां त्यांनीं पटेल बिलास सर्वस्वीं अनुकूल भाषण केलें होतें. पंचेचाळीस वर्षांच्या कालावधींत जे जे समाजसुधारणेचे प्रश्न निघाले त्या सर्वांस हरिभाऊ अनुकूल होते, एवढेंच नव्हे तर कांहीं सामाजिक चळवळींत त्यांचा पुढाकार होता. असें असतां सुधारणांचे विचार त्यांच्या कृतींत फारसे उतरले नाहींत, असा कित्येक लोकांचा आक्षेप आहे. विचाराच्या दृष्टीनें ते समाजाच्या किती पुढें गेले होते हें त्यांच्या सामाजिक

कादंबऱ्यांवरून समजतें. मनानें त्यांना सर्व सुधारणा पसंत होत्या. पाश्चात्य संस्कृतींतील उत्कृष्ट भागाचा स्वीकार समाजानें करावा याविषयीं त्यांनीं प्रयत्न केले. परंतु जुन्या समाजाचा संबंध तोडण्यास ते तयार नसल्यामुळें सुधारणांचे कित्येक विचार त्यांस कृतींत आणणें शक्य झालें नाहीं. त्यांच्या कुटुंबांतील मंडळी पुराणमताभिमानी होती. त्यामुळें एखादी विशेष सुधारणा अंमलांत आणावयाचें त्यांनीं मनांत आणलें असतें तर त्यांना कुटुंबाचा संबंध सोडावा लागला असता. विशेषतः आनंदाश्रमासारखी धर्मसंस्था चालविण्याची जबाबदारी त्यांच्या शिरावर असल्यानें समाजसुधारणेचे विचार कृतींत उतरवावे अशी इच्छा असूनही त्यांना कृतींवर बंधन घालणें जरूर झालें. मनानें ते सुधारक होते तरी जुनी पद्धति त्यांनीं सोडली नव्हती.

सुधारणेचे प्रिय विचार आचरणांत आणणें अशक्य झालें म्हणूनच कीं काय, त्यांनीं ते विचार आपल्या कादंबऱ्यांत प्रकट केले व तरुण पिढींत समाजसुधारणेविषयीं जागृति उत्पन्न करून समाजसुधारक निर्माण केले. ज्या ज्या समाजसुधारणांचा हरिभाऊंनीं पुरस्कार केला त्या त्या सर्व समाजास संमत होऊन त्यांचा स्वीकार त्यानें केलेला आज दिसत आहे. हरिभाऊंनीं सुधारणा कृतींत आणण्यासाठीं जर कुटुंबाचा संबंध सोडला असता तर त्यांच्या कादंबऱ्यांचा जनतेवर इतका परिणाम झाला असता किंवा नाहीं याची शंका आहे.

आनंदाश्रम ही धार्मिक संस्था असल्यानें संस्थेचे व्यवस्थापक या नात्यानें सर्व जुनीं धर्मबंधनें पाळणें हरिभाऊंचें कर्तव्यच होतें; आणि त्याप्रमाणें ते आचरण ठेवीत. आनंदाश्रमांतील देवाचे उत्सव, पूजा, घरांतील हव्यकव्यें, सत्यनारायणाच्या पूजा, सोमवारचें उपोषण, शिवरात्रीचें जागरण, पारणें, इत्यादि सर्व धार्मिक आचार ते करीत. सोंवळ्याओंवळ्यांचे निर्बंधही त्यांना पाळावे लागत. हरिभाऊंच्या प्रकृतीसाठीं चिमामावशींनीं बारा सत्यनारायणांचा नवस केला होता; तो त्यांनीं फेडला. त्याचप्रमाणें ताईसाठीं दर पौर्णिमेस वर्षभर सत्यनारायण करण्याचा नवसही त्यांनीं रीतसर फेडला. अण्णासाहेबांची पुण्यतिथि, आई, चुलती व मथुताई यांचीं श्राद्धें, अविधवा नवमी, ते यथासांग पार पाडीत. आनंदाश्रमांतील उत्सवप्रसंगीं भालप्रदेशावर भस्म चर्चिलेली व पितांबर परिधान करून ब्राह्मणांची पूजा करीत असलेली हरिभाऊंची मूर्ति कोणीं पाहिली असतां हरिभाऊ पुराणमताभिमानी कर्मनिष्ठ ब्राह्मण आहेत असाच कोणाचाही ग्रह होई.

परंतु एरव्हींच्या प्रसंगीं त्यांच्या तोंडून जुन्या धर्मसमजुती व रूढी यांबद्दल जे चेष्टेचे व केव्हां केव्हां नास्तिकपणाचे उद्गार बाहेर पडत त्यांवरून हरिभाऊ म्हणजे एक गूढ आहे अशी कोणाची कल्पना झाल्यास त्याबद्दल आश्चर्य वाटायला नको.

आपल्या मनास न पटणाऱ्या गोष्टी हरिभाऊ कां करीत, हा प्रश्न विचार करण्या-सारखा आहे. स्वतःस न आवडणाऱ्या गोष्टी जन्मभर करीत राहणें हें एक दिव्यच आहे आणि हें दिव्य हरिभाऊंनीं कां व कसें पार पाडलें, याचा जरूर विचार केला पाहिजे.

आनंदाश्रमांतील धार्मिक कार्यें त्यांनीं कर्तव्यबुद्धीनें व चुलत्यावरील निःसीम प्रेमामुळें केलीं यांत शंका नाहीं. कारण अण्णासाहेबांच्याबद्दलचीं सर्व कर्तव्यें मनापासून करावयाचीं असा त्यांचा निश्चय होता. चुलत्यावरील प्रेमामुळें स्वतःस अप्रिय असणाऱ्या गोष्टी निरपेक्षतेनें करणाऱ्या हरिभाऊंचें कौतुकच करावयास नको काय? जन्मभर नावडत्या गोष्टी करितांना त्यांच्या मनास अगदींच क्लेश होत नसतील असें मानणें असमंजसपणाचें होईल. परंतु मनाविरुद्ध गोष्टी उत्कृष्ट रीतीनें करणें कर्तव्यनिष्ठ व थोर मनाच्या मनुष्यासच शक्य आहे.

धर्मामध्यें तत्त्वज्ञान, नीति व परमार्थिक ज्ञान, यांचा अंतर्भाव होतो. पारलौकिक कल्याणासाठीं मनुष्य जो आचार व जीं कर्मे करतो, तींच धर्मामध्यें अत्यंत महत्त्वाचीं आहेत. तत्त्वज्ञानाचे अध्ययनास श्रद्धेची आवश्यकता नाहीं. नीतियुक्त आचरण श्रद्धेशिवाय होऊं शकतें, परंतु पारलौकिक अप्रत्यक्ष ज्ञानास श्रद्धेची जरूरी आहे. मृत्यूनंतर आत्म्याची काय स्थिति होते हें कोणीच शास्त्रज्ञ अथवा कोणताही ग्रंथ निश्चित सांगूं शकत नाहीं. देहबंधनांतून मुक्त झाल्यावर आत्म्याला कांहीं विशिष्ट अनुभव येत असले पाहिजेत. म्हणून तद्विषयक जीं आप्तवाक्यें आहेत किंवा ज्या पूर्वापार चालत आलेल्या समजुती आहेत, त्यांवर विश्वास ठेवणें मनु-ष्याला भाग पडतें. बुद्धिवादी मनुष्याचेंही अन्य उपपत्तीच्या अभावामुळें समाधान होऊं शकत नाहीं. त्यामुळें तो नेहमीं संशयाकुल मनःस्थितींत असतो. सर्वसामान्य-पणें हरिभाऊ हे संशयवादीच होते, असें म्हणावयास हरकत नाहीं. कित्येक बाबींत त्यांच्या मनाचा विशिष्ट प्रकारचा असा निश्चय झालेला नव्हता, असेंच त्यांच्या 'कर्मयोग', 'आज' इत्यादि कादंबऱ्यांतील तद्विषयक विवेचनावरून दिसतें. अशी जरी स्थिति होती तरी स्वप्नें, दृष्टांत, पुनर्जन्म यांवर हरिभाऊंचा विश्वास होता.

ताई गेल्यावर पुनर्जन्मासंबंधीं त्यांचे नेहमीं विचार चालत. आपला पुनर्जन्मावर दृढ विश्वास असल्याचें त्यांनीं एका प्रसंगीं बोलूनही दाखविलें होतें असें म्हणतात.

हरिभाऊंचें अंतःकरण अत्यंत मृदु असल्यामुळें त्यांच्यामध्यें एक प्रकारची भाविकता होती. ताईच्या करितां केलेले नवस फेडण्यांत प्रेमाचाच भाग जास्त होता. जर हे नवस फेडल्यामुळें तिला बरें वाटणार असेल तर तेंही करून पहावें; नवस करण्यापासून अपाय होणार नाहीं; झाला तर कदाचित् उपायच होईल; आपल्या आवडत्या माणसासाठीं ती गोष्ट कां करूं नये? त्याच्यांत जर चांगलें असेल तर ठीकच झालें. अशा प्रकारची एकंदरीनें त्यांची नवससायासासंबंधीं विचार-सरणी होती.

कोणाचेंही मन दुखविणें त्यांच्या जिवावर येई. वडील मंडळींच्या मर्जीसाठीं सोंवळ्याओंवळ्यांसारख्या गोष्टी करण्यास काय हरकत आहे? ज्यांच्या घरांत वडीलधारीं माणसें नाहींत त्यांनी या बाबतींत ढिलाई जरूर करावी, असें त्यांना वाटे. परंतु जुन्या मताच्या वडील माणसांच्या व स्त्रियांच्या दृढ झालेल्या धर्मसमजुती वादविवादानें बदलणें अशक्य आहे, हें जाणून क्षुल्लक गोष्टींसाठीं तेढ उत्पन्न करून कुटुंबसौख्यांत बिघाड करणें त्यांना नापसंत होतें. ज्याप्रमाणें पुरुषांस, त्याप्रमाणें स्त्रियांनाही, मतस्वातंत्र्य असलें पाहिजे असें त्यांचें मत असल्यानें त्यांना विशेष न आवडणाऱ्या गोष्टीही करण्यास ते घरांतील स्त्रियांना परवानगी देत व त्यांच्यासाठीं म्हणून अनेक गोष्टी करीत. इतकें असूनही घरांतील मडळींच्या भावना न दुखवितां ते शक्य असेल तेवढया गोष्टी आपल्या मनाप्रमाणें करीत असत. स्वतःच्या आवडीनिवडी एका बाजूला ठेवून दुसऱ्याकरितां अनेक गोष्टी करण्याची त्यांच्या मनाला संवय झाली होती म्हणून बरें. हरिभाऊंच्या जागीं दुसरा कोणी स्वार्थी मनुष्य असता तर त्यानें हीं बंधनें तडातड तोडून दूर फेंकून दिलीं असतीं. परंतु दुसऱ्यास दुखविणें हें हरिभाऊंचें ब्रीदच नव्हतें.

हरिभाऊंचे खरे धर्मविचार त्यांच्या बाह्य आचरणावरून ठरविणें धोक्याचें आहे. देवालयांतील देवाला जरी ते नमस्कार करीत तरी त्याच्या अस्तित्वाबद्दल त्यांच्या मुखांतून संशयाचे उद्गार बाहेर पडत. ' देव यदाकदाचित् असला तर आपला नमस्कार केलेला असावा ' असें ते चेष्टेनें नेहमीं म्हणत. थिऑसॉफी, एकेश्वरी पंथ, वारकरी पंथ, निरनिराळे गुरु व त्यांचे शिष्य यांची ते खूप थट्टा उडवीत. परंतु वेदान्त,

उपनिषदें, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, तुकारामाचे अभंग, दासबोध इत्यादि ग्रंथ ते मोठ्या आवडीनें व भक्तीनें वाचीत. ख्रिस्ती धर्माची त्यांनीं चेष्टा केली असली तरी ख्रिस्त व बायबल यांबद्दल त्यांना आदर होता. नाना गुरु व नाना धर्मपंथ यांबद्दल ते तिटकारा व्यक्त करीत तरी ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, यांचे ते भक्त होते. धर्मसंबंधीं विवाद सुरू झाला म्हणजे ते वेदान्ती आहेत कां अज्ञेयवादी आहेत, आस्तिक आहेत कां नास्तिक आहेत याचा निर्णय करणें कठीण पडे. कोणी वेदान्ताचा पक्ष घेऊन वादविवाद करूं लागल्यास ते चार्वाकाचीं मतें पुढें आणीत. प्रतिपक्षाविरुद्ध मुद्दे मांडण्यांत ते कुशल होते. एकदां एक मिशनरी हिंदु धर्मावर तोंडसुख घेऊं लागला, तेव्हां नास्तिक पक्षाची बाजू उचलून धरून हरिभाऊंनीं त्यास निरुत्तर केलें.

कर्मयोगांतील चंद्रशेखराचे धर्मविचार वर्णन करण्याच्या मिषानें हरिभाऊंनीं आपल्या पूर्ववयांतील धर्ममतांचें दिग्दर्शन केलें आहे, अशी शंका येते. मिल्, स्पेन्सर इत्यादि पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथवाचनानें धर्मसंबंधीं त्यांच्या विचारांत वादळ उपस्थित झालें होतें असेंच दिसतें. ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल मन साशंक होऊन त्यांची मनःशान्ति नाहीशी झाली असावी. जुन्या धर्माप्रमाणें ते बाह्यतः आचरण करीत असले तरी त्यांच्या हृदयाचें समाधान झालेलें दिसत नाहीं. परंतु धर्माचें कोडें उलगडण्याची जिज्ञासा त्यांच्या ठिकाणीं खास होती. जुना संन्यास-मार्ग त्यांस पसंत होता. मुलीच्या मृत्यूनंतर एका स्वामीशीं अध्यात्मविषयासंबंधीं त्यांनीं बरीच चर्चा केली असें म्हणतात. आपणही सर्वसंगपरित्याग करून संन्यास घ्यावा असा विचार त्यांच्या डोक्यांत नेहमीं घोळे. परंतु त्यांना अध्यात्माचा निश्चित मार्ग सांपडलेला दिसत नाहीं. ‘धर्म हा विकार आहे, विचार नाहीं. तो श्रद्धामूल आहे...लोक हाच परमेश्वर. त्यांच्या हितासाठीं झटणें हीच परमेश्वराची सेवा’ असें चंद्रशेखराप्रमाणें हरिभाऊंनाही वाटत होतें कीं काय कोण जाणे! ‘तुमच्या कर्मश्रद्धेच्या पाठीशीं धर्मश्रद्धा जर नसेल, तर तुमची कर्मश्रद्धा फार दिवस टिकणार नाहीं...... धर्मश्रद्धा म्हणजे ‘सर्वशक्तिमान्, सर्वज्ञानवान् आणि सच्चिदानंद असा कोणी सृष्टि-नियंता आहे व तो जें घडवितो तें सर्व या सृष्टीच्या बऱ्याकरितांच घडवितो.’ या दोन प्रमेयांवर दृढविश्वास,’ हें चंद्रशेखरास स्वामींनीं दिलेलें उत्तर हरिभाऊंच्या धर्मविचारांत अत्यंत महत्त्वाचें आहे.

## विसंगतीचें कोडें

धर्मग्रंथांत सर्वसामान्य स्वरूपाच्या तत्त्वज्ञानाचें प्रतिपादन असल्यानें एका व्यक्तीच्या आयुष्यांतील गोष्टींचीं कोडीं त्यांच्या साहाय्यानें उलगडणें अत्यंत कठीण आहे. वेदान्त, भगवद्गीता यांनीं बुद्धीचें समाधान झालें तरी, हृदयाचें समाधान होण्यास स्वानुभवच हवा. इतर व्यावहारिक विषयांप्रमाणेंच धार्मिक बाबतींतही स्वानुभव हाच खरा शिक्षक आहे यांत शंका नाहीं.

जो वरवर पाहील त्यास त्यांच्या आचारांत व विचारांत साहजिकच विसंगति दिसते. परंतु मानवी मनाची गुंतागुंतीची रचना लक्षांत घेतली म्हणजे हरिभाऊंच्या आचारविचारांतील विसंगतीचें कोडें उलगडणें तितकेंसें कठीण वाटत नाहीं.

हरिभाऊंच्या धर्मविचारांचें सूक्ष्म परीक्षण केलें असतां हरिभाऊ अज्ञेयवादी होते हाच विचार दृढ होतो. ईश्वराचें अस्तित्व ते मानीत असले तरी त्याच्याकडे जाण्याच्या मार्गासंबंधीं त्यांच्या संशयाचें निराकरण झालेलें नव्हतें. धर्मश्रद्धा व कर्मश्रद्धा या दोन विचारांच्यामध्यें त्यांची बुद्धि व हृदय एकसारखीं आंदोलन पावत होतीं. हरिभाऊंच्या पिढीतील बरेच लोक त्यांच्याप्रमाणेंच अज्ञेयवादी होते.

पाश्चात्यांच्या सुधारणांनीं आरंभीं आमच्या लोकांचे डोळे दिपून गेले होते. इंग्रजांच्या चालीरीति, समाजव्यवस्था, राज्यव्यवस्था, विवाहाची पद्धति, त्यांची रहाणी, त्यांचा पोषाख, त्यांची भाषा सर्व कांहीं उत्तम, असाच आमच्या पहिल्या सुधारकांचा ग्रह होऊन बसला होता. त्या सुधारणांनीं हुरळून जाऊन त्यांनीं इंग्रजांचें अंधानुकरण केलें व त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गाण्यांतच ते काळ घालवूं लागले.

दुसऱ्या पिढींतील सुधारकांनीं त्यांच्या वाङ्मयाचा, राज्यघटनेचा, अभ्यास करून त्यांचे गुण मात्र घेण्याचें धोरण पुढें ठेविलें. आपण आपली उन्नति करण्याचा प्रयत्न केला तर इंग्रज आपणांस साहाय्य करतील अशी या लोकांची अपेक्षा—नव्हे खात्री होती व त्या दृष्टीनें समाजाच्या उन्नतीचे प्रयत्न त्यांनीं सुरू केले. बाल-विवाह, हुंडा, केशवपन इत्यादि रूढींविषयीं लोकमत प्रतिकूल करून प्रौढविवाह, स्त्रीशिक्षण इत्यादि सुधारणांविषयीं लोकांचें मन अनुकूल करण्याचे प्रयत्न त्यांनीं केले. परंतु हें करीत असतां राजकीय हक्कांवांचून समाजाचें पाऊल पुढें पडणार नाहीं अशी त्यांची अनुभवानें खात्री झाली. या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं दुफळी माजून ‘ आधीं सामाजिक कां आधीं राजकीय ?’ हा प्रश्न उपस्थित झाला व या प्रश्ना-संबंधीं तत्कालीन पुढाऱ्यांत रणें माजलीं.

## हरि नारायण आपटे

हरिभाऊंचा ना. गोखले यांच्याशीं संबंध आल्यापासून ते न्या. रानडे यांच्या नेमस्त राजकारणाचे अनुयायी झाले होते हें मागील प्रकरणीं सांगितलेंच आहे. परंतु त्यांचे राजकारणासंबंधीं विचार व धोरण हीं त्यांच्या ' मी ' व ' आजच ' या कादंबऱ्यांत पहावयास सांपडतात.

'आधीं राजकीय कां आधीं सामाजिक ?' या प्रश्नाचें उत्तर हरिभाऊंनीं शिवरामपंताच्या तोंडीं घातलें आहे. ते म्हणतात, ' आधी राजकीय कीं सामाजिक, हा प्रश्न काय ? अरे, दोन्ही एकदम. जें ज्याला रेटेल, तें त्यानें पुढें रेटावें. ' देशाच्या सर्वांगीण उन्नतीचें ध्येय हरिभाऊंनीं आपल्या ' मी ' कादंबरींत रेखाटलें आहे. भावानंदाचा मठ ही हरिभाऊंच्या देशोन्नतीच्या कल्पनांची पराकाष्ठा आहे. त्यांनीं निर्माण केलेले भावानंद, अद्वैतानंद व अखंडानंद हे देशभक्त देशासाठीं सर्वसंगपरित्याग करितात. त्यांच्या विचारांत धर्मास प्राधान्य नसून देशास प्राधान्य आहे, ही लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. 'आपल्या देशाचें चिरकालिक हित हाच परमार्थ. आपल्या देशाची पारतंत्र्यांतून सुटका हाच मोक्ष. ' हीं दोन वाक्यें म्हणजे भावानंदाच्या संस्थेचीं ब्रीद-वाक्यें होत. देशाची धार्मिक, राजकीय, सामाजिक उन्नति करण्याचें अत्यंत व्यापक ध्येय या मठाच्या चालकांसमोर होतें. मठांतील प्रचारक खेडोंखेडीं हिंडून शेतकऱ्यांना आपल्या हक्कांची जाणीव करून देत व त्यांची शेती सुधारावी यासाठीं सप्रयोग व्याख्यानेंही देत असत. या संस्थेच्या मार्फत स्त्रीशिक्षणाचें कार्य भावानंदाच्या बहिणीनें चालविलें होतें. भावानंदाच्या मठाचें धोरण कांहींसें Servants of India Society त दिसतें. ताईची संस्था पुण्यांतील सेवासदनामध्यें आढळते. भावानंदाच्या मठांतील कार्यकर्त्या लोकांनीही ' रामकृष्ण मिशन 'च्या लोकांप्रमाणें संन्यासव्रत घेतलें होतें. परंतु रामकृष्ण मिशनचा जोर धर्मावर अधिक आहे तर भावानंदाच्या मठाचा जोर देशावर अधिक आहे. देशाची सर्वांगीण उन्नति करणारी व अत्यंत विशाल ध्येय समोर ठेवणारी भावानंदाच्या मठासारखी श्रेष्ठ दर्जाची संस्था या भारतवर्षांत अद्याप दिसावयाचीच आहे.

इंग्रज लोक व्यक्तिशः उत्तम असले तरी राज्यकर्ते या नात्यानें ते प्रथम इंग्लंड देशांचेंच हित पाहणार. त्यांचें राजकीय धोरण हिंदुस्थानच्या फायद्याचें नसून नेहमीं इंग्लंडच्याच कल्याणाचें राहणार; ही कल्पना हरिभाऊंच्या डोक्यांत आलीच होती. देशोन्नतीसाठीं झटणाऱ्या श्रेष्ठ दर्जाच्या संस्थेविषयीं सरकारी धोरण कोणत्या प्रकारचें

असतें याचें दिग्दर्शन ‘ आजच ’ या कादंबरींत युरोपिअन पोलिस अधिकारी व पद्माकर यांच्या भाषणांत सांपडतें. साहेब पद्माकरास म्हणतोः ‘ ती संस्था सद्धेतूनें काढली आहे याबद्दल आम्हांला शंका नाहीं. पण.........जो तुम्हांला सद्धेतु वाटतो तो सरकारला वाटणार नाहीं.........दिवसानुदिवस तुमच्यावरला आमचा ताबा आम्ही कमी करूं इच्छित नाहीं, वाढवूं इच्छितों.........या संस्थेंतील लोक गांवोगांव हिंडून लोकांना काय शिकविणार ? लोकांनीं आपले हक्क जाणावे, वेळच्यावेळीं तक्रारी कराव्या.........कशीही जरी संस्था असली तरी तिला जर राजकीय स्वरूप असलें, किंवा तिचे सभासद राजकीय गोष्टींत जर खटाटोप करीत असले तर आम्हीं काय समजावें ?......... ’

कितीही उत्कृष्ट देशकार्य करणारी संस्था असली आणि ती जर लोकांना आपल्या राजकीय हक्कांचें ज्ञान करून देऊं लागली तर सरकार तिच्यावर डोळा ठेवून तिला दडपून टाकण्याचा प्रयत्न करील याबद्दल हरिभाऊंच्या मनाची खात्री झाली होती, असेंच वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसतें.

राजकीय प्रश्नांसंबंधी हरिभाऊ खोल दृष्टीनें विचार करीत. त्यासंबंधींचें त्यांचें वाचन उत्कृष्ट होतें. स्वावलंबनाबरोबरच इंग्रजांशीं सहकार्य करून कांही मर्यादेपर्यंतच आपणांस जातां येईल असें त्यांना वाटत होतें असें दिसतें. राजकीय प्रश्नांचा विचार करतां करतां हरिभाऊ कोठें येऊन थांबले होते हें आपणांस ‘ आजच ’ या कादंबरीवरून जाणतां येईल व हरिभाऊंचीं राजकीय मतें कोणतीं होतीं याचाही उलगडा होईल.

---

## प्रकरण सतरावें

# ताई

कन्याजन्माच्या महोत्सवाचा आनंद फारसा अनुभवला नाहीं तोंच एका दुष्ट रोगानें शांताताईवर हल्ला करून हरिभाऊंना काळजींत टाकलें. दुःखाच्या छाये-वांचून आनंद संभवत नाहीं हेंच खरें. यासाठीच गुलाब आणि कांटे यांचें अखंड साहचर्य परमेश्वरानें निर्माण करून ठेविलें आहे.

वयाच्या तिसऱ्या महिन्यापासून ताईचा आजार सुरू झाला. तिच्या माकडहाडास सूज येऊन आंतल्या बाजूस गळूं झालें. डॉक्टर राव यांनीं 'ऑपरेशनशिवाय दुसरा इलाज नाहीं' असें सांगितलें. हें डॉक्टरचें मत ऐकतांच हरिभाऊ गडबडून गेले. ताईच्या चिमुकल्या जीवास यातना देण्याची कल्पना त्यांना सहन होईना. परंतु ताईचा जीव जगविण्याचा तेवढा एकच उपाय आहे हें ध्यानीं येतांच हरिभाऊ व वेणूताई या दोघांनीं आपलें मन कठोर करून ऑपरेशन करण्यास संमति दिली.

डॉ. शिखरे, डॉ. गोखले व डॉ. नेने असे तिघेजण ऑपरेशनसाठीं आनंदाश्रमांत आले. ताईस ऑपरेशनटेबलावर ठेवून क्लोरोफॉर्म देतांच आपल्या हृदयावरच कोणी घाव घालीत आहे असें हरिभाऊंना वाटलें. वेणूताई तर हताश होऊन बसल्या होत्या. ऑपरेशन चांगल्या रीतीनें पार पडलें व ताई सावध झाली; हें पाहतांच त्या दोघांनाही समाधान वाटलें. परंतु यानंतर ताईस ताप सुरू झाला. तो सतत वीस दिवसांपर्यंत निघाला नाहीं. गांवांत जोराचा प्लेग सुरू होता. ताईसाठीं म्हणून हरिभाऊ गांवाबाहेर झोंपडींत रहावयास गेले. ताईची प्रकृति अधिकाधिक बिघडूं लागली. सिव्हिल सर्जनला प्रकृति दाखवितांच त्यानें 'पुनः ऑपरेशन केलें पाहिजे' असें स्पष्ट सांगितलें. त्याप्रमाणें ससून हॉस्पिटलमध्यें दुसरें ऑपरेशन केलें. परंतु



ताई

बालोद्यान प्रेस, पुणें.

रोगाचें मूळ कांहीं नाहींसें झालें नाहीं. इ. स. १९०८ साल हरिभाऊंनीं अत्यंत निराश मनःस्थितीत घालविलें. ताईच्या वरचेवर बिघडणाऱ्या प्रकृतीमुळें त्यांचें मन अस्वस्थ होई. वेणूताईनीं व इतर जवळच्या आप्तमंडळींनीं तिच्या प्रकृतीसाठीं कितीतरी नवस केले! नानासाहेबांच्या जुन्या समजुतीप्रमाणें अनुष्ठानें, जपजाप्य इत्यादि प्रकार सुरू केले. डॉक्टरचीं औषधेंही एकसारखीं चालू होतीं. परंतु गुण म्हणून येईना.

दुसऱ्या ऑपरेशननंतर दोनच महिन्यांनीं जेव्हां तिसऱ्या ऑपरेशनची वेळ येऊन ठेपली तेव्हां मात्र खरोखरीच पराकाष्ठा झाली. ताईच्या यातना कोणासही पहावेनात. हें तिसरें ऑपरेशन कर्नल बर्क यांनीं ससून हॉस्पिटलमध्यें केलें. जखम लवकर भरून न आल्यानें एकसारखें सहा महिने ड्रेसिंग चालू होतें. ड्रेसिंगच्या वेळीं तिला कळवळून रडतांना पाहून हरिभाऊंचा जीव थोडा थोडा होई. एकदां तर तिचें रडणें ऐकून त्यांचें मन इतकें उद्विग्न झालें कीं, ‘ड्रेसिंग बंद करा’ असें त्यांनीं डॉक्टरला सांगितलें. त्याप्रमाणें दोन दिवस ड्रेसिंग झालें नाहीं. परंतु त्यामुळें दुखणें जास्त झालें व पुनः ड्रेसिंग सुरू करणें भाग पडलें. डॉक्टर म्हणत, ‘ही मुलगी जगणार नाही व जगली तर तिच्या प्रकृतींत कांहीं तरी व्यंग हें राहीलच. कदाचित् ती वेडी होईल व तिला चालतांबोलतां येणार नाहीं.’ डॉक्टरनेंच अशा रीतीनें हात टेंकल्यावर हरिभाऊ व वेणूताई दोघेंही अत्यंत निराश व्हावीं यांत काय नवल? ताई दोन अडीच वर्षांची झाल्यावर तिची प्रकृति सुधारूं लागली. थोडेंसें अन्न खाऊं लागल्यामुळें तिला शक्ति येऊं लागली. त्यामुळें हरिभाऊंची खिन्नता बरीच कमी झाली. तिसऱ्या ऑपरेशनची जखम मात्र अखेर डॉक्टरच्या औषधांपेक्षां घरगुती मलमानेंच भरून आली!

ताईच्या साऱ्या दुखण्यांत वेणूताईच्या बरोबरीनें खऱ्या प्रेमानें व कळकळीनें जर ताईची शुश्रूषा कोणी केली असेल तर ती बाळंतपणाकरितां घरीं नोकरीस ठेवलेल्या मोलकरणीनें—नागूबाईनें! ताईच्या जन्मापासून तों ती चांगली साडेतीन वर्षांची होईपर्यंत नागूबाईनें ताईला संभाळलें. ताईवरील तिची भक्ति व शुश्रूषा करण्याची तिची टापटीप पाहून खुद्द कर्नल बर्क यांनीं उद्गार काढले कीं, ‘नागूबाईच्या मदतीमुळेंच ताईची इतकी उत्कृष्ट शुश्रूषा झाली.’ कोणाच्या कां प्रयत्नांमुळें होईना पण ताई एकदांची बरी झाली.

ताई बरी झाल्यावर ती केव्हां एकदां चालूंबोलूं लागेल असें हरिभाऊंना झालें. हरिभाऊंच्या स्नेह्यानें पाठविलेल्या घोड्याच्या पांगुळगाड्यास धरून ताईस उभें करण्याचा नागूबाई एकसारखा प्रयत्न करी. एक दिवस वेणूताई व हरिभाऊ माजघरांत बसलीं असतां, ताईस घेऊन नागूबाई तेथेंच उभी होती. तेव्हां ताईकडे कौतुकानें पहात हरिभाऊ नागूबाईस म्हणाले, ‘ नागूबाई, ताईला लवकर चालायला शिकवा. म्हणजे तुम्हांला चांगलं लुगडं मिळेल. ’ ते ऐकतांच ‘ ताईबाई, लवकर चालूं लागा. मला लुगडं मिळणार आहे. ’ असें ताईस उद्देशून सहज थट्टेनें नागूबाई म्हणाली व तिनें ताईचा हात खरोखरीच सोडून दिला. बोलाफुलास गांठ पडली. नागूबाईनें हात सोडतांच ताईनें पांगुळगाड्यास धरून खरोखरीच दहाबारा पावलें टाकलीं. तेव्हां हरिभाऊंचा आनंद गगनांत मावेनासा झाला. कबूल केल्याप्रमाणें नागूबाईस लुगडें मिळालें हें सांगावयास नकोच.

त्या दिवसापासून ताई चालूंच लागली. ती बोलूं लागली तेव्हां तर हरिभाऊंना जो आनंद झाला तो सांगतां पुरवत नाहीं. ही मुलगी म्हणजे आपल्याला लाभेल असें त्यांना वाटत नसे. दुडुदुडु चालणारी, गोडगोड बोलणारी व स्निग्ध मधुर हंसणारी ताई म्हणजे आपल्या आयुष्यांतील विलक्षण आश्चर्यच होय, असा विचार त्यांच्या मनांत वारंवार येई.

इ. स. १९०९ सालच्या प्लेगांत ताईस संभाळणारी नागूबाई प्लेगनें लागली. हरिभाऊंनीं दोन दिवस डॉक्टरकडून तिला औषध देवविलें. परंतु तिसरे दिवशीं झोंपडीवरून हरिभाऊ कामासाठीं गांवांत येतात तों नागूबाई गेल्याची बातमी त्यांना कळली. तेव्हां मागचापुढचा विचार न करितां ते तिच्या स्मशानयात्रेबरोबर गेले. तिकडून परत येतांना हरिभाऊंना त्यांचे कांहीं स्नेही वाटेंत भेटले. त्यांनीं ‘ इकडे कुठं गेलां होतां ? ’ असें त्यांना विचारतांच नागूबाईची सर्व हकीकत सांगून हरिभाऊंनीं म्हटलें ’ ‘ ती बाई तशीच होती, तिला शेवटचं पोहोंचविण्यास जाणं जरूरच होतं. ’ ताईवरील नागूबाईच्या प्रेमामुळें हरिभाऊंना तिच्याबद्दल एक प्रकारचा आदर वाटे. आपल्या घरच्या नोकरांची अशी काळजी वाहणारे सहृदय गृहस्थ खरोखर किती असतात !

नागूबाई गेल्यानंतर ताईचें काम इतर नोकरांनीं वांटून घेतलें. सर्व नोकरांत रामसिंग भय्याजवळ जाणें तिला फार आवडे. ती साऱ्या घरभर एकसारखी

फिरे. त्यामुळें तिला कोठें विसंबतां येत नसे. ताईकरितां रोज रोज नवीं खेळणीं आणण्याचा हरिभाऊंना नाद होता. परंतु ताईला एखादी वस्तु आणावयाची झाल्यास घरांतील तिच्या जोडीच्या लहान मुलांनाही तशाच वस्तु आणावयास हरिभाऊ विसरत नसत. ताईला बाहेर हिंडविण्यासाठीं लहानशी गाडी घेण्याचें वेणूताईच्या मनांत असतांही दुसऱ्या कोणत्याही मुलास आजवर गाडी आणली नाहीं म्हणून तसें करणें हरिभाऊंच्या मनास रुचेना. अशी कांहीं विलक्षण त्यांची कर्तव्यबुद्धि होती.

शान्ताताई हरिभाऊंच्या सर्व मित्रमंडळींत अत्यंत प्रिय झाली. हरिभाऊ व वेणूताई तिला नेहमीं आपल्या बरोबरच बाहेर नेत. कोणीं कांहीं प्रश्न केल्यास ती धीटपणानें उत्तर देई. म्हणून सर्वांस तिचें फार कौतुक वाटे. काशीताई, दीक्षित, झुकले वगैरे हरिभाऊंचे स्नेही तिला नाना तऱ्हांचीं सुंदर खेळणीं वारंवार पाठवीत. हरिभाऊंच्या ओळखीच्या युरोपिअन स्त्रियाही तिला बक्षिसें देत. आपलीं सारीं खेळणीं काळजीपूर्वक जपून ठेवण्याचा ताईला फार नाद होता. एखादें कांचेचें खेळणें फुटेल म्हणून कपाटांत ठेवून जर तिला कोणीं सांगितलें कीं, 'ताई, याच्याकडे नुस्तं पहायचं बरं का? हात नाहीं लावायचा!' तर ती बिलकूल हट्ट न करतां त्याच्याकडे नुसतें पहातच राही. घरकूल मांडून खेळण्याची तिला विशेषच हौस होती. आपल्या खेळांतल्या चिमुकल्या संसारांत गर्क झालेली ताईची मूर्ति पाहून हरिभाऊंना धन्यता वाटे.

ताईचा वर्ण पित्याप्रमाणें सांवळा होता. पण डोळे विशाल व तेजस्वी होते. तिचें बोलणें शहाणपणाचें व मोठें ठसकेबाज असे. ताई अनुकरणप्रिय असून तिची ग्रहणशक्ति व तिचें निरीक्षण आश्चर्य वाटण्याजोगें होतें. घरांत चालणाऱ्या बारीकसारीक गोष्टींकडे तिचें लक्ष असल्यामुळें इतर लहान मुलांपेक्षां तिला व्यवहार अधिक समजे.

हरिभाऊंच्याप्रमाणेंच सर्व नातलगमंडळीवर तिचें फार प्रेम होतें. विशेषतः तिचे आजोबा, आजी व चुलते रामभाऊ यांच्यावर तिचा फार जीव होता. दिवसांतून एकदां तरी आजोबांच्या घरीं जाऊन तेथील मंडळींना भेटल्याशिवाय तिला चैन पडत नसे. बोलण्यांत ती फार निर्भीड असून खोटें बोलणें तिला बिलकूल सहन होत नसे. वडील माणसांचीं बोलणीं ध्यानांत धरून समयसूचकतेनें योग्य वेळीं ती

तेंच उत्तर देई व ऐकणारास थक्क करून सोडी. त्यामुळें तिच्या देखत विशेष कांहीं न बोलण्याची खबरदारी हरिभाऊ व वेणूताई यांना घ्यावी लागे.

ताईच्या अंगीं तिच्या वयाच्या इतर मुलींत फारसा न आढळण्याइतका निरिच्छपणा होता. एकदां ती आपल्या आजोबांच्या घरीं गेली असतां तिच्याच वयाची तिची आतेबहिण अंगावर सोन्यामोत्यांचे खूप दागिने घालून आली होती. तेव्हां नानासाहेब सहज म्हणाले, 'ताई, बघ तिच्या अंगावर किती दागिने आहेत ते. तुला हवेत का असे दागिने?' परंतु त्यावर, 'मला मुळीं दागिने आवडतच नाहींत. तिच्याच अंगावर ते चांगले दिसतात,' असें गंभीरपणानें उत्तर देऊन ती तेथून निघून गेली. इतर लहान मुलींच्याप्रमाणें ती रडेल, दागिन्यांसाठीं हट्ट घेऊन बसेल अशी घरांतल्या बायकांची साहजिक अपेक्षा होती. नानासाहेब तर तिच्या उत्तरानें चकित होऊन म्हणाले, 'तिचा जन्म दासनवमीला झाला आहे. रामदासा-प्रमाणें ती खरोखर अगदीं निरिच्छ आहे.'

स्वभावांत ताई हरिभाऊंचीच चिमुकली प्रतिमा होती. अन्तःकरणानें ती त्यांच्यासारखीच उदार व प्रेमळ होती. नोकरांशीं सुद्धां ती आपलेपणानें वागे. एकदां वेणूताई बोलल्या म्हणून त्यांच्या रागावर स्वयंपाक करणाऱ्या काकूंनीं फराळ करण्याचें नाकारलें व त्या तशाच उपाशी निजल्या. तें पाहून ताई त्यांच्याजवळ जाऊन हळूच म्हणाली, 'कां हो काकू, तुम्ही आज फराळ कां करीत नाहीं?' तेव्हां 'तुझी आई माझ्यावर रागावली आहे म्हणून' असें त्यांनीं उत्तर दिलें. तेव्हां ताई म्हणाली, 'काकू, तुम्हांला नाहीं फराळ करायचा तर आम्हीही जेवणार नाहीं हो. आमचं जेवायचं करू नका.' या तिच्या चातुर्याच्या भाषणानें काकूंचा राग कोठल्या कोठेंच विरघळून गेला व त्यांनीं उठून फराळ केला. हरिभाऊंना ही गोष्ट समजली तेव्हां आपल्या कन्येच्या अन्तःकरणाचा प्रेमळपणा पाहून त्यांना फार समाधान वाटलें. तिच्याबरोबर खेळण्यास गंगू नांवाची एक गरीब मुलगी ठेविली होती. 'ही कोण ग तुझी?' असा कोणीं प्रश्न विचारल्यास खुशाल 'माझी बहिण' असें ताई उत्तर देई. आपपरभावाचा तिच्यांत लेशही नव्हता.

खोट्याची तिला अगदीं विलक्षण चीड होती. एके दिवशीं गंगू व ताई खेळत असतां त्यांच्या हातून एक वस्तु मोडली. त्यावर गंगूनें म्हटलें, 'हें कोणीं मोडलं? असं आईनं विचारल्यास आम्हांला माहित नाहीं असं आपण सांगू या.' हें तिचें

भाषण न रुचून ताईनें तिच्यावर रागावून म्हटलें, ' हें काय ग गंगू असं म्हणतेस ? खोटं बोललं तर देव पाप देतो असं आईनं मला सांगितलं आहे. आई रागावली तरी हरकत नाहीं; पण मी कधींही खोटं बोलणार नाहीं. ' पलीकडच्याच खोलींत कांहीं काम करीत असलेल्या वेणूताईच्या कानावर ताईचे ते उद्गार पडतांच त्यांच्या नेत्रांत आनंदाश्रु आले. ताईस जवळ घेऊन त्यांनीं तिला शाबासकी दिली व असें कन्यारत्न दिल्याबद्दल मनांतून ईश्वराचे आभार मानले.

एकदां हरिभाऊंचे एक स्नेही व त्यांची पत्नी आनंदाश्रमांत आली होती. परत जातांना त्या बाईनीं खाऊसाठीं म्हणून ताईच्या खिशांत एक रुपया टाकला. संध्याकाळीं तिचे कपडे बदलतांना हरिभाऊंना तो सांपडला. ' हा रुपया कुठला ?' असें त्यांनीं ताईस विचारिलें. परंतु तिला कांहींच माहीत नसल्यानें ती अगदीं गोंधळून गेली. ताई तर कांहीं बोलेना व रुपया तर प्रत्यक्ष दिसत होता. त्यामुळें तो रुपया तिनें कोठून उचलला तर नसेल अशी शंका येऊन हरिभाऊंनीं रागानें तिला दोनचार चापट्या मारल्या. वेणूताईची समजूत हरिभाऊंच्याचप्रमाणें झाली होती. ही रुपयाची गोष्ट हरिभाऊंच्या डोक्यांतून कांहीं केल्या जाईना. तिला घेऊन त्या दिवशीं ते जेथें जेथें म्हणून गेले होते तेथें तेथें त्यांनीं चौकशी केली व शेवटीं परगांवीं गेलेल्या त्या स्नेह्यासही पत्र पाठवून विचारिलें, तेव्हां साऱ्या गोष्टीचा उलगडा झाला. मग घरांतल्या मंडळीस व विशेषतः हरिभाऊंना तिला मारल्याबद्दल अत्यंत वाईट वाटलें. हरिभाऊंनीं ताईला मारलें हें नानासाहेबांना कळतांच त्यांनीं निरोप धाडला कीं, ' ताई कधींही खोटं बोलत नाहीं. तिला रागं भरत जाऊं नका.' ही गोष्ट हरिभाऊंच्या मनास कित्येक दिवस लागून राहिली. यानंतर त्यांनीं तिच्या अंगाला कधीं पांच बोटेंही लाविलीं नाहींत. वेणूताई कधीं तिला रागें भरल्या किंवा त्यांनीं एखादी चापट मारली कीं ते म्हणत, ' एवढे श्रम करून आपण तिला वाढविली तें तिला मारण्यासाठीं का ? तिच्या अंगाला हात लावीत जाऊं नका.'

वयाच्या मानानें ती फार समजूतदार होती. हरिभाऊंच्या बरोबर बाहेर जाणें तिला फार आवडे. परंतु ' ताई, फिरायला जायचं असलं म्हणजे मी तुला बाहेर नेईन. पण कामाला जायचं असल्यास नाहीं न्यायचा बरं कां ! ' असें हरिभाऊंनीं एकदां तिला सांगितलें होतें. तेव्हांपासून हरिभाऊ बाहेर निघाले कीं तिनें विचारावें,

' तात्या, कामाला जातां कां फिरायला ? ' ' कामाला ' असें उत्तर मिळालें कीं ती लागलीच घरांत परत जाई. परंतु बाहेर जाण्याचा हट्ट धरून ती रडत मात्र केव्हांही बसली नाहीं.

ताईचें अन्तःकरण फार सदय होतें. कोणीही भिक्षेकरी म्हणून दाराशीं येवो, तिनें त्याला विन्मुख म्हणून कधीं पाठविला नाहीं. एकदां भिकाऱ्यानें ' बाई, मी उपाशी आहें ' असें म्हणतांच तिनें त्यास आंत बोलावलें व घरांत जाऊन ती वेणूताईना म्हणाली, ' आई ग, हा बिचारा उपाशी आहे, त्याला जेवायला वाढ. ' ताईच्या इच्छेप्रमाणें तिच्या आईनें त्याला जेवूं घातलें ! त्याचें जेवण होऊन तो जाईपर्यंत ताई त्याची विचारपूस करीत तेथेंच बसून राहिली होती. घरांत स्वयंपाक करणाऱ्या बाईचें लुगडें फाटलेलें पाहून ताईस फार वाईट वाटलें व आईकडून त्यांना एक चांगलें लुगडें देवविल्यावांचून तिला मुळींच चैन पडलें नाहीं. कोणी मोलकरणी नोकरी मागण्यासाठीं आल्या कीं, त्यांना ठेवून घेण्याचा ती आग्रह धरून बसे व आपल्या इच्छेप्रमाणें ती वडील माणसांना करावयास लावी.

ताईवांचून हरिभाऊंना क्षणमात्र सुद्धां करमत नसे. कामानिमित्त परगांवीं जावें लागल्यास ते बहुधा तिला व वेणूताईना बरोबर नेत. एके दिवशीं गोदूताईनें तिच्या मावसबहिणीनें—तिला रात्रीं आपल्या घरीं ठेवून घेण्याचा बेत केला. परंतु हरिभाऊंना मुळींच करमेना. शेवटीं भय्याला पाठवून तिला जेव्हां घरीं आणविली तेव्हांच त्यांच्या मनाचें समाधान झालें.

इ. स. १९११ सालीं ताईच्या आजोळच्या मंडळींनीं अत्यंत आग्रह केल्यामुळें तिला घेऊन वेणूताई नागपुरास गेल्या होत्या. ताई जाण्याच्या दिवशीं हरिभाऊंनीं निदान शंभर वेळां तरी म्हटलें असेलः ' ताई, तुझ्यावांचून नाहीं बुवा आम्हांला करमणार. तूं नको जाऊं. ' ' ताईची प्रकृति बरी आहे. ' असा मजकूर, व स्वतःचा पत्ता लिहून त्यांनीं तीस कार्डें वेणूताईच्या जवळ देऊन रोज नियमानें एक कार्ड पाठविण्यास बजावून सांगितलें होतें. एक दिवस कोठें चुकून पत्र पोस्टांत टाकायचें राहिलें तर लगेच दुसऱ्या दिवशीं त्यांची तार आली ! स्टेशनवर त्या दोघींना ते पोहोंचविण्यास गेले, परंतु त्यांच्या तोंडून एक शब्द सुद्धां फुटेना व डोळ्यांत अश्रु उभे राहिले. त्यांची ती मनःस्थिति पाहून गाडींतल्या इतर प्रवाशांनाही विस्मय वाटल्यावांचून राहिला नाहीं. असें कांहीं ताईचें त्यांना विलक्षण वेड होतें.

## ताई व ' संत सखू '

इ. स. १९१२ च्या साहित्यसंमेलनास हरिभाऊ एकटेच गेले होते. ताईची प्रकृति बरी नसल्यामुळें अर्थातच तिला बरोबर नेणें अशक्य होतें. तात्या आपणांस न नेतां एकटेच गांवाला निघालेले पाहून शान्ताताई त्यांच्यावर अतिशय रुसली व त्यांना पोहोंचविण्यास दारापर्यंत सुद्धां गेली नाहीं. एवढ्या लहान वयांतही तिचा मानी स्वभाव चांगलाच दृष्टोत्पत्तीस आला.

हरिभाऊंचें ' संत सखू ' नाटक पाहण्यास ताई त्यांच्याबरोबर अनेक वेळां गेली होती. त्यामुळें तिला त्यांतील कित्येक भाषणें तोंडपाठ येत होतीं. आपल्या लहान लहान मैत्रिणी गोळा करून ती म्हाळसाबाईचें सोंग घेई व म्हाळसाकाकूंचीं भाषणें न चुकतां हुबेहूब म्हणून दाखवी.

तात्यांच्याप्रमाणें साऱ्या गोष्टी आपण कराव्या अशी तिला हौस वाटे. एकादे दिवशीं आपली चिमुकली खुर्ची डेस्कजवळ आणून ती तीवर बसे व हरिभाऊंच्या-प्रमाणें लिहिण्याचा आव आणी. ' काय लिहितेस ग ताई ? ' असें कोणीं विचारल्यास ' संत सखू ' असें गंभीरपणानें उत्तर देई. तिचा तो लिहिण्याचा थाट व बोलण्याची ऐट पाहून हरिभाऊंना आनंद होत असे व ' आपली ताई एक अलौकिक विद्वान् स्त्री होईल ' अशीं ते मनोराज्यें करीत.

हरिभाऊंच्यावांचून ताई एकटी कधींच जेवत नसे. हरिभाऊंना बाहेरून येण्यास कितीही उशीर झाला तरी ती त्यांची वाट पहात बसून राही. जेवणाच्या बाबतींत त्या दोघांच्या आवडीनिवडी अगदीं एकसारख्या होत्या. हरिभाऊंच्या प्रमाणेंच आंबा व केळीं तिला विशेष आवडत. एखादा खाण्याचा पदार्थ तिला कोणीं दिल्यास बरोबरीच्या मुलांना त्यांतील भाग अगोदर देऊन उरलेला थोडासा ती स्वतः खाई. असा तिचा स्वभाव असे.

ताईला देवाचा फार नाद होता. रोज सकाळीं 'सच्चिदानंदा'च्या दर्शनास ती जात असे. परंतु तेथें पैसा किंवा तांदूळ ठेविल्यावांचून तिचें कधींच समाधान झालें नाहीं.

वडिलांच्याप्रमाणें ताईचा स्वभावही अतिशय बोलका होता. आनंदाश्रमांत हरिभाऊंच्याकडे येणाऱ्या सर्व लोकांची ती ओळख ठेवी व तीं माणसें रस्त्यांत भेटलीं म्हणजे त्यांच्याशीं बोलल्यावांचून पुढें पाऊल टाकीत नसे. तिचा स्वभाव उत्सवप्रिय होता व लग्नकार्यासारख्या समारंभास जाण्याची तिला हौस वाटे. ती

फार चौकस होती, त्यामुळें कित्येक वेळां तिच्या प्रश्नांना काय उत्तरें द्यावीं असा हरिभाऊंना पेंच पडे.

तिच्या अंगीं विलक्षण अस्थिरता होती. त्यामुळें प्रथम लिहिण्यावाचण्याकडे तिचें लक्ष नव्हतें. ताई जी जी वस्तु मागेल ती ती हरिभाऊ तिला आणून देत. ती लिहावयास वाचावयास लागण्यापूर्वीच तिच्यासाठीं त्यांनीं कितीतरी पाट्या, पेन्सिली, रंगीत चित्रें, गोष्टींचीं छानदार पुस्तकें आणलीं होतीं. हुजूरपागेंतील श्री. गोगटे मास्तर तिला घरीं शिकविण्यास येत असत. एक दिवस ते म्हणाले, 'ताई, तूं अगदीं दगड आहेस. तुला लिहितांवाचतां कधीं येणार?' ताईला हे शब्द फार झोंबले. त्या दिवशीं ती मन लावून शिकली व नंतर कांहीं दिवसांनीं पुस्तकांतील धडा मास्तरांना घडाघड वाचून दाखवून तिनें म्हटलें, 'मास्तर, तुम्ही मला दगड म्हणाला होतां, नाहीं का! पहा आतां मी कसं वाचतें तें!' आपण ताईला दुखविलें हें पाहून गोगटे मास्तरांना वाईट वाटलें व वाचनाबद्दल त्यांनीं तिला मनापासून शाबासकी दिली.

लहान मुलींची तिला फार आवड असल्यानें एके दिवशीं हुजूरपागेंत जाण्याचा ती हट्ट धरून बसली. शाळेंत जाण्याचें तिचें खरोखरी वय नव्हतें. तिची शाळेची आवड पाहून तेथील लेडी सुपरिन्टेन्डेन्ट यांनीं तिला शाळेंत येण्याची परवानगी दिली. ती रोज नियमानें शाळेंत जाई व मधल्या सुट्टींत हरिभाऊंनीं तिला घरीं बोलावलें तरी येत नसे. आपल्या बरोबरीच्या बालमैत्रिणींत ती अगदीं रमून जात असे. एकदां गोगटे मास्तर तिला म्हणाले, 'ताई, वर्गांत गंडबड केलीस तर मार मिळेल बरं का?' त्यावर ताईनें ठसक्यानें उत्तर दिलें, 'या शाळेंत मुळीं मुलींना मार देतच नाहींत हें मला माहीत आहे.' या तिच्या चाणाक्षपणाच्या उत्तराची गोगटे मास्तरांना मौज वाटली.

पुढें पुढें तिला गोष्टी वाचण्याचा अतिशय नाद लागला होता. इसापनीतींतील साऱ्या गोष्टींचीं अनेक वेळां पारायणें केल्यामुळें बहुतेक गोष्टी तिला मुखोद्गत झाल्या. काशीताईनीं लिहिलेली 'गंगाबाई' नांवाची हस्तलिखित गोष्ट वाचून तिचा सारांशही तिनें हरिभाऊंना सांगितला होता. क्रमिक पुस्तकांतील धडे ती तोंडपाठ म्हणून दाखवी. एकदां हरिभाऊ तिला म्हणाले, 'ताई, मी तुझ्याबरोबर तुझा धडा वाचतों. पाहूं तो बरोबर म्हणतेस कीं नाहीं तें!' हरिभाऊ पुस्तकांतील धडा

वाचूं लागले व ताई तोच धडा तोंडपाठ म्हणूं लागली. तिला चुकविण्यासाठीं हरिभाऊंनीं मुद्दामच पदरचीं दोनचार वाक्यें वाचलीं. त्याबरोबर ‘ हां ! हां ! हें नाहीं वाक्य आमच्या पुस्तकांत. तें तुम्हीं मनचंच घातलंत बरं का ! ’ असें म्हणून तिनें मोठमोठ्यानें हंसण्यास सुरुवात केली. आपली युक्ति तिनें ओळखली हें पाहून हरिभाऊंनाही मौज वाटली. तिला कितपत समजतें हें पाहण्यासाठीं हरिभाऊ रोज तिला नाना तऱ्हांचे प्रश्न विचारीत व तीही बहुधा त्यांची अचूक उत्तरें देई.

ताईसाठीं आपण कांहीं तरी करावें असें प्रत्येक ओळखीच्या माणसास वाटे. हरिभाऊंच्या ओळखीचा एक गवंडी नेहमीं वेणूताईना म्हणे, ‘ वहिनीबाई, ताई-बाईचं लगीन करा. मी छानदार बोहोलं घालून देईन. ’ त्याचें बोलणें खरें समजून ताई एक दिवस म्हणाली, ‘आई, रोज तो गवंडी म्हणतो कीं, छान बोहोलं घालीन, मग तात्या न् तूं कां ग नाहीं माझं लग्न करीत ? ’

भीति कशी ती तिच्या गांवींही नव्हती. एकदां हरिभाऊंच्या बरोबर ती काशीताईच्या घरीं गेली होती. त्या दोघांच्या गप्पा कांहीं केल्या संपेनात. तेव्हां ती अगदीं कंटाळून गेली व अखेर ‘ तात्या, जातें हो मी घरीं. ’ असें सांगून रस्त्यावर गेली सुद्धां. वाटेंत एका मनुष्यानें तिला ओळखून आनंदाश्रमांत पोहोंचती केली. बोलणें संपल्यावर हरिभाऊ ताईला हांका मारूं लागले तेव्हां ती कोठें दिसेना. आनंदाश्रमांत शोध घेण्यास मनुष्य पाठविला तेव्हां ती घरीं असल्याचें समजलें. मुंबईत एकदां ती अशीच एकटी बाहेर पडली व वाट चुकली. शोधास माणसें धाडलीं तेव्हां ती क्रॉफर्ड मार्केटपाशीं सांपडली.

एकदां रथसप्तमीच्या दिवशीं ताई ताटांतील खीर न खातां उठूं लागली. तेव्हां हरिभाऊंनीं तिला म्हटलें, ‘ ताई, आमची आई आम्हांला हवी आहे. म्हणून आम्ही खीर खाल्ली. तूं खाल्ली नाहींस, तेव्हां तुला आई नको असं दिसतं. ’ तिला खीर नकोशी झाली होती, म्हणून कांहीं न बोलतां ती बराच वेळ पाटावर तशीच बसून राहिली व शेवटीं खिरीचें एक बोट चाखून ती उठतां उठतां म्हणाली, ‘ मला आई हवी आहे हो. पण खीर नको. ’

ताईचे सारे हट्ट हरिभाऊ पुरवीत. घरीं मैत्रिणी खेळावयास येतात, म्हणून तिनें हरिभाऊंच्यापाशीं झोंपाळा मागितला. त्याप्रमाणें दुसरेच दिवशीं तिच्या इच्छेप्रमाणें गोकुळदासाकडून एक सुंदर झोंपाळा आणवून हरिभाऊंनीं तिची हौस पुरविली.

झोंपाळा पाठवितांना गोकुळदासानें चिठींत लिहिलें, ‘ ताईला झोंपाळा बक्षीस दिला आहे. पैसे पाठवूं नयेत. ’

हरिभाऊंच्या मित्रांचें ताईवर फार प्रेम असे. ताईला गोंवर येऊन न्युमोनिआ झाला तेव्हां डॉ. वाडिया यांचें औषध सुरू होतें. ती बरी झाल्यावर हरिभाऊ डॉ. वाडियांना बिल किती झालें तें विचारूं लागले, तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें, ‘ तुमची मुलगी बरी झाली. माझी फी मला मिळाली. ’

इ. स. १९१२ च्या नवरात्रांत ती आपल्या आईबरोबर चतुःशृंगीस गेली होती. तेथें ‘ नको, नको ’ म्हणत असतां हट्टानें ती बरीच चालली. त्यामुळें तिच्या पायाच्या भेगेंत माती शिरून तो पाय दुखूं लागला. घरीं आल्यावर पायाला मलम लावून ती निजली. परंतु लागलींच दोनतीन तासांनीं ‘ पाय दुखतो, ’ म्हणून रडत उठली. पाय सुजून शेवटीं टांचरूं झालें. एकसारखी आग होऊन तिला भयंकर वेदना होऊं लागल्या. पायास ठणका लागला, तेव्हां डॉ. पळसुले यांनीं घरींच क्लोरोफॉर्म न देतां तें थोडेंसें कापलें, त्यामुळें ठणका कमी होऊन रात्रीं तिला झोंप लागली. दुसऱ्या दिवशीं पुनः दोन्ही पाय सुजले. डॉ. पळसुले त्या दिवशीं आनंदाश्रमांत आल्याबरोबर ती त्यांच्यावर रागावून म्हणाली, ‘ डॉक्टर, बरेच आहां किं हो तुम्ही ! पाय बरा होईल म्हणतां म्हणतां नी एकसारखा दुखवतां ! आतां थांबा मी साऱ्यांना सांगतें कीं डॉक्टर लोक वाईट असतात. त्यांना कुण्णी कुण्णी बोलावूं नये. उगीचच म्हणायचं डोळे मिटा. अन् आमच्या पायाला तेवढा मात्र धक्का लावायचा! ’ हरिभाऊंना सुद्धां ती म्हणाली, ‘ तात्या, कशाला हो या डॉक्टरांना बोलावलंत? ’ हें तिचें बोलणें ऐकून डॉ. पळसुले व हरिभाऊ एकमेकांकडे पाहून हसूं लागले. त्या दिवशीं कापतांना शिरेस धक्का लागून अशुद्ध रक्ताबरोबर बरेंच शुद्ध रक्त गेलें व ती आजारी पडली ती पडलीच. थोडा थोडा ताप व खोकला येऊं लागून दुखणें ॲनिमियावर गेलें. हें दुखणें इतकें विकोपास जाईल असें हरिभाऊंना स्वप्नांत सुद्धां वाटलें नाहीं. रात्रीं तिला चांगली झोंप लागे. दिवसा ती घरांत हिंडे फिरे, त्यामुळें हरिभाऊंना तितकीशी काळजी वाटली नाहीं. परंतु हळू हळू अन्नावरची तिची वासना कमी होत चालली व क्षीणता वाढूं लागली, तेव्हां मात्र त्यांना तिच्या प्रकृतीविषयीं चिंता उत्पन्न झाली; व त्यांनीं काळजीपूर्वक औषधोपचार सुरू केले.

## शेवटची आनंदाची दिवाळी

इ. स. १९१२ तील दिवाळींत ताईस बरें नव्हतें तरी दिवाळी नेहमींप्रमाणें थाटाची झाली. हरिभाऊंच्या मित्रांकडून ताईला एक किल्ला व सुंदर चित्रें बक्षीस म्हणून आलीं होतीं. किल्ल्याच्या व फटाक्यांच्या धांदलींत इकडेतिकडे आनंदांत हिंडतांना ताई दुखणें विसरली व हरिभाऊ व वेणूताई यांना सुद्धां ताईचा आनंद पाहून तिच्या दुखण्याची विस्मृति झाली. दिवाळींत एके दिवशीं संध्याकाळीं वेणूताई गुरुवार सोडण्याच्या बेतांत खालींच होत्या. हरिभाऊ माडीवर ताईशीं गोष्टी करीत होते. गोष्टी ऐकतां ऐकतां ताईस झोंप लागली. तेव्हां तिला पलंगावर निजवून हरिभाऊ बाहेर व्हरांड्यांत वाचीत बसले. थोड्या वेळानें ताई झोंपेंतून एकदम जागी झाली व आपल्या किल्ल्यापाशीं दिवे लाविले नाहींत या कल्पनेनें धांवत धांवत जिना उतरून खालीं आली. किल्ल्यापाशीं लावलेले दिवे पाहण्यास ती वांकली तों एका पणतीची ज्योत तिच्या टाळूला लागली. 'भाजलें! भाजलें!' हे ताईचे शब्द ऐकून हरिभाऊ धांवत खालीं आले. त्यांनीं तिला उचलून चटकन् माडीवर नेऊन औषध लाविलें. ताईस त्या रात्रीं शांतपणें झोंप लागली. परंतु हरिभाऊ व वेणूताई यांना या विचित्र प्रसंगामुळें धक्काच बसला. खरोखर, हा प्रसंग म्हणजे पुढें येणाऱ्या भयंकर संकटाची पूर्वसूचनाच होती. जुन्या समजुतीप्रमाणें बोलावयाचें झाल्यास भावी अनर्थ सुचविणारा तो अपशकूनच होता. परंतु दुसऱ्या दिवशीं ताई नेहमींप्रमाणें घरांत हिंडूं लागल्यामुळें हरिभाऊंच्या मनाची अस्वस्थता बरीच कमी झाली.

भाऊबीजेच्या दिवशीं तिचे सारे चुलतभाऊ मावसभाऊ दरवर्षीप्रमाणें ओंवाळून घेण्यास आले होते. ओंवाळणीच्या रुपयांनीं ताम्हन भरलेलें पाहतांच तिला मोठा आनंद झाला. ही आनंदाची दिवाळी शेवटचीच ठरली. पुढल्या दिवाळींत ताईवांचून आनंदाश्रम सुना सुना दिसणार अशी कल्पनासुद्धां कोणाच्या मनास शिवली नाहीं.

दिवाळी झाल्यानंतर ताईच्या इच्छेप्रमाणें तिची मोठी भातुकली झाली. त्या दिवशीं हरिभाऊंच्या वीसपंचवीस मित्रकन्या आनंदाश्रमांत जमल्या होत्या. त्या साऱ्यांनीं मिळून जेवायचें होईपर्यंत देवळांत खेळाचा धुमाकूळ मांडला. ताईनें सांगितल्याप्रमाणें तिच्या मैत्रिणींच्यासाठीं पाट, रांगोळ्या, विडे वगैरेंची जय्यत तयारी तिच्या आईनें ठेविली होती. हरिभाऊंना सांगून त्यांच्याकडून तिनें

मैत्रिणींना देण्यासाठीं आयत्या वेळीं फुलें आणविलीं. जेवावयाच्या वेळीं माजघर मुलींनीं भरून गेलें होतें. तो भोजनसमारंभ व मुलींचा आनंद कौतुकानें पहात हरिभाऊ तेथें उभे राहिले. आपल्या लाडक्या ताईसाठीं म्हणून इतक्या मुली आपल्या घरीं आल्या या विचारानें त्यांच्या नेत्रांत आनंदाश्रु आले. परंतु हा त्यांचा आनंद संपण्याची वेळ जवळ जवळ येत चालली होती!

दिवाळीनंतर मात्र ताईच्या दुखण्याचें मान वाढतच चाललें. अंगांत रक्त तयार होईनासें झालें व ती दिवसेंदिवस अधिकाधिक कृश दिसूं लागली. याच सुमारास गोपाळबुवा स्वयंपाकी रजा घेऊन गांवास जाण्यास निघाला. त्याचें ताईवर विलक्षण प्रेम होतें. 'ताईबाई दुखणाईत आहेत. फार अडचण झाली तर मला अवश्य कळवा. मी ताबडतोब येईन.' असें सांगून तो गेला. वेणूताईही त्या वेळीं सुमारें महिनाभर फार आजारी होत्या. त्यांची प्रकृति कांहीं दिवसांनीं सुधारली; परंतु ताई बिछान्यावर पडली ती पडलीच. इतकें बरें नव्हतें तरी तिनें हरिभाऊंच्याकडून संक्रान्तीच्या दिवशी घरांतल्या सर्व मंडळींना व छापखान्यांतल्या नोकर माणसांना बोलावून घेतलें व सर्वांना प्रेमानें तिळगूळ दिला. ताईची क्षीण प्रकृति पाहून हरिभाऊंना फार वाईट वाटलें.

ताईस आतां रोज ताप येऊं लागला, अन्न जाईनासें झालें; जीव मात्र एकसारखा घाबरा घाबरा होई. नाना प्रकारचीं औषधें सुरू होतीं. परंतु ताप कमी होण्याचें लक्षण दिसेना. ताईची प्रकृति अत्यंत नादुरुस्त झाली आहे हें हरिभाऊंना समजत नव्हतें असें नाहीं. परंतु ताईकडे पाहतांच ही मुलगी म्हणजे आपणांस सोडून जाईल, तिचा व आपला चिरवियोग होईल, अशी कल्पनाच त्यांच्या डोक्यांत येत नसे. लहानपणीं भयंकर दुखण्यांतून ती बरी झाली तशीच आतांही होईल, अशी आशा त्यांना वाटे. प्रेमी हृदय किती तरी वेडें असतें! प्रत्यक्ष गोष्टीवर विश्वास न ठेवितां खोटी आशा नेईल तेथें तिच्यामागून तें बिचारें धांवत सुटतें. आपण ज्यावर प्रेम करतों तें मनुष्य अमर असतें अशीच त्या वेड्या मनाची कल्पना असते कीं काय कोण जाणे!

दुखण्यामुळें ताईचा नादिष्टपणा वाढला. 'अमक्याच माणसाला बोलवा,' असा हट्ट ती धरून बसे व तें मनुष्य तिच्याजवळ येऊन बसल्याशिवाय तिला करमत नसे. 'यंदांचा माझा वाढदिवस मोठा कर' असा तिनें आपल्या आईपाशीं

छंद घेतला होता. तिचा जन्मदिवस उजाडला. परंतु त्यापूर्वीच आठ दिवस ताई कोठें निघून गेली होती बरें !

त्या वर्षीच आनंदाश्रमांत लाविलेल्या सोनकेळीला एक मोठा सुंदर घड आला होता. ताईला केळीं फार आवडत. बिछान्यावर पडल्यापडल्या त्या घडाकडे पाहून ती वारंवार म्हणे, ‘ तात्या, मला बरं वाटलं अन् हीं केळीं पिकलीं म्हणजे, मला द्याल ना एक ?’ हरिभाऊ तिला रोज सांगत, “ताई, तुला बरं वाटलं म्हणजे द्यायचें बरं का एक केळं ! ” सोनकेळ्यांचा घड कांहीं कालानें पिकला; परंतु त्याकडे पाहून हरिभाऊ व वेणूताई यांना टिपें गाळण्याचाच शेवटीं प्रसंग आला !

तिच्या समाचारास एकसारखी नातेवाईक व ओळखीची मंडळी येत. ती इतकी आजारी होती तरी प्रत्येकाचें चांगलें आदरातिथ्य केल्यावांचून तिला चैन पडत नसे. ‘ त्यांना चहा दे, फराळाचं दे ’ असें ती आपल्या आईला सांगे व तिच्या इच्छेप्रमाणें केलें नाहीं तर तिला फार राग येई.

याच सुमारास काशिनाथ नांवाचा तिचा चुलत काका आजारी पडला. त्याची आई परगांवीं होती. त्याच्याबद्दल एकसारखे तिचे बिचार चालत व ती म्हणे, ‘आई ग, अण्णाची आई तर दूर आहे अन् तो आजारी आहे. त्याला आईची आठवण होत असेल नाहीं ?’ तिचे हे चाणाक्षपणाचे उद्गार ऐकून हरिभाऊ आपल्याशींच म्हणत, ‘ही एवढीशी मुलगी, मोठ्या माणसासारखं बोलते; पण ही आपल्याला लाभेल का ?’ पुनः मनाशीं विचार करून ते म्हणत, ‘ हो, न लाभायला काय झालं? मागं नाहीं का यमावर तिनं विजय मिळविला? यम तिला ओढीत होता व आपणही तिला त्याच्या तावडींतून सोडविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होतों. त्या वेळीं आपण यमाला जिंकलं! मग आतांही ती खास बरी होईल.’

‘ मला कुठें तरी बाहेरगांवीं न्या,’ असा तिनें हट्ट धरला. परंतु ताप थांबल्याशिवाय डॉक्टर बाहेरगांवीं जाण्यास परवानगी देईनात. याच वेळीं तिच्या पंजोळीं लग्न निघालें व रावसाहेब अंजनगांवकर आपल्या मुलीसाठीं स्थळ पाहण्यास पुण्यास आले. तिच्यासमोर चाललेल्या लग्नाच्या गोष्टी ऐकून ताई ह्मणाली, ‘ आई, माझं कधीं ग लग्न करायचं !’

शेवटीं शेवटीं तीन दिवस तिला कांहींच अन्न गेलें नाहीं. आदल्या दिवशीं सिव्हिल सर्जन पाहून गेला होता. झोंप येण्यासाठीं म्हणून तिला औषध दिलें, परंतु

त्यामुळें गुंगी न येतां एकसारख्या उलट्याच होऊं लागल्या. ही तिची स्थिति पाहून हरिभाऊंचा धीर सुटत चालला. त्या दिवशीं रात्रीं ताई एकदम वेणूताईंना म्हणाली, ' आई, मला एक भाऊ किंवा बहिण असती तर बरं झालं असतं, नाहीं ग ? ' त्यावर, ' काय करायची आहे भाऊ न बहिण ? तूं तर आहेस आम्हांला ! ' असें तिच्या तोंडावरून हात फिरवीत सद्गदित कंठानें वेणूताईंनी म्हटलें. तेव्हां, ' तसं नव्हे ग. पण...... ' इतकें अर्धवट बोलून ती थांबली. ' आपण आतां जाणार, आईला व तात्यांना मग कोणी नाहीं, ' असे विचार त्या वेळीं तिच्या डोक्यांत येत होते कीं काय कोण जाणे !

सकाळीं ती जागी झाली. तेव्हां सर्व मंडळी अत्यंत खिन्न होऊन बसलेली तिला दिसली. चहा करायला कुणाला सुचत नव्हतें. परंतु चहा केला नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवून तिनें विचारलें, ' आई, आज चहा कां ग नाहीं केला ? ' ' तुला बरं वाटत नाहीं म्हणून नाही केला झालं. ' असें वेणूताईंनीं उत्तर दिलें. हें ऐकून तिला चैन पडेना व ती म्हणाली, ' आई चहा कर, तूं, मी अन् तात्या मिळून चहा घेऊं. रावसाहेब आले आहेत. त्यांना चहा दे. ' तिच्या बोलण्याचा त्या दिवशीं अनादर करणें अशक्यच होतें. वेणूताईंनीं चहा केला व सर्वांना दिला. ताईबरोबर घेतलेला हा चहा हरिभाऊंच्या आयुष्यांतील शेवटचाच ठरला. कारण यानंतर चहाच्या थेंबाला सुद्धां त्यांनीं कधीं स्पर्श केला नाही !

यानंतर तिनें ' आजोबांना बोलवा ' म्हणून सांगितलें. ' ताईनें बोलावलें आहे ' असें कळतांच नानासाहेब तात्काळ आनंदाश्रमांत आले व तिच्याजवळ बसले. तेव्हां आपलें क्षणोक्षणीं निस्तेज होत चाललेलें मुखकमल त्यांच्याकडे वळवून ती म्हणाली, ' नाना, आज अगदीं माझ्याजवळ बसा. जाऊं नका. मी रोज सकाळीं जेव्हां तुमच्याकडे येत होतें तेव्हां तुम्ही नेहमीं सोंवळ्यांत असां. अन् तुम्ही मला कधीं जवळ घेतलं नाहीं. ' हे तिचे शब्द ऐकून नानासाहेबांना अत्यंत दुःख झालें व त्यांच्या डोळ्यांना पाणी आलें. थोड्या वेळानें तिनें म्हटलें, ' तात्या, आई, साऱ्यांना बोलवा. सगळ्यांना भेटावें असंच आज मला वाटतं आहे. ' त्याप्रमाणें सर्वांना बोलाविलें. त्या सर्वांच्याकडे तिनें एकदां पाहिलें व ' जा ' म्हणून सांगितलें.

सकाळीं साडेनवापासूनच श्वास लागला होता. ही इतकी एकसारखी बोलते, तेव्हां चिन्ह कांहीं ठीक नाहीं, अशी हरिभाऊंच्या मनाची खात्री होत चालली.

साडेदहानंतर तिनें हरिभाऊ व वेणूताई यांना आपल्याजवळून हलूं दिलें नाहीं. वेणूताई सारख्या रडत होत्या. 'आई ग, रडूं नकोस. मला बरं वाटतं आहे, पण आज किनई कांहींतरी वेगळंच होतं आहे,' असें बोलून आसन्नमरण स्थितींतही ताई त्यांची समजूत घालीत होती. वेणूताईच्या डोळ्यांचें पाणी खळेना, तेव्हां ती हरिभाऊंच्याकडे वळून म्हणाली, 'तात्या, आईला कांहीं तरी सांगा ना ? ती पहा कशी एकसारखी रडते आहे. तुम्ही सांगितलंत म्हणजे ती ऐकेल.' वेणूताईच्या सारखीच हरिभाऊंच्या हृदयाची स्थिति झालेली होती. ते त्यांची समजूत कशी करणार ?

डॉ. व्ही. सी. गोखले यांनीं ऑक्सिजनचें इंजेक्शन दिलें. ताईची तळमळ चालली होती. बाहेर व्हरांड्यांत हरिभाऊंचे एक ज्योतिषी मित्र एक वाजल्यानंतर ताईस आराम पडेल असें त्यांना आश्वासन देत होते. देवांपुढें चिठ्या टाकून पाहिल्या, त्यांतही 'बरें वाटेल' असेंच आलें होतें ! सर्व मानवी उपाय थकले म्हणजे मनुष्य वेड्यासारखा होऊन वाटेल त्या गोष्टीवर विश्वास ठेवूं लागतो ! ताई शुद्धीवर असून शहाण्यासारखी बोलत होती. 'आजी ग, माझ्या आईला कांहीं बोलूं नकोस हं.' अशी तिनें आपल्या आजीकडून कबुली करून घेतली. तिची मावसबहिण गोदूताई तिचे पाय चेपीत बसली होती. हरिभाऊ व वेणूताई चिमणीसारखीं दीनवाणीं तोंडें करून आपल्या हृदयांतील त्या प्राणाकडे पहात राहिलीं होतीं. पार्वतीबाई जोशी ताईच्या उशाशीं होत्या. तिचे पाय थंड पडत चालले होते व मुख अगदीं निस्तेज दिसूं लागलें होतें. 'ताई, आतां तूं बोलूं नकोस. राम, राम म्हण.' हे पार्वतीबाईचे शब्द ऐकून तिनें 'राम, राम' म्हणण्यास सुरुवात केली आणि दुपारीं एक वाजतां 'राम, राम' म्हणत म्हणत माघ शुद्ध चतुर्दशीच्या दिवशीं ( तारीख १९, फेब्रुवारी १९१३ ) तिनें प्राण सोडला ! वेणूताई शोकानें मूर्च्छित होऊन पडल्या. हरिभाऊंच्या अंतःकरणांतील अमर्याद दुःखाचें कोण वर्णन करणार ! आपला स्वतःचाच प्राणदीप मालविला असें त्यांना वाटलें. ताईच्या मृत्यूनें सर्व नातेवाईकांना व आनंदाश्रमांतील नोकरांसही फार दुःख झालें. आनंदाश्रमांतील आनंदमूर्ति नाहींशी झाली ! तिच्या बरोबरच हरिभाऊंच्या जीवनांतील आनंदाचा कायमचा लोप झाला !

---

## प्रकरण अठरावें

# अखेर

ताईच्या मृत्यूनंतर तीन दिवस समाचारास येणाऱ्या स्नेही मंडळींची आनंदाश्रमांत रहदारी लागली. हरिभाऊ व वेणूताई यांचें दुःख पाहून हळहळून मंडळी परत जात. ताईबिना शून्य झालेल्या आनंदाश्रमांत त्या दोघांना क्षणमात्रही करमेना. कांहीं दिवस तरी पुण्यांतून बाहेर जावें असें वाटून हरिभाऊ वेणूताईसह लोणावळ्यास दीक्षितांच्या बंगल्यांत जाऊन राहिले. तेथेंही मंडळी एकसारखी येतच होती. आजूबाजूंस इतर माणसें असलीं म्हणजे तितकाच मनावर दाब राहतो, यासाठी गोदूताई व त्यांचे वडील बरोबर गेले होते. परंतु सांत्वनपर शब्द ऐकून हृदयास झालेली भयंकर जखम कधीं भरून येईल काय?

महिनाभर तेथें राहून ते पुण्यास आले, तों वेणूताई आजारी पडल्या. त्यांचें दुखणें क्षयावर जातें कीं काय अशी भीति हरिभाऊंना पडली. एक संकट येऊन गेलें नाहीं तोंच दुसरें उद्भवलें. परंतु वेणूताईचा ताप मलेरियाचाच ठरून चारपांच महिन्यांनीं त्या बऱ्या झाल्या.

आनंदाश्रमांत परत आल्यानंतर ताई ज्या खोलींत गेली त्या जागेकडे हरिभाऊ जात नसत. जेवावयास बसले कीं, ताईची आठवण होऊन कंठ दाटून येऊन डोळ्यांत अश्रु उभे रहात व भरलेलें ताट कधीं कधीं तसेंच पुढें सारून ते पानावरून उठून जात. खाण्यापिण्याच्या पदार्थांतील त्यांच्या आणि ताईच्या आवडीनिवडी सारख्याच असल्यामुळें हरघडी तिची आठवण होई. त्यामुळें उगीच जेवल्यासारखें करावें व पानावरून उठावें असा त्यांचा क्रम चालू होता. याचा त्यांच्या शरीरप्रकृतीवर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. हरिभाऊ व वेणूताई यांना





' आमची करमणूक व तिची करमणूक '



बालोद्यान प्रेस, पुणें.

## ‘ आमची करमणूक व तिची करमणूक ’

दुःखाचा कांहींतरी विसर पडावा म्हणून गोदूताई सतत सहा महिने त्यांच्याजवळ राहिल्या होत्या. गोदूताईंनीं वेणुताईची व हरिभाऊंची करमणूक करण्याचा किती प्रयत्न करावा. परंतु ताई—त्यांच्या हृदयाची करमणूक—नाहींशी झाल्यावर कशांत तरी त्यांचें चित्त रमणें शक्य होतें काय? ताईच्या जवळ तिच्याच एवढी एक बाहुली बसवून हरिभाऊंनीं तिचा एकदां फोटो काढला होता व त्याखालीं ‘आमची करमणूक व तिची करमणूक’ असें खुबीदार वाक्य लिहिलें होतें. रसिकास रमविणारें करमणूक पत्र सुरू होतें. परतु हरिभाऊ व वेणुताई यांची ‘करमणूक’ मात्र देवानें हिरावून नेली होती. ताईच्या दुःखामुळें हरिभाऊंची झोंपही पार उडून गेली होती. कांहीं तरी बोलावें, मनाची करमणूक व्हावी म्हणून कधीं पत्ते खेळावे व कोणीकडून तरी रात्र सरवावी असा क्रम कित्येक दिवस चालू होता. जिकडेतिकडे एकसारखा ताईचा भास होऊन त्यांची अगदी वेड्यासारखी स्थिति होई. ताईवांचून शून्य दिसणाऱ्या आनंदाश्रमांत जाणें हरिभाऊंच्या मित्रांनाही कसेंसेंच वाटे. एकदां श्री. माडीवाले हरिभाऊंच्याकडे आले आणि आनंदाश्रमांत पसरलेली विलक्षण उदासीनता पाहून म्हणाले, ‘ आजपर्यंत केव्हांही या घरीं आलों तरी ‘ ताई ’ हा शब्द जिकडेतिकडे ऐकू येत होता. आतां मात्र तो संपला! ’ ताई गेली त्या दिवशीं हरिभाऊंनीं अन्नग्रहण केलें नाही. तो सोमवारचा दिवस होता. तेव्हांपासून पुढें वर्षभर दर सोमवारी ते कडक उपोषण करीत.

हरिभाऊंच्या आयुष्यांतील आनंद व उत्साह ताई आपल्याबरोबरच लुटून घेऊन गेली. ताईचा प्रेमळ, बोलका, गोड स्वभाव, तिचें चातुर्य, तिची आकलनशक्ति व तीव्र बुद्धिमत्ता यांचें स्मरण होऊन त्यांचें चित्त विव्हळ होऊन जाई. त्यांचा सारा आनंद, सारें प्रेम, सारें सुख शांताताईच्या बालमूर्तींतच सांठविलेलें होतें. तें त्यांचें प्रेमनिधान नाहींसें झाल्यावर सारें विश्व त्यांस शून्यवत् व्हावें यांत कसलें नवल? सारेच आईबाप आपल्या मुलांवर प्रेम करितात, त्यांत हरिभाऊंनींच विशेष काय केलें असें कोणास वाटेल. परंतु हरिभाऊंना ‘ ताई ’ म्हणजे सर्वस्व वाटत होती व तिच्याबांचून जीवित घालविणें त्यांस खरोखर अशक्य झालें. तिच्यावरच सारा जीव गुंतवून ठेवल्यामुळें त्यांची कांहीं दिवस अगदीं भ्रमिष्टासारखी स्थिति झाली होती. कन्यावियोगाच्या अमर्याद दुःखाच्या झळीनें त्यांचे मनोरथ दग्ध झाले व जीवित निःसार वाटूं लागलें. ताईच्या मृत्यूनंतर त्यांच्या हातून फारसें कादंबरी-

लेखन होऊं शकलें नाहीं. ते पुष्कळदां लिहावयास म्हणून बसत, परंतु गतगोष्टींच्या स्मृतीनें ताईची गोड मूर्ति नेत्रांसमोर उभी राहून त्यांचें हृदय भरून येई व डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागून ते हातांतील लेखणी दूर सारीत. ताई म्हणजे त्यांचें सुखसर्वस्व, जीव कीं प्राण होती. ताईच्या खेळण्यांनीं भरलेल्या कपाटांकडे पाहून त्यांच्या मनास वेदना होत. खेळणीं निर्जीव, बिचारीं जशींच्या तशींच कपाटांत होतीं. परंतु त्यांच्याबरोबर आनंदानें नाना खेळ खेळणारी ताई कोठें होती बरें ?

भावनाप्रधान हृदयाचें समाधान बाह्यगोष्टींनीं कधींही होत नाहीं आणि एकदां कां हृदयास धक्का बसला कीं, त्याच्या वेदना कमी होत नाहींत. ताईच्या मृत्यूनंतरचें हरिभाऊंचें आयुष्य म्हणजे खरोखर निर्जीव जीवन होतें. त्यांनीं आपल्या आयुष्याचा चित्रपट सुंदर रंगविला होता. परंतु दुःखाची, निराशेची काळी शाई त्यावर ओतून दैवानें तो बिघडवून टाकला. ताईबद्दल त्यांनीं केवढीं तरी मनोराज्यें उभारलीं होतीं. ' ताई हुषार आहे, बुद्धिमान् आहे, तिला विद्वान् करून आपण ' करमणूक ' तिच्या स्वाधीन करूं. ' अशी त्यांचीं मनोहर मनोराज्यें नेहमीं चालत. तीं मनोराज्यें अखेर विरून गेलीं. देवाची तशी मर्जी होती असें म्हणून स्वस्थ बसण्यापलीकडे मानवाच्या हातीं काय आहे बरें ?

हरिभाऊंनीं केव्हां केव्हां ताईस लडिवाळपणानें विचारावें, ' ताई, तूं कुठें आहेस ? ' त्यावर त्या चाणाक्ष मुलीनें हरिभाऊंच्या हृदयावर हात ठेवून म्हणावें, ' येथें ! ' ताई त्यांचा त्याग करून गेल्यावर त्यांच्या शरिरावर, मनावर व बुद्धीवरही परिणाम झाला. शरीर कृश झालें, मनोवृत्ति निराश बनली व बुद्धिमत्ता तेजोहीन झाली. शांताताईबरोबरच त्यांची प्रतिभाही त्यांस सोडून गेली कीं काय कोण जाणे ! त्यांचा तो हृदयाधार नाहींसा झाल्याबरोबर त्यांच्या वृत्तींत, जीवितक्रमांत कितीतरी बदल झाला. थोडक्यांत सांगावयाचें तर ताईच्या मृत्यूपूर्वीचे हरिभाऊ व तिच्या मृत्यूनंतरचे हरिभाऊ या भिन्न व्यक्ति होत्या असें म्हणतां येईल. ताईच्या मृत्यूनें वाङ्मयाचें भयंकर नुकसान झालें व हरिभाऊंचा मृत्यू दहा वर्षे अलीकडे आला.

ताई गेली त्या वेळीं ' कर्मयोग ' कादंबरी करमणुकींत चालू होती. ती शेवटीं अपूर्णच राहिली. तारीख १५ मार्च १९१३तील करमणुकीच्या अंकांत हरिभाऊंनीं ' एक स्वप्न ' लिहून कन्यावियोगानें अत्यंत निराश झालेल्या आपल्या मनःस्थितीचें वर्णन केलें आहे.

## ‘ मी सर्वांचा संभाळ करीन ’

इ. स. १९१४ सालीं Religious Endowment Conference साठीं ते दिल्लीस गेले होते. सभा सोमवारीं होती. त्या दिवशीं त्यांनीं नेहमींप्रमाणें कडक उपोषण करण्याचें ठरविलें. परंतु प्रकृति अशक्त झालेली, प्रवासाची दगदग आणि त्यानंतर सभेचें काम, यांमुळें व उपासानें डोकें फिरूं लागलें, म्हणून वेणूताईनीं कांहीं तरी खाण्याचा अतिशय आग्रह केला. त्या दिवसापासून त्यांनीं कडक उपोषण करण्याचें सोडून दिलें.

दिल्लीच्या आसपासची प्रसिद्ध स्थळें त्यांनीं पूर्वीं पाहिलीं होतीं. परंतु वेणूताईच्यासाठीं ते पुनः आग्रा, मथुरा, वृन्दावन, हरद्वार, लक्ष्मणझूला वगैरे ठिकाणीं गेले. प्रवासांत त्या दोघांनाही ताईची आठवण साहजिक होई. दोघांची मनःस्थिति सारखीच झालेली; परंतु परस्परांचें समाधान करण्याचा दोघांचाही प्रयत्न चाले.

ताई गेली त्याच वर्षी हरिभाऊंची प्रकृति बिघडली. ताप न येतांच घाम येऊन अशक्तता वाटूं लागली. प्रकृतीसाठीं पुनः दोन महिने ते लोणावळ्यास जाऊन राहिले. कांही न खाण्यामुळें आंतडीं वाळून अशी अशक्तता येते, असा डॉक्टरांचा अभिप्राय पडला. तेव्हां डॉक्टरच्या सांगण्यावरून त्यांनी कोको घेण्यास सुरुवात केली; तेव्हां थोडें बरें वाटूं लागलें.

ताईचा मृत्यु म्हणजे हरिभाऊंच्यावरील संकटपरंपरेचा प्रारंभच होय. इ. स. १९१४ सालच्या अखेरीस त्यांचे वडील नानासाहेब आजारी पडले. घरांत कोणीही आजारी पडो, शुश्रूषा करण्याचें काम हरिभाऊ स्वतः करीत. ‘ मी सर्वांचा संभाळ करीन. ’ हें नानासाहेबांस दिलेलें वचन त्यांनीं आजन्म पाळलें. आनंदाश्रमांत स्वतंत्र घर त्यांनीं केलें होतें; तरी घरांतील इतर मंडळींचा समाचार घेणें त्यांनीं केव्हांही सोडलें नाहीं. वडिलांना कांहीं नाहीं म्हणावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविलें होतें. नानासाहेब व लक्ष्मीबाई जो जो जिन्नस मागत तो तो हरिभाऊ त्यांना देत. नानासाहेबांनीं ‘ मला घर बांधून द्या, ’ असें म्हटल्याबरोबर हरिभाऊंनीं जागा शोधून काढून घर बांधून दिलें.

नानासाहेबांशीं त्यांचें वागणें अतिशय मर्यादशील असे. त्यांच्या देखत ताईला त्यांनीं कधींही घेतली नाहीं. पेन्शन घेतल्यापासून नानासाहेब आपला काळ स्नानसंध्या, जपजाप्य, व्रतवैकल्यें यांत घालवीत. रोज पार्थिवपूजा करण्याचा त्यांचा नेम असे. त्यांचीं मतें सर्व बाबतींत जुनीं असल्यामुळें हरिभाऊंच्या सुधारकी मतां-

बद्दल त्यांना राग येई. वडील मंडळींना न दुखविण्याचा हरिभाऊ किती प्रयत्न करीत हें मागें एकदां सांगितलेंच आहे. नानासाहेबांचा रोष न व्हावा यासाठीं जरी हरिभाऊ जपत तरी त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. शेवटचीं दोन तीन वर्षे तर हरिभाऊंना यामुळें फार त्रास झाला. वडील मंडळींपासून त्यांना फारसें सुख झालें नाहीं; याचें कारण मतभेद हेंच होय. नानासाहेब जुन्या विचारांचे असल्यानें गव्हर्मेंट-हाउसमधील पार्ट्यांस व सहकुटुंब फिरावयास जाणें, सामाजिक सुधारणांच्या गोष्टी बोलणें व लिहिणें त्यांना बिलकुल आवडत नसे. त्यांतल्या त्यांत दोघांचें राहणें एका घरांत नसल्यानें निंदकांनीं तिखटमीठ लावून सांगितलेल्या हरिभाऊंच्या सुधारकीपणाच्या गोष्टींवर त्यांचा विश्वास बसे. प्रत्यक्ष मोकळेपणानें त्या दोघांचें बोलणें होत नसल्यानें गैरसमज वाढत जाई. यांत नानासाहेबांचा दोष होता असें नाहीं. कारण त्यांचें शिक्षण, त्यांच्या धर्मसमजुती व त्यांचा जीवनक्रम यांचा विचार केला असतां त्यांस सुधारणेचे नवीन विचार न आवडणें साहजिक होतें. अर्थातच हरिभाऊंचे विचार त्यांना पसंत पडत नसत. जुन्या-नव्या मतांच्या झगड्यांत नेहमीं असाच प्रकार होत असतो. यामुळें हरिभाऊंच्या मनाला केव्हां केव्हां अत्यंत त्रास होई, तरीही त्यांनीं आपलें वडिलांच्या संबंधींचें कर्तव्य करण्यांत बिलकुल कसूर केली नाहीं. नानासाहेबांच्या आजारांत जागरणें करून त्यांनीं त्यांची शुश्रूषा केली. शेवटची त्यांनीं केलेली सेवा पाहून नानासाहेबांना पश्चात्ताप झाला व वाईट वाटलें. परंतु मग काय उपयोग? इ. स. १९१५ च्या माघाच्या महिन्यांत नानासाहेब स्वर्गवासी झाले, त्या वेळीं ‘आपल्यावरचें छत्र गेलें’ म्हणून हरिभाऊंना दुःख झालें. नानासाहेब गेल्यानंतर जुन्या मंडळींचे डोळे हरिभाऊ वडिलांची क्रिया करतात किंवा नाहीं इकडे लागले होते. परंतु हरिभाऊंनीं सर्व क्रिया यथासांग केली. नानासाहेबांच्यामागें आपली सापत्न माता व बंधु यांचा हरिभाऊंनीं कर्तव्यबुद्धीनें योग्य परामर्श घेतला.

त्याच वर्षी माघाच्या महिन्यांत त्यांचे जिवलग स्नेही ना. गोखले हेही गेले. त्यामुळें हरिभाऊंना परमावधीचें दुःख झालें. माघ महिना आला कीं त्यांना भीति वाटे; कारण त्यांचीं सर्व आवडतीं माणसें याच महिन्यांत गेलीं होतीं.

आवडत्या माणसांचा वियोग झाल्यामुळें त्यांची वृत्ति अत्यंत अस्वस्थ झाली. दुःखाचा कांहीं काळ तरी विसर पडावा म्हणून त्यांनीं आपल्या भोंवतीं बरींच

माणसें गोळा केलीं. मामेभाऊ, चुलतभाऊ, आतेभाऊ, पुतणी, एक विद्यार्थी व शास्त्रीबोवा इतकीं बाहेरचीं माणसें त्यांच्याजवळ होतीं. परंतु यामुळें त्यांस बिलकुल सुख न होतां त्रास मात्र झाला. इ. स. १९१५ सालापासून त्यांची एक चुलती मुलांबाळांसह त्यांच्याकडे येऊन राहिली होती. तिच्यापासूनही त्यांना अत्यंत त्रास पोहोंचला. ' लहान म्हणून लहानाला भ्यायचं, मोठं म्हणून मोठ्यांना भ्यायचं; एकंदरीत माझा सारा काळ भिण्यांतच गेला. ' असे ते केव्हां केव्हां उद्गार काढीत.

घरांतील सौख्य व शांति नाहींशीं झाल्यामुळें सार्वजनिक कार्यांत त्यांनीं स्वतःस गुंतवून टाकलें. दुःखाची विस्मृति होण्यास अविश्रांत उद्योग हेंच एक साधन आहे आणि त्याच साधनाचा हरिभाऊंनीं अंगिकार केला.

इ. स. १९१५ च्या प्रांतिक परिषदेंत स्वागताध्यक्ष या नात्यानें हरिभाऊंनीं पुष्कळ काम केलें. ही परिषद भरविण्यांत त्यांचाच विशेष पुढाकार होता. त्याच वर्षी सप्टेंबर महिन्यांत हरिभाऊ म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाले. तेव्हांपासून त्यांचा बराच काळ म्युनिसिपालिटीच्या कामांतच जाई. म्युनिसिपालिटीच्याच जोडीला इ. स. १९१६ सालापासून त्यांच्या गळ्यांत एका रेल्वेचें काम पडलें. आळंदीच्या कारभारांत त्यांचा जोशी नांवाच्या इसमाशीं परिचय झाला होता. त्यानें एका रेल्वेचें कॉन्ट्रॅक्ट घेतलें होतें. त्यासाठीं शेअर्स जमविण्याकरितां त्यानें प्रथम हरिभाऊंच्याकडून मोठमोठ्या लोकांना देण्यासाठीं म्हणून चिठ्ठ्या मागितल्या. हरिभाऊंच्या वजनामुळें त्या गृहस्थानें बराच पैसा गोळा केला. हरिभाऊंच्या बऱ्याच मित्रमंडळींत शेअर्स खपले. या कामापासून फार फायदा होईल, अशा गोष्टी तो गृहस्थ सांगे, त्यावर हरिभाऊंचा विश्वास बसला व त्यांनीं तें धोंगडें इतर स्नेही नको नको म्हणत असतां आपल्या गळ्यांत घेतलें.

हरिभाऊंनीं याच सालापासून ' करमणूक ' पत्रांत लिहिणें जवळजवळ सोडून दिलें. त्या वर्षी श्री. रेंदाळकर यांचीच कादंबरी करमणुकींत येत होती. हरिभाऊ लिहिनासे झाल्यामुळें करमणुकीची लोकप्रियता कमी होऊन वर्गणीदारांचा नंबर खालावला. ही स्थिति पाहून त्यांनीं स्वतः आपण होऊनच ' करमणूक ' पत्र इ.स. १९१७ सालीं बंद केलें. आपलें हें आवडतें पत्र बंद करून हरिभाऊंनीं शेवटचीच निरवानिरव करण्यास जणूं काय आरंभ केला !

इ. स. १९१८ सालीं त्यांच्या एका डोळ्यास पक्षघाताचा विकार झाला. त्या डोळ्याची दृष्टि कायमचीच जाते की काय अशी त्यांना भीति येऊन पडली. वाचन हेंच त्यांचें जीवित होतें. त्यामुळें आपला वेळ कसा जाईल याची त्यांना चिंता वाटूं लागली. दीड महिन्यानें डोळा बरा झाला तों मलेरिया सुरू झाला. अपचनाचा विकार प्रथमपासून होताच. अशा तऱ्हेनें त्यांची प्रकृति अगदीं नादुरुस्त होऊन गेली.

इ. स. १९१८ च्या सप्टेंबरमध्यें त्यांचें म्युनिसिपालिटीचें अध्यक्षपद गेलें. त्यामुळें त्यांना वाईट वाटलें. तेव्हांपासून 'कोणतीही गोष्ट हातीं घेतली तरी त्यांत मला आतां यश येत नाहीं, त्यावरून माझा अंतकाल समीप आला आहे,' असे उद्गार त्यांच्या तोंडून वरचेवर बाहेर पडत, आणि खरोखर तसेंच झालें. जें काम हातीं घ्यावें तें पार पडावयाचेंच हा प्रकार बदलून त्यांना क्षुल्लक गोष्टीतही यश येईनासें झालें.

रेल्वेच्या कामांत त्यांस अतिशय त्रास होऊं लागला. पुढें पुढें या कामाची सर्व जबाबदारी त्या गृहस्थानें हरिभाऊंच्यावरच टाकली. गांवोगांव हिंडून शेअर्स खपविण्याचें काम हरिभाऊंना करणें भाग पडलें. याच कामासाठीं त्यांना कलकत्त्यास जाण्याचा प्रसंग आला. प्रवासानें प्रकृति सुधारेल असें वाटून ते कलकत्त्यास गेले. वाटेंत वेणूताईंना त्यांनी नागपुरास माहेरीं ठेविलें. कलकत्त्यास प्रकृति बिघडली. आठ दिवसांनीं परत येणार होते, ते तेथेंच रेल्वेच्या कामानिमित्त महिनाभर राहिले. काम झाल्यावर परस्पर दिल्लीस जाऊन पुढें इंदूरच्या महाराजांना भेटण्यासाठीं म्हणून इंदूरला गेले. तेथें ते कीर्तन्यांच्याकडे उतरले होते. महाराज तेथें नसल्यामुळें इंदूरला बरेच दिवस रहावें लागलें. एके दिवशी फिरून परत येत असतां, गारांचा पाऊस लागला व त्यामुळें पोटाला व पायांना सूज आली. डॉ. शारंगपाणी यांनीं त्यांची प्रकृति पाहून त्यांस घरीं जावयास सांगितलें. परंतु रोगाचें नांव मात्र सांगितलें नाहीं. प्रकृति इतकी बिघडली तरी रोज खुशालीचें पत्र ते घरीं पाठवीत. इंदूरच्या महाराजांची भेट व कामही जवळ जवळ झाल्यासारखेंच होतें; म्हणून ते इंदुराहून निघाले. प्रकृति जास्त बिघडल्यामुळें खांडव्यास दीक्षितांच्या घरीं त्यांनी मुक्काम केला. वेणूताईंना परस्पर भुसावळेस बोलाविलें होतें. परंतु स्टेशनवर हरिभाऊ न येतां दीक्षितांचा मुलगा त्यांना दिसला. त्याबरोबर त्यांना फार नवल वाटलें. 'हरिभाऊ आमच्या घरीं आहेत व तेथेंच तुम्हांस बोलाविलें आहे.' असें त्यानें सांगितलें.

याप्रमाणें त्या त्याच्या बरोबर गेल्या. हरिभाऊंची स्थिति पाहतांच त्या चित्रासारख्या तटस्थ होऊन त्यांच्याकडे पहातच राहिल्या. त्यांना एक शब्दही बोलवेना. डोळ्यांतून मात्र अश्रू वाहू लागले. ' काळजी लागेल म्हणून मी आजारीपणाबद्दल कांहींच लिहिलें नव्हतें. मुंबईस जाऊन प्रकृति दाखवितों, म्हणजे बरें वाटेल. ' असें बोलून हरिभाऊंनीं त्यांचें समाधान केलें. त्याच दिवशीं पहांटे मुंबईस जाण्यासाठीं ते निघाले. मुंबईच्या स्टेशनवर त्यांचे स्नेही रा. ब. अंजनगांवकर हे आले होते. दुसऱ्याच दिवशीं म्हणजे तारीख २८ जानेवारी १९१९ रोजी पब्लिक सर्व्हिस कमिशनपुढें हरिभाऊंची साक्ष होती. पाय उचलवत नव्हता, तरी तसेच साक्ष द्यावयास गेले. परत येतांना व्हिक्टोरियाचा घोडा बुजून गाडीला त्या दिवशीं अपघातच व्हावयाचा, पण थोडक्यांत निभावलें!

त्याच दिवशीं दुपारी डॉ. भडकमकर प्रकृति पाहून गेले व त्यांनीं ' बिलकुल हलूं नका ' असें सांगितलें. त्यामुळें दुसरे दिवशीं स्वतः हजर न राहतां लेखी साक्ष पाठवावी लागली; त्याबद्दल हरिभाऊंना वाईट वाटलें. डॉ. भडकमकर मिरजेस गेल्यामुळें डॉ. नानासाहेब देशमुख यांचें औषध सुरू केलें. रोग असाध्यच होता. परंतु हार्टडिसीझची भीति जास्त होती. डॉक्टरच्या सांगण्याप्रमाणें दूध व फळें यांजवरच हरिभाऊ होते. औषधानें एक दोन आठवडे बरें वाटलें. पोटाची सूजही उतरली.

हरिभाऊ आजारी होते, तरी सुद्धां जोशीबुवा त्यांना ' या कागदावर सही द्या, त्या कागदावर सही करा, ' म्हणून त्रास देईच.

हरिभाऊंची प्रकृति बिघडल्याची बातमी कळतांच रामभाऊ, राधाकाकू, गोदूताई, पार्वतीबाई, रामसिंग व भिडे कारकून इतकी मंडळी मुंबईस गेली. स्नेहीमंडळी तर एकसारखी वरचेवर भेटून जात होती. आज बरें वाटेल, उद्यां बरें वाटेल, असें करतां करतां सव्वा महिना निघून गेला.

इतक्या अत्यवस्थ स्थितींतही हरिभाऊंच्या मनाची शांति ढळली नाहीं. त्यांचें वाचन तर अखंड चालूच होतें. रोज रोज नवीं नवीं पुस्तकें आणून ते वाचीत. नवी पुस्तकें पाहिलीं की त्यांना मोठा आनंद होई व अतिशय प्रेमानें ते त्यांच्याकडे पहात. स्नेही मंडळी आली तर नेहमींप्रमाणें हंसत हंसत विनोदानें ते त्यांच्याशीं बोलत.

डॉ. राणीना रोज येत. डॉ. भाजेकर, डॉ. देशमुख व डॉ. भडकमकर मधून मधून येत. फेब्रुवारीच्या १९ व्या तारखेस दुखण्याचा जोर जास्त झाला व पोटाची सूज वाढली, तेव्हां डॉ. भाजेकर यांच्या हॉस्पिटलमध्यें त्यांस नेऊन पोटांतील पाणी काढलें. पाणी काढल्यानंतर डोळ्यांवर कायमचीच झांपड आली.

डॉ. भडकमकर यांनीं त्यांस नाना तऱ्हांनीं पुण्यास जाण्याबद्दल सुचवावें. त्यावर हरिभाऊ विचारीत, 'माझं जास्त आहे का?' तेव्हां 'तसं कांहीं नाहीं. परंतु घरीं गेलांत तर बरं,' असें डॉक्टरांनीं उत्तर द्यावें.

वेणुताईची मनःस्थिति त्या वेळीं कशी होती हें वर्णन करणें अशक्य आहे. दिवसेंदिवस रोग बळावत चाललेला पाहून त्यांच्या पोटांत धस्स होई. त्यांची तहान, भूक, झोंप पार उडून गेली होती. परंतु हरिभाऊ आग्रह करून त्यांना जेवावयास लावीत. आपला रोग असाध्य आहे असें वाटून हरिभाऊ एकदां गोदूताईना म्हणाले, 'केवळ तुझ्या मावशीसाठीं म्हणून मी औषध घेतों. औषधानें मला बरें वाटणें शक्य नाहीं.'

मुंबईत असतांच प्रो. लिमये यांच्या आकस्मिक मृत्यूची बातमी त्यांच्या कानावर आली. ती ऐकून त्यांना फार वाईट वाटलें.

शेवटीं डॉ. भाजेकर यांच्या सांगण्यावरून पुण्यास जाण्याचा बेत ठरला. डॉ. रेळे बरोबर होते. हरिभाऊंना त्रास होऊं नये म्हणून, त्यांना फर्स्ट क्लासांतून आणलें. बरोबर लक्ष्मीबाई, गोदूताई व वेणूताई होत्या. वाटेंत वेणूताईनीं डॉ. रेळे यांस प्रकृतीचें खरें मान काय आहे म्हणून विचारलें. 'प्रकृतीचा आतां भरंवसा नाहीं; कदाचित् दोनचार महिनेही जातील' असें त्यांनीं उत्तर दिलें.

घरीं तार करून मोटार मागविण्यास सांगितलें होतें. परंतु मोटार मिळाली नाहीं, म्हणून मेण्याची व्यवस्था केली. मेणा पाहतांच हरिभाऊंना वाईट वाटलें. परंतु नाइलाज म्हणून मेण्यांतून त्यांना आणणें भाग पडलें. मेण्याबरोबर डॉ. रेळे यांचा टांगा चालला होता. वेणूताई व कांहीं मंडळी बिछान्याची वगैरे तजवीज करण्याकरितां पुढें गेली. ती ऐन बारा वाजण्याची वेळ होती. उन्हामुळें व मेण्याच्या गद्गद् हलण्यामुळें हरिभाऊंना अत्यंत त्रास झाला. आप्पा बळवंत चौकांत येतात तोंच त्यांना रक्ताची गुळणी आली. ती पाहतांच त्यांना धक्का बसला व आपला मृत्यु समीप आला अशी त्यांच्या मनाची खात्रीच झाली. गवत्या मारुतीपाशीं

दुसरी गुळणी आली व आनंदाश्रमाच्या दाराशीं तिसरी गुळणी येऊन ते बेशुद्ध झाले. घरांत आणून माजघरांतच आरामखुर्चीवर बसवून डॉ. रेळे यांनीं त्यांच्या डोक्यावर बर्फ ठेवला व औषध हुंगावयास दिलें, तेव्हां कांहीं वेळानें ते शुद्धीवर आले.

वेणुताईनीं रामसिंगाच्या मदतीनें हरिभाऊंच्यासाठीं पलंग वगैरे घालून आराम-शीर निजण्याची उत्तम व्यवस्था केली होती. हरिभाऊंच्या येण्याची त्या एकसारखी वाट पहात होत्या. खालीं येऊन पाहतात तों हरिभाऊंना रक्ताच्या गुळण्यांवर गुळण्या येत असून रक्तानें भरलेल्या कपड्यांचा ढीग माजघरांत पडलेला! तें पाहतांच त्यांना चक्करच आली!!

अजून आपलें एक कर्तव्य राहिलें आहे याची हरिभाऊंना जाणीव होती. एकीकडे रक्ताच्या गुळण्या येतच होत्या, हातपाय थंड होत होते, तरी मन शांत ठेवून त्यांनीं आपलें मृत्युपत्र भराभर लिहिण्यास सांगितलें. श्री. वामनराव पटवर्धन व श्री. ठकार वकील यांनीं ड्राफ्ट तयार केला व हरिभाऊंनीं त्यावर कशीबशी सही केली. अशा तऱ्हेनें आपल्या मागें आपल्या पत्नीची व्यवस्था केल्यावर वेणुताईच्याकडे पाहून ते म्हणाले, ‘ मला जें कांहीं करणं शक्य होतं तें मी केलं. मृत्यु माझ्या स्वाधीन नाहीं. ’ त्याच दिवशीं विम्याचा हप्ता भरावयाचा शेवटचा दिवस होता. तो भरण्याबद्दल त्यांनीं आठवण ठेवून सांगितलें.

शेवटपर्यंत त्यांची शांति लवमात्रही कमी झाली नाहीं. डॉ. शिखरे, डॉ. रानडे व डॉ व्ही. सी. गोखले, इतर मित्रमंडळी व नातेवाईक त्यांच्याजवळ अखेरपर्यंत होती.

तिसऱ्या गुळणीबरोबरच हरिभाऊ जावयाचे, परंतु आपल्या पत्नीसाठीं म्हणूनच कीं काय आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावरच त्यांनीं आपलें आयुष्य कांहीं तास तरी लांबविलें.

सायंकाळीं सातच्या सुमारास ( ता. ३ मार्च, १९१९ रोजीं ) आपली पत्नी, नातेवाईक, ग्रंथ-बालक व प्रचंड मित्रसमूह यांचा त्याग करून हरिभाऊ आपल्या प्रिय कन्येच्या भेटीस निघून गेले! शोकातिरेकानें वेणूताई कित्येक तास बेशुद्धावस्थेंत होत्या. त्यांचा सौख्यनिधी आटून जाऊन आनंदाश्रमांतील आनंदाचा कायमचाच लोप झाला!!

## प्रकरण एकोणिसावें

# उपसंहार

हरिभाऊ तर गेले, परंतु त्यांचा सर्व मोठा पसारा आवरण्याचें काम त्यांच्या पत्नी वेणूताई ऊर्फ रमाबाई यांच्यावर येऊन पडलें. एका संस्थेचे व्यवस्थापक व सार्वजनिक कार्यांतील प्रमुख पुढारी या दृष्टींनीं हरिभाऊंच्या कार्याचा व्याप किती मोठा होता याची मागील हकीकतीवरून वाचकांना कल्पना होईलच. विशेषतः रेल्वेच्या कामामुळें अनेक भानगडी उपस्थित झाल्या होत्या. हरिभाऊंच्या मृत्यूचें अपरिमित दुःख व हें दुसरें दुःख यांमुळें रमाबाईच्या मनाची अगदीं विलक्षण स्थिति झाली होती. 'कसं होतं आणि हें काय झालं!' असा विचार मनांत येऊन त्यांना अत्यंत खेद होई. अंतःकरणांत दुःखाग्नि सदोदित पेटलेला, जवळ खऱ्या कळकळीचें कोणी नाहीं व पसारा अतिशय मोठा अशा चमत्कारिक पेंचांत रमाबाई असतां, त्यांना जर कोणीं साहाय्य केलें असेल तर तें श्रीयुत बापूराव आंबेकर यांनींच. प्रसंगांनींच मनुष्याची खरी पारख होते म्हणतात. हरिभाऊंना कित्येक स्नेही होते. परंतु विपत्तीच्या प्रसंगीं एकटे बापूरावच धांवून आले. त्यांनीं तीन वर्षें अत्यंत कळकळीनें हरिभाऊंचा सारा पसारा आवरला, रमाबाईची व्यवस्था करून दिली व हरिभाऊंच्या मैत्रीचें ऋण फेडलें. ही त्यांची कामगिरी निःसंशय संस्मरणीय आहे.

ताई गेल्यापासून रमाबाईच्या मनाची तयारी करण्याचें काम हरिभाऊंनीं चालविलें होतें. 'दोघांपैकीं कोणी तरी अगोदर जाणार, तेव्हां मन घट्ट करायला शिकलें पाहिजे. तूं माझ्यापेक्षां लहान आहेस, तेव्हां तुला माझ्यामागें या जगांत अनेक वर्षें काढावीं लागतील.' असें ते रमाबाईला वारंवार म्हणत. 'आतांच कशाला या

भलत्या गोष्टी पाहिजेत ?' असें रमाबाई उत्तर देत. त्यावर हरिभाऊ म्हणत, 'अशा प्रश्नांचा विचार जरूर केलाच पाहिजे.' परंतु नुसतें बोलणें व खरोखरी तशी गोष्ट घडून येणें यांत महदंतर आहे. हरिभाऊंच्यावांचून रमाबाईंना खरें प्रेमाचें असें दुसरें कोणीच नव्हतें. त्यामुळें हरिभाऊंच्या मृत्यूचा त्यांजवर भयंकर परिणाम झाला. माडी सोडून त्या वर्षभर खालीं आल्या नाहींत. त्यामुळें पाय अधू होऊन ऑपरेशन करावें लागलें. एकसारखें दुःख करीत राहिल्यामुळें डोकें हलकें होऊन प्रकृति बिघडून गेली.

परंतु अलीकडे पांचसहा वर्षांत ईश्वराकडे लक्ष लाविल्यानें त्यांचा दुःखभार कांहींसा कमी होऊन राहिलेलें आयुष्य सत्कारणीं लावावें व हरिभाऊंना प्रिय अशा कार्यांत वेळ खर्चावा अशी इच्छा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. त्याप्रमाणें आनंदाश्रमाबद्दल आत्मीयभाव ठेवून तेथील धार्मिक बाजूचें कार्य पूर्वींप्रमाणेंच हरिभाऊंच्या मृत्यूनंतरही आजतागायत त्या करीत आहेत.

त्यांची बुद्धि, आकलनशक्ति व व्यवहारचातुर्य नांवाजण्यासारखीं आहेत व त्यांना उच्च दर्जाच्या शिक्षणाचा लाभ मिळता तर त्यांच्या हातून पुष्कळच कार्य झालें असतें. हरिभाऊंच्याबद्दलची त्यांची भक्ति, त्यांच्या इच्छा तृप्त करून त्यांना सुख देण्याची तत्परता, सर्व कामें दक्षतेनें करण्याची त्यांची पद्धति, इतरत्र क्वचितच दिसेल. हरिभाऊंचें सार्वजनिक कार्याचें व्रत थोडक्याफार प्रमाणांत त्यांनींही पुढें चालू केलें आहे हें पाहून आनंद वाटतो. बालसंरक्षक संस्थेच्या त्या सेक्रेटरी असून एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटल, सेवासदन-कौन्सिल, Women's Indian Association, डेक्कन सभा, लेडीज् सोशल क्लब इत्यादि संस्थांच्या सभासद या नात्यानें त्या काम करितात. हुजूरपागेच्या Visitors मध्येंही त्यांचें नांव आहे. त्यांची कन्या कै. शांताबाई हिच्या नांवें मराठी शाळेंतील विद्यार्थिनींना दरवर्षी बक्षिसें देण्यासाठीं तीनशें रुपयांची रक्कम त्यांनीं ठेविली आहे. मराठी ऐच्छिक विषय घेऊन एम्. ए. होणाऱ्या विद्यार्थिनींना त्या दरवर्षी हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचा सेट बक्षीस देत असतात.

विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे हरिभाऊंच्या कार्याचें महत्त्व व हरिभाऊंची खरी योग्यता त्या जाणतात. हरिभाऊंची पत्नी या दृष्टीनें आपल्या हातून कांहीं तरी काम व्हावें अशी त्यांची इच्छा असून त्यांच्या परिस्थितीच्या मानानें शक्य तें सार्वजनिक कार्य करण्यास त्या चुकत नाहींत, ही कौतुक करण्यासारखी गोष्ट आहे यांत शंका नाहीं.

---

## प्रकरण विसावें

## जीवनरहस्य

महाराष्ट्राचे सर वॉल्टर स्कॉट या नांवानें हरिभाऊंचा गौरव करण्यांत येतो. कादंबरीकार या दृष्टीनेंच बहुधा त्या दोघांची तुलना होते. परंतु हरिभाऊ व स्कॉट यांच्या खाजगी चरित्रांतही कांहीं विशेष साम्यस्थलें आढळतात. स्कॉटचें अफाट व विविध प्रकारचें ग्रंथकर्तृत्व, मराठी वाङ्मयाच्या तत्कालीन स्थितीचा विचार करतां, हरिभाऊंच्या ठिकाणीं निःसंशय होतें. स्वदेशाच्या इतिहासाविषयींच्या व ऐतिहासिक व्यक्तींविषयींच्या आदरांत व अभिमानांत हरिभाऊ स्कॉटला हार जाणारे नव्हते. त्याचा आदरातिथ्यशील व उमदा स्वभाव हरिभाऊंच्याशीं तुलनेला अपुराच पडला असता. दोघेही शीघ्र कवि होते. परंतु हरिभाऊंनीं काव्यलेखनाचा व्यासंग पुढें चालू ठेवला नाहीं. ' The Great Unknown ' म्हणून त्याची कीर्ति दुमदुमत होती, त्याचप्रमाणें ' आजकालच्या गोष्टी 'चा कर्ता कोण हेंही त्या काळीं एक मोठें गूढच होतें. केवळ लेखनवाचनांत वेळ घालविणें यांतच आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता न मानतां दोघांनींही आपआपल्या परिस्थितीप्रमाणें आपल्या आवडत्या सार्वजनिक कार्यांत प्रामुख्यानें भाग घेतला. अशीं एक ना दोन अनेक साम्यस्थानें स्कॉट व हरिभाऊ यांच्या आयुष्यक्रमांत दाखवितां येतील. परंतु विशेषतः रेल्वेसंबंधांत अखेरीस हरिभाऊंच्यावर कोसळलेलें संकट व Ballantyne & Co. मुळें स्कॉटवर आलेलें संकट यांत बरेंच साम्य आहे. Waverley Novels एका पाठोपाठ लिहून स्कॉटनें संकटांतून आपली मुक्तता करून घेतली. हरिभाऊंच्यावर मृत्यूचा घाला अकल्पित आला म्हणून त्यांचें आपत्तींतील धैर्य व कर्तृत्व जगास दिसलें नाहीं. ते कांहीं वर्षें जगते तर त्यांनीं रेल्वेचें काम तरी यशस्वी करून दाखविलें असतें अथवा

## ‘ योग्य वेळीं नाहीं म्हणणें ’

आपल्या प्रतिभाशाली लेखणीच्या जोरावर अनेक कादंबऱ्या लिहून स्वतःवरील संकट टाळलें असतें. परंतु विधिघटना निराळीच होती. त्यामुळें हें मागें राहिलेलें महत्त्वाचें कार्य हरिभाऊंच्या मित्रांवर व पत्नीवर येऊन पडलें. असो.

गुणांचा अतिरेक झाला म्हणजे खरोखरी तो दोषच ठरतो. भिडस्तपणा हा गुण खरा, परंतु हरिभाऊंच्यांत त्याचें प्रमाण इतकें होतें कीं, त्याला दोषच मानला पाहिजे. या आत्यंतिक भिडस्तपणामुळें त्यांना खाजगी आयुष्यांत व त्याचप्रमाणें सार्वजनिक कार्यांतही अत्यंत त्रास झाला. मनुष्य लबाड, लफंगा आहे असें कळत असूनही त्याला ते कांहीं नाहीं म्हणत नसत. या त्यांच्या भिडस्तपणाचा आप्तेष्ट, नातेवाईक व स्नेही यांनीं फार फायदा घेतला. हरिभाऊंना स्वतःलाच योग्य वेळीं ‘नाहीं’ म्हणणें साधत नव्हतें, म्हणूनच कीं काय, त्यांनीं ‘ योग्य वेळीं नाहीं म्हणणें ’ या विषयावर घटकाभर करमणुकींत एक लेख लिहिला. ते योग्य वेळीं ‘ नाहीं ’ म्हणूं शकते तर किती तरी तापदायक प्रसंग टळले असते. निरर्थक गप्पांतील त्यांचा वेळ वांचून तो कादंबरीलेखनाकडे लावतां आला असता, अनेक अप्रिय माणसांशीं आलेला संबंध तुटून मनस्ताप चुकला असता व अखेरचा रेल्वेचा अव्यापारेषु व्यापार करावा न लागून मृत्युसमयीं त्यांस खरीखुरी मनःशांति लाभली असती !

हरिभाऊंच्या कारभारांत व्यवस्थितपणा, शिस्त नसे. स्वभाव हिशेबी नसल्यानें खर्चांत अव्यवस्थितपणा होई. कॉलेजमध्यें असतांना श्री. कृष्णराव वाबळे व हरि-भाऊ एका खोलींत होते. त्या वेळीही क्लबाच्या पैशाबद्दल दोघांचा नेहमी घोंटाळा चाले. स्वभाव बिनहिशेबी व अत्यत भिडस्त, त्यामुळें जो कोणी जें कांहीं मागेल तें त्याला ते देत. त्यांचेकडे पाहुणे मंडळी फार येते. स्नेह्यांच्या व नातेवाईकांच्या मुलांमुलींना खाऊ, खेळणीं, कपडेलत्ते देण्यांत त्यांचा कितीतरी खर्च होई. बिन-हिशेबी व्यवहारामुळें ‘करमणुकी’पासून फायद्याचें तर नांवच नको; परंतु तोटा मात्र झाला. स्वतःजवळचे पैसे खर्च करून ‘करमणूक’ पत्राची दरवर्षाची तूट त्यांना भरून काढावी लागे. इतक्या पुष्कळ व इतक्या श्रेष्ठ दर्जाच्या कादंबऱ्या लिहूनही त्यांपासून हरिभाऊंना विशेष अर्थप्राप्ति झाली नाहीं; याचें कारण त्यांचा अव्यवस्थित कारभार हेंच होय. या त्यांच्या स्वभावामुळें पैशाचा चुराडा झाला व त्यांना मान-सिक त्रास फार सोसावा लागला. ते एकदम पुष्कळ कामें अंगावर घेऊन त्यांसाठीं अविश्रांत मेहनत करीत. याचा परिणाम त्यांच्या शरिरावर व मनावर साहजिकच होई.

# हरि नारायण आपटे

हरिभाऊ लहरी व छांदिष्ट होते. जी गोष्ट मनांत येईल ती केल्यावांचून त्यांना क्षणमात्र चैन पडत नसे. त्यांना एकदां फोटोग्राफीचा नाद लागला होता. तेव्हां तर फोटोग्रीफीचीं सर्व उपकरणें त्यांनीं खरेदी केलीं व फोटोग्राफीवरील पुस्तकें वाचलीं. आप्तांचे व मित्रमंडळींचे रोजच्या रोज फोटो काढून त्यांनीं कांहीं दिवस आनंदाश्रमाला स्टूडिओचेंच रूप दिलें. परंतु एकदां तो नाद संपला, तेव्हां फोटोग्राफीच्या उपकरणांची त्यांनीं पुनः चौकशीसुद्धां केली नाही. होमिओपॅथीचा नाद लागला तेव्हांही त्या विषयाचें त्यांनीं उत्कृष्ट अध्ययन केलें. बसावयाच्या जागीं त्यांना नित्य नवी रचना आवडे. एकाच जागीं बसून लिहिणें त्यांना पसंत नसे. म्हणून दोन तीन जागीं टेबल, खुर्ची व लेखनसाहित्य नेहमीं तयार असे. त्यांच्या खोलींतील टेबलांच्या, पुस्तकांच्या जागा दिवसांतून सुद्धां कितीतरी वेळां बदलत. घड्याळांचा नाद असाच एकदां लागला, तेव्हां त्यांनीं सर्व खोल्यांतून लहानमोठीं किती तरी घड्याळें, कोनाड्यांत, टेबलावर, भिंतीवर लावून टाकिलीं.

त्यांना सुंदर, सुबक वस्तूंची आवड होती. एखादी सुंदर वस्तु बाजारांत दिसली कीं, ती विकत घेतल्यावांचून त्यांना बरेंच वाटत नसे. त्यांचा बराच पैसा नवीन नवीन पुस्तकें विकत घेण्यांत खर्च होई. कधी कधीं तर सुंदर कव्हरसाठीं अथवा टाइपासाठीं अथवा आंतील चित्रांसाठीं एकाच ग्रंथाचे तीन तीन चार चार सेट्स् ते विकत घेत. तऱ्हतऱ्हांचे नोटपेपर्स, फौन्टन पेन्स् त्यांच्या जवळ असत. परंतु थोडे दिवस ती वस्तु वापरली कीं, तिचा त्यांस कंटाळा येऊन नवीन वस्तु ते खरेदी करीत. हा त्यांचा लहरीपणा जेवणाखाण्यांत, वाचनांत व लेखनांतही अनेकदां दृष्टीस पडे.

वर सांगितल्याप्रमाणें जरी एखाद दुसरे बारीक सारीक दोष त्यांच्यांत असले तरी त्यांच्या अंगच्या गुणांच्या मानानें ते अत्यल्पच ठरतात. त्यांचें अंत:करण अत्यंत मृदु असे आणि परक्याच्या दु:खानेंही तें तत्काल विरघळून जाई. त्यांनीं प्लेगमध्यें केलेल्या कार्यांत त्यांची दीन अनाथांचें दु:ख हलकें करण्याची आस्थाच दिसून येते. परोपकार हें त्यांचें व्रतच असून दुसऱ्यासाठीं आपला प्राण धोक्यांत टाकण्याचें अलौकिक धैर्य व आत्मनिरपेक्षता हीं त्यांच्या ठायीं वास करीत होतीं. प्लेगानें मृत्युशय्येवर पडलेल्या एका बाईनें मरणसमयीं गीता ऐकण्याची इच्छा दर्शविली. तेव्हां त्या बाईचा प्राण जाईपर्यंत हरिभाऊ तिच्यापाशीं गीता वाचीत बसले होते! अशी निरपेक्ष सेवा या लोकीं असामान्य आहे.

## हरिभाऊंचा स्वभाव

इन्फ्ल्युएंझाच्या सांथीच्या वेळीं हरिभाऊंनीं परिश्रम करून जें एक इन्फ्ल्युएंझा हॉस्पिटल स्थापन केलें होतें, तेथें एके दिवशीं एक कुणब्याची बाई टांग्यांत बसून आली. तिच्याबरोबर एक पोर होतें. तिच्या अंगांत खूप ताप होता व तें पोरही तापानें फणफणलें होतें. हरिभाऊ त्या वेळीं तेथेंच उभे होते. मुलाला घेऊन टांग्यांतून खालीं उतरण्याची त्या बाईच्या अंगांत ताकद नाहीं, हें पाहतांच नर्सची वाट न पाहतां हरिभाऊंनीं त्या मुलास चटकन् उचलून घेतलें. 'त्या मुलास स्पर्श कसा करूं?' असा विचार क्षणमात्रही त्यांच्या डोक्यांत आला नाहीं.

प्लेगांत गेलेल्या स्नेह्यांच्या कितीतरी कुटुंबांचा त्यांनीं वर्षानुवर्ष समाचार घेतला. परंतु 'मीं म्हणजे अमक्यासाठीं, अमुक केलें' असे उद्गार त्यांच्या मुखांतून केव्हांही बाहेर पडले नाहींत.

त्यांचा स्वभाव अत्यंत भावनाप्रधान होता. पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर कित्येक वर्षे, साखर, विडा, गादी यांचा त्यांनीं त्याग केला होता व मुलीच्या मृत्यूनंतर कित्येक दिवस तर त्यांनीं जेवणच जवळ जवळ सोडलें होतें!

वडील मंडळींच्याबद्दल त्यांना फार आदर होता. त्यांचे वडील, अण्णासाहेब, आजी, चिमामावशी व इतर मंडळी यांच्याशीं त्यांची वागणूक अत्यंत मर्यादशील असे.

त्यांचा स्वभाव फार सरळ व साधा होता, त्यामुळें ते लोकांवर साहजिक विश्वास टाकीत. ही स्वभावाची सरलता त्यांच्या भाषेंतही उतरली. त्यांची भाषा इतकी सुंदर, मनोहर, प्रसादयुक्त व साधी आहे याचें कारण त्यांचा मोहक साधा स्वभाव हेंच होय. हा साधेपणा त्यांच्या आचरणांत व पोषाखांतही दिसे. आंत एक व बाहेर एक असे डावपेंच अर्थात् त्यांनीं कधीं केले नाहींत व त्यांना ते साधलेही नसते; त्यांच्या स्वभावांत, लेखनांत, मित्रांशीं वागण्यांत व सार्वजनिक कार्यांतही सरलता हा गुण प्रामुख्यानें दृष्टीस पडतो.

त्यांचें हृदय इतकें मृदु, इतकें प्रेमळ, इतकें सरळ व उदार होतें म्हणूनच ते लहान मुलांशीं तेव्हांच समरस होत. सुंदर मुलेंच त्यांना आवडत असें नाहीं. मूल कसेंही कुरूपसुरूप असो ते त्याला प्रेमानें उचलून घेत. दुसऱ्याच्या हृदयाशीं त्यांची तन्मयता होई, म्हणूनच त्यांच्या हातून उत्कृष्ट पात्रें निर्माण होऊं शकलीं.

ते स्वाभिमानी होते, पण आढ्यताखोर नव्हते. युरोपिअन लोकांत त्यांचें वजन व दाट परिचय होता, तरी त्यांच्याशीं त्यांचें वर्तन सडेतोडपणाचें व तुटक असे.

त्यांची हांजीहांजी करणें त्यांच्या स्वप्नांतही आलें नाहीं. कारण त्यांच्यापासून स्वतःस कांहीं लाभ व्हावा अशी त्यांची कधींही इच्छा नव्हती.

त्यांच्याइतका निस्पृहपणा क्वचितच पहावयास सांपडेल. वडिलांच्या इस्टेटीची जशी त्यांनीं अपेक्षा केली नाहीं त्याचप्रमाणें कादंबरीलेखनापासून द्रव्यप्राप्तीचीही आशा केली नाहीं. सार्वजनिक कार्यांतही त्यांनीं स्वार्थासाठीं कधीं कोणाकडे हेलपाटे घातले नाहींत किंवा त्यापासून कीर्ति मिळेल अशी इच्छाही मनांत धरली नाहीं.

निश्चयाप्रमाणें वागण्याचें मनोधैर्य त्यांच्या अंगीं होतें. लहान वयांत ते विड्या ओढीत असत; परंतु एक मित्र टोंचून बोलला, तेव्हांपासून विडीला स्पर्श न करण्याची त्यांनीं प्रतिज्ञा केली व ती आजन्म पाळली. तपकीर ओढण्याची संवय लागूं लागली असें दिसतांच त्यांनीं तपकीर ओढणें सोडून दिलें. त्यांना चहा इतका आवडे, परंतु मृत्यूपूर्वी सहा वर्षे त्यांनीं चहाला स्पर्शही केला नव्हता.

ते जसे मनोनिग्रही तसेच बाणेदार होते. विद्यार्थिदशेंत अण्णासाहेबांना पत्र लिहून ‘ आपली एक कपर्दिकही मला नको, ’ असें त्यांस स्पष्टपणें कळविलें होतें. टिळक विलायतेस जाण्यापूर्वी त्यांचा जो सत्कार झाला त्या प्रसंगीं मित्रमंडळी नको नको म्हणत असतांही त्यांचें न ऐकतां हरिभाऊंनीं समारंभाचें अध्यक्षपद स्वीकारून तेथें उत्कृष्ट भाषण केलें व नागरिक या दृष्टीनें आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजाविलें. एकदां त्यांना एखादी गोष्ट पटली तर कोणाच्याही सांगण्यावरून त्यांचें त्या बाबतींत मत बदलत नसे.

इ. स. १९१८ सालीं मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिफॉर्म्स्वर ना. शास्त्री यांचें किर्लोस्कर थिएटरमध्यें व्याख्यान झालें. हरिभाऊ अध्यक्षस्थानीं होते. हरिभाऊंना रिफॉर्म्स् असमाधानकारक आहेत असें वाटत होतें. तेव्हां आपल्या पक्षांतील मंडळींच्या मतास न जुमानतां ना. शास्त्री यांच्या भाषणानंतर समारोप करतांना त्यांनीं आपलें मत स्पष्टपणें मांडून इतकें जोरदार भाषण केलें कीं, हरिभाऊंच्या कित्येक स्नेह्यांना सुद्धां त्यांनीं पक्षांतर केलें असा भास झाला. हरिभाऊंची सत्यप्रियता जाज्वल्य स्वरूपाची होती व आणीबाणीच्या प्रसंगीं ती वेळोवेळीं दृष्टोत्पत्तीस येई. म्युनिसिपालिटीच्या ड्रेनेजसंबंधीं त्यांनीं सरकारला अशीं निर्भीड व झणझणीत पत्रें लिहिलीं कीं, त्यामुळें दुसऱ्या पक्षांतील वर्तमानपत्रांनींही त्याबद्दल हरिभाऊंची मोकळ्या मनानें प्रशंसा केली.

## हरिभाऊंची योग्यता

हरिभाऊंची वागणूक सर्वांशींच सौजन्याची असे. एखादा मनुष्य विरुद्ध पक्षाचा असला तरी हरिभाऊ प्रसंग पडतांच त्याच्याशीं अत्यंत सौजन्यानें वागत. श्री. टिळक हे हरिभाऊंचे गुरु होते. राजकीय मतभेदामुळें जरी पूर्वींचा संबंध टिकूं शकला नाहीं, तरी त्यांच्या विद्वत्तेबद्दल हरिभाऊंना आदर वाटे. श्री. टिळक तुरुंगांतून सुटून आले त्या वेळीं हरिभाऊ आपल्या मित्रांच्या सांगण्याविरुद्ध त्यांना भेटावयास गेले व त्यांच्या मागील पोलिसांचा ससेमिरा कमी करण्याचा त्यांनीं अटोकाट प्रयत्न केला. एकदां टिळकांना खटला चालू असतां कांहीं कायद्यांच्या पुस्तकांची जरूरी होती. त्यांच्याच पक्षाच्या एका बड्या सरकारी नोकराकडे या पुस्तकांची मागणी करण्यांत आली. परंतु त्यांनीं ती नाकारली. ही गोष्ट हरिभाऊंना कळतांच त्यांनीं Royal Asiatic Society तून हीं पुस्तकें मिळवून त्यांजकडे पाठविलीं. त्यांचा स्वभाव शांत होता व त्यांना क्वचितच राग येई. त्यांच्याकडे कोणीही मनुष्य आला तरी त्याच्याशीं ते ममतेनें वागत. अगदीं कामांत असले तरी सुद्धां त्याची भेट घेतल्यावांचून ते त्यास परत पाठवीत नसत. या त्यांच्या स्वभावामुळें पुष्कळ लोक त्यांच्याकडून आपलीं कामें करून घेत व हरिभाऊही त्यांना मनापासून मदत करीत.

त्यांना एकलकोंडेपणा बिलकुल आवडत नसे. आजूबाजूला चार दोन मंडळी असल्यावांचून त्यांना करमत नसे. मित्रमंडळींची त्यांना विशेषच हौस होती. ते विनोदी होते, परंतु दुसऱ्याला राग येईल अशी थट्टा ते कधींही करीत नसत.

त्यांचें स्त्रीदाक्षिण्य वाखाणण्याजोगें होतें. स्त्रियांच्या उन्नतीबद्दल त्यांना खरी कळकळ होती. त्यांच्या उत्तेजनामुळेंच श्री. काशीताई कानिटकर व श्री. सौ. यशोदाबाई भट यांनीं लेखनाचे प्रयत्न करून कादंबऱ्या व गोष्टी लिहिल्या.

हरिभाऊ फार उद्योगप्रिय होते, त्यामुळेंच त्यांच्या हातून वीसपंचवीस कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. इतकेंच नव्हे, तर त्याच्याच जोडीला त्यांच्या सार्वजनिक कार्याचें क्षेत्रही जरी व्यापक होतें तरी हीं सर्व कामें ते मनःपूर्वक करीत.

कादंबरीकार या दृष्टीनें हरिभाऊंची योग्यता फार मोठी आहे. त्यांच्यापूर्वी व नंतरही त्यांच्यासारखा बुद्धिमान्, बहुश्रुत, रसिक व प्रतिभासंपन्न कादंबरीकार झाला नाहीं. इंग्रजी वाङ्मयाचें त्यांचें ज्ञान अत्युत्कृष्ट होतें. त्यांचा ग्रंथसंग्रह विपुल होता. कोणतेंही नवीन पुस्तक प्रसिद्ध होवो, हरिभाऊ तें प्रथम विकत घेऊन

वाचीत. त्यांना वाचनाचें खरोखर व्यसनच होतें. ते पदवीधर नसूनही त्यांचें वाचन व अध्ययन शेंकडों पदवीधरांना लाजविण्यासारखें होतें. हिंदुस्थानविषयक आर्थिक, औद्योगिक व राजकीय प्रश्नांचा त्यांनीं खोल विचार केला होता. पाश्चात्य राजशासनपद्धतींचा त्यांचा अभ्यास चांगला होता. पाश्चात्य तत्त्वज्ञान व इतिहास यांचें त्यांनीं बारकाईनें अध्ययन केलें होतें. इंग्रजीशिवाय जर्मन, फ्रेंच, रशियन, बंगाली, इत्यादि भाषांतील वाङ्मय त्यांनीं वाचलें होतें. प्राचीन संस्कृत वाङ्मय व जुनें मराठी वाङ्मयही त्यांनीं काळजीपूर्वक अभ्यासिलें होतें.

तेजस्वी मनोवृत्ति, सूक्ष्म निरीक्षणशक्ति, विद्वत्ता, विस्तृत वाचन, मोठा प्रवास, हृदयाची उदारता, सहानुभूति व भाषाप्रभुत्व इत्यादि उत्कृष्ट कादंबरीकारास आवश्यक असणारे गुण हरिभाऊंच्यांत होते. डिकन्स, थॅकरे, स्कॉट यांच्या बरोबरीचे कादंबरीकार हरिभाऊ निःसंशय होते. अलीकडे अलीकडे श्री. वामन मल्हार जोशी व श्री. ना. सी. फडके हे आधुनिक कादंबरीकारांत पुढें येऊं पहात आहेत; परंतु गुणांच्या व त्याचप्रमाणें ग्रंथसंपत्तीच्या दृष्टीनें अजूनही महाराष्ट्रीय कादंबरीकारांत हरिभाऊंचा मान पहिलाच आहे.

त्यांचे लेखनाचे कित्येक बेत अपूर्णच राहिले. शेक्स्पिअरच्या सप्तपद्यांचें त्यांनीं सुरू केलेलें भाषांतर अपुरें राहिलें. नारायणराव पेशव्यांच्या वधावर कादंबरी लिहिण्याचा त्यांचा बेत होता. महाभारताचा उपसंहार लिहिण्याचें काम अर्धवटच राहिलं. आत्मचरित्र लिहिण्याचा त्यांचा विचार होता, परंतु तेही लिहून झालें नाहीं.

हरिभाऊ हे श्रेष्ठ दर्जाचे वाङ्मयसेवक होते. राजकीय व सामाजिक चळवळींत भाग घेऊन त्यांनीं चांगली कामगिरी केली. सार्वजनिक कार्याचें त्यांचें क्षेत्र विशाल होतें. सामाजिक, राजकीय, धार्मिक, शिक्षणविषयक, इत्यादि बाबतींतही त्यांचें कार्य वाखाणण्यासारखें आहे. त्यांची देशभक्ति श्रेष्ठ दर्जाची होती. या सर्व गोष्टींत जरी ते थोर होते, तरी व्यक्ति म्हणून त्यांची योग्यता सर्वांत अधिक आहे. पुत्र, पति, पिता, मित्र, आप्त, नागरिक इत्यादि सर्व दृष्टींनीं त्यांनीं आपलें कर्तव्य उत्कृष्ट रीतीनें बजावलें आणि यांतच त्यांच्या जीवनाचें खरें रहस्य आहे. कारण, **' Man is really greater than his work. '**

---

## प्रकरण एकविसावें

# जीवनस्मृति

चरित्राची परिपूर्तता चरित्रनायकाच्या समकालीनांचे स्मृतिशेष संकलित स्वरूपांत एकत्र दिल्याशिवाय होऊं शकत नाहीं. कारण चरित्र लिहितांना चरित्रकाराला जें एक सूत्र कायम ठेवावें लागतें, त्यामुळें विविध स्वरूपाच्या आठवणींचा समावेश चरित्रांत त्याला करतां येत नाहीं. परंतु चरित्र-नायकाची सर्वांगीण बाजू चरित्रांत चर्चिली जाणें तितकेंच अवश्य आहे. चरित्रकाराच्या वैयक्तिक मताचा सूर कसाही वाहो, तत्सदृश किंवा तद्विरुद्ध ध्वनि चरित्रनायकाच्या समकालीनांच्या आठवणींतून निघाल्यास त्रयस्थ वाचकास त्यापासून फायदाच होण्यासारखा आहे. त्यासाठीं चरित्राची पूरणिका म्हणून हरिभाऊंची ' जीवनस्मृति ' निरनिराळ्या आठवणींच्या स्वरूपांत लिहिली आहे.

**तैलपूरक जोशीबुवा!**

हरिभाऊ डेक्कन कॉलेजमध्यें असतां जोशी नांवाचा सातारचा विद्यार्थी त्यांच्या खोलींत रहावयास आला. त्यांच्या पलीकडच्या खोलींत समर्थ व पानसे रहात होते. जोशीबोवांची बावळी मुद्रा पाहून 'हें सावज ठीक आहे' असा या 'Popular' मंडळींनीं कयास बांधला. जोशीबुवा अभ्यास करतांना व रिकाम्या वेळांतही त्यांच्या समजुतीनें उत्तम, परंतु खरोखर अश्राव्य ताना मारीत! कांहीं दिवस गेल्यावर हरिभाऊंनीं त्यांना विचारिलें, ' जोशीबुवा, खरंच सांगा, तुम्ही गायनसमाजांत किती वर्षे होतां?' 'छे हो, मी गायनसमाजांत कधींच नव्हतों', जोशीबुवांनीं उत्तर दिलें. ' तुम्ही खोटं बोलतां. गायनसमाजांत जात नव्हतां, तर बाळकोबा नाटेकरांसारख्या ताना कशा येतात?' हरिभाऊंनीं गंभीरपणानें त्यांस विचारलें.

' येतात खऱ्या, त्याला मी काय करूं ? ' असें जोशीबोवांचें उत्तर येतांच हरिभाऊंचें काम झालें.

संध्याकाळच्या बैठकींत हरिभाऊंनीं जोशीबुवांस मुद्दाम बोलावून आणून गाणीं म्हणण्याचा आग्रह केला. त्याबरोबर फुशारून जाऊन एकामागून एक आपल्या आवडत्या चिजा त्यांनीं मंडळींत म्हणून दाखविल्या, तेव्हां एकसारखा हंशा, वन्समोअरचा तडाका व टाळ्यांचा कडकडाट सुरू झाला. विशेषतः सर्व चिजांत जोशीबुवांच्या हरिणीवृत्तांतील श्लोकावर टाळ्यांचा जोराचा गजर होऊन ' हरिणी-वृत्तांत श्लोक म्हणावा तर जोशीबुवांनींच ' असें जो तो म्हणूं लागला. ' जोशीबुवा म्हणजे प्रति नाटेकर ! ' असें मंडळी त्यांच्या तोंडावर म्हणूं लागली. क्लबाच्या फीस्ट्स्च्या वेळीं गायनाचीं त्यांना आमंत्रणें येऊन हरिणीवृत्तांतील श्लोक म्हणण्याचा मंडळी अत्यंत आग्रह करीत. त्या वेळीं अर्थात् हरिभाऊ आदिकरून ' पॉप्युलर ' कंपूंतील मंडळीस निमंत्रणें यावयाचींच.

एकदां तर 'आम्ही मृच्छकटिक नाटक स्टेजवर करणार आहोंत; तुम्ही उत्कृष्ट गाणारे, तेव्हां तैलपूरकाचा पार्ट घेऊन तुम्ही जर त्याचे हरिणीवृत्तांतील शोकपूर्ण चार श्लोक म्हणाल तर बहार उडून जाईल, ' असें हरिभाऊंनीं व त्यांच्या कंपूंतील मित्रांनीं जोशीबुवांना म्हटलें. त्यांना आनंद होऊन त्यांनीं तैलपूरकाचा पार्ट घेण्याची कबुली दिली. तेव्हां मंडळींनीं जोशीबुवांकडून हुंदके आणआणवून तैलपूरकानें वसन्तसेना मरण पावली त्या वेळीं म्हटलेले हरिणीवृत्तांतील श्लोक म्हणवून घेतले. आठ पंधरा दिवस सर्व कॉलेजांत जोशीबुवांच्या देखत नाटकाची चर्चा चाले व मागाहून मंडळींत खो खो हंशा होई. कांहीं दिवसांनीं वसन्तसेनेचा पार्ट घेणारा विद्यार्थी आजारी असल्यामुळें प्रयोगाचा बेत रद्द करावा लागला, असें जाहीर करण्यांत आलें, तेव्हां जोशीबुवा ऊर्फ तैलपूरक अत्यंत कष्टी झाले. जोशीबुवा पांच-वर्षांपूर्वी वारले; परंतु हरिणीवृत्ताबद्दल कॉलेजांत आपली थट्टा होत असे याचा त्यांना गंधही नव्हता !

**केळ्या लास्ट !**

हरिभाऊंच्या वेळीं ' Popular ' प्रमाणें 'केळ्या' ही संज्ञा सुरू होऊन ती पुढें बरेच दिवस कॉलेजांत राहिली. त्या वेळचे हल्लीं वृद्धावस्थेंत असलेले डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी अजूनही सहज बोलतां बोलतां अमुक अमुक ' केळ्या ' आहे असें म्हणतात.

न्यू इंग्लिश स्कूलमध्यें श्री. नंदर्गीकर म्हणून संस्कृत शिक्षक होते. त्यांचा खाजगी क्लासही असे. हरिभाऊंचे बरेच मित्र या क्लासाला जात. 'मॅट्रिकमध्यें संस्कृतांत माझा पहिला नंबर येऊन मला ९८ मार्क मिळाले. रामकृष्णा भाण्डारकर हा माझा पेपर पाहून थक्क झाला. परंतु काय उपयोग? गणितांत १० मार्क! नापास झालों! आमचा मास्तर आबाजी काथवटे माझ्या इंग्रजी निबंधावर खूष होत असे. युरोपिअन हेडमास्तरसुद्धां माझी किंमत ओळखीत होता. पण गणितानें दगा दिला.' वगैरे गोष्टी अनेकवार निरनिराळ्या प्रसंगीं घरीं व क्लासांत नंदर्गीकर आपल्या शिष्यवर्गास सांगत. गोष्टी सांगतांना 'मी पहिला होतों व केळ्या (केळकर—हे पुढें मोठे पगारी अंमलदार झाले) लास्ट होता,' ही गोष्ट विशेष जोरानें ते प्रत्येक वेळीं सांगत. नंदर्गीकरांविषयीं कॉलेजच्या कंपूंत गोष्ट निघाली, तेव्हां त्यांच्या व केळ्याच्या ठराविक नंबराची मौज हरिभाऊंनीं सांगितली. तेव्हां मंडळींत गंमत उडाली. तेव्हांपासून कोणी आपली प्रौढी सांगूं लागला कीं, 'केळ्या लास्ट आहे' असें मंडळी म्हणत. पुढें 'केळ्या लास्ट' या संज्ञेचा संक्षेप होऊन 'केळ्या' हाच शब्द उरला व घमेंडखोर विद्यार्थ्यास 'केळ्या' ही पदवी देण्यांत येऊं लागली. 'तो गणिताचा केळ्या; अमुक टेनिसमध्यें केळेगिरी करतो.' अशा धर्तीचे वाक्प्रयोग हरिभाऊंच्या कंपूंत सुरू झाले. 'केळया' हा शब्द त्या काळीं कॉलेजांत इतका बोकाळला होता कीं, त्यामुळें सदर कंपूस कॉलेजांतील इतर मंडळींनीं 'शककर्ते' ही संज्ञा नजर केली होती.

## अधांत्रीं मेणबत्ती!

प्रोफेसर अण्णासाहेब विजापूरकर हरिभाऊंच्या वेळीं डेक्कन कॉलेजांत होते. कोणीं थट्टा, विनोद केला तर अण्णांना राग न येतां उलट मंडळीबरोबर हंसण्यास ते तयार असत. अण्णांचा वर्ण बराच काळा होता. वर्णाच्या बाबतींत बक्षी नांवाचा एक विद्यार्थी अण्णांना प्रतिस्पर्धी होता. पहिला नंबर कोणास द्यावा याबद्दल हरिभाऊ, समर्थ व पानसे या तिघांत कडाक्याचा वाद होई. परंतु अखेर एकमत न झाल्यामुळें हा प्रश्न सोडविण्याचें काम त्यांनीं पुढील पिढीवर सोंपविण्याचें ठरविलें. हा ठराव त्या उभयतांस कळविण्यास मंडळी चुकली नाहींत!

एकदां अण्णा रात्रीं साडेदहाच्या सुमारास अंधारांतून मेणबत्तीचा दिवा हातांत घेऊन आपल्या खोलीकडे येत होते. हरिभाऊ व एक दोन विद्यार्थी बाहेरच उभे

होते. अण्णांना पाहतांच हरिभाऊंनीं व त्यांच्याबरोबरच्या इतर मित्रांनीं 'अरे, भूत ! भूत ! मेणबत्ती अधांत्रींच चालली आहे !' अशी आरोळी ठोकली. या आरडाओरडीनें बहुतेक मंडळी बाहेर आली. वस्तुस्थिति कळतांच हंशा उडाला व बारा वाजेपर्यंत शांतता झाली नाहीं. हा अधांत्रीं मेणबत्तीचा विषय कॉलेजांत बरेच दिवस चालू होता. हरिभाऊंच्या या कॉलेजकर मित्रमंडळींच्या कंपूंत नेहमीं अशा प्रकारचे निरनिराळे गमतीचे प्रकार चालत.

**पैज जिंकली !**

एकदां कॉलेजांत असतां हरिभाऊ व डॉ. गर्दे यांचे बंधु यांनीं पाणी पिण्याची पैज लावली. मारे, एकएकजण चढाओढीनें पाण्याचीं भांड्यांवर भांडीं पिऊं लागले ! गर्दे नऊ भांडीं पाणी प्यायले तर हरिभाऊ दहा भांडीं प्यायले. हरिभाऊंनीं पैज जिंकली !

**दि ग्रेट डायनर-आऊट !**

हरिभाऊंना मित्रांना आपल्या घरीं जेवायला बोलाविण्याचा व त्यांच्या घरीं जेवायला जाण्याचा नाद होता. त्यांचे परम मित्र कै. कृष्णाजी केशव गोखले त्यांस 'The Great Diner-out' असें विनोदानें म्हणत.

**माधवरावांचे धन्योद्गार !**

एकदां श्री. महादेव हरि मोडक भेटावयास गेले असतां, हरिभाऊ त्यांना 'आजकालच्या गोष्टीं'पैकीं मुलें खर्डे लिहीत बसल्याचा जो भाग आहे तो वाचून दाखवीत होते. तेथें जवळच माधवराव आपटे—त्यांचे चुलते—यांचें आलेलें इंग्रजी पत्र पडलें होतें. त्यांतील मजकूर त्यांनीं वाचून दाखविला. त्यांचा सारांश असाः—'मला पुत्र नाहीं, तथापि माझ्या आत्मीयांत तुजसारखा मुलगा झाला म्हणून धन्यता वाटते. तूं पुस्तकें मागितलींस तीं मुंबईंत मिळत नाहींत. तथापि तीं भूपृष्ठावर कोठेंही असोत, प्रयत्नसाध्य मात्र असलीं पाहिजेत, म्हणजे मी तीं तुला मिळवून देईन.'

**नवे वाक्प्रचार**

श्री. महादेव हरि मोडक यांनीं त्यांना एकदां विचारलें, 'हरिभाऊ, तुम्ही आपल्या लेखनांतही नवीन नवीन वाक्प्रचार पाडतां, 'तो उत्तरला,' यासारखे नामधातु प्रचारांत आणितां हें कसें काय ?' त्यावर हरिभाऊंनीं एकच उत्तर दिलें, 'मला

योग्य वाटतें तें मी करतों. मला माझ्या कृतीचा अभिमान नाहीं व लोकांना ती रुचली नाहीं तरी खेद नाहीं. ' Survival of the fittest ' या कायद्याप्रमाणें माझे कृतीचा निर्णय भविष्यकाल ठरवील, असें समजून मी शांत आहें.'

## ' तुका म्हणे 'ची मौज !

एकदां बायबलमधील Psalms चें त्यांनीं अभंगांत भाषान्तर केलें. प्रत्येक अभंगांत ' तुका म्हणे ' हें पालुपद होतें. हे अभंग त्यांनीं श्री. आजगांवकर व श्री. पांगारकर यांना दाखवून म्हटलें, ' हे तुकारामाचे अभंग आहेत. ' ते इतके सरस होते कीं, ते तुकारामाचे नव्हेत असें कोणास वाटेना. नंतर एके दिवशीं श्री. वासुदेवराव आपटे यांजपाशीं सारी मौज सांगून ते म्हणाले, ' हे केव्हां लिहिले ठाऊक आहे का? पहांटे तीन वाजतां उठून, पायांत चाळ बांधून, चिपळ्या घेऊन नाचतांना ही स्फूर्ति झाली ! '

## गणेशखिंडीचा गणपति !

श्री. वासुदेवरावांचा गणपति नांवाचा पुतण्या आठ वर्षांचा होता. त्याला हरिभाऊंनी विचारलें, ' काय रे? गव्हर्नरसाहेब कोठें आहेत?' त्याला कांहीं कळेना. तो अगदीं भांबावून गेला! तो काय उत्तर देणार? वासुदेवराव व इतर मंडळी हरिभाऊंच्या तोंडाकडे पाहूं लागली. तेव्हां ते म्हणाले, ' अरे, गणेश-खिंडींतच आहेत का?' तेव्हां सर्व उलगडा होऊन मंडळी हंसूं लागली. कारण या गणेशाच्या दांतांमध्येंही खिंड पडली होती!

## उक्ति तशी कृति !

' सार्वजनिक कार्यांत पडून तीं कामें उत्तम रीतीनें करणें हीच खरी देशभक्ति ', असें हरिभाऊ म्हणत. ' वाङ्मयाचा प्रान्त सोडून सार्वजनिक कार्यांत तुम्ही पडत जाऊं नका,' असें श्री. वासुदेवराव आपटे त्यांस म्हणाले, तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें, ' मी आपल्या कादंबऱ्यांतून सार्वजनिक कार्य करण्याबद्दल जोरानें प्रतिपादन केलें असतां स्वतः तसें आचरण करूं नको तर काय करूं? तें नाहीं व्हायचें! '

## ओझ्याचें गाढव!

हरिभाऊ पुणें म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाल्यानंतर दोनतीन दिवसांनीं श्री. काशीताई कानिटकर त्यांच्याकडे गेल्या; तेव्हां राधाकाकू तेथें होत्या. काशीताईंस मोठ्या आनंदानें त्यांनीं म्हटलें, ' बंधुराज कोण झाले तें कळलं का? '

त्यावर हरिभाऊ म्हणाले, ' अग अग ! त्यांना कांहीं सांगू नकोस. ' काशीताईनीं त्यावर म्हटलें, 'अशा कामांत पडून तुम्ही खरोखरीच वाङ्मयाचें नुकसान करीत आहांत.' हरिभाऊंना गाढव हा प्राणी फार प्रिय होता. त्याच्या अंगावरून हात फिरवायला सुद्धां ते मागेंपुढें पहात नसत. सार्वजनिक कार्यांत हरिभाऊ पडल्यानंतर काशीताई त्यांना केव्हां केव्हां म्हणत, ' तुम्ही आतां मात्र ओझ्याचे गाढव झालां आहांत ! नाहीं तरी तो तुमचा आवडताच प्राणी आहे. '

## अनुकरण होऊं लागलें

कोणी मनुष्य फार मोठा व लोकप्रिय झाला कीं त्याचें बारीकसारीक गोष्टींत सुद्धां अनुकरण केलें जातें. हा मनुष्यस्वभाव आहे. हरिभाऊंच्या सारख्या लोक-विख्यात कादंबरीकाराचेंही अनुकरण केलें जावें यांत नवल कसलें ? कित्येक लोक पुढें पुढें हरिभाऊंच्या पोषाखाचें अनुकरण करीत. कोणी त्यांच्याप्रमाणें रस्त्यांतून हातांत वर्तमानपत्र घेऊन वाचीत जात, कोणी एका रुमालाचे दोन रुमाल करून बांधीत, कोणी त्यांच्यासारखा कोट घालीत, तर कोणी त्यांच्याप्रमाणें उपरण्यास रजा देत.

## विवाह-विभ्राट !

कलकत्त्याच्या कॉंग्रेसला हरिभाऊ गेले असतां स्टार थिएटरमध्यें सुप्रसिद्ध नट अमृतलाल बोस यांचें काम पहावयास गेले. नाटकाचें नांव ' विवाह-विभ्राट ' असें असून त्यांत सुधारणेची फार टवाळी केली होती, ती सहन न होऊन हरिभाऊंनीं तेथल्या तेथें इंग्रजींत भाषण करून नाटकावर कडक टीका केली. त्यामुळें बंगाली बाबूंत फार खळबळ उडाली व बोलाचाली होऊन, कांहीं वेळपर्यंत, नाटक बंद पडलें !

## स्त्रीवाचक शब्दांवर बहिष्कार

हरिभाऊंना कोणाची निंदा केलेली कधीं खपत नसे. विशेषतः स्त्रियांसंबंधीं कोणीं अनुदार उद्गार काढले कीं, त्यांचें पित्त भडकून जाई. त्याचप्रमाणें उगीच फाजील शिष्टपणा करणें हेंही त्यांस आवडत नसे. एकदां त्यांचेकडे असेंच आत्यंतिक शिष्टपणाचा आव घालणारे एक स्नेही आले होते. स्त्रियांचें नांवसुद्धां काढणें त्यांना खपत नसे. इतकेंच नव्हे, तर स्त्रीवाचक शब्दही त्यांना चालत नसत. एकदां त्यांची खोड मोडण्यासाठीं हरिभाऊंनीं श्री. पानसे व श्री. वासुदेवराव आपटे यांना अनुकूल करून घेतलें व ' बाई, ' ' दोघें, ' ' जोडपें ' वगैरे शब्द कोणीं उच्चारला कीं,

दुसऱ्यानें त्या गृहस्थाच्या देखत त्याला मारावयाचें असा बेत ठरला. त्या तिघांनीं मिळून हें नाटक इतक्या उत्तम तऱ्हेनें पार पाडलें कीं, तो गृहस्थ 'हें काय?' 'हें काय?' असें सारखें विचारूं लागला. खरी गोष्ट कळतांच तो वरमला. तेव्हांपासून त्याची खोडच जिरली.

## अश्लीलतेची चुणूक !

एका शिमग्यांत हरिभाऊंचे एक स्नेही त्यांजकडे आले. ते विनोदी होते; परंतु त्यांच्या विनोदाचा कल अश्लीलाकडे केव्हां केव्हां झुके. खालीं पोरें रस्त्यानें अचकटविचकट गाणीं म्हणत चाललीं होतीं. तीं गाणीं ऐकून या गृहस्थांना स्फूर्ति होऊन तेही तसलींच गाणीं म्हणूं लागले. हरिभाऊंच्या निकट स्नेह्यांपैकीं ते होते. अर्थात् हरिभाऊ त्यांना म्हणाले, 'पुरे करा आतां आपलं शहाणपण!' परंतु त्यामुळें त्यांना अधिकच चेव येऊन ते म्हणाले, 'तुम्हांला काय माहीत आहे ? मला किती छान छान लावण्या येतात, पहा.' त्यावर हरिभाऊंनीं त्यांस म्हटलें, 'असेंच जर तुमचें म्हणणें असेल तर तुमच्यापेक्षांही अत्यंत अचकटविचकट लावण्या मी म्हणून दाखवितों.' असें म्हणून त्यांनीं एक लावणी खरोखरच म्हटली व म्हणाले, 'तुम्हांला काय वाटतें ? अश्लील आम्हांला ठाऊक नाहीं ? पण आम्हांला सर्व माहीत असूनही आम्ही सभ्यतेनें वागतों आणि तुम्ही वागत नाहीं, हाच तुमच्या आमच्यांतला फरक.' हरिभाऊंच्या या उद्गारांनीं तो गृहस्थ अगदीं जिरला! हरिभाऊंच्या तोंडून अश्लील शब्द असे प्रथम त्याच वेळीं बाहेर पडले असें त्यांचे मित्र सांगतात.

## हरिभाऊंचा तोतया

हरिपंत नांवाचा एक इसम 'करमणुकींत सर्वच लेख आपण लिहितों' असें सांगत फिरे. तो हरिभाऊंच्यापासून वारंवार पैसे नेई व हरिभाऊही त्याला मदत करीत. तो कांहीं दिवस आनंदाश्रमांत जेवीतही होता. तो हरिभाऊंशीं अगदीं बरोबरीच्या नात्यानें वागे व त्यांचे कपडेसुद्धां वापरी. एकदां हरिभाऊंचा कोट घालून हरिपंतांची स्वारी बाहेर निघून गेली. इकडे हरिभाऊंनीं तो कोट शोध शोध शोधला, परंतु तो सांपडला नाहीं. तेव्हां त्यांचें मन किंचित् खट्टू झालें. पुढें हरिपंतांच्या अंगांत त्यांनीं तो कोट पाहिला. तेव्हां ते म्हणतात, 'कायरे, हा कोट तूं केव्हां केलास?' तेव्हां त्यानें सर्व हकीकत सांगितली. त्यावर हरिभाऊंनीं विचारलें, 'अरे, पण माझे कपडे तूं काय म्हणून वापरतोस?' तेव्हां तो निर्लज्जपणें म्हणाला, 'तुम्ही एका

वेळीं एकच कोट वापरणार! मग बाकीचे कपडे पडूनच राहतात. तेव्हां त्यांतला मी एखादा वापरला म्हणून काय झालें?' तेव्हां हरिभाऊंनीं या मनुष्याची चांगलीच खरडपट्टी काढली. परंतु असें झालें तरी त्याला मदत करणें सोडलें नाहीं!

## हरिश्चन्द्र नाटक

हरिभाऊंचें मन अत्यंत कोवळें होतें. एकदां बालीवाला थिएटरमध्यें बालीवाला कंपनीचें 'हरिश्चंद्र' नाटक होतें. स्वतः बालीवाला हा उत्कृष्ट नट म्हणून नांवाजलेला होता. तेव्हां दामुअण्णा कुलकर्णी व श्री. वासुदेवराव आपटे यांनीं त्या नाटकास येण्याबद्दल हरिभाऊंना अत्यंत गळ घातली. परंतु त्यांनीं येण्याचें नाकारलें. तेव्हां त्यांना चिडविण्यासाठीं वासुदेवराव मुद्दाम म्हणाले, 'आपण कांहीं तरी इतरांच्या पेक्षां निराळं करावं अशी लहर तुम्हांला आतां आली आहे काय?' त्यावर हरिभाऊ म्हणाले, 'अहो तसं नाहीं. खरं सांगूं तुम्हांला? मला कीं नाहीं हरिश्चन्द्राचे विश्वामित्रानं केलेले हाल बिलकूल पाहवत नाहींत. माझं अन्तःकरण विदीर्ण होतं! एवढयाच कारणास्तव मी येत नाहीं; दुसरं कांहीं नाहीं.' अर्थात् यानंतर वासुदेवरावांनीं त्यांना आग्रह केला नाहीं; आणि खरोखरच त्या नाटकांतील प्रसंग अत्यंत हृदयद्रावक होते. दामुअण्णा तर एकसारखे डोळे पुशीत होते!

## काय म्हातारडीं आहेत?

हरिभाऊंना वृद्ध मंडळींच्याबद्दल फार आदर वाटे. एकदां आपल्या एका मित्रास बरोबर घेऊन ते नेटिव्ह जनरल लायब्ररींत गेले होते. तेथें बरीच वृद्ध मंडळी जोर-जोरानें वादविवाद करीत बसली होती. त्या गोंगाटामुळें वाचनाकडे बिलकुल लक्ष लागेना. म्हणून तो स्नेही हरिभाऊंच्याकडे वळून रागानें म्हणाला, 'काय म्हातारडीं आहेत पहा! त्यांना कांहीं भान आहे का आपण काय करतों आहोंत आणि कुठं आहोंत याचं!...मला वाटतं यापुढं असा नियम केला पाहिजे कीं, अमुक एका वयानंतर कोणालाही लायब्ररीचा मेंबर होतां येणार नाहीं.' त्यावर हरिभाऊ त्यांची बाजू घेऊन समर्थन करूं लागले. हरिभाऊ थट्टेनेंच बोलत आहेत असें वाटून तो स्नेही पुनः म्हणाला 'नाहीं तर काय? यांचा मला इतका राग येतो कीं, यांना आतांच्या आत्तां धक्के मारून येथून बाहेर काढावं असं मला वाटतं!' तें ऐकून हरिभाऊ इतके रागावले कीं, तो मित्र जर कां आणखी एकादा शब्द पुढें बोलता तर त्यांनीं त्याला यथास्थित चोपलेंच असतें!

### सालूबाईमालूबाईंच्या गोष्टी

हरिभाऊ ना. गोखले यांच्याकडे एकदां सकाळीं गेले असतां १०॥ वाजले. रोजची जेवणाची वेळ झाली म्हणून लवकर घरीं जाण्यासाठीं चुळबुळ करूं लागले. तेव्हां गोखले थट्टेनें त्यांस म्हणाले, " बसा हो, घरीं जाऊन काय करणार आहांत ? त्याच सालूबाईमालूबाईच्या गोष्टी लिहिणार ना ? आम्हांला नाहीं कांहीं त्यांत विशेष वाटत. बसा."

### शेलीचा चंडोल

Shelly च्या To a Skylark या कवितेचें हरिभाऊंनीं पद्यांत भाषांतर केलें होतें. एकदां बरोबर वाटलें नाहीं म्हणून दुसऱ्यांदां, तेंही बरोबर झालें नाहीं म्हणून तिसऱ्यांदां, असें त्यांनीं सहा वेळ भाषांतर केलें; तरी त्यांचें समाधान झालें नाहीं. यावरून हरिभाऊंची चिकाटी व कामाची पद्धति कशी होती हें सहज समजतें.

### मेकर ऑफ् एम्.एज्.

एका खटल्यांत हरिभाऊंना साक्षीदार म्हणून बोलाविण्यांत आलें होतें. हरिभाऊ पदवीधर नव्हते, तेव्हां त्यांनीं केलेला अर्थ बरोबर नसावा असें दर्शविण्यासाठीं उलट बाजूच्या वकिलानें हरिभाऊंना मुद्दाम प्रश्न केला,—' Are you an M. A. ?' ( तुम्ही एम्. ए. आहांत काय ? ) हरिभाऊंनीं उत्तर दिलें ' I am the maker of M. A.'s ( मी एम्. ए. लोक तयार करणारा आहें. ) त्याबरोबर कोर्टांत हंशा झाला. जज्जसाहेब हंसूं लागले व वकीलसाहेबांचें तोंड गोरेंमोरें झालें !

### कश्मला किंवदन्ती

श्री. टिळक यांना शिक्षा झाली तेव्हां हरिभाऊ नामदार गोखले यांचे पक्षपाती असल्यानें त्यांनीं पेढे वांटले, अशी ' कश्मला किंवदन्ती ' पसरली होती. त्यासंबंधीं हरिभाऊंचे स्नेही श्री. महादेव हरि मोडक यांनीं हरिभाऊंना प्रश्न केला, तेव्हां ते म्हणाले, ' बोलणाराच्या तोंडाला हात लावावा कोणीं ? माझा मतभेद असला तरी मी टिळकांचे विपत्तीनें सुखी होणारा अधम गुरुद्रोही शिष्य असेन असं तुला वाटतं काय ?' त्यावर मोडकांनीं उत्तर दिलें, ' कसं वाटेल ?'

### सिद्ध करून दाखवा

टिळकांना शिक्षा झाली, म्हणून हरिभाऊ आणि त्यांचा कंपू यांनीं पेढे वांटले, या गप्पेचा परिणाम फार दूरवर झाला. त्यानंतर लौकरच हरिभाऊ म्युनिसि-

पालिटीच्या निवडणुकीस उभे राहिले होते. तेव्हां राष्ट्रीय पक्षाच्या लोकांनीं वरील पेढे वांटण्याची हकीकत छापून हस्तपत्रकें वाटलीं व असेल नसेल तो नीचपणा त्यांच्या माथीं मारिला. तेव्हां हरिभाऊंनीं राष्ट्रीय पक्षांतील आपल्या कांहीं स्नेह्यांना घरीं बोलावून आणून खरी वस्तुस्थिति सांगितली. श्री. गोपाळराव साने यांचे बंधु मॅट्रिक्युलेशनमध्यें पास झाले म्हणून मंडळींनीं त्यांच्याकडून पेढे आणविले. पेढे आणले त्याच वेळीं टिळकांना शिक्षा झाल्याची बातमी आली. या गोष्टीचा लोक विपर्यास करतील अशी खात्री होती; म्हणून हरिभाऊ पेढे आणण्याच्या बेताविरुद्ध होते. हरिभाऊ म्हणाले, ‘ मीं पेढे आणण्यास खरोखरी मोडता घातला ही गोष्ट जगांतल्या वाटेल त्या पंचांपुढें सिद्ध करून दाखवितों. नाहीं तर तुम्ही तरी सिद्ध करून दाखवा. तुम्हीं सिद्ध केलेंत तर वाटेल ती शिक्षा भोगावयास मी तयार आहें. पाहिजे तर मीच शिक्षा Propose करतों. तुम्ही सिद्ध करून दाखविलेंत तर भरादिवसां मी नरकाची पाटी डोक्यावर घेऊन बुधवार चौकांत उभा राहीन.’ राष्ट्रीय पक्षांतील हरिभाऊंचे स्नेही कांहींही न बोलतां चालते झाले. परंतु तें हस्तपत्रक खोटें आहे असें कांहीं त्यांच्याच्यानें जाहीर करवलें नाहीं!

### तुमचे गुरूच शोभतात!

पुढें टिळक सुटून येऊन त्यांनीं गीतारहस्य प्रसिद्ध केलें. त्यांनीं त्याची एक प्रत भेट म्हणून हरिभाऊंनाही पाठविली होती. एकदां श्री. महादेव हरि मोडक आनंदाश्रमांत गेले असतां त्यांनीं हरिभाऊंच्या हातांत गीतारहस्य पाहिलें. त्या ग्रंथाकडे पहात हरिभाऊंनीं म्हटलें ‘ What an erudite essay this गीतारहस्य!’ त्यावर मोडकांनीं हंसून उत्तर दिलें, ‘ एवढी विद्वत्ता ज्याच्या अंगीं नसेल तो तुमच्यासारख्या शिष्यांच्या गुरुपदीं शोभेलच कसा? ’ हरिभाऊ विचार करून म्हणाले, ‘ बरोबर आहे. विद्वत्ता मोठी यांत शंकाच नाहीं.’

### टाका मेजवानी!

श्री. शंकर गणेश लवाटे हे Temperance च्या चळवळींत होते. तेव्हां हरिभाऊ Excise Committee च्या सल्लागार मंडळाचे सभासद असल्यानें श्री. लवाटे यांना त्यांच्याकडे वरचेवर जावें लागे. एकदां अशी गंमत झाली कीं, याच विषयासंबंधीं बोलतां बोलतां श्री. लवाटे त्यांना म्हणाले, ‘तुमच्यासारख्या सरकारी दरबारी लोकांच्या हातून कांहींसुद्धां या बाबतींत होणार नाहीं.’ तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें,

‘ तुमच्या या बाबतींत काय मागण्या आहेत, त्या तर कळूं देत.’ तेव्हां लवाटे त्यांना म्हणाले, ‘ हल्लीं गुत्ते उघडे राहण्याची वेळ रात्रीं १०॥ पर्यंत आहे, ती आठांवर आणून ठेवा. ’ तेव्हां बरीच भवति न भवति होऊन असें ठरलें कीं, यांत ज्या पार्टीला अपयश येईल त्यांनीं दुसऱ्या पार्टीच्या लोकांना मेजवानी द्यावी. ती गोष्ट दोघांनाही मान्य झाली. पुढें हरिभाऊंनीं जोराची खटपट करून १०॥ ची वेळ ८॥ वर आणली व रविवारीं ‘ गुत्ते बंद ठेवावेत ’ असा हुकूम आणला व लागलीच श्री. लवाटे यांना भेटून सांगितलें, ‘तुमचे आठ जरी नाहीं तरी साडेआठ व रविवारची Contract मध्यें नसलेली सुट्टी यांचा हिशेब केला तर तुमचें म्हणणें जवळ जवळ आम्ही यशस्वी करून दाखविलें आहे. अक्षरशः नसेल, पण नैतिक जय आमचाच आहे; हें तुम्ही कबूल केलें पाहिजे.’ त्यावर लवाटे म्हणाले, ‘नैतिक जय तुमचाच आहे. ’ तेव्हां हरिभाऊ म्हणतात, ‘ मग टाका आतां मेजवानी! ’ अर्थात् कबूल केल्याप्रमाणें श्री. लवाटे यांनी हरिभाऊंना मेजवानी दिली.

## पत्रं आहेत, पण पाकिटं ?

ना. गोखल्यांनी मोर्ले यांच्या कानाशीं लागून टिळकांना तुरुंगांत घातलें, हा प्रवाद त्या वेळीं बराच पसरला होता. तेव्हां त्याच्या निराकरणार्थ हरिभाऊंनीं किसनदास विष्णुदास यांच्या मध्यस्थीनें श्री. शिवरामपंत परांजपे यांस त्यांचे दुकानीं बोलावून घेतलें व त्या टिकाणीं बोलतां बोलतां हा प्रश्न काढला. हरिभाऊ त्यांना म्हणाले, ‘ गोखल्यांची तर अशीं पत्रें येत आहेत कीं, ही दडपशाही योग्य नाहीं, त्यामुळें असंतोष वाढत जाईल. ती नाहीशी व्हावी याबद्दल मी येथें खटपट करीत आहें; आणि तुम्ही लोक गोखल्यांच्यावर नानातऱ्हेचे भलभलते आरोप करतां हें चांगलं का ? ’ तेव्हां शिवरामपंत म्हणाले, ‘कुठं आहेत तीं पत्रं ? ’ हरिभाऊंनीं त्यांना गोखल्यांचीं पत्रें दाखविलीं. तीं वाचून पाहून शिवरामपंत विचारतात, ‘ पत्रं आहेत, पण या पत्रांचीं पाकिटं कुठें आहेत ? ’ हरिभाऊ कांही न बोलतां उठून चालते झाले !



## वाङ्मयसूची

### कै. श्री. हरि नारायण आपटे यांचे ग्रंथ

#### सामाजिक कादंबऱ्या

१. मधली स्थिति
२. गणपतराव ( अपूर्ण )
३. पण लक्षांत कोण घेतो?
४. यशवंतराव खरे
५. मी
६. जग हें असें आहे
७. भयंकर दिव्य
८. आजच ( अपूर्ण )
९. मायेचा बाजार
१०. कर्मयोग ( अपूर्ण )

#### ऐतिहासिक कादंबऱ्या

१. म्हैसूरचा वाघ ( अपूर्ण )
२. उष:काल
३. केवळ स्वराज्यासाठीं
४. रूपनगरची राजकन्या
५. चंद्रगुप्त
६. गड आला पण सिंह गेला

७. सूर्योदय
८. मध्यान्ह ( अपूर्ण )
९. सूर्यग्रहण ( अपूर्ण )
१०. कालकूट ( अपूर्ण )
११. वज्राघात

## नाटकें

१. तीन नाटकें व तीन प्रहसनें
२. संगीत संत सखूबाई
३. संगीत सती पिंगला
४. भासकवीच्या नाटककथा

## गोष्टी

१. चाणाक्षपणाचा कळस
२. स्फुट गोष्टी ( भाग १-४ )
३. घटकाभर करमणूक [ अंक १ ते २४ ]
४. कसे दिवस गेले ?

## व्याख्यानें

१. मराठीचा अभ्यास
२. विदग्ध वाङ्मय
३. Wilson Philological Lectures—' Marathi ', Its Sources and Development
४. The Philosophy of Fiction
५. Realism in Fiction
६. The Teaching of the Bhagavadgītā
७. What is a Nation ?
८. Beauty
९. Joy of Life
१०. John Stuart Mill as revealed in his Letters
११. Ethics of Mahabharat

१२. प्राचीन काळचीं शस्त्रास्त्रें
१३. हास्य
१४. कादंबऱ्या
१५. मुलांस उपदेश
१६. शिक्षण ( शिक्षकांकरितां व्याख्यानें )
१७. प्रांतिक परिषदेचे स्वागताध्यक्ष म्हणून केलेलें भाषण

## अवांतर लेख व ग्रंथ

१. सहा अभंगांत तुकाराममहाराज
२. गीतांजली
३. केशवसुतांची कविता ( संपादित )
४. सगुणाबाईंचीं आपल्या मुलींस पत्रें
५. गोविंदरावांचीं आपल्या मुलांस पत्रें
६. मोर्लेसाहेबांच्या आठवणी ( मनोरंजन, मार्च १९२८ )
७. शेक्स्पिअरचें आत्मचरित्रपर काव्य ( अपूर्ण, चित्रमयजगत् )
८. संशयकल्लोळ-प्रस्तावना
९. हॅम्लेट ( आगरकरकृत ) प्रस्तावना
१०. शशिकला व रत्नपाल–( नारायण बापूजी कानिटकरकृत ) परीक्षणात्मक निबंध
११. कादंबऱ्यांचें उद्दिष्ट ( अनुपलब्ध, पुणें वैभव )
१२. विकारविलसित व वीरसेन ( टीकात्मक लेख )

## चरित्रें

१. न्या. महादेव गोविंद रानडे यांचें चरित्र
२. चक्रवर्तिनी महाराणी व्हिक्टोरिया
३. श्रीरामकृष्ण परमहंस
४. इसॉप
५. भक्त कन्नाप्पा नायर
६. आठ स्त्रीरत्नें

७. द्रौपदी
८. एडने जॉन लक्लेअर

## हरिभाऊंची कविता

१. शिष्यजनविलाप
२. जीवितसार ( भाषांन्तर ) The Psalm of Life )
३. भाऊबीज ( निबंधचन्द्रिका )
४. जाईचीं फुलें
५. शान्तिमंगल काव्य-उपोद्घात ( अनुपलब्ध )
६. Shelly's Sky-lark–भाषान्तर ( अनुपलब्ध )
७. Seven Stages—As You Like It–भाषान्तर (निबंधचंद्रिका)
८. ' भासकवीच्या नाटककथा ' ( यांतील भाषांतरांतील श्लोक )
९. ' गड आला पण सिंह गेला ' यांतील पोवाडा
१०. ' स्थितिं नो रे दध्याः ' या श्लोकाचें भाषान्तर

## अनुपलब्ध भाषान्तरें

१: तारा ( मेडोज् टेलर )
२. अनाथ पाडुरंग ( मेडोज टेलर )
३. ज्ञानेश्वरीचा शब्दकोश ( अप्रकाशित )

---

# कै. आपटे यांच्या ग्रंथांवरील प्रबंध

१. हरिभाऊ आपटे यांच्या कांहीं आठवणी व सामाजिक कादंबऱ्या—
बा. ना. देशपांडे, बी. ए., एलएल्. बी.
२. हरि नारायण आपटे, संक्षिप्त चरित्र—बा. मा. आंबेकर
३. हरि नारायण आपटे, कांहीं आठवणी व मनोरंजक प्रसंग-बा.मा. आंबेकर
४. हरिभाऊंचीं पत्रें—संग्राहक, श्री. काशीबाई कानिटकर

---

# इतर लेख

१. कै. हरि नारायण आपटे ( चरित्र )—लेखिका श्री. काशीबाई कानिटकर, ( विविधज्ञानविस्तार )
२. प. लो. हरि नारायण आपटे—ले आंबेकर, (मनोरंजन, एप्रिल, १९१९)
३. प. वा. हरि नारायण आपटे यांच्या कांहीं आठवणी—लेखक, बा. ना. देशपांडे, ( मनोरंजन, एप्रिल, १९१९ )
४. हरिभाऊंशीं दोन घटका—लेखक श्री. एकनाथ पांडुरंग रेंदाळकर, ( मनोरंजन, एप्रिल, १९१९ )
५. हरिभाऊंच्या वाङ्मयप्रासादाचें ओझरतें दर्शन—ले. वसंत नारायण नाईक, ( मनोरंजन, एप्रिल, १९१९ )
६. हरिभाऊंचा संदेश—ले. बा. मा. आंबेकर, (मनोरंजन, मार्च, १९२६)
७. हरिभाऊंचें 'मी '—ले. श्री. शारदाभक्त, (मनोरंजन, ऑक्टो०, १९१६)
८. अभिप्राय आणि परीक्षण–' मी '—ले. रा. वि. ओतूरकर, ( नवयुग, जानेवारी, १९१७ )
९. हरि नारायण आपटेकृत 'ऐतिहासिक कादंबऱ्या'—ले. न. र. फाटक, बी. ए., ( विविधज्ञानविस्तार, मार्च, १९२५ )
१०. 'पण लक्षांत कोण घेतो ?' परीक्षण—( विविधज्ञानविस्तार, जानेवारी ते एप्रिल, १८९४ )
११. 'मी 'चा निष्कर्ष—ले. प्रो. रा. प. सबनीस, ( मनोरंजन, मार्च १९२६ )
१२. मृत्युलेख—रा. रा. हरि नारायण आपटे—ले. संपादक, ( नवयुग, फेब्रुआरी, १९१९ )
१३. मृत्युलेख—रा. हरि नारायण आपटे—(केसरी, स्फुट, ४ मार्च, १९१९)
१४. मृत्युलेख—कै. हरि नारायण आपटे—(चित्रमयजगत्, मार्च, १९१९)
१५. तीन हरिभाऊ—(कविता) कवि, ग. ज. आगाशे
१६. मध्यान्ह–प्रस्तावना—ले. वा. म. जोशी
१७. हरिभाऊ आपट्यांची झूमर—ले. बा. ना. देशपांडे

१८. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्यांचें विहंगमदृष्टया अवलोकन—
ले. येरवडेकर

१९. हरि नारायण आपटे यांचें अल्प चरित्र—लेखक, वि. जि. नाडकर्णी,
( प्रस्तावना—केवळ स्वराज्यासाठीं इ० )

२०. हरिभाऊंचें कादंबरीमय चरित्र—ले. वा. ना. देशपांडे ( रत्नाकर, मार्च, १९२९ )

२१. कादंबऱ्या व नाटकें—ले. गं. कृ. लेले ( चित्रमयजगत्, मे, १९२१ )

२२. रूपनगरची राजकन्या—ले. बा. ग. मुर्डेश्वर, बी. ए.
(रत्नाकर, ऑगस्ट, १९२९ )

२३. हरिभाऊंचें समाजकार्य—ले. बा. मा. आंबेकर (रत्नाकर, मार्च, १९२६ )

२४. हरिभाऊंचीं पत्रें ( पुस्तक-परीक्षण )—ले. श्री. रा. पारसनीस
( मनोरंजन, मार्च, १९३० )

२५. भासकवीच्या नाटककथा—
(विविधज्ञान-विस्तार, जानेवारी, १९१८ )

२६. ह. ना. आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्या—ले. वा. ना. देशपांडे
(विविधज्ञान-विस्तार, एप्रिल, मे, जुलै, १९२० )

२७. जग हें असें आहे—( विविधज्ञान-विस्तार, एप्रिल, १९०२ )

२८. कै. हरिभाऊ आपटे यांच्या "मी" या कादंबरीवर चार विचार—
ले. वा. ना. देशपांडे ( विविधज्ञान-विस्तार, नोव्हेंबर, १९२२ )

२९. कै. हरिभाऊ आपटे ( कविता )—( विविधज्ञान-विस्तार, १९२३ )

# सूची

# सूचि

